महाराष्ट्र-ग्रन्थ-प्रदीपावलि : प्रदीप आठवा

सत्कार्योत्तेजक सभा–धुळें

श्री

रामदास आणि रामदासी

भाग १२१ वा

त्रिखंडात्मक

# सर ११ वा ] श्रीसमर्थचरित्र [ मणि ११ वा

प्रथम खंड

# श्रीसमर्थावतार

शाश्वत एकछत्री राजा । परम समर्थ स्वामी माझा ।
विश्वोद्धार लोककाजा । लीला अवतरला ॥

१८७१ वैशाख शुद्ध ९ शनिवार
तीनशेंवी श्रीशिवरायानुग्रहतिथि
राज्याभिषेक शक २७५

केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ-सदन, मुंबई ४

# महाराष्ट्रदर्शन करून देणारे ग्रंथप्रदीप

'महाराष्ट्र ग्रंथ प्रदीपावली'ला प्रारंभ होऊन १० वर्षें झालीं. ह्यापूर्वी सात प्रदीप प्रकाशित झाले. प्रस्तुतचा श्रीसमर्थावतार हा आठवा.

जितक्या उमेदीनें आम्हीं ह्या ग्रंथमालेचा संकल्प सोडला होता तितक्या समाधानकारक रीतीनें आणि त्वरेनें काम होऊं शकलें नाहीं ह्याची आम्हांला जाणीव आहे. ह्याला कारण मुद्रणाच्या धंद्यांत सदैव पाठीस लागलेल्या अडचणी हे तर आहेच, पण प्रत्येक ग्रंथ सुबक आणि शक्य तेवढा निर्दोष व परिपूर्ण व्हावा ह्या चोखंदळ दृष्टीबद्दल एक प्रकारें दिरंगाईच्या रूपानें द्यावी लागलेली ही किंमतही आहे. तरी ही भूमिका लक्षांत घेऊन प्रदीपावलीच्या ग्राहकांनीं आमच्यावर राग धरूं नये एवढीच विनंती आहे.

प्रदीपावलि हातीं घेण्याची प्रेरणा श्रीसमर्थकृपेनें आम्हांला झाली त्याला मराठींत किंवा महाराष्ट्रांत जें जें सत् व सनातन आहे तें तें ग्रंथमालेच्या रूपानें संकलित करावें ही इच्छा बरीचशी कारणीभूत होती. समर्थ सांगत कीं महाराष्ट्रधर्म वाढवावा. हा महाराष्ट्रधर्म म्हणजे केवळ शत्रूला तरवारीनें पाणी दाखवून मराठी राज्याच्या मर्यादा वाढवाव्यात एवढ्याच मर्यादित अर्थाचा धर्म नव्हता. महाराष्ट्रधर्म म्हणजे महाराष्ट्राचें विचारधन. हें विचारधन टिकवावें, वाढवावें, महाराष्ट्राची शतकानुशतकांची संस्कृतिपरंपरा जगापुढें मांडावी, महाराष्ट्राचें वैशिष्ट्य म्हणून जें कांहीं आहे त्याचें चिरस्मरण ठेवावें हाच समर्थाचा संदेश असावा. त्या संदेशानुसार थोडें कांहीं करावें हा प्रदीपावलि सुरू करण्याचा उद्देश. त्या उद्देशाला धरून प्रथम मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतील रामदासकालीन वाङ्मयाचा कै. पांगारकरकृत खंड प्रसिद्ध केला. त्यानंतर डॉ. पेंडसे ह्यांचें श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान प्रकाशित झालें. नवयुगधर्ममालाकार श्री. स. कृ. फडके ह्यांनीं तिसऱ्या प्रदीपाकरवीं अकरा हनुमन्तांशीं हितगुज केलें. त्यानंतर बऱ्याच कालावधीनें श्री. शंकर श्रीकृष्ण देव ह्यांनीं श्रीसमर्थहृदय उघडें केलें, श्रीसमर्थसंप्रदाय जनतेपुढें मांडला. हे अनुक्रमें चौथा व पांचवा प्रदीप. ह्यानंतर संतवाङ्मय क्षणभर बाजूस सारून आधुनिक साहित्याचा परामर्श केशवसुत ह्या प्रा. रा. श्री. जोग ह्यांच्या ग्रंथद्वारें घेण्यांत आला; तो सहावा प्रदीप. सातवा प्रदीप म्हणजे दादोबा पांडुरंग ह्यांचें श्री. अ. का. प्रियोळकर ह्यांनीं संपादिलेलें आत्मचरित्र व चरित्र. अशा रीतीनें ज्ञानेश्वरकालापासून तों केशवसुतांपर्यंत शेंकडों कवींनीं, साधु-संतांनीं, तत्त्वज्ञान्यांनीं महाराष्ट्राच्या विचारसंपदेंत जी भर टाकली तिचा हा त्रोटक उडता अपुरा परामर्श प्रदीपावलीनें घेतला. ज्ञानेश्वरांपूर्वी मराठी म्हणजे प्राकृत अतएव तुच्छ अशिष्ट भाषा समजून पंडित मंडळींत तिला मान नसायचा.

ज्ञानोबांनीं प्रथमच ' माझा मऱ्हाठाचि बोल कौतुकें। ऐशीं अक्षरें रसिकें मेळवीन।' असें आव्हान देऊन संस्कृताच्या प्रामादाबाहेर सरस्वतीला पदन्यास करायला लावला आणि महाराष्ट्रशारदा बहुजनसमाजापुढें मराठमोळ्या वेषांत अवतरली. साहित्याच्या दरबारांत मराठीला मान चढला आणि ह्या प्राकृत भाषेला सुरेख सालंकृत स्वरूप येत चाललें. त्या स्वरूपाची छाननी आणि सुव्यवस्थित मांडणी करणारे अनेक भाषाशास्त्री होऊन गेले. त्यांतले सर्वांत आधुनिक म्हणजे दादोबा पांडुरंग होत ह्याबद्दल वाद नाहीं. तेव्हां एका दृष्टीनें प्रदीपावलीनें साहित्यदृष्ट्या तरी बऱ्याच मोठ्या कालखंडाचा आढावा घेऊन एक कामगिरी पार पाडली आहे. तीही अर्थात् अपूर्ण स्वरूपाची आहे. पण गांगायचें असें कीं प्रदीपावलीचें क्षेत्र साहित्यापुरतें मर्यादित नव्हतें. औद्योगिक, शैक्षणिक, राजकीय वगैरे सर्वच क्षेत्रांतलें महाराष्ट्राचें ' कृतिधन ' निःपक्षपाती दृष्टिकोन ठेवून जनतेपुढें मांडायचें असा मोठा हेतु होता. तो अजून साध्य झालेला नाहीं. प्रयत्नांत आहों एवढेंच.

प्रस्तुत श्रीसमर्थावतार हा आमच्या समर्थवाङ्मयांत मोलाची भर टाकणारा आहे असें खुद्द आम्हांलाही अभिमानानें म्हणावेंसें वाटतें. श्री. शंकर श्रीकृष्ण देव ह्यांच्यासारखे समर्थभक्त लेखक, त्यांची प्रासादिक लेखनशैली आणि अखंड परिश्रम ह्या ग्रंथामागें आहेत. ग्रंथाची सजावट चांगली करण्यासाठीं आम्हींही आमच्याकडून परिश्रम घेतले आहेत. महाराष्ट्रशारदेची ही सेवा ईश्वरचरणीं रुजू होवो एवढीच प्रार्थना.

श्री

ता. ............................ १९

व्यवस्थापक,

महाराष्ट्र-ग्रंथ-प्रदीपावलि,

श्रीसमर्थ–सदन, बनाम हॉल लेन, गिरगांव, मुंबई ४

सा० न० वि० वि०

आपल्या महाराष्ट्र – ग्रंथ – प्रदीपावलीची योजना व सर्वसाधारण नियम वाचले. योजना पसंत असून नियमही मान्य आहेत. प्रवेश फी * ........... पाठविली आहे. तरी माझें नांव नोंदून ग्रंथ जसजसे प्रसिद्ध होत जातील तसतसे माझ्याकडे पाठवीत जावे. कळावें, हे विनंती.

आपला,

सही ............................................................

संपूर्ण नांव ............................................................

मु० पो० ............................................................

जि० ............................................................

---

* मनीऑर्डरनें अगर सोबत.

# ग्रंथ-प्रदीपावलीसंबंधीं सर्वसाधारण नियम

( १ ) आश्रयदात्यांनीं आरंभीं फक्त एक रुपया प्रवेश फी द्यावयाची व नांव नोंदवून घ्यावयाचें.

( २ ) दर वर्षी साधारणपणें दोन ग्रंथ प्रकाशित होतील. ग्रंथ प्रकाशित होतांच आश्रयदात्यांस सूचनापत्र जाईल. त्याप्रमाणें बाहेरगांवच्या मंडळींनीं पोस्टेजसह किंमत पाठवावी म्हणजे त्यांस रजिस्टर्ड बुकपोस्टनें पुस्तक पाठवूं. स्थानिक आश्रयदात्यांनीं समक्षच घेऊन जावींत. व्ही. पी. उभयपक्षीं सोईची नाहीं.

( ३ ) आश्रयदात्यांस प्रदीपावलींतील पुस्तकें तर पाऊणपट किंमतीनें मिळतीलच; पण आमचीं इतर प्रकाशनेंही व्यापारी दरानें मिळतील.

( ४ ) आश्रयदात्यांनीं सोबतचें पत्रक भरून पाठवावें.

# अनुक्रमणिका

| विषय | पृष्ठांक |
| --- | --- |
| (१) उल्लास पहिला | |
| ग्रन्थारंभ ... ... ... ... | १ |
| (२) उल्लास दुसरा | |
| पूर्वज ... ... ... ... | २७ |
| **पूर्वार्ध** | |
| (३) उल्लास तिसरा | |
| अवतरण आणि बाळपण ... ... | ३९ |
| (४) उल्लास चौथा | |
| श्रीरामकृपा ... ... ... ... | ५३ |
| (५) उल्लास पांचवा | |
| संगत्याग ... ... ... ... | ६१ |
| (६) उल्लास सहावा | |
| पुरश्चरण ... ... ... ... | ६९ |
| (७) उल्लास सातवा | |
| तीर्थाटण–उत्तरेकडे ... ... ... | ८५ |
| (८) उल्लास आठवा | |
| आईची भेट ... ... ... | १०१ |
| (९) उल्लास नववा | |
| तीर्थाटण–दक्षिणेकडे ... ... ... | १०९ |
| (१०) उल्लास दहावा | |
| देशस्थिति ... ... ... ... | ११९ |
| **उत्तरार्ध** | |
| (११) उल्लास अकरावा | |
| कृष्णातीरगमन-मारुतीस्थापना ... | १९३ |
| (१२) उल्लास बारावा | |
| श्रीरामसंस्थापना ... ... ... | २०५ |

| विषय | पृष्ठांक |
|---|---|
| (१३) उल्लास तेरावा | |
| घळी आणि मठ ... ... ... | २२१ |
| (१४) उल्लास चौदावा | |
| श्रीशिवसमर्थ ... ... ... | २३५ |
| (१५) उल्लास पंधरावा | |
| पंचायतन ... ... ... ... | २७३ |
| (१६) उल्लास सोळावा | |
| गाथाचरित्रें ... ... ... | २९१ |
| (१७) उल्लास सतरावा | |
| श्रीसमर्थांचीं वैशिष्ट्यें ... ... | ४२९ |
| (१८) उल्लास अठरावा | |
| श्रीसमर्थांनीं केलेलें आत्मचरित्राचें सिंहावलोकन | ४५९ |
| (१९) उल्लास एकोणविसावा | |
| निर्याण आणि पश्चात् ... ... ... | ४७१ |
| (२०) उल्लास विसावा | |
| ग्रन्थाचा शेवट ... ... ... | ४८७ |
| **परिशिष्टें** | |
| ( १ ) वाकेनिसी टिपण ... ... | ५०५ |
| ( २ ) बखरीवरून शकावली ... ... | ५१३ |
| ( ३ ) श्रीरामजानकीसंवाद ... ... | ५२३ |
| ( ४ ) मेरुस्वामींच्या शब्दांत ... ... | ५२९ |
| ( श्री ) अभिवंदन | |
| ( रा ) कृपावलोकन | |
| ( म ) वरदान | |
| ( दा ) उपदेशरहस्य | |
| ( स ) आपलें भाग्य | |

# चित्रें


| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| (१) श्रीसमर्थवाग्देवतामंदिर | ... | ... | पृ० | १९ | समोर |
| (२) जांब येथील श्रीराममंदिर | ... | ... | ,, | ४६ | ,, |
| (३) जांब येथील श्रीसमर्थमंदिर | ... | ... | ,, | १०६ | ,, |
| (४) जांब येथील श्रीसमर्थमूर्ति | ... | ... | ,, | १०७ | ,, |
| (५) मारुती | ... | ... | ,, | २०१ | ,, |
| (६) चाफळचे श्रीराम | | ... | ,, | २१० | ,, |
| (७) चाफळ मठाचा पुढचा दरवाजा | | ... | ,, | २१२ | ,, |
| (८) चाफळ येथील बाह्य देखावा | | ... | ,, | २१३ | ,, |
| (९) रामघळ | ... | ... | ,, | २२३ | ,, |
| (१०) समर्थें अफझलखानासि मारविलें | | ... | ,, | २४८ | ,, |
| (११) शेजघरांतील श्रीसमर्थांची तसबीर | | ... | ,, | २६४ | ,, |
| (१२) श्रीकल्याण | ... | ... | ,, | ३२६ | ,, |
| (१३) श्रीकल्याणांचें हस्ताक्षर | ... | ... | ,, | ४४९ | ,, |
| (१४) माघ वद्य ५ स आलेली मूर्ति | | ... | ,, | ४७६ | ,, |
| (१५) समाधिमंदिर | ... | ... | ,, | ४७८ | ,, |
| (१६) श्रीसमर्थांची समाधि | ... | ... | ,, | ४७९ | ,, |



## उ ल्ला स प हि ला

# ग्र न्था रं भ



श्रीगुरुचरणांतें स्मरोनी ।
सकळ पूर्वचरित्रग्रंथ अवलोकुनी ।
जें जें मानेल माझिये मनीं ।
तें तें लिहीन स्वच्छंदें ॥

वाचेसी न दिसे दुसरें काम ।
कैंचा मनाला आणीक संभ्रम ।
म्हणोनि मांडिला चरित्रउदिम ।
लाभ सर्वत्रां व्हावया ॥

[ (१) नमन – (२) कृपेची याचना – (३) हनुमंतस्वामीकृत श्रीसमर्थांच्या बखरीचें महत्त्व – (४) तिचें प्रामाण्य – (५) एकंदर बखरीचें स्वरूप –

( ६ ) तात्पर्य – ( ७ ) तंजावरमठपति भीमस्वामीकृत श्रीचरित्र – ( ८ ) तिसगांवमठपति दिनकरकृत स्वानुभवदिनकर – ( ९ ) बीडमठपति गिरिधरकृत श्रीसमर्थप्रताप – ( १० ) त्याची अपूर्वता – ( ११ ) त्यांतील संकेत – ( १२ ) मन्नारगुडीच्या मेरुस्वामींचा रामसोहळा ग्रंथ – ( १३ ) त्यांचा च भीमोपदेश ग्रंथ – ( १४ ) उद्धवसुतकृत श्रीचरित्र – ( १५ ) शिरगांवमठपति भीमस्वामीकृत भक्तलीलामृत ग्रंथ – ( १६ ) दासविश्रामधाम – ( १७ ) त्याची योग्यता – ( १८ ) त्याची अपूर्व रचना – ( १९ ) त्याच्या प्रती – ( २० ) राजारामप्रासादींची भक्तमंजरीमाला – ( २१ ) आत्मारामबोवाकृत श्रीचरित्र – ( २२ ) बाबाजी अनंत तेंडुलकर – ( २३ ) श्रीरामदासगुणार्णव – ( २४ ) महीपतिकृत संतविजय – ( २५ ) चरित्राचरित्रांत फरक – ( २६ ) कालक्रमानुसार चरित्र नाहीं – ( २७ ) अलीकडच्या काळांत लिहिलेलीं चार चरित्रें – ( २८ ) श्रीचरित्र लिहिण्याचा क्रम अखंड चालणार – ( २९ ) श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमाला आणि मासिक पुस्तक – ( ३० ) श्रीसमर्थवाङ्मयाचा पूर्णावतार – ( ३१ ) ऐतिहासिक पुरुषांचें चरित्र समजण्याला तत्कालीन देशस्थितीचें ज्ञान आवश्यक – ( ३२ ) इटालियन प्रवासी मनुसी – ( ३३ ) फ्रेंच प्रवासी टॅव्हरनिअर – ( ३४ ) त्याचा च देशबंधु बर्निअर – ( ३५ ) जर्मन प्रवासी मॅन्डेलस्लो – ( ३६ ) इतर प्रवासी – ( ३७ ) यांच्या प्रवासवर्णनग्रंथांचा परिणाम – ( ३८ ) इतिहासकार फेरिस्ता – ( ३९ ) इलियट आणि डौसन यांचे इतिहासखंड – ( ४० ) माझे आधार – ( ४१ ) श्रीसमर्थचरित्राची अपूर्वता – ( ४२ ) फलश्रुति ]

×××। ×××। ×××। ×××। ×××।

**मम जननी रे मम जनकु रे। मम स्वामी हा रे मत्सखा हा रे॥ १**
**सुखकारकु रे दुःखहारकु रे। भवतारकु रे उद्धारकु रे॥ २**
**करुणाकरु रे गुणसागरु रे। पूर्वापरु रे दासा वरु रे॥ ३**

**गणेशः शारदा चैव। सद्गुरुः सज्जनस्तथा।**
**आराध्यदैवतं गुह्यं। सर्वं मे रघुनंदनः॥ १**

**गणेश शारदा सद्गुरु। संत सज्जन कुळेश्वरु।**
**माझा सर्व हि रघुवीरु। सद्गुरुरूपें॥ २**

**माझें आराध्य दैवत। परम गुह्य गुह्यातीत।**
**गुह्यपणाची हि मात। न चले तेथें॥ ३**

**आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं।**
**श्रीरामं मारुतिं वंदे श्रीरामदासं जगद्गुरुम्॥ १**

जय जय देवा ब्राह्मण्यगुरु ।
जय जय देवा परम गुरु ।
जय जय देवा परात्पर गुरु ।
नरनारायण अवतरसी ॥ १

जय जय वैराग्यभाग्यउदया ।
जय जय ज्ञानविज्ञानसूर्योदया ।
जय जय अनंत अपार स्वरूपोदया ।
उदयअस्तेविण विराजसी ॥ २

जय जय गिरिकंदरनिवासा ।
जय जय देवा जगन्निवासा ।
जय जय मुनिमानसहंसा ।
आत्मयारामा सुखमूर्ति ॥ ३

दीनदयाळा सद्गुरुराया शरण तुझ्या चरणा ।
एकवार मज दर्शन देउनि कृतार्थ करि दीना ॥ १

दीनदयाळा सद्गुरुराया हृदय कठिण कां रे ।
काय करूं रे प्राणसखया धरिलें दुरि कां रे ॥ २

दीनदयाळा सद्गुरुराया उपेक्षिलें तुम्हि जरी ।
कोण भरंवसा ठेविल वचनीं तुमच्या पुनरपि तरी ॥ ३

दीनदयाळा सद्गुरुराया धांवत या, या क्षणीं ।
धर्म बुडाला देश भंगला वालि न उरला कुणी ॥ ४

दीनदयाळा सद्गुरुराया कृपा मजवरी करा ।
चरित्र अपुलें लिहा आपण चि धरूनियां मम करा ॥ ५

(२) **श्रीसमर्थावतार, श्रीसमर्थहृदय** आणि **श्रीसमर्थसंप्रदाय,** असें श्रीसमर्थांचें त्रिखंडात्मक चरित्र लिहिलें जावें, अशी आतां शेवटची इच्छा आहे. पहिल्या खंडांत जन्मापासून समाधीपर्यंतचा त्यांचा वृत्तान्त सांगावा, दुसऱ्या खंडांत त्यांच्या अंतरंगांतील तरंग आपणांस कळावे, या दृष्टीनें त्यांच्या संपूर्ण वाङ्मयाचें निरीक्षण करावें आणि त्यांनीं प्रवर्तित केलेल्या संप्रदायाचीं लक्षणें कोणतीं, त्या काळीं या संप्रदायाचें स्वरूप कसें स्पृहणीय होतें आणि आतां कसें निकृष्ट झालें आहे व तें च पुन्हां पूर्वींसारखें कशानें होईल, याचा विचार तिसऱ्या खंडांत करावा, असा हेतु आहे. पण तो पूर्ण

कसा व्हावा ? माझी धारणाशक्ति फार अल्प आहे, त्यामुळें मनांत योजिलेलें कार्य कसें पार पडेल, याची चिंता वाटते. श्रीसमर्थांनीं च कृपा केली पाहिजे. ते करतील, असा विश्वास वाटतो. नाहीं तर, त्यांनीं मला इतका तरी थारा कशास दिला असता ! पूर्वजांचें कांहीं भाग्य होतें, शिवाय अनेक पूर्व जन्मांत माझ्या हातून जें पाप आणि पुण्य घडत गेलें, त्या पापपुण्याची बेरीज-वजाबाकी होऊन तळाशीं पुण्याचा किंचित् अंश उरला असला पाहिजे, एऱ्हवीं त्यांच्या चरणांकडे लक्ष कां लागतें ? तेव्हां

**तया सुकृताच्या गुणें मोक्षराशी ।**
**समर्था प्रभू तूं मला जोडलासी ।**
**परिच्छिन्न केला मनाचा निवाडा ।**
**मतीमंद मी काय वर्णूं पवाडा ॥**

तेव्हां त्यांची कृपा, हा च आपला मुख्य आधार. तसें च, आजपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं श्रीसमर्थांच्या लीला वर्णिल्या, त्या सर्वांचा येथें क्रमशः निर्देश करून त्यांच्या हि साहाय्याची मी याचना करतों.

(३) श्रीहनुमंतस्वामीकृत **श्रीसमर्थांच्या बखरीचे** मजवर अनंत उपकार आहेत. ऐतिहासिक दृष्ट्या तिचें प्रामाण्य कसें हि असो, प्रथम तिनें माझें मन श्रीसमर्थचरणांकडे वेधून घेऊन मला कायमचें ऋणी करून ठेविलें आहे. तुमच्याप्रमाणें च मी हि ती सर्वस्वीं च प्रमाण मानतों, असें नव्हे, पण म्हणून मी तिला दूर सारीत नाहीं. बडोदें येथील लक्ष्मणमहाराजांच्या मठांतील आचारविचारवान् निष्ठावंत रामदासी कै. दादामहाराज मला एकदां म्हणाले, तें च मी सर्वांना सांगेन. दादामहाराज म्हणाले, जसे रोज श्रीमत् ग्रन्थराज दासबोधांतील दोन समास आणि श्रीश्लोक मनाचे अकरा नित्य नियमानें वाचावयाचे, तसा च प्रत्यहीं नियमानें बखरींतील कांहीं भाग क्रमशः वाचीत जावा. मी हि सर्वांना नम्रतापूर्वक सुचवीन कीं, काय चिकित्सा करावयाची असेल, ती पुढें करा, आधीं भक्तिभावानें बखर वाचा, ती वाचून श्रीसमर्थचरणीं तुमचें भक्तिप्रेम जडलें, म्हणजे मग करवेल तितकी चिकित्सा साऱ्या जन्मभर करा, त्या चिकित्सेनें तुमचें भक्तिप्रेम दृढावत च जाईल; पण आपण आधीं च संशयवृत्तीनें चिकित्सा करूं लागूं, तर श्रीसमर्थ आपणांकडे पाठ फिरवितील आणि त्यांचे चरण मात्र आपणांस दुरावतील.

(४) श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत बखरीच्या ज्या अनेक प्रती आहेत, त्या पाहून असें दिसतें कीं, या बखरीवर वेळोवेळीं अनेक संस्कार झाले असावेत. ही बखर रचली गेली तेव्हांपासून च तिच्यावर आक्षेप हि घेण्यांत आले होते, असें बाडांक ३९६ तील एका पत्रावरून दिसतें. पण हें सर्व खरें असलें तरी बखरींत वर्णन केलेले सर्व प्रसंग, दिलेल्या शकमित्या, सांगितलेल्या सर्व गोष्टी केवळ निराधार आणि काल्पनिक असतील, असें मानणें कठीण आहे. माझ्या अल्प मतीला पटेल, तेथें मी बखरीला शरण जाऊन तिचा आधार घेणार आहें.

(५) ऐतिहासिक पुराव्यांत बखरींपेक्षां कागदपत्रांचें महत्त्व विशेष होय, असें प्रतिपादण्यांत येत असतें. हें प्रतिपादन मला सर्वस्वीं मान्य करवत नाहीं. आज जगांत सर्वत्र चाललेलें राजकारण आपण पहात च आहोंत. तसें च त्याचें स्वरूप पूर्वकाळांत हि असलें पाहिजे. राजकारण सर्व काळीं सारखें च असणार. राजकीय धोरणामुळें, कागदपत्रांतील मजकूर खरा च असतो, असें आजचें राजकारण पाहून आपणांस खात्रीनें म्हणतां येईल काय? ती च कथा सर्व काळच्या राजकारणी कागदपत्रांची. तें कांहीं असो, मला स्वतःला कागदपत्रांइतक्या च बखरी हि महत्त्वाच्या वाटतात. बखरींची भाषा, ही मला जिवंत वाणी वाटते. ती जिवंत माणसांनीं जिवंत लोकांसाठीं लिहिलेली असते. कोणती हि एकादी पूर्वकालीन बखर घ्या आणि हल्लींच्या काळांत जे ऐतिहासिक ग्रंथ लिहिले गेले आहेत, किंवा लिहिले जात आहेत, त्यांच्याशीं ताडून पहा. तुमच्या तत्काळ लक्षांत येईल कीं, एकाची वाणी जिवंत माणसाची असते, तर दुसऱ्याची मेलेल्या माणसाची असते. स्वातंत्र्य हें जिवंतपणाचें लक्षण होय व पारतंत्र्य म्हणजे मृत्यु च. स्वातंत्र्यांत सत्य निर्भय असतें, पारतंत्र्यांत सत्यकथनाला भ्यावें लागतें. स्वातंत्र्यांत मन मोकळें असतें, पारतंत्र्यांत त्यावर दडपण पडलेलें असतें.

स्वातंत्र्याच्या काळांत बखरी लिहिल्या गेलेल्या असल्यामुळें वाचकाच्या मनाला त्या फार चटका लावतात. हनुमंतस्वामीकृत बखरीची गोडी आमच्या भाषेंत केव्हां हि येणें शक्य नव्हे. आम्ही मेलेलीं माणसें. आतांशीं कोठें जिवंत होऊं पहात आहोंत. श्रीसमर्थांची च बखर असें नव्हे, तर स्वतंत्र काळांत लिहिली गेलेली कोणती हि बखर पहा व अलीकडच्या काळांतील

कोणत्या हि लेखकाच्या ऐतिहासिक लिखाणाशीं ती ताडून पहा, म्हणजे दोहोंतला फरक सहज दिसून येईल. हा दोष हल्लींच्या लेखकांचा, तुमचा, माझा किंवा आणखी कोणाचा हि नसून तो भिन्न परिस्थितीचा परिणाम होय.

(६) तात्पर्य, हनुमंतस्वामीकृत बखरीला माझे शतशः प्रणाम आहेत. तिची भाषा फार मोहक आहे. श्रीसमर्थकार्यांत माझा जन्म तिच्या पोटीं झाला, याचा मला केव्हां हि विसर पडत नाहीं. मी तिला माझी आई मानतों. आईच्या कुशींत निजतांना बालकाला जो निरतिशय आनंद होत असतो, त्याचा अनुभव बखर वाचींत असतां मला येत असतो.

(७) बखरीनंतर नमन करावयाचें तें तंजावरमठपति भीमस्वामींना. हे राहणारे मसूरजवळच्या शहापुरचे. ते शक १५९७ त श्रीशिवाजीमहाराजां-बरोबर तंजावरकडे गेले, ते तेथें च मठ करून राहिले. श्रीसमर्थांच्या निर्याणानंतर तिसऱ्या दिवशीं ते सज्जनगडीं येऊन पोचले. त्यांनीं लिहिलेलें श्रीसमर्थांचें त्रोटक चरित्र, **श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें**, या रामदास आणि रामदासी ग्रन्थमालेंतील दुसऱ्या भागांत आपण प्रकाशित केलेलें आहे. त्यांत विशेषतः त्यांनीं केलेला विलाप आहे. पण तो वाचकाच्या जीवाला चटका लावतो. घ्या थोडा अनुभव :

**कैं मी पाहिन आतां सद्गुरु समर्था ।**
**निशिदिन चिंतन करितां धणी न पुरे या चित्ता ।**
**तळमळ तळमळ जीव करित अती ।**
**न धरत धीर पळ विकळ अवस्था ॥ ध्रु० ॥**

**तन मन धन गेहे ठावो कारण भावाभावो ।**
**स्वरूपीं सकळ हि वावो भेटल्या सद्गुरुरावो ।**
**चरणकमळीं मस्तक वाहिन ।**
**विलया जाइल जन्मकथा ॥ १ ॥**

**सज्जनगड जो वासी । केव्हां जाइन त्यापासीं ।**
**दुर्लभ पादुका दृष्टीसी । अवलोकिन अहर्निशीं ।**
**निश्चय हा मम अंतरिचा परी ।**
**प्रारब्ध कैसें न कळे पाहतां ॥ २ ॥**

**समर्थसमाधी जेथें । सुकृति जन बहु तेथें ।**
**सर्वस्व चित्तें वित्तें । पूजिती पूर्ण ब्रह्मातें ।**
**धन्य धन्य भाग्यवंत सहवास घडला ।**
**दुर्लभ जाला मज असतां ॥ ३ ॥**

**श्रवणीं सद्गुण परिसे । नयनीं निजरूप पैसे ।**
**सुमनीं तन्मय सरिसें । वदनीं कीर्तन विलसे ।**
**मुनिमनमोहन माझें हि जीवन ।**
**करुणार्णवघन भीमवरदाता ॥ ४ ॥**

या च भीमस्वामींनीं श्रीसमर्थांच्या अंतकाळचें वर्णन पन्नास ओव्यांत केलेलें, श्रीसांप्रदायिक विविध विषयांक २५ यांत प्रकाशित केलें असून तें विशेष महत्त्वाचें आहे. त्या वेळचें इतकें विस्तृत वर्णन दुसऱ्या कोणीं केलेलें नाहीं. तें पुढें निर्याणाच्या प्रकरणांत उद्धृत करण्याचा माझा विचार आहे.

(८) यानंतर मला स्मरण होतें **स्वानुभवदिनकर** या अप्रतिम, प्रतिदासबोध ग्रन्थाचे कर्ते तिसगांवमठपति दिनकर यांचें आणि त्यांच्या नुसत्या स्मरणानें हि माझें मन उल्हसित होतें. दिनकरांवर श्रीसमर्थांची कृपा १५७६ च्या फाल्गुन शुद्ध पौर्णिमेस झाली आणि त्यांनीं आपला स्वानुभवदिनकर ग्रन्थ १६१६ त म्हणजे श्रीसमर्थांच्या पश्चात् तेरा च वर्षांनीं पूर्ण केला आहे.

**अहो रामदासकृपा ते चि पूर्णिमा पूर्ण ।**
**तेथ स्वानुभवचंद्राचें पूर्णपण ।**
**दिनकरसुखाब्धि मर्यादा सांडून ।**
**अमर्याद उचंबळला ॥**

—स्वानुभवदिनकर १६.४.१०६

तो जो सुखाब्धि उचंबळला तो स्वानुभवदिनकर ग्रन्थाच्या रूपानें प्रकट झाला. त्या ग्रन्थांत ठिकठिकाणीं दिनकरांनीं श्रीसमर्थांचा उल्लेख करून निस्सीम श्रीगुरुभक्तीचे जे प्रेमळ उद्गार काढले आहेत, त्यांच्या योगानें हा ग्रन्थ फार आकर्षक झाला आहे. ते उद्गार वाचीत असतां श्रीसमर्थभक्तांचीं अंतःकरणें प्रेमानें भरून आल्यावांचून व त्या प्रत्येक उद्गाराचे ठिकाणीं कायमचा च मुक्काम करावा कीं काय, असें वाटून त्यांची

वृत्ति तावत् तदाकार झाल्यावांचून रहात नाहीं. असा हा निरुपम ग्रन्थ आहे. त्याचे सोळा कलाप असून प्रत्येक कलापांत पांच पांच किरणें आहेत. सोळाव्या कलापाच्या चौथ्या किरणांत श्रीसमर्थांवर श्रीरामाची व आपणावर श्रीसमर्थांची कृपा कशी झाली, याचें त्यांनीं केलेलें वर्णन अगदीं नवीन आहे. त्या प्रसंगाचें इतकें विश्वसनीय निवेदन दुसरीकडे कोठें हि आढळत नाहीं. पण त्यामुळें च माझा जीव कासावीस होऊन दिनकरांचा मला राग आला. श्रीसमर्थभक्तांच्या जीवाचें सार्थक करण्यास श्रीमत् ग्रन्थराज दासबोध हा एकटा ग्रन्थ समर्थ आहे. दिनकरांनीं प्रतिदासबोध ग्रन्थ निर्माण करण्याच्या ऐवजीं त्या ग्रन्थाएवढें मोठें श्रीसमर्थचरित्र च लिहिलें असतें, तर आम्हा सांप्रदायिकांना ब्रह्मानंद झाला असता ! त्यांना सत्तावीस वर्षें श्रीसमर्थांचा सहवास लाभला होता. त्यांनीं श्रीसमर्थचरित्र लिहावयास पाहिजे होतें. तें लिहिलें नाहीं, म्हणून त्यांच्यावर माझा राग आहे, तो लपवून कशास ठेवूं ? नमनाची माझी ही अशी विचित्र तऱ्हा आहे. मी जाणतों, ते कृपाळु आहेत. माझें हृदय त्यांच्या पुढें खुलें आहे. मी त्यांची क्षमा मागतों, कृपा असावी म्हणून याचना करतों.

(९) यानंतर मला स्वाभाविकपणें स्मरण होतें, लहानमोठ्या बेचाळीस ग्रन्थांचे व सात रामायणांचे कर्ते गिरिधर, यांचें. कारण त्यांच्यावर हि माझा थोडा राग आहे च. त्यांचा मठ वीड येथें होता. त्यांच्या पश्चात् त्या एका मठाचे आज दोन मठ झाले आहेत. म्हणजे मठांना हि आज प्रापंचिक स्वरूप प्राप्त झालें आहे, याचा हा साक्षात् पुरावा होय. श्रीसमर्थांचा ज्याला कांहीं काळ तरी सहवास घडला, अशानें त्यांचें साद्यंत चरित्र म्हणून लिहिलेलें, गिरिधरकृत **श्रीसमर्थप्रताप** हें एक च एक चरित्र आतांपर्यंत उपलब्ध आहे. ग्रन्थारंभीं त्यांनीं

**समर्थस्वामीचीं चरित्रें ।**
**कांहीं देखिलीं ऐकिलीं पुण्य श्रोत्रें ॥**

असें म्हटलें आहे. अर्थात् ऐकिलीं म्हणजे सुद्धां कल्याण, उद्धव, आक्का, वेणाबाई, इत्यादि श्रीसमर्थांच्या प्रत्यक्ष सहवासांत असलेल्यांच्या तोंडून, क्वचित् श्रीसमर्थांच्या तोंडून हि, असें मानतां येईल. श्रीसमर्थ सज्जनगडावर शेवटचीं कांहीं वर्षें रहावयास गेले होते, त्या काळांत तर गिरिधर त्यांच्यापाशीं च होते. प्रतापाच्या नवव्या समासांत सज्जनपर्वत-

निवासमहिमानें निवेदन केलेलीं आहेत, तीं तर प्रत्यक्ष त्यांच्या पाहण्यांतलीं असून

**देखिलीं लिहिलीं यथार्थ हो ॥**

असें त्यांनीं त्या समासाच्या शेवटीं शेवटीं म्हटलें आहे. असें हें सर्वतोपरि अत्यंत विश्वसनीय श्रीसमर्थचरित्र होय.

गिरिधरांनीं समाधी घेतली शक १६५१ त आणि त्यांनीं प्रतापांत एका ठिकाणीं रामचंद्र नीळकंठांच्या समाधिवृंदावनाचा उल्लेख केला आहे, ते रामचंद्र नीळकंठ अमात्य समाधिस्थ झाले होते शक १६४४ त. तेव्हां शक १६४४ आणि १६५१ यांच्या दरम्यान केव्हां तरी श्रीसमर्थप्रताप ग्रन्थाची रचना झाली, हें उघड आहे. या ग्रन्थाची योग्यता फार मोठी आहे. त्याचे एकवीस समास असून, सर्व मिळून ओवीसंख्या १३३२ आहे, तरी मला हें हि चरित्र त्रोटक च वाटतें. तेराशें बत्तीस ऐवजीं तेरा हजार बत्तीस ओव्यांत त्यांनीं श्रीचरित्र वर्णावयास पाहिजे होतें; असो. १३३२ ओव्यांचें तरी त्यांनीं आपणांस चरित्र देऊन आपलें बरें च समाधान केलें, हे त्यांचे उपकार होत.

(१०) सर्व च ग्रन्थ अपूर्व आहे, पण त्यांत हि तेरावा समास विशेष च. त्या समासांत सीतामाईनें श्रीरामचंद्रांना, श्रीसमर्थांच्या देखत श्रीसमर्थांविषयीं, हे कोण, कोठील, येथून आरंभ करून, यांचें नित्य नियमानें कोठें दर्शन घ्यावें, येथपर्यंत पांच पन्नास प्रश्न विचारले आहेत व त्या प्रश्नांचीं श्रीरामचंद्रांनीं उत्तरें दिलीं आहेत. गिरिधरांनीं कल्पना केली आहे ती अशी : श्रीराम आणि जानकी यांच्या ठिकाणीं सर्व ब्रह्मांडांतील गृहस्थाश्रम एकवटला असून त्यांच्याकडे श्रीसमर्थ भिक्षेला गेले. तेव्हां त्या दंपतींनीं श्रीसमर्थांचा सत्कार करून त्यांना भोजनास बसवून श्रीराम स्वतः अभिश्रवणास बसले. ब्राह्मणांना भोजनास बसवून यजमानानें जें वैदिक सूक्त म्हणावयाचें, त्यास अभिश्रवण म्हणतात, हें सर्वांना ठाऊक च आहे. प्रस्तुत प्रसंगीं एकादें वैदिक सूक्त न म्हणतां श्रीराम आणि जानकी यांचा श्रीसमर्थांविषयीं जो संवाद झाला, तो च येथें अभिश्रवणस्थानीं मानला आहे! गिरिधरांनीं ही किती अपूर्व आणि गोड कल्पना केली आहे. रामानें सीतेला सांगितलेलें

श्रीसमर्थचरित्र ! तें उपलब्ध असल्यावर आणखी काय पाहिजे ! हा समास अनेक श्रीसमर्थभक्तांनीं कठगत केल्याचें मीं पाहिलें आहे. तो सर्वांना च कंठगत असावा, म्हणून तो परिशिष्टरूपानें या ग्रंथाला जोडण्याचा माझा विचार आहे.

( ११ ) गिरिधरांचे आपणांवर इतके जरी उपकार आहेत, तरी त्यांच्यावर हि माझा राग आहे च. प्रतापाच्या अठराव्या आणि एकोणिसाव्या समासांत त्यांनीं श्रीसमर्थचरित्रांतील सुमारें शंभर प्रसंगांचा उल्लेख नुसत्या संकेतांनीं केला आहे. या वेळच्या लोकांच्या डोळ्यांपुढें ते ते प्रसंग प्रत्यक्ष घडलेले असल्यामुळें केवळ संकेतांनीं ते समजूं शकले असतील, पण आज आम्हांस त्या सर्व प्रसंगांची माहिती नसल्यामुळें शंभरांपैकीं पन्नास संकेत, वेदांतील कांहीं ऋचांप्रमाणें, दुर्बोध होऊन बसले आहेत. गिरिधरांनीं ते सारे प्रसंग, मागाहून येणारांसाठीं सविस्तर वर्णन करून सांगावयास पाहिजे होते. राग कसला महाराज, मला आपल्या श्रीसमर्थप्रतापाइतके प्रिय ग्रंथ फार थोडे आहेत, हें आपण जाणत च आहांत !

( १२ ) गिरिधरांच्या इतकाच मन्नारगुडीच्या मेरुस्वामींच्या चरणीं मी लीन आहें. अरुणाचल येथील अनंत मौनी हे श्रीसमर्थांचे शिष्य होते व मेरुस्वामी हे त्यांचे शिष्य होत. दोघांच्या हि समाधी मन्नारगुडीस च आहेत. मन्नारगुडीस दक्षिण द्वारका मानीत, पण तेथें च श्रीरामाची स्थापना करून अनंत मौनींनीं मन्नारगुडीस दक्षिण अयोध्येचें स्वरूप प्राप्त करून दिलें. गिरिधरांप्रमाणें मेरुस्वामींना हि श्रीसमर्थांचा सहवास घडला होता. **रामसोहळा** आणि **भीमोपदेश** असे त्यांचे दोन ग्रंथ असून ते सत्कार्योत्तेजक सभेनें प्रकाशित केले आहेत. सांप्रदायिक दृष्टीनें रामसोहळा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. त्याचे अकरा रुद्र असून प्रत्येक रुद्राचे अकरा अकरा उल्लास आहेत, म्हणजे या ग्रंथाचे ११ × ११ = १२१ समास च आहेत म्हणावयाचे. पहिल्या रुद्राच्या ६ ते ११ या सहा उल्लासांत मेरुस्वामींनीं त्रोटक रीतीनें श्रीसमर्थचरित्र वर्णिलें आहे. त्याशिवाय मधून मधून ठिकठिकाणीं त्यांनीं श्रीसमर्थांचें स्मरण केलें च आहे. ग्रंथ अति प्रेमळ, तसा च महत्त्वाचा आहे. तरी पण, माझी तक्रार आहे च कीं, त्यांनीं ब्रह्माची प्रतिष्ठा आणि मायेचा परिहार करण्यांत

जो ग्रन्थाचा नऊदशांश भाग खर्च केला आहे, तो श्रीसमर्थलीला-वर्णनाकडे लावला असता, तर आम्हांस विशेष आनंद वाटला असता.

दिनकर, गिरिधर, मेरु हीं केवढालीं थोर, व्युत्पन्न, साक्षात्कारी माणसें! तरी पण त्यांनीं मायाब्रह्मनिरूपणाचें कार्य श्रीमत् ग्रन्थराज दासबोधावर सोपवून स्वतः श्रीसमर्थांचें चरित्र च विस्तृत लिहून ठेवावयास पाहिजे होतें, असें च मला वाटतें. आणि, कल्याणमहाराज, हें तुम्हीं काय केलेंत? श्रीसमर्थस्तवनपर दहा वीस पदांनीं आमची तृप्ति होईल, असें तुम्हांस वाटलें काय? तुम्हीं एकट्यानें श्रीसमर्थचरित्र लिहून तें आमच्या हवालीं केलें असतें तर आम्हांस इतरांवर रागावण्याचें कारण उरतें ना!

मीं हें या सर्वांचें नमन चालविलें आहे! ही माझी नमनाची तऱ्हा वाचकांस विचित्र वाटेल, पण वरील थोर गुरुभक्तांशिवाय आम्हीं कोणाला आमचें गाऱ्हाणें सांगावें? त्यांच्याशिवाय आमचा कैवार घेणारे दुसरे कोण आहेत? दुसरे कोण श्रीसमर्थांपाशीं आमची दाद लावणार आहेत?

(१३) मेरुस्वामींचा दुसरा ग्रन्थ **भीमोपदेश.** रामाच्या आज्ञेवरून सीतेनें मारुतीला केलेला ज्ञानोपदेश या ग्रन्थांत आहे. त्याचे बारा सूर्य असून प्रत्येक सूर्याच्या बारा बारा कला आहेत, म्हणजे या ग्रंथाचे १२ × १२ = १४४ समास च आहेत. ग्रंथाचा मुख्य विषय कठीण तर खरा च, पण सर्व ग्रंथ येथूनतेथून गुरुभक्तिरसानें थबथबलेला असल्यामुळें वाचकाचें चित्त सहज आकर्षून घेतो. ठिकठिकाणीं प्रभु रामचंद्र मारुतीच्या उपकारांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करीत आहेत, तर उलट मारुतिराय भक्तिप्रेमानें उचंबळून येऊन श्रीरामरायाच्या चरणीं सारखे लागत आहेत! हे प्रसंग प्रेमभरानें वाचीत असतां वाचक हि गहिंवरणें साहजिक आहे. संतस्तवनाची एक हि संधि मेरुस्वामींनीं दवडली नाहीं. या सर्व कारणांमुळें, ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय गहन असून हि, पुरे आतां वाचन, असें वाचकास केव्हां हि वाटत नाहीं.

(१४) **उद्धवसुतकृत श्रीसमर्थरामदासस्वामींचें चरित्र.** हे उद्धव म्हणजे टाकळीचे उद्धव नव्हत. यांची वंशपरंपरा अशी : त्रिंबक-मल्हारी--उद्धव-उद्धवसुत लक्ष्मण ; आणि गुरुपरंपरा : श्रीसमर्थ-माधव-केशव-उद्धव-सुत, अशी आहे. या गुरुपरंपरेवरून असें वाटतें, शक १६३०ते१७०० या काळांत उद्धवसुत होऊन गेले असावेत. त्यांची वाणी मला प्रासादिक

वाटते. ग्रन्थाचे एकावन अध्याय असून ओवीसंख्या सुमारें चार हजार आहे व जवळ जवळ तितकीच ग्रंथसंख्या इतरांची उद्धृत केलेली आहे.

( १५ ) शिरगांवमठपति **भीमस्वामीकृत भक्तलीलामृत** ग्रंथ. हा ग्रंथ अभंगात्मक आहे. असें दिसतें कीं, नुसतें श्रीसमर्थांचें च चरित्र लिहिण्याचा भीमस्वामींचा आरंभीं हेतु असावा. त्याप्रमाणें त्यांनीं १२१ अभंगांत श्रीसमर्थांचें चरित्र शक १७१९ च्या श्रावण वद्य २ स संपविलें. पण मग पुढें, मनांत येतील त्या भक्तांच्या लीला वर्णन करण्यास त्यांनीं सुरुवात केली व ग्रंथ जसा वाढत गेला, तसें त्यास मग 'भक्तलीलामृत' हें नांव देऊन ग्रन्थाचा शेवट केला. तो शेवट केव्हां केला, त्याचा शक दिला नाहीं. श्रीसमर्थांशिवाय इतर ३७ भक्तांच्या अगदीं च त्रोटक आख्यायिका त्यांनीं सांगितल्या आहेत. या भीमस्वामींची परंपरा अशी : श्रीसमर्थ–कल्याणांचे धाकटे बंधु दत्तात्रेय – त्यांचे पुत्र राघव – त्यांचे पुत्र मनाच्या श्लोकांच्या आरतींतले यशवंत – त्यांचे पुत्र भीम. हे भीम व वरील सातव्या कलमांत उल्लेखिलेले तंजावरमठपति भीम, अशा उभय भीमांनीं लिहिलेलीं श्रीसमर्थांचीं चरित्रें,' श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें ' म्हणून सभेनें शक १८२८ त प्रथम प्रकाशित केलीं होतीं.

( १६ ) उपलब्ध असलेल्या श्रीसमर्थचरित्रांत **श्रीदासविश्रामधाम** हें त्यांचें अति प्रचंड चरित्र होय. तें कल्याणस्वामींच्या परंपरेंतील आत्माराम-महाराजांनीं लिहिलेलें आहे. श्रीसमर्थ – कल्याण – शिवराम – रामचंद्र – आत्माराम अशी त्यांची परंपरा होय. वास्तविक एवढें मोठें श्रीसमर्थचरित्र स्वतः कल्याणांनीं च लिहावयास पाहिजे होतें, म्हणजे तें आम्ही डोक्यावर घेऊन खरोखर नाचलों असतों. कल्याणांना जितका श्रीसमर्थांचा सहवास लाभला होता, तितका दुसऱ्या कोणास लाभला नव्हता. शिवाय असें कीं, श्रीसमर्थांना च खुद्द त्यांचें चरित्र विचारण्याचें धैर्य दुसऱ्या कोणाला होत नसे, तें कल्याणांना होई आणि केव्हां केव्हां तर त्यांचें मनोगत जाणून श्रीसमर्थ च स्वतः कृपाळु होऊन **स्वकथा स्वयें चि सांगती**। तेव्हां सांगा, त्या कल्याणांनीं श्रीसमर्थचरित्र लिहिलेलें उपलब्ध नसावें, याचें आम्हांस दुःख झाल्यावांचून कसें रहावें ? आम्ही सध्यां आमचें एवढें च भाग्य समजतों कीं, त्यांच्या परंपरेंतील पुरुषानें तरी लिहिलेलें चरित्र आमच्या हातीं पडलें आहे.

(१७) कल्याणांचा परिपाठ असा असे कीं, शिष्यमंडळी भोंवताली जमली आणि दुसरें कांहीं काम नसलें म्हणजे त्यांनीं श्रीसमर्थांच्या लीला प्रेमानें सांगत बसावें. कल्याणांचे प्रमुख शिष्य दोन : एक, "वैराग्याचा राजा रामदासस्वामी माझा । त्याचे चरणीं भाव धरा वोजा । रे गडियानो ॥" या प्रेमळ पदाचे कर्ते आपचंदमठपति शिवरामस्वामी व दुसरे तडवळे-मठपति जगन्नाथमहाराज, "धांव रे रामदासा । गुरुवर्या सर्वेशा" इत्यादि धांवा ज्यांनीं केला, ते. कल्याणांच्या तोंडून या दोघांनीं श्रीसमर्थ-चरित्र ऐकावें आणि हृदयीं सांठवावें. त्या दोघांपासून तें पावन चरित्र रामचंद्रांना ऐकावयास मिळालें. रामचंद्र हे शिवरामांचे शिष्य खरे, पण त्यांचें बाळपण शिवरामांच्या आणि तरुणपण जगन्नाथांच्या संगतींत गेलें. श्रीदासविश्रामधाम या ग्रन्थाचे कर्ते आत्माराम हे रामचंद्रांचे शिष्य होत. अशा परंपरेंतील हा प्रासादिक ग्रंथ आहे. त्याची यथार्थ योग्यता वर्णन करून सांगण्यास मी असमर्थ आहें.

(१८) त्याची रचना मोठी अपूर्व आहे. त्याचे एकंदर १२१ समास आहेत. त्या समासांना क्रमशः समास, मान, प्रकरण, प्रसंग, सर्ग, अध्या, खंड, पटल, विसावा, स्तबक, कांड, वर्ग, सोपान, स्कंद, अवधान, अशीं पंधरा नांवें दिलेलीं आहेत. हे १२१ समास म्हणजे जणूं इतकीं कीर्तनें होत. कीर्तनाच्या पद्धतीला अनुसरून हे समास रचलेले आहेत. प्रत्येक समासाच्या आरंभीं, त्या समासांतील विषयाला अनुरूप असें एकादें श्रीसमर्थांचें पद असावयाचें, नंतर थोडक्यांत त्याचें निरूपण करून चरित्रांतील प्रसंग वर्णावयाचा व अखेरीस स्वकृत एकादा अभंग देऊन समासाचा शेवट करावयाचा. याप्रमाणें पहिल्या ११४ समासांत क्रमशः श्रीसमर्थचरित्र वर्णिलें आहे, ११५ व ११६ या दोन समासांत कल्याणांचें चरित्र, ११७-११८ त शिवरामांचें चरित्र, ११९ त शिवराम, जगन्नाथ, रामचंद्र यांचे परस्पर संबंध, १२० त रामचंद्रांचें चरित्र, याप्रमाणें चरित्रें सांगून, शेवटल्या १२१ व्या समासांत आपल्या वंशावळीचें स्तवन करून आत्मारामहाराजांनीं ग्रंथ संपविला आहे. उद्धृत वचनें सोडून नुसती चरित्रविषयक ओवीसंख्या १६३०२ आहे. केवढा प्रचंड हा चरित्रग्रंथ आहे ! त्याला मी श्रीसमर्थसंप्रदायाचा विश्वकोश म्हणत असतों. धन्य,

धन्य आहे आत्मारामहाराजांची ! हा ग्रंथ पहा आणि आत्मारामहाराज आपला काळ कसा कंठीत असतील याची कल्पना करा ! या ग्रंथाची रचना कैक वर्षे चालली असली पाहिजे. त्याचा शेवट 'सन्न बारासेहे पंचविस' म्हणजे शक १७३७ त करण्यांत आला आहे.

( १९ ) आत्मारामहाराजांचा मठ एकेहाळी या गांवीं आहे व या ग्रंथाची एक च एक हस्तलिखित मूळ प्रत त्या मठांत आहे व एकेहाळीस तीन महिने दहा दिवस राहून, प्रकाशित करण्यासाठीं करवून आणलेली नक्कल श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील संग्रहांत १८४३ या क्रमांकाच्या जागीं आहे. या नकलेवरून या ग्रन्थाच्या एक हजार प्रती छापवून शक १८४६ त प्रसिद्ध केल्या होत्या. आज आतां विक्रीसाठीं त्याची एक हि प्रत सभेजवळ शिल्लक नाहीं. पुन्हां हा ग्रंथ शंभर वर्षांत छापला जाण्याचा संभव मला दिसत नाहीं. तेव्हां ज्यांच्या संग्रहीं हा ग्रंथ असेल त्यांनीं त्यास जीवापलीकडे जपावें, अशी विनंति आहे.

( २० ) राजारामप्रासादींच्या **भक्तमंजरीमालें**तील २७ अध्यायांपर्यंत रामदास, जयराम, रंगनाथ, आनंदमूर्ति आणि केशव, या पांच जणांचें जें श्रीरामदासपंचायतन मानलें जातें, त्या पंचायतनाचीं चरित्रें आहेत. या २७ अध्यायांपैकीं पहिल्या अकरा अध्यायांत श्रीसमर्थचरित्र आहे व तें सर्वस्वीं हनुमंतस्वामीकृत बखरीला धरून आहे. त्याची ओवीसंख्या १७१७ आहे. नंतर २८ ते ९७ अध्यायापर्यंत पांच पन्नास सत्पुरुषांचीं चरित्रें असून ९८ ते १०८ या अकरा अध्यायांत ग्रन्थकाराचे गुरु श्रीसिद्धस्वामी यांचें चरित्र आहे. १०९ वा कळसाध्याय होय. त्यांत रामा हरिदास यांचें चरित्र आहे. या ग्रन्थाचा रचनाकाल शक १७५६ होय. सबंध माला तीन खंडांत सभेनें प्रसिद्ध केली आहे.

( २१ ) आत्मारामबोवाकृत **श्रीसमर्थरामदासस्वामींचें चरित्र.** हा हि ग्रंथ प्रासादिक असून त्याची ओवीसंख्या सुमारें सहा हजार आहे. या आत्मारामांची गुरुपरंपरा अशी : श्रीसमर्थ – कल्याण – जगज्जीवन म्हणजे च तडवळेमठपति जगन्नाथ – यादव – दत्तात्रेय – रामचंद्र– आत्माराम. या परंपरेवरून व इतर कारणांवरून असें वाटतें, या चरित्रग्रंथाची रचना शक १७८९ च्या सुमारास झाली असावी. त्याचे एकंदर अध्याय ७८ आहेत.

(२२) हें चरित्र व वर उल्लेखिलेल्या १४ व्या कलमांतील उद्धवसुतकृत चरित्र, अशा हीं दोन हि चरित्रें इ. स. १८९१ त बाबाजी अनंत तेंडुलकर यांनीं प्रसिद्ध केलीं होतीं. त्यांचें मासिक होतें व त्यांत हीं चरित्रें प्रथम प्रकाशित झालीं. हे तेंडुलकर कोण होते मला ठाऊक नाहींत, पण त्यांच्या प्रकाशनाचे मजवर उपकार आहेत. या दोन्ही चरित्रांच्या मूळ हस्तलिखित प्रती मिळवून त्यांचें पुनर्मुद्रण झालें पाहिजे.

(२३) श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक १८१६ – **श्रीरामदास-गुणार्णव** – हें एक श्रीसमर्थांचें अप्रकाशित चरित्र आहे. या चरित्रकाराची गुरुपरंपरा: श्रीसमर्थ – माधवदास – केशव – गोविंद – व्यंकटेश – तुकाराम – नीळकंठ – रघुनाथ – गणदेव – लक्ष्मण – गंगाधर चरित्रकार. यांपैकीं माधवदास आणि केशव हे दोन पुरुष वरील उद्धवसुतांच्या परंपरेंतील च होत. उद्धवसुतांनीं आणि प्रस्तुतच्या चरित्रकारांनीं माधवदासांच्या जन्माची कथा एकसारखी च सांगितलेली आहे. ती अशी : " माधवदासांची आई सात महिन्यांची गरोदर असतां च वारली. तिला स्मशानांत नेल्यावर तिचें पोट चिरून बालक काढलें, नाळ कापून दुडींत घालून त्यास घरीं नेलें, बापानें त्याचें संरक्षण केलें, त्यास वाढविलें, ते हे माधवदास होत ! " नवल आहे. या ग्रंथाचे ५५ अध्याय असून ओवीसंख्या ७५७५ आहे. त्याचा रचनाकाल शक १७९२ होय.

(२४) श्रीसमर्थसंप्रदायाच्या बाहेरच्या पुरुषानें लिहिलेलें श्रीसमर्थांचें जुनें चरित्र म्हणजे **महीपतिकृत संतविजय** ग्रंथ होय. महीपतींनीं शक १६९६ त एक भक्तविजय ग्रन्थ लिहिला, त्यांत इतर भक्तांच्या बरोबर श्रीसमर्थांचें हि चरित्र संकलित स्वरूपांत आलें च होतें, पण तेवढ्यानें समाधान न वाटून महीपतींनीं संतविजय नांवाचा हा २६ अध्यायांचा स्वतंत्र ग्रंथ लिहून त्यांत एकट्या श्रीसमर्थांचें चरित्र सविस्तरपणें वर्णिलें आहे. हा त्यांनीं श्रीसमर्थांचा विशेष गौरव केला, असें मी मानतों. या ग्रंथाची ओवीसंख्या ४६२८ आहे. महीपति स्वतः या ग्रन्थाची योग्यता प्रचीतीनें बोलून दाखवितात, ती अशी :

**संसार धंदा करितां जाण । प्रेमळ श्रोतयां हें चि मनन ।**
**जीं संतचरित्रें केलीं श्रवण । त्यांची आठवण सर्वदा ॥** सं. वि. २५-५

**ऐसा श्रवणीं अत्यादर । रात्रंदिवस लागला जर ।**
**तरी तयासी भेटेल रुक्मिणीवर । सगुण साकार होउनी ॥ ६ ॥**

**ऐसा वर पंढरीनाथें । दिधला असे या ग्रंथातें ।**
**असत्य वचन नसे चि, सत्य । सप्रचीत बोलतों ॥ ७**

महीपतींचा हा संतविजय ग्रन्थ आणि मागील चौदाव्या कलमांतील उद्धवसुतकृत श्रीसमर्थचरित्र, या दोन्ही ग्रन्थांत इतकें साम्य आहे कीं, या दोघांपैकीं एकानें दुसऱ्याची उसनवारी केली असली पाहिजे हें स्पष्ट दिसतें. हे दोघे समकालीन च होते. न जाणों दोघे एकमेकांचे निकट संबंधी हि असतील.

( २५ ) येथवर ३ ते २४ परिच्छेदांत ज्या चरित्रकारांचा उल्लेख केला, त्यांच्या निवेदनांत, स्थळें, व्यक्ति आणि प्रसंग यांच्या बाबतींत पुष्कळदां अनेक महत्त्वाचे फरक आढळतात. हे अनेक चरित्रकार, कोणाच्या आधारावर विसंबून, अशीं भिन्न भिन्न कथानकें सांगतात, तें कळत नाहीं. याचें नवल वाटण्यासारखीं दोन च उदाहरणें पहा : बखरकार हनुमंतस्वामी व दासविश्रामधामकर्ते आत्माराम समकालीन असतां उद्धवांच्या जन्मकथेची हकिकत नाशकाजवळ टाकळीस घडल्याचें बखरींत आहे, तर दासविश्रामधामांत साताऱ्याकडे भिलवडीस घडल्याचें वर्णन आहे. शिष्य कल्याण याची प्राप्ति, श्रीसमर्थांना कोठें आणि कशी झाली, याची हकिकत महीपतीनें आपल्या संतविजयांत बखरींतल्याहून अगदीं च निराळी सांगितली आहे. अशीं अनेक उदाहरणें आढळतात व तीं मला घोटाळ्यांत पाडतात. बखर, प्रताप आणि धाम या तीन ग्रंथांवर माझा विशेष भर आहे. पण त्यांच्या हि कथानकांत भिन्नता आढळली म्हणजे मी स्तब्ध बसून विचारतों व जें सुचविलें जातें, तें खरें मानून चालतों.

( २६ ) या पूर्व काळांतील चरित्रकारांपैकीं बखरकाराशिवाय कोणा हि अन्य चरित्रकारानें तिथि, मास, संवत्सर देऊन कालक्रमानुसार चरित्र वर्णिलें नाहीं. त्यामुळें श्रीसमर्थांचें चरित्र सर्वथैव कालक्रमानुसार सांगणें अशक्य होऊन बसलें आहे, त्यास इलाज नाहीं. कांहीं साहाय्य वाकेनिसी टिपणाचें होतें, म्हणून तें टिपण व बखरीच्या आधारानें एक शकावली तयार करून ती शकावली, अशीं दोन्ही शेवटीं परिशिष्टांत देण्याचें मनांत आहे.

(२७) पूर्व काळांत होऊन गेलेल्या वरील सर्व चरित्रकारांशिवाय अलीकडच्या काळांत हि कित्येकांनीं श्रीसमर्थांविषयीं थोडें फार लिहिलेलें आहे. तें सर्व च माझ्या अवलोकनांत आलें असेल, असें वाटत नाहीं. या काळांत तिघा विद्वानांनीं भाविकपणें लिहिलेलीं मराठींतील तीन ठळक चरित्रें व एका अमेरिकन मिशनरीनें इंग्रजींत लिहिलेलें एक चरित्र, अशीं चार चरित्रें मात्र माझ्या वाचण्यांत आलेलीं आहेत.

(**पहिलें**) भीमराव सखाराम पारळकर, यांनीं शक १८३९ त **श्रीरामदासकथासारामृत** नांवानें प्रसिद्ध केलेलें. हा ओवीबद्ध ग्रंथ आहे. ग्रंथ आजकालचा आहे, पण भाषा मात्र पूर्वकाळची आहे. भाषेवरून ग्रंथाचा काल ठरविणाऱ्या एकाद्या विद्वानाच्या हातीं हा ग्रंथ पडला, तर तो हा ग्रंथ एकनाथकालीन असला पाहिजे, असें प्रतिज्ञापूर्वक प्रतिपादन करील, इतकें नाथांच्या भाषाशैलीचें अनुकरण पारळकरांना साधलें आहे. ग्रंथाचे प्रसंग अठरा आहेत व ओवीसंख्या सुमारें अठराशें असेल.

(**दुसरं**) 'महाराष्ट्रभाषाचित्रमयूर' कृष्णाजी नारायण आठल्ये यांनीं **समर्थाचें सामर्थ्य** किंवा **श्रीरामदासस्वामींचा लीलानुग्रह** या नांवानें शक १८४६ त प्रसिद्ध केलेलें गद्यात्मक चरित्र होय. त्याचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग पाडले असून पहिल्यांत आठ व दुसऱ्यांत सहा प्रकरणें आहेत. हा ग्रंथ म्हणजे श्रीसमर्थचरित्रविषयक एक मोठें थोरलें बाड च होय. तें अत्यंत भाविकपणानें लिहिलेलें आहे.

(**तिसरें**) भाविकपणाला धक्का न लागतां चिकित्सक बुद्धीनें लिहिलेलें असें अलीकडच्या काळांतलें सविस्तर **श्रीसमर्थचरित्र**, कऱ्हाडचे सदाशिव खंडो ऊर्फ आप्पासाहेब आळतेकर यांच्या लेखणींतून शक १८५५ त उतरलेलें होय. सर्व उपलब्ध साधनांचा उपयोग करून अत्यंत परिश्रमपूर्वक तें चरित्र लिहिलें गेलें आहे. या चरित्रग्रंथावर माझा अभिप्राय श्रीसांप्रदायिक वृत्तचर्चा, खंड सहावा, लेखांक १८१ वा (श्री रामदासी मासिकाचें वर्ष चवदावें, अंक १५७ वा) यांत आला आहे. त्या अभिप्रायांत दर्शविलेले या चरित्रग्रंथांतील वीस पंचवीस दोष जमेस धरून हि, माझ्या मनांत एकवार असें येऊन गेलें कीं, आपण योजिलेल्या त्रिखंडात्मक श्रीसमर्थचरित्राचा दुसरा खंड — **श्रीसमर्थहृदय** आणि तिसरा खंड —

**श्रीसमर्थसंप्रदाय,** असे दोन खंड प्रकाशित झाले च आहेत, पण पहिला खंड – **श्रीसमर्थावतार** प्रकाशित होण्यापूर्वीं च मला देह टाकून जावें लागलें, तर त्या टाकलेल्या देहाची वासलात लावण्याचा ज्यांचा अधिकार त्यांना सांगून जावें कीं, 'माझ्या अभिप्रायासह आप्पासाहेबांनीं लिहिलेलें चरित्र च' त्रिखंडात्मक चरित्राच्या पहिल्या खंडाच्या जागीं मानण्यांत यावें !

( **चवथें** ) हें चरित्र अमेरिकन मिशनरी Rev. Dr. W. S. Deming यांनीं इंग्रजींत लिहून Ramdas and the Ramdasis या नांवानें च इ. स. १९२८ सालीं प्रसिद्ध केलें. तत्पूर्वीं एवढ्यासाठीं डेमिंग धुळ्यास येऊन भेटले, सज्जनगडावर जाऊन आले, जांब हि पाहून आले. त्यांनीं येथील संग्रह पाहिला, ग्रन्थ वाचले, टिपणें केलीं, दोन वर्षांची रजा घेऊन ते अमेरिकेस गेले, तेथून हि मधून मधून पत्रें पाठवून शंका विचारल्या, अमेरिकेंत राहून चरित्र लिहिलें, तेवढ्यावर तिकडील एका युनिव्हरसिटीकडून पीएच्. डी. पदवी मिळविली आणि परत हिंदुस्थानांत डॉक्टर होऊन आले. उद्योगप्रियतेचें हें एक उदाहरण आहे. मिशनरी माणसानें च तें चरित्र लिहिलेलें असल्यामुळें, शेवटचें अकरावें प्रकरण Ramdas and Jesus लिहिणें त्यांना भाग पडलें असेल. तें प्रकरण वगळून बाकीचें चरित्र, ज्यांना मराठी भाषा समजत नाहीं आणि इंग्रजी समजते, अशा वाचकांना वाचण्याला सामान्यतः बरें आहे.

( २८ ) निरनिराळ्या काळांत निरनिराळ्या लोकांकडून श्रीसमर्थांचीं जितकीं चरित्रें लिहिलीं गेलीं, तितकीं महाराष्ट्रांत दुसऱ्या कोणाच्या वांट्याला आल्याचें दिसत नाहीं. अजून हि त्यांचें चरित्र लिहिण्याचा क्रम थांबला आहे, असें दिसत नाहीं. तो अखंड चालू च राहणार, असें वाटतें. याचें कारण इतकें च कीं, त्यांनीं राष्ट्राच्या आपत्तीच्या काळांत, सर्वसंग-परित्याग करून राष्ट्राच्या कल्याणाची चिंता वाहिली, कष्ट केले आणि व्यापक संघटना करून धर्मरक्षण केलें. ते मारुतीचा अवतार च होते आणि मारुती चिरंजीव आहेत, तेव्हां जगांत जोंपर्यंत रामकथा गायिली जाणार, तोंपर्यंत श्रीसमर्थांचीं हि चरित्रें लिहिलीं जाणार, हें उघड आहे.

( २९ ) **श्रीरामदास** आणि **रामदासी** ग्रन्थमाला, मासिक पुस्तक, **श्रीसांप्रदायिक कागदपत्रांचे खंड,** यांना हि मीं नमन केलें पाहिजे.

मला केव्हां हि जें कांहीं ठाऊक होतें, तें सर्व तत्काळ मासिकांत जाहीर होतें. श्रीसमर्थचरित्रग्रंथसंप्रदायादिविषयक कांहीं नवीन माहिती कळली, नवीन कल्पना सुचली, नवीन शोध लागला, एकादा नवीन हस्तलिखित ग्रन्थ उपलब्ध झाला, म्हणजे ती ती गोष्ट सर्वांना विदित करण्याविषयीं माझें मन उतावीळ होत असतें. एक महिन्यापेक्षां अधिक काळ ती माझ्या पोटांत ठरत नाहीं, पुढच्या च महिन्याच्या मासिकाच्या अंकांत ती वाचकांच्या कानांवर घालण्यांत येते. त्यामुळें माझें सारें सांप्रदायिक ज्ञानाचें भांडवल या मालेंत आणि त्या मासिकांत सांठविलेलें आहे. हें चरित्र लिहितांना मला पदोपदीं त्या भांडवलाचा च उपयोग करावा लागणार आहे.

( ३० ) श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत श्रीसमर्थवाङ्मयाचा पूर्णावतार झाला आहे. मंदिरांत नाहीं आणि बाहेर आहे, असें श्रीसमर्थांचें कांहीं हि वाङ्मय असेल, असें वाटत नाहीं. मंदिरांतील संग्रहाच्या एकंदर १८७५ बाडांची वर्णनात्मक नोंद, **श्रीरामदासी संशोधन** म्हणून हजार अकराशें पृष्ठांच्या दोन खंडांत करण्यांत आली आहे. प्रत्येक कवि आणि त्याचें लहानमोठें प्रत्येक काव्य त्या खंडांत नोंदलें असून शेवटीं सूची दिलेली असल्यामुळें कोणतें हि प्रकरण क्षणार्धांत पाहण्याची सोय झाली आहे. या १८७५ बाडांपैकीं बहुतेकांत श्रीसमर्थ नटून राहिले आहेत. कित्येक बाडें तर अशा तोलाचीं आहेत कीं, त्यांच्या वरून जीव ओवाळून टाकावासा वाटतो. निदान त्यांच्या संगतींत आपण सतत रमावें, असें वाटतें. तेव्हां अशा या संग्रहाशिवाय श्रीसमर्थांना दुसरीकडे कोठें पहावें ? त्यांची कृपा म्हणून त्यांच्या च इच्छेनें, सर्वत्र विखुरलेलीं सांप्रदायिक पोथ्यापुस्तकें एकत्र होऊन, या मंदिरांत आपआपल्या आराध्यदैवतीं लीन होऊन राहिलीं आहेत. त्यांच्या सान्निध्यांत बसून च मी हें श्रीसमर्थचरित्र लिहिण्याचा उद्योग आरंभिला आहे. त्या सर्वांची कृपादृष्टि असावी.

( ३१ ) ज्या कोणाचें चरित्र आपणांस जाणावयाचें असेल, त्याच्या काळाच्या परिस्थितीची आपणांस जर बरोबर कल्पना झालेली नसेल, तर त्या पुरुषाच्या चरित्राचें आपणांस पूर्ण आणि यथार्थ आकलन होणार नाहीं, हें निश्चित समजावें. मी हा सिद्धान्त मानतों व त्या सिद्धान्ताला अनुसरून च म्हणतों कीं, ज्या मानानें तत्कालीन देशस्थितीचें चित्र

आपल्या मनश्चक्षूंपुढें उभें राहील, त्या मानानें श्रीसमर्थांच्या कार्याशीं आपणांस समरस होतां येईल. कोणत्या हि काळांत होऊन गेलेल्या कोणत्या हि महापुरुषाच्या हृदयाचा आपणांस ठाव घेतां यावा, अशी इच्छा असेल, तर आपल्या काळाचा विसर पडून आपण शरीरानें जरी नव्हे, तरी मनानें त्या काळांत जाऊन पडलें पाहिजे. आपणांस श्रीसमर्थांचें चरित्र जाणावयाचें आहे, तर त्यांच्या पूर्वीपासून चालत आलेल्या त्यांच्या वेळच्या देशस्थितीचें आपण जरूर ज्ञान करून घेतलें पाहिजे. श्रीसमर्थांच्या चरित्राला जें चळवळीचें आणि कर्मयोगाचें वळण लागलें, त्याला कारण, माझ्या समजुतीनें, तीर्थाटणाच्या काळांत त्यांच्या नजरेस पडलेली या देशाची तत्कालीन विपन्नावस्था होय. तो काळ म्हणजे इ. स. १६३२ ते १६४४ च्या दरम्यानचा, म्हणजे शहाजहानाच्या कारकीर्दीचा, ऐन रंगाचा काळ होय. बापाला कैदेंत टाकून व भावांना आणि त्यांच्या मुलांना निर्दयपणें ठार करून किंवा देशोधडीस लावून औरंगजेब अजून तख्तनशीन झाला नव्हता, दक्षिणेची नुसती सुभेदारी करून च होता. अशा त्या काळांत श्रीसमर्थांनीं पाहिलेली आणि ऐकलेली देशस्थिति, हा श्रीसमर्थचरित्राचा पाया होय. त्या पायाचें ज्ञान आपण करून घेतलें नाहीं, तर आपणांस श्रीसमर्थांच्या चरित्राची उपपत्ति बरोबर लावतां च येणार नाहीं. कोणा हि श्रीसमर्थचरित्रकाराला त्या पायाचा पूर्ण विचार केला च पाहिजे. तसा विचार करण्याचीं साधनें स्वतः श्रीसमर्थांच्या वाङ्मयांत आहेत च, पण तीं मोघम आहेत. तीं आपण विचारांत घेऊं च, पण त्यांच्या वेळच्या देशस्थितीचें साधार आणि सविस्तर ज्ञान होण्याला, तत्कालीन पाश्चात्य प्रवाश्यांचीं जीं प्रवासवर्णनें प्रकाशित आहेत, त्यांची आणि तत्कालीन इतिहासकारांच्या ग्रंथांची आपणांस फार मदत होणार आहे. तसें मला त्यांचें फार साहाय्य झालें आहे. तेव्हां ग्रन्थारंभीं त्या प्रवाश्यांचें आणि इतिहासकारांचें स्मरण करणें मला इष्ट वाटतें. श्रीसमर्थ-कालीन व पूर्वकालीन देशस्थितीचें वर्णन करतांना मी त्यांच्या प्रवास-वर्णनांचा आणि इतिहासग्रंथांचा भरपूर उपयोग करणार आहे.

( ३२ ) असे प्रवासी आणि इतिहासकार पुष्कळ च आहेत. माझ्या विशेष उपयोगीं पडलेला पहिला प्रवासी म्हणजे **मनुसी** ( Manucci ). त्याच्या नांवाचा उच्चार त्याच्या देशांत मनुसी करतात कां मनुची, मला

माहित नाहीं. हा इटली देशांतील रहिवासी होता. वयाच्या अवघ्या चौदाव्या वर्षी हा मुलगा कोणाच्या तरी आश्रयानें या देशांत आला, तो पुढें सारख्या बावन वर्षें इकडे च राहिला. इ. स. १६५३ च्या नोव्हेंबरांत या मुलानें व्हेनिस शहर सोडलें व १६५६ च्या जानेवारींत सुरत शहर गांठलें. पुढें १७०८ पर्यंत तो सारखा या च देशांत होता; म्हणजे औरंगजेब गादीवर येण्यापूर्वी दोन वर्षें आधीं मनुसी इकडे आला व औरंगजेब मेल्यावर एक वर्षानें परत आपल्या देशीं गेला; म्हणजे औरंगजेबाची सारी कारकीर्द त्यानें पाहिली. तो प्रथम दाराच्या नोकरींत होता, नंतर मग औरंगजेबाच्या मुलाच्या आणि स्वतः औरंगजेबाच्या नोकरींत आला. हें मूल मोठें भाग्यवान् होतें म्हणावयाचें. त्याला श्रीशिवाजीमहाराजांचें दर्शन घडलें होतें ! औरंगजेबानें जयसिंगास शिवाजीराजांवर पाठविलें, त्या वेळीं जयसिंगाच्या पदरीं, दररोज दहा रुपये घेऊन, मनुसी त्याच्या तोफखान्यावर होता. श्रीशिवाजी राजे इ. स. १६६५ च्या जुलैमध्यें जयसिंगास भेटावयास आले, त्या वेळीं मनुसी तेथें च होता. त्या प्रसंगाची मोठी हंसूं येणारी एक गोष्ट त्यानें सांगितली आहे. जयसिंगास भेटावयास राजे आले असतां रखवालदारास मोघम म्हणाले, " जा, आंत जाऊन जयसिंगांना कळीव, मी आलों आहे. " " कोण आले आहेत म्हणून सांगूं ? " असें रखवालदारानें विचारलें. " सांग, मी शिवाजी आलों आहे, " असें महाराज म्हणाले. ' शिवाजी ' नांव ऐकतां च तो रखवालदार इतका घाबरला कीं, त्यानें जमिनीवर दोन चार कोलांट्या च खाल्ल्या ! " अरे, हो, हो, " असें हंसत म्हणून महाराजांनीं त्यास सावरलें आणि " भिऊं नको, मी तुला किं कोणाला मारावयास आलों नाहीं, " म्हणाले. गोष्ट ऐकून हंसूं येतें, पण शिवाजीमहाराजांच्या नुसत्या नांवाचा, त्या काळीं, सर्वत्र, केवढा दरारा होता, तो पाहून आज हि आपणांस किती तरी सानंद कौतुक वाटतें. त्या महाराजांच्या चरणांचें दर्शन मनुसीस घडलें, तेव्हां त्याच्या भाग्याचा आपणांस हेवा कां न वाटावा ? असो, तूर्त मला येथें मनुसीच्या इतक्या च उपकाराचें स्मरण करावयाचें आहे कीं, आपल्या राष्ट्राच्या तत्कालीन राजकीय, धार्मिक, आर्थिक, सामाजिक स्थितीची यथार्थ कल्पना करण्याला, त्याच्या प्रवासवर्णनाचें मला फार साहाय्य झालें. त्याच्या प्रवासवर्णनाला त्यानें दिलेलें नांव Storia Do Mogor 1653 –

1708 असें आहे. मूळ ग्रंथ त्याच्या मातृभाषेंत असून त्याचें इंग्रजी भाषांतर William Irvine यांनीं केलेलें, सन १९०७ सालीं चार खंडांत प्रकाशित झालेलें उपलब्ध आहे. चारी खंड मिळून पृष्ठसंख्या सुमारें २००० आहे, त्यावरून हें वर्णन किती विस्तृत आहे, याची कल्पना होईल.

( ३३ ) मला उपयोगीं पडणारा दुसरा प्रवासी **टॅव्हरनिअर** होय. हा फ्रान्स देशाचा रहिवासी होता. तो श्रीसमर्थांचा अगदीं समकालीन होता. श्रीसमर्थांच्या आधीं तीन वर्षें तो जन्मास आला होता आणि त्यांच्या पश्चात् हि आठ नऊ वर्षें तो हयात होता. या देशांत त्याचा आणि श्रीसमर्थांचा संचार जवळ जवळ एका च काळांत झाला. इ. स. १६३१ पासून १६६८ पर्यंतच्या ३७ वर्षांत तो सहा वेळां हिंदुस्थानांत आला आणि पुन्हां गेला. हिरेमाणिकांचा तो व्यापार करी. त्या निमित्तानें देशांतील थोरामोठ्यांशीं त्याच्या गांठी पडत. औरंगजेब, शाइस्तेखान वगैरेंना तो भेटला होता. सुरतेपासून डाक्क्यापर्यंत व आग्र्यापासून मद्रासपर्यंत, म्हणजे वस्तुतः सर्व देशभर त्याला आपल्या व्यापारासाठीं हिंडावें लागे. त्याचीं हि प्रवासवर्णनें त्याच्या मातृभाषेंत १६७६ त च प्रसिद्ध झालीं होतीं. त्यांचें V. Ball नें केलेलें इंग्रजी भाषांतर दोन खंडांत प्रसिद्ध आहे. टॅव्हरनिअर हा श्रीसमर्थांना समकालीन असल्यामुळें त्याच्या नजरेस जी या देशाची स्थिति पडली, ती च श्रीसमर्थांच्या हि पाहण्यांत आली असली पाहिजे, या विचारानें, त्यानें केलेलें देशस्थितीचें वर्णन मला फार उपयुक्त वाटलें.

( ३४ ) माझ्या उपयोगीं पडलेला तिसरा प्रवासी **बरनिअर** होय. तो टॅव्हरनिअरचा च देशबंधु होता. या देशांत त्यानें इ. स. १६५६ ते १६६८ संचार केला. त्याच्या प्रवासवर्णनाचें Archibald Constable यानें १८९१ त इंग्रजींत केलेलें भाषांतर वाचावयास मिळतें. हा हि श्रीसमर्थांच्या हयातींत च या देशांत आलेला असल्यामुळें त्यानें जी स्थिति पाहिली, ती च श्रीसमर्थांनीं हि पाहिली, हें उघड आहे.

( ३५ ) श्रीसमर्थकालीन देशस्थितीची आपणांस कल्पना करून देणारा चवथा लहानसा प्रवासी एक जर्मन होता. त्याचें नांव **मॅन्डेलस्लो.**

हा मुलगा आपल्या वयाच्या विसाव्या वर्षीं इ. स. १६३८ त या देशांत आला व १६४० त परत हि गेला, पण तेवढ्या वेळांत गोवें, सुरत, अहमदाबाद, आग्रा, लाहोर, वगैरे भागांत त्यानें संचार केला व जें पाहिलें तें लिहून ठेवलें. . . . . . . .

(३६) याशिवाय आणखी हि दहा पांच तत्कालीन प्रवाश्यांचीं नांवें मला ऐकून ठाऊक आहेत व त्यांपैकीं एका दोघांचीं प्रवासवर्णनें वाचण्यांत हि आलीं आहेत, पण बाकीच्यांचीं मिळालीं नाहींत. त्यांची तितकी आवश्यकता हि वाटत नाहीं. वाटती तर, तीं मी मिळवून वाचलींच असतीं. मनुसी, टॅव्हरनिअर आणि बर्निअर यांनीं तत्कालीन स्थितीची बरोबर कल्पना करून दिली च आहे. आणखी इतरांचे ग्रंथ वाचावयास मिळते, तर त्या च कल्पनेला दुजोरा मिळता, इतकें च. तत्कालीन देशस्थितीचें हुबेहुब चित्र मनश्चक्षूंपुढें उभें करण्याला वरील तिघांचीं वर्णनें समर्थ आहेत.

(३७) धन्य आहे या प्रवाश्यांची यांत शंका नाहीं. त्यांचीं प्रवासवर्णनें आज माझ्या उपयोगाला येत आहेत, हें हि ठीक. पण माझ्या मनांत असें हि येऊन जातें कीं, पर्यायानें हे च प्रवासी बहुधा या राष्ट्राच्या अवनतीला कारणीभूत झाले असावेत ! थोडेंसें विषयांतर होईल, पण कसें तें पहा. हे प्रवासी परत आपआपल्या देशांत गेले, म्हणजे तिकडे या देशाच्या वैभवाची आणि दुर्बलतेची, गुणांची आणि दोषांची, वगैरे इत्थंभूत माहिती लिहून काढून ती प्रसिद्ध करीत. त्यांच्या ग्रन्थांचीं इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, डच, इटालियन वगैरे भाषांतून तत्काळ भाषांतरें होत, तीं त्या त्या देशांतील बुभुक्षित लोकांच्या वाचण्यांत येत, त्यावरून या देशाच्या ऐश्वर्याची आणि संपत्तीची त्या लोकांना कल्पना होई च, पण त्याचें बळ आणि मरण, हीं दोन्ही कशांत आहेत, तें हि त्यांना कळून चुके ! त्या ग्रंथांत त्यांना प्रोत्साहन हि दिलेलें असे व मार्ग हि सुचविलेले असत. § त्यामुळें साहजिकच त्यांच्या तोंडाला पाणी सुटे, त्यांचें लक्ष या देशाकडे लागे, त्यांना स्वप्नें पडत आणि त्यांचे पाय इकडे येण्यास वळत.

---

§ उदाहरणार्थ, मनुसी – खंड चवथा, पृ. ६२ पहा.

( ३८ ) तत्कालीन देशस्थितीचें ज्ञान करून देणारा तत्कालीन च इतिहासकार **महमद् कासीम फेरिस्ता,** हा होय. त्याचा ग्रंथ मूळ परशियन भाषेंत आहे, पण त्याचें इंग्रजींत John Briggs नें केलेलें भाषांतर मिळूं शकतें. भाषांतराचे चार भाग आहेत. त्यांचा मला फार उपयोग होणार आहे व तो मी भरपूर करून घेणार आहे. विशेषतः बहामणी राज्य आणि त्याच्या च पोटांतून निघालेल्या पांच शाह्या, यांच्या अंमला-खालीं श्रीसमर्थकालीन महाराष्ट्राची काय दशा झाली होती, ती कळण्याला फेरिस्ताच्या ग्रंथाशिवाय दुसरा तिऱ्हाइताचा चांगलासा आधार नाहीं.

( ३९ ) त्या च प्रमाणें, माझ्या उपयोगास येणारी Elliot & Dowson यांनीं करून ठेवलेली अपूर्व कामगिरी होय. या गृहस्थांनीं History of India as told by her own Historians म्हणून आठ मोठमोठाले भाग काढून अनेक तत्तत्कालीन अखबारनवीसांनीं लिहून ठेवलेल्या इतिहासग्रंथांचीं इंग्रजींत भाषांतरें करून ते ग्रन्थ आपणांस उपलब्ध करून दिले आहेत. त्या आठ भागांपैकीं सहाव्या भागांत अकबर व जहानगीर आणि सातव्या भागांत शहाजहान, औरंगजेब आणि नंतरचे बादशहा, यांच्या कारकीर्दींचे इतिहास आहेत. श्रीसमर्थ-कालीन व किंचित् पूर्वोत्तरकालीन देशस्थितीची कल्पना करण्यास या दोन भागांची फार मदत होणार आहे.

( ४० ) या सर्व चरित्रकारांच्या, प्रवाश्यांच्या आणि इतिहासकारांच्या ग्रन्थांचा मी जरी यथेच्छ उपयोग करणार आहे, तरी माझा ठरलेला पहिला आधार, भासमान होणाऱ्या श्रीसमर्थकृपेचा आणि शेवटचा आधार माझ्या मनाचा. बाकीचे सारे मधले आधार होत. हृदयस्थ श्रीसमर्थांच्या कृपेवर सर्वस्वीं अवलंबून राहून माझें मन मला जें सुचवील तें च मी सत्य मानून वाचकांस निवेदन करीन. तसें निवेदन करीत असतां, कोणता हि आग्रह न धरतां मी वाचकांची प्रार्थना करीन कीं, माझें म्हणणें सत्य आहे कां मिथ्या आहे, हें आपलें आपण शोधून पहा आणि पटेल तसें मानून चाला.

( ४१ ) चरित्रग्रंथ जे लिहावयाचे आणि वाचावयाचे असतात, ते बोध घेऊन अनुकरण करण्यासाठीं. आधीं कौतुक वाटतें, कौतुकापासून

प्रेमादर उत्पन्न होतो, मग अनुकरण करण्याची इच्छा होऊन किंचित् अनुकरण घडतें. अशा पायऱ्या वाटतात. पण श्रीसमर्थांचें चरित्र इतकें अलौकिक आहे कीं, विचाराचा पल्ला आदराच्या पुढें जाऊं च शकत नाहीं! त्यांची निःसंगता अपूर्व नव्हे? आईबाप, बंधु, सोयरेधायरे, आणि विशेष म्हणजे स्वतःच्या च विवाहाचा सोहळा, या सर्वांचा त्याग करून, वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षीं, भगवंताचें अधिष्ठान प्राप्त करून घेण्याचें एक च एक ध्येय डोळ्यांपुढें ठेवून घराबाहेर पाऊल टाकणारा पुरुष, पुराणांत आणि इतिहासांत, दुसरा कोणी झाल्याचें कोणाच्या ऐकिवांत आहे काय? जन्मापासून समाधीपर्यंतचें श्रीसमर्थांचें सारें चरित्र इतकें अद्भुत आणि असामान्य आहे कीं, त्यांच्याजवळ जाऊन उभें राहण्याची मजसारख्याला लाज वाटते, भीति वाटते! तशी भीति कदाचित् श्रीएकनाथांची वाटणार नाहीं, नाहीं तुकारामांची हि! तरी सुद्धां, मनाचा हिय्या करून त्यांच्या चरणांचा आश्रय करण्याचें मीं ठरविलें आहे. मनाच्या श्लोकांतील ४७ ते ५६ श्लोकांत श्रीसमर्थांचें च आत्मचरित्र आहे, असें मी मानतों.

**दिनाचा दयाळु मनाचा मवाळु।**
**स्नेहाळु कृपाळु जनीं दासपाळु।**
**तया अंतरीं क्रोध संताप कचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ५६**

तो दास दुसरा कोणी नसून स्वतः श्रीसमर्थ च! ते अति दयाळु आहेत. विश्वास वाटतो कीं, ते आपणांस झिडकारणार नाहींत, चरणांजवळ येऊं देतील, स्पर्श करूं देतील!

**येक सहस्र कोटीवरी।**
**जाली अन्यायाची परी।**
**तरी सद्गुरु उपेक्षिना।**
**अंतीं निष्ठुर होइना॥**

या वचनावर विसंबून मी त्यांचें चरित्र सांगण्यास प्रवृत्त होत आहे.

(४२) या अवतारचरित्राच्या परिशीलनानें, एकापुढें एक अशा क्रमानें, पुढील दोन सिद्धान्त वाचकांस पटून, तिसरी फलश्रुति आपणा सर्वांच्या पदरांत पडली पाहिजे—

**( श्री )** श्रीसमर्थांनीं आधीं बारा वर्षें पुरश्चरण आणि नंतर बारा वर्षें तीर्थाटण करून परमेश्वर आपलासा करून घेतला आणि मग च रामराज्याच्या स्थापनेच्या उद्योगाला लागून तें कार्य यशस्वी करून दाखविलें. तेव्हां त्यांचें हें चरित्र म्हणजे

**सामर्थ्य आहे चळवळेचें ।**
**जो जो करील तयाचें ।**
**परंतु येथें भगवंताचें ।**
**अधिष्ठान पाहिजे ॥** २०-४-२६

या त्यांनीं च प्रस्थापित केलेल्या सिद्धान्ताचें प्रत्यक्ष उदाहरण च होय, हें सर्वांना मान्य होऊन

**( रा )** श्रीसमर्थांचें स्मरण – म्हणजे त्यांच्या चरित्राचें चिंतन, वाङ्मयाचें अध्ययन आणि आज्ञांचें पालन – हेंच आपल्या महाराष्ट्राचें जीवन होय, हें सर्वांना पटेल, आणि मग

**( म )** सर्वांना श्रीसमर्थचरणांचा निदिध्यास लागून महाराष्ट्राचें कल्याण होईल.

अशी या ग्रंथाची थोडक्यांत फलश्रुति आहे. तिचें स्मरण ठेवून ग्रन्थाच्या शेवटच्या उल्लासांत सवड झाल्यास आपण ती पडताळून हि पाहूं.



उ ल्ला स दु स रा

# पूर्वज

[ ८८४ – १५३० ]



धन्य त्याचें कुळ धन्य त्याचा वंश ।
जे कुळीं रामदास अवतरले ॥ १ ॥
धन्य ते जननी धन्य तिची कुसी ।
जे हरिप्रियासी प्रसवली ॥ २ ॥
धन्य ते संबंधी संतांचे सोइरे ।
संसर्गें उद्धरे कुळ त्यांचें ॥ ३ ॥
धन्य तो पै ग्राम धन्य तो पै देश ।
जेथें रहिवास समर्थांचा ॥ ४ ॥

श्रीसमर्थांच्या पूर्वजांची माहिती होण्याला साधन एकच — हनुमंतस्वामीकृत श्रीसमर्थांची बखर. हनुमंतस्वामींच्या वेळीं आणि नंतर रंगो लक्ष्मण आणि मल्हार रामराव चिटणीवीस असे दोन कर्तृत्ववान् पुरुष होऊन गेले. प्रस्तुत प्रकाशित असलेली बखर हनुमंतस्वामींच्या नांवावर मोडते, पण वस्तुतः ती या दोघा पुरुषांची कृति होय. प्रथम शक १७११ त एक लहानशी बखर लिहिली गेली. नंतर शक १७१५ त हनुमंतस्वामींच्या आज्ञेवरून रंगो लक्ष्मण यांनीं दुसरी तयार केली. तिच्यावर मल्हार रामराव यांनीं १७३९ त संस्कार करून थोडी वाढविली आणि नंतर पुन्हां, हनुमंतस्वामींच्या पश्चात् महारुद्रस्वामींच्या आज्ञेवरून शक १७५३ त रंगो लक्ष्मण यांनीं च तिच्यावरून आपला शेवटचा हात फिरविला. हल्लीं प्रकाशित असलेली बखर, ती ही, शेवटचा संस्कार झालेली होय. ती भाविकपणानें लिहिलेली आहे, पण पुराव्याला जपून च घ्यावी लागते. ती लिहिली गेली तेव्हांपासून च तिच्या पूर्ण विश्वसनीयतेविषयीं दिवाकर उपाध्ये यांच्या घराण्यांतील पुरुषांनीं शंका प्रदर्शित केल्याचे कागद माझ्या वाचण्यांत आले आहेत. विशेषतः शेवटच्या समयीं दिवाकरांना मागें सारून श्रेष्ठांच्या मुलांना पुढें करण्याची कारवाई करण्यांत आली, असा उपाध्ये यांचा मुख्य आक्षेप होता. त्यामुळें बखरीचें प्रामाण्य जपून मानावें लागतें. तें कांहीं हि असलें तरी, श्रीसमर्थांविषयीं प्रेमादर निर्माण करण्यास बखरीचें वाचन हें उत्कृष्ट साधन होय, यांत शंका नाहीं.

श्रीसमर्थांच्या पूर्वजांविषयीं इतकी जुनी माहिती कोठून मिळविली असावी कळत नाहीं. वाग्देवतामंदिरांतील क्रमांक १७५९ त ही सर्व माहिती गोंवलेली आहे. श्रीसमर्थांचें उपनांव ठोसर व जांबेच्या परिसरांत कित्येक गांवीं आज हि ठोसरकुळांतील कित्येक घराणीं नांदत आहेत. जांबेपासून दोन कोसांवर पाटोदें गांव लागतें. हनुमंतस्वामींच्या वेळीं तेथें कोणी भानजी यादव पाटोदेकर जोशी नांवाचे, श्रीसमर्थांचे गोत्रपुरुष नांदत होते, त्यांनीं व इतरांनीं माहिती पुरविल्याचा उल्लेख क्रमांक १७५९ त आहे; असो. त्या क्रमांकावरून च श्रीसमर्थांच्या पूर्वजांविषयींची माहिती उतरून घेऊन येथें सादर करतों. बखरीचा आधार हि बहुधा हें च क्रमांक १७५९ चें वेटोळें असावें. तें शक १७५३ तील च आहे व तें बहुधा रंगो लक्ष्मणांच्या हातचें असावें.

१ "पुर्वील पूर्वज **कृष्णाजीपंत** जामदग्नी गोत्री सूत्र आश्वलायन उपनाम ठोसर हे बेदरभागानगरप्रांतीं राहात होते. त्या कालीं दुष्काळ पडिला म्हणौन श्रीगंगातीरीं तिकडील मंडळी येऊं लागली. त्याजबरोबर कुटुंबासुधा आले. चार कुटुंबे येकामेकाचे आप्तशरीरसंमंधी मिळोन आले. कृष्णाजीपंत मौजे हिवरे तर्फ तालखेडे प्रांत बीड गंगादक्षिणतीर येथें राहिले. येक जण गंगाउत्तरतीरीं मौजे गुंज येथें. येक जण कुटुंबसुधा राहिले. येक जण देहगाव येथें राहिले. तिघांचे उपाध्ये चाभाडे गणेशभट हे कृष्णाजीपंत याजपासी हिवऱ्यांत राहिले. शालिवाहन शके ८८४ दुंदुभी नाम संवत्सरे. कृष्णाजीपंत यांस पुत्र पांच, पैकीं पूर्वी पुत्र चार जाले होते, हिवऱ्यास आले यावरी येक जाले, येकूण ५ त्यांचीं नांवें–(१) ज्येष्ठ पुत्र केशवपंत, (२) दुसरे राघोपंत, (३) तिसरे हरिपंत, (४) चौथे आत्मारामपंत, (५) पांचवे दशरथपंत ऊर्फ नाम दादोपंत, यांचा जन्म हिवऱ्यांत जाला.

येकूण पुत्र पांच सुधा मौजे हिवरे येथें राहिले. त्या काळीं राज्य आनेगुंदीकर यांचें. याच्या राज्यांत साडे सहा सुभे यापौ दौलताबाज सुभ्यांत चौघे हि कुटुंबासुधा राहिले. काळा दुष्काळामुळें वसाहत उठली व दिलीपतीचे नांवचे कलहामुळें जुजबी वस्ती. वतंदार गेले मेले. सबब दौलताबाज सुभ्यांतून वसाहत करितील त्यास वतन करून देत होते. म्हणौन कृष्णाजीपंत यांचे पुत्र चौघे केशवपंत आदिकरून आत्मारामपंत त्यांत प्रमुख प्रौढ त्याणी बीड प्रांतांत हिवरे व राक्षेसभुवन व उकडगांव आदिकरून आठेचाळीस गांवची वसाहत केली, पांडेपण व ज्योतिषपण हे वतन करून घेऊन बारा बारा गांव वाटून घेतले. शके ९०४ चित्रभानु नाम संवत्सरे सन फसली ३९२. चौघे पृथक पृथक राहिले. ते गाव बी तपसील

(१) केशवपंत मौजे हिवरे येथें वडिलापासी राहिले

(१) राघोपंत राक्षेसभुवनीं राहिले

(१) हरिपंत गंगाउत्तरतीरीं उकडगांवीं राहिले

(१) आत्मारामपंत मौजे § नजीक बीड येथें राहिले

§ मुळांत च जागा कोरी आहे.

मूळ पुरुष कृष्णाजीपंत यांचे पुत्र पांच. पैकीं चौघे पृथक पृथक राहिले. पांचवे पुत्र यांचा तपसील पुढें लिहिला आहे. मूळ पुरुष येक.

**२ दशरथपंत** हे कृष्णाजीपंत यांचे पांचवे पुत्र वय वर्षें पंधरा ‡ सोळा. चौघे बंधु याणी आपल्यास वाटणी न देतां आपण गांव बारा बारा वाटून घेतले, आम्ही नाकर्ते, गुंजकर याणी गुंजेचे व मोर्तीचे दोन गांवचे पांडेपण त्याणी मेळविले, देहगांवकर याणी पांडेपण मिळवून वसाहत केली, आपण नाकर्ते जालों, म्हणौन गणेशभट चाभाडे उपाध्ये याच्या विचारें हिवऱ्याहून निघोन झाबऱ्या माहार चोढालेकर बरोबर घेऊन हिवऱ्यापासून तीन कोशावरी गंगाउत्तरतीरीं पड पांढर, पुर्वील गांवचें नांव वडगांव, त्या पांढरीवरी गवळियाणी गवळवाडा वसवून, प्रमुख लखमाजी गवळी होता, त्यापासी गेले. त्याणी ठेऊन घेऊन छेपरी बांधोन दिल्ही. तेथें राहिले. माहार माघारा गेला नाहीं, तेथेंच राहिला. वडगांव हा आंबड तालुकेयातील गांव म्हणौन आंबडास जाऊन देशमुख देशपांडे पहिले होते त्यांचे विचारें हकिमाची भेट घेतली आणि बारा गांवची वसाहत केली. पड पांढर या गांवचें नांव कसबे वडगांव, तें नांव मोडोन कसबे जांब ठेविले. लखमाजी गवळियास जांबेची व साखलगांवची पाटिलकी देऊन आपण पांडेपण व ज्योतिषपण वतन करून घेऊन बारा गांवची वसाहत केली बी तपसील

| | |
|---|---|
| १ कसौ जांब | १ मौजे साखलगांव |
| १ मौजे पांडेपोखरी | १ मौजे हातगांव |
| १ मौजे आंतरवाले | १ मौजे सुरमेगांव |
| १ मौजे आसनगांव | १ मौजे साडेगांव गंगातीरीं |
| १ मौजे आरगडगव्हाण | १ मौजे पाटोदे |
| १ मौजे निंबी | १ मौजे वीरेगव्हाण |
| ६ | ६ |
| | १२ |

‡ नंतर कोणीं खोडून ‘येकुणवीस’ केलें आहे.

येकूण बारा गांवची वसाहत शके ९०५ सुभानु नाम संवत्सरीं केली. कुटुंब शिवरे येथें च होते. तेथें ज्येष्ठ पुत्र रामाजीपंत जाहाले. शके ९०९ यांत कृष्णाजीपंत यांचा काळ जाहाला. नंतरीं शके ९१० सर्वधारी नाम संवत्सरीं कुटुंबासुद्धा जांबेस येऊनी राहिले. यांस पुत्र ६. ह्यांची नांवनिसी—

(१) ज्येष्ठ पुत्र रामाजीपंत, (२) दुसरे लक्षुमणपंत, (३) तिसरे भरतपंत ऊर्फ नांव बाहणाजीपंत, (४) चवथे शत्रुघ्नपंत ऊर्फ नांव आपाजीपंत, (५) पांचवे हनुमंतपंत, (६) साहावे वासुदेवपंत हे व्याकरणादि [illegible] यास व्यास म्हणत होते.

येकूण पुत्र साहा. यांसी दशरथपंत याणी पुत्रास दोन दोन गांव वाटोन दिल्हे आणि झाबऱ्या माहार यास जांबेची वतनदारी करून दिल्ही

बीा

२ रामाजीपंत ज्येष्ठ पुत्र यांस कसबे जांब व मौजे आसनगांव हे दोन गांव यास दिल्हे

२ दुसरे लक्षुमणपंत यास साखलगांव व सुरमेगांव हे दोन गांव यास दिल्हे

२ तिसरे भरतपंत यास हातगांव व आंतरवाले दिल्हे

२ शत्रुघ्नपंत यास मौजे साडेगांव व आरगडगव्हाण हे दोन गांव यास दिल्हे

२ हनुमंतपंत यास मौजे निंबी व वीरेगव्हाण हे दोन गांव यास दिल्हे

२ साहावे वासुदेवपंत यास मौजे पाटोदे व पांडेपोखरीं हे दोन गांव यास दिल्हे

---

१२

एकंदर बारा गांवची वाटणी करून दिल्ही. कांहीं दिवसांनीं दशरथपंतांचा काळ जाला. वाटणीप्रमाणें आपआपले गांवीं राहिले. त्यांत पुढें [illegible] नूतन गांव पुन्हा मेळविले. कितेकांनीं जुने हि गमाविले.

केसोपंत आदिकरून यांतील कितेकाचा वौश च नाहींसा जाला. याप्रमाणें दशरथपंत हे पुरुष दुसरे

**३ रामाजी दशरथ** याजपासून पुढें वौशज येक येक पुरुष होत आले. येखाद्यास दुसरा पुत्र जाहाला असतां त्याची वौशवृध्धी जाली नाहीं. कन्येचा वौश येखादियाचा असेल. येक येक पुरुष होत आले ते लि॥ आहेत.

**४ हरि रामाजी** चवथे

५ पांचवे **नीराजी हरि,** यास निरंजनपंत म्हणत होते. हे ब्रह्मवेत्ते होते

**६ शिवाजी नीराजी** हे साहावे पुरुष

**७ विष्णु शिवाजी** सातवे

**८ बाहणाजी विष्णु** आठवे, यांस ब्रह्माजीपंत म्हणत होते

**९ आत्माराम बाहणाजी,** यास बृहस्पतीपंत म्हणत होते. याणी शके ११८४ दुंदुभी संवत्सरांत आंबडप्रांतीं पुन्हा पांच गांव मेळविले. गांवचे नांवांचा तपसील

(१) मौजे कुंभार पिंपळगांव, कुंभार याजकडे पाटिलकी व पांडेपण दोनी वतनं होती. पौ त्याजकडील पांडेपण, दुसरेकडील ज्योतिषपण आपण घेऊन पाटिलकी कुंभार याजकडे ठेविली,

(२) मौजे भेंडाळे, (३) मौजे निंबुली (४) मौजे कोठाळे बु॥, (५) मौजे घाणेगांव.

येकूण पांच गांव व पहिले दोन गांव येकूण सात गांवची वहिवाट सोनो बलाळ चाभाडे उपाध्ये याजकडून करवीत होते

**१० गणेश आत्माराम** दाहावे पुरुष

**११ धोंडो गणेश** अकरावे

**१२ आत्माराम धोंडदेव,** यास अलक्षपंत म्हणत होते. हे माहा ब्रह्मवेत्ते होते. चाभाडे उपाध्ये यांचे तीर्थ घेऊन आत्माराम बाहणाजी

याणी पांच गांव गेळविले होते ते सोनो बलाळ चाभाडे उपाध्ये त्याचे वौशांतील गणेशभट बिन केशवभट गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन याचे तीर्थ [illegible] पृथ्वीदानं दिल्ही, शके १३०५, पूर्वीचे दोन गांव आपणाकडे ठेविले, हे पुरुष बारावे

१३ **गुंडो आत्माराम** तेरावे पुरुष

१४ **नीराजी गुंडो,** यांस निरंजनपंत म्हणत होते, चवदावे पुरुष

१५ **आत्माराम नीराजी** पंधरावे

१६ **शिवाजी आत्माराम** सोळावे

१७ **विष्णु शिवाजी** सतरावे

१८ **केसो विष्णु** अठरावे

१९ **रामाजी केशव** येकूणिसावे

२० **भानजी रामाजी** विसावे

२१ **सूर्याजी भानजी** येकविसावे

२२ **त्रिंबक सूर्याजी** ऊर्फ नांव बाहणाजीपंत यांचे कारकीर्दीस जुने पांढरीवरील वस्ती मोडून हालीचे पांढरीवरी वस्ती केली. यांतील कारण जुन्या पांढरीवरी दौलताबाजेचा रस्ता, मार्गाचा उपद्रव, सरकारचा खजीना येक दोन वेळा गेला त्याचा तंटा जांबेवरी पडिला, सबब वस्ती मोडोन भेंडाळे व वीरेगव्हाण व आसनगांव व कोठाळे व घाणेगांव, असे पांच गांवचे मध्यभागीं निपल ‡ जागा पाहून वस्ती केली, ती च वस्ती सांप्रत आहे. शके १४९९ ईश्वर नाम संवत्सरे सन फसली ९८७ तेव्हां वस्ती जाली. याचे पूर्वी सूर्याजीपंत यांचा जन्म शके १४९० जुने पांढरीवरी § जन्म जाला होता. या वस्तीवरी आले ते समई नऊ वर्षांचे पंताचें वय होतें. व्रतबध्ध होऊन लग्न हि जाले होते. त्रिंबकपंत यांचा काल शके १५०० बहुधान्य संवत्सरे नव्या पांढरीवरी जाला. ते पुरुष बेविसावे

‡ निबल, मऊ.

§ ही जुनी पांढरी हल्लींच्या गांवठाणापासून अर्धा पाऊण कोस असेल भाविकजन तथील हि माती कपाळाला लावतात व एकादा दगड घरीं नेऊन पूजेंत ठेवतात.

**२३ सूर्याजी त्रिंबक** हे पुरुष तेविसावे. यांची पितृभगिनी माजलगांवकर पांडे यास दिल्ही होती. तिजला आसनगांवचें पांडेपण आंदण दिल्हे होते. कांहीं दिवस माजलगांवकर आसनगांवचें पांडेपण करीत होते. त्रिंबकपंत असतां तिचा व तिचे भर्त्याचा काळ जाला. तिजला संतान नाहीं, सबब आसनगांवचें पांडेपण त्रिंबकपंत वहिवाट करूं लागले. पुढें सूर्याजीपंत लहान असतां त्रिंबकपंताचा काळ जाला म्हणौन दोनी गांव पंत वहिवाट करूं लागले. आपण सूर्यआराधना करणार, दोनी गांवची वहिवाट न होये, सबब आपले बायकोचे बंधु भानजीपंत बोदलापुरकर यास आसनगांवचे पांडेपणाचे कामावरी ठेविले, आपण जांबेचें काम रात्रौ करीत होते, ते पुरुष तेविसावे.

येकूण मूळ पुरुषापासून सूर्याजीपंत तेविसावे. यांस सूर्यउपासना, परंतु मूळ पुरुष कृष्णाजीपंतापासोन रामउपासना, श्रीरामनौमीचा उछाह करीत होते. परंपरेप्रमाणें सूर्याजीपंत उछाह करून सूर्यउपासना करीत होते, त्यास पुत्र दोन ता।

(१) ज्येष्ठ पुत्र गंगाधर सूर्याजी ऊर्फ नांव रामीरामदास, यांचा जन्म शके १५२७ विश्वावसु नाम संवत्सरे मार्गशीर्ष शुध्ध १३ गुरुवारीं जाला.

(२) दुसरे पुत्र नारायण ऊर्फ नांव रामदास, यांचा जन्म शके १५३० कीलक नाम संवत्सरे चैत्र शुध्ध ९ रविवारीं जन्म जाला, ते ब्रह्मचारी .... ...."

**२४ श्रीसद्गुरु समर्थ रामदास स्वामी** हे पुरुष चोविसावे.

सूर्याजीपंतांनीं सूर्याची उपासना करावी, प्रत्यहीं हजार नमस्कार घालावे, गायत्रीचा जप करावा, आदित्यहृदयस्तोत्राचें पठन करावें. असा त्यांचा क्रम बारा वर्षे चालला होता. तेव्हां सूर्य प्रसन्न होऊन द्विजरूपानें प्रकट झाले. त्यांचें सूर्याजीपंतांनीं आतिथ्य केलें. द्विजानें जातांना राम, लक्ष्मण, सीता यांच्या मूर्ति देऊन परंपरेनें यांची पूजा, अर्चा करीत जा, असें आज्ञापिलें व वर दिला कीं, तुला दोन पुत्र होतील, एक जनकाप्रमाणें प्रपंचांत राहून परमार्थ करील व दुसरा शुकाप्रमाणें वैराग्यशील राहून धर्मस्थापना करून जगदुद्धार करील.

ते हे उभयतां बंधु गंगाधर ऊर्फ श्रेष्ठ आणि नारायण ऊर्फ समर्थ रामदासस्वामी.

संध्येच्या आरंभीं जगदीशाचीं जशीं चोवीस नांवें घ्यावयाचीं, त्याप्रमाणें श्रीसमर्थांच्या चरित्रास आरंभ करण्यापूर्वीं आपणांस अनायासें या योगियांचें स्मरण घडत आहे.

हा वंशवृक्ष पाहिला, त्याचें मनन केलें, म्हणजे अपूर्वता वाटते. उगीच नाहीं अशा कुळांत श्रीसमर्थांनीं जन्म घेतला ! या घराण्यांत श्रीसमर्थांच्या पूर्वींच्या तेवीस पिढ्यांत श्रीरामाची उपासना सारखी चालू होती, तेव्हां कोठें चोविसाव्या पिढीला, या वंशरूपी आम्रवृक्षाला, श्रीसमर्थांच्या सारखें मधुर, पक्व फळ लागलें, जें आपत्कालीं या राष्ट्राच्या उद्धारार्थ आणि धर्माच्या रक्षणार्थ उपयोगास आलें, येत आहे व अखंड येत राहील !

आतां आपण सर्वजण त्या च फळाची सतत गोडी घेत आपलें आयुष्य कंठीत राहूं.



उ ल्ला स ति स रा

# अवतरण आणि बाळपण

[ १५३० – १५४० ]



मूढ जन म्हणती देहधारी ।
सुबुद्धिमान म्हणती अवतारी ।
समर्थाची समर्थ जाणती थोरी ।
संतसज्जन यथार्थ ॥

धर्मस्थापनेचे नर ।
ते ईश्वराचे अवतार ।
जाले आहेत पुढें होणार ।
देणें ईश्वराचें ॥

[ ( १ ) सत्य संकल्पाची शक्ति – ( २ ) धर्मग्लानि – ( ३ ) देव धांवून आले – ( ४ ) समर्थजन्माचें कौतुक – ( ५ ) संतमुखें श्रीसमर्थस्तवन – ( ६ ) जन्मभूमि जांब – ( ७ ) तत्कालीन जांब – ( ८ ) सद्यःकालीन जांब – ( ९ ) जांबेची पंचवटी – ( १० ) श्रीएकनाथांच्या पायांवर – ( ११ ) शंका-समाधान – ( १२ ) बारा बाललीला – ( १३ ) अकरावें वर्ष लागलें ]

( १ ) पांच-सहाशें वर्षें चालू असलेल्या अस्मानी-सुलतानी कहरामुळें जनता अगदीं त्रस्त होऊन गेली होती. त्यांतून सुटण्याचा मार्ग कोणाला च दिसेनासा झाला होता. परमेश्वरास दया येऊन तो अवतार घेईल, तर च यापुढें धडगत आहे आणि धर्म टिकण्याचा संभव आहे, अशी सर्वांची खात्री होऊन चुकली होती. अशा हताश परिस्थितींत सर्वांचे च डोळे परमेश्वराकडे लागले होते. केव्हां हि सर्वांच्या च मनांत एक च एक विचार तीव्रतेनें आला, म्हणजे तो फलद्रूप झाला च पाहिजे आणि होतो हि, असा जगाचा नियम आहे. कठीण असतें, सर्वांच्या मनांत एक च सत्य संकल्प उद्भवणें. उद्भवल्यानंतर तो सिद्धीस गेल्यावांचून मात्र रहात नाहीं. एकट्या हि सत्प्रवृत्तीच्या व्यक्तीच्या विचाराची तीव्रता वाया जात नाहीं, असें जेथें मला वाटतें, तेथें सामुदायिक उत्कट इच्छा सफल झाली च पाहिजे, याची मला मुळीं च शंका वाटत नाहीं. सर्व शक्तींत संकल्पाची शक्ति विशेष प्रबळ आणि प्रभावी असते. माणूस आपल्या कर्माचीं फळें भोगीत असतो, असें आपण म्हणतों, तें बरोबर आहे. हा न्याय जसा व्यक्तीच्या बाबतींत सत्य आहे, तसा च तो समाजाला आणि राष्ट्राला हि लागू असतो. मला वाटतें, व्यक्तीचें किंवा व्यक्तिसमूहाचें कर्म हि स्वतंत्र नसतें, तर तें त्याच्या संकल्पावर अवलंबून असतें. संकल्पाला अनुसरून कर्म घडतें. जसा संकल्प तसें कर्म आणि जसें कर्म तसें त्याचें फळ. समाजांत द्वेष, मत्सर, निंदा, वैमनस्य, कलह, तिरस्कार, कृत्रिमता, कपट, स्वार्थबुद्धि, पापवासना, दुराचार, देवद्रोह, धर्मद्रोह, बंधुद्रोह, राष्ट्रद्रोह, इत्यादि दुष्ट संकल्पांचा बुजबुजाट झाला, अशा च सर्वांच्या कुडी वासना बनल्या, म्हणजे सर्वांच्या कपाळीं दुःख, दारिद्र्य, उद्वेग, जुलूम, छळ, गुलामगिरी, पारतंत्र्य, हें फळ ठरलेलें असतें. पण, अशा हि वेळीं दैववशात् कांहीं महापुरुषांच्या चित्तांत कालवाकालव झाली, त्यांना ती स्थिति बघवेनाशी झाली, असह्य झाली, ते देवाला शरण गेले, ती स्थिति पालटावी

असें त्यांना [illegible] वाटूं लागलें, ते तळमळूं लागले, तदनुसार त्यांच्या ठिकाणीं सद्गुणांचा प्रादुर्भाव झाला ; भूतदया, स्वसुखनिरभिलाष, सत्याचरण, आत्मौपम्यबुद्धि, परोपकारबुद्धि, सदाचार, सद्वासना, धर्मकर्मप्रेम, बंधुप्रेम, राष्ट्रप्रेम, भगवत्प्रेम, इत्यादि मानसिक सद्वृत्तींचा उद्भव झाला आणि ती बळावत जात जात, एकंदर समाजाचा तो च स्वभाव बनला, म्हणजे त्याचें फळ सुख, शांति, समाधान, न्यायनीति, माणुसकी, व्यक्तिस्वातंत्र्य, राष्ट्रस्वातंत्र्य, यांचा लाभ झाल्यावांचून रहात नाहीं. 'सत्य संकल्पाचा दाता नारायण।' या वचनाचा दुसरा काय अर्थ आहे?

(२) जेव्हां जेव्हां धर्माला ग्लानि येते आणि अधर्माला जोर चढतो, अन्याय, अनीति, अत्याचार, बलात्कार, दुष्टपणा, बेबंदशाही माजून साधूंचा छळ होतो आणि दुष्टांचें वर्चस्व होतें, तेव्हां तेव्हां आपण, तेजस्वी आणि पराक्रमी पुरुषाच्या रूपानें अवतीर्ण होऊन राष्ट्रधर्माची बिघडलेली घडी पुन्हां बसवितों, या भगवंतानें अर्जुनास सांगितलेल्या गुह्याप्रमाणें, शालिवाहनाच्या सोळाव्या शतकांत भगवंतानें भरतखंडांत ब्राह्मण आणि क्षत्रिय कुळांत श्रीसमर्थ-शिवरूपानें अवतार घेतला, असा आमचा पूर्ण विश्वास असल्यामुळें, अवतार घेण्यास कोणती स्थिति कारणीभूत झाली, त्या स्थितीचें, अनुसंधानासाठीं सिंहावलोकन करणें अवश्य होय. तें आपण योग्य वेळीं सविस्तर पुढें करूं. तूर्त येथें, संप्रदायाबाहेरचे महीपति काय म्हणतात, तेवढें च पाहूं.

**कलियुगामाजीं साचार । कर्मभ्रष्ट जाहले द्विजवर ।**
**यवन राजे दुराचार । प्रजा निरंतर पीडिती ॥**
**असत्याचें भय निश्चित । दैवतें जाहलीं पाषाणवत ।**
**मंत्रांचें सामर्थ्य राहिलें समस्त । न्यायनीत बुडाली ॥**
**पुराणप्रसिद्ध तीर्थें पाहे । तीं हि जाहलीं जलमय ।**
**आतां जनासी तरणोपाय । धुंडितां ठाय दिसेना ॥**
**मग वैकुंठवासी नारायण । भक्तांसी आज्ञापी आपण ।**
**तुम्ही मृत्युलोकीं अवतार घेऊन । लावावे जन भक्तीसी ॥**
**तो हा जगद्गुरु साचा । रामदास अवतार मारुतीचा ।**
**महीपति भाट संतांचा । सत्कीर्ति वाचें वर्णित ॥**

—संतविजय, १२-१८८ ते १९२

(३) श्रीसमर्थांच्या जन्मापूर्वी अशी स्थिति येऊन ठेपली होती. कित्येक शतकें जनता पारतंत्र्यपंकांत रुतून पडली होती, धर्म लयाला जाण्याच्या मार्गाला लागला होता, दैन्याचा कडेलोट म्हणजे आपल्या आया-बहिणींच्या अब्रूचें हि रक्षण करण्याचें सामर्थ्य लोकांत उरलें नव्हतें, सर्व बाजूंनीं आकाश फाटल्यासारखें झालें होतें, तेव्हां साहजिक सर्वांचे डोळे देवाकडे लागले आणि त्यांनीं त्याचा धांवा मांडला! तो धांवा देवाला ऐकूं गेला, त्याला दया आली आणि श्रीक्षेत्र जांब गांवीं सूर्याजीपंत आणि राणुबाई यांच्या पोटीं शक १५३० च्या श्रीरामनवमीच्या च दिवशीं, बरोबर श्रीरामजन्माच्या च क्षणाला, जन्म घेऊन तो धांवून आला. श्रीदासविश्रामधामकार म्हणतात

**पुनर्वसु चतुर्थ चरणीं।**
**कर्कराशीस जन्मला सद्गुणी॥**

– दासविश्रामधाम, २ – १०४

मला या जन्मवेळेचें मोठें कौतुक वाटत असतें. मी हा श्रीसमर्थचरित्रांतील पहिला चमत्कार मानीत असतों. चमत्कार च नव्हे, तर काय? सहसा न घडणारी अशी एकादी अपूर्व गोष्ट घडली, म्हणजे तिला च आपण चमत्कार म्हणत असतों. सांगा असें दुसऱ्या कोणाच्या चरित्रांत घडलें असल्यास, कीं ज्याची जी उपासना, त्या उपासनेच्या नुसत्या जन्मदिवशीं च नव्हे, तर नेमका जन्माच्या क्षणाला, त्याचा हि जन्म झाला.

(४) श्रीसमर्थांचे चरित्रकार कांहीं हि म्हणोत, मातुःश्रीचे डोहळे वर्णन करोत, कीं आणखी कांहीं सांगोत, एक गोष्ट खरी कीं, सूर्याजी-पंतांना दुसरा मुलगा झाला, याचें त्या वेळीं कोणास च कांहीं विशेष वाटलें नसेल, कोण जन्मास आलें, याची कोणास च कांहीं कल्पना झाली नसेल. पण एक मात्र सर्वांच्या च सकौतुक बोलण्याचा विषय झाला असेल कीं, तिकडे श्रीराममंदिरांत टळटळित दुपारीं रामजन्म होऊन गुलाल उधळला जातो काय आणि इकडे कुळकर्ण्यांच्या घरीं हें बालक अवतीर्ण होऊन ट्याहां ट्याहां करूं लागतें काय! श्रीसमर्थांचा जन्म म्हणजे आपल्या आया-बहिणींच्या आक्रोशाचे आणि विलापाचे शब्द परमेश्वराला ऐकूं गेल्याचें प्रत्यक्ष प्रमाण होय! त्यांचा अवतार म्हणजे

पूर्वीच्या सर्व साधुसंतांच्या पुण्याईचें फळ होय ! धर्माला आलेली अवकळा पाहून त्यांनीं जो दुःखोद्गार काढले आणि देवाची करुणा भाकली, तें सारें वाया गेलें नाहीं !

(५) कोण जन्मास आले, हें त्या वेळीं जरी कोणाच्या लक्षांत आलें नसलें, तरी नंतर सर्व महाराष्ट्राला तें कळलें, तसें च तें श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर आणि रामसोहळाकार मेरुस्वामी यांनीं हि जाणलें. त्या अवताराचें गिरिधरांनीं संतमुखें स्तवन केलें, तें असें :

**जय जय देवा ब्राह्मण्यगुरु । जय जय देवा परम गुरु ।**
**जय जय देवा परात्पर गुरु । नरनारायण अवतरसी ॥**

**जय जय देवा धरामरा । जय जय देवा मायाभूभारहरा ।**
**जय जय देवा सहस्रकरा । बोधभास्करा दिनमणी ॥**

**जय जय त्रिकांडवेदरक्षणी । जय जय कर्मउपासनासंरक्षणी ।**
**जय जय ज्ञानविज्ञानपूर्णलक्षणी । अलक्षलक्षणी परब्रह्मा ॥**

**जय जय सकामकर्मदळणी । जय जय निःकामकर्म प्रतिपाळणी ।**
**जय जय धर्मअर्थकाममोक्षप्रदानी । कैवल्यब्रह्मदानी जगद्गुरु ॥**

**जय जय दंडकारण्यनिवासा । जय जय मायारण्यनिवासा ।**
**जय जय ब्रह्मारण्यनिवासा । मायातीता निरंजना ॥**

**जय जय ब्रह्मचर्यशिखामणी । जय जय परब्रह्मनिर्वाणी ।**
**जय जय विमळ ब्रह्म निर्गुणी । छात्रजनसंरक्षका ॥**

**जय जय भरतवर्षविभावना । जय जय भरतखंडजनपावना ।**
**जय जय ब्राह्मण्यकुळसद्भावना । पावनपावना हनुमान जी ॥**

**जय जय वैराग्यभाग्यउदया । जय जय ज्ञानविज्ञानसूर्योदया ।**
**जय जय अनंत अपार स्वरूपोदया।उदयअस्तेंविण विराजसी ॥**

**जय जय गिरिकंधरनिवासा । जय जय देवा जगन्निवासा ।**
**जय जय मुनिमानसहंसा । आत्मयारामा सुखमूर्ति ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १–५५ ते ६३

आणि मेरुस्वामी या अवताराचें रहस्य वर्णन करून सांगतात —

**साच सृष्टीचा करावया उद्धार । जाला समर्थाचा अवतार ।**
**मीपणधरेचा भार । फेडिला समर्थें ॥**

अनादि पातकाचे संस्कार। सरले समर्थकृपेनें संसार।
तरले जीव भवसागर। समर्थअनुग्रहें॥
समर्थ निजशांतीचा जनक। समर्थ सायुज्याचा प्रकाशक।
स्वबोधस्थिति निश्चयात्मक। जाले मूर्तिमंत॥
समर्थ सत्याचें रूप शाश्वत। समर्थ अनुभवाचें हृद्गत।
समर्थ निश्चयाचें दृढव्रत। व्यक्तीस आलें॥
समर्थ देवत्रयाचें हृदय। परेचें अभ्यंतर निश्चयें।
स्वानंदाच्या अतिशयें। स्वरूपासी आलें॥
सकळ देहाची प्रवृत्ती। चुकवावया या चि अर्थी।
सच्चिदानंद आकृतीं। आले समर्थ॥
स्वरूपसाक्षात्कारें निर्धार। करावया कर्मभूमीचा उद्धार।
स्वानंदविग्रही साचार। लीला प्रगटले॥

* * *

दुष्टदमन सुखस्थिति। सर्वत्रासी निजगति।
सज्जनप्रतिष्ठा प्रतीति। केली निजसमर्थें॥
होऊनियां दशावतार। सांभाळिली परंपरा साचार।
आदिपुरुष कृपाकर। कळवळिला हृदयीं॥
भवबंधकारागृहीं। श्रमले निजअंश सर्व हि।
मुक्त करावयासी लवलाहीं धांवोनि आला॥
मायामहार्णव दुस्तर। माजी जीव बुडाले सविस्तर।
ते समर्थस्वामीनें सत्वर। तारिले भवजळीं॥

—रामसोहळा, १–६–६ ते १२ व १९ ते २२

( ६ ) श्रीसमर्थांची जन्मभूमि जांब गांव, औरंगाबाद जिल्ह्यांत, आंबड तालुक्यांत, गोदावरीच्या उत्तरेस तीन कोसांवर व हल्लींच्या परतुड स्टेशनपासून दक्षिणेस सहा कोस आहे. पैठणच्या पूर्वेस जांब सुमारें वीस कोस येईल. आज तो सारामुलुख महाराष्ट्रापासून वेगळा पडलेला भासतो, पण खरें पाहूं जातां जांब-पैठण हा भूभाग म्हणजे महाराष्ट्राचें हृदयस्थान होय. श्रीसमर्थकालीन जांबगांवचें स्वरूप आज राहिलेलें नाहीं. त्या वेळीं तें कसें होतें, हें गिरिधरांना च विचारिलें पाहिजे. तें आपणांस दुसरे कोण सांगणार? गिरिधर सांगतात :

जांबुवती नामें गमगजधानी। भोंवतीं आरामें शोभती चक्रध्वनि।
उभय सरिता जेंवी जनस्थानीं। पंचवटिका विराजे॥

नगरींत श्रीमंत चारी वर्ण। अनन्य ब्राह्मणीं तिन्ही वर्ण।
विद्या तप शौच्यादि गुणें ब्राह्मणवर्ण। ब्रह्मानंदें संतुष्ट हो॥

ग्रामवासी भले लोक। ग्रामपाळक पुण्यश्लोक।
यहलोकीं साधिती परलोक। नीतिन्यायें वर्तती॥

देव देवालयें देवदर्शनें घेणें। नित्य हरिकथा पुराणश्रवणें।
नित्य नैमित्य कर्में आचरणें। परमार्थबुद्धि करूनियां॥

देवब्राह्मणाची आराधना। घरोघरीं समाराधना।
रंगमाळा दीपमाळा दीपाराधना। सुमनगंधमाळा वसंतपूजा॥

ब्राह्मणाची रक्षिती प्रतिष्ठा। संतसज्जनीं केवळ निष्ठा।
परदार परद्रव्य मानिती वमन विष्ठा। स्वप्नीं हि अनिष्टा नातळती॥

ग्रामसेवक जाति विजाति फिरती। आलयाचीं आतिथ्यें करिती।
कष्टल्यांभागल्यांचे श्रम हरिती। क्षुधिस्थ कोण्ही राहेना॥

ग्रामसीमेमधूनि संतमूर्ति। डावलोनि कोण्हि च न जाती।
पवित्र पुरीसी पवित्र करिती। चरणस्पर्शें करूनियां॥

देशाकाळवर्तमानें। ग्रामस्थ वर्तती प्रसंगमानें।
पिकें पिकती अतिमानें। पर्ज्यन्य वर्षती यथाकाळीं॥

शुद्ध राजभाग राजयोगें देती। विवेकविचारें प्रपंच परमार्थ करिती।
अंबापुरीं अधिष्टानीं ऐक्य राहती। सत्य ध्वज लाऊनियां॥

—श्रीसमर्थप्रताप, १–१३ ते २२

असें त्या वेळचें जांबगांव होतें.

ऐसीये जांबुवतिये नगरीं। नगरलेखकाच्या दिव्य मंदिरीं।
जामदग्निवछगोत्रीं श्रीराणादेवीउदरीं। स्वयें नारायण समर्थ अवतरले॥

—श्रीसमर्थप्रताप, १–२३

(७) आज त्या गांवाचें नैसर्गिक स्वरूप कायम असलें, तरी मानवकृत स्वरूपाचा पत्ता हि राहिला नाहीं ! गांवांत शिरण्यापूर्वी, गांवाला लागून च पण गांवाबाहेर मारुतीचें पुरातन देवालय आहे. या च देवालयाच्या पाठीमागें एकदां घरून रुसून येऊन समर्थ – समर्थ नव्हे, नारायण – बसले

होते. गांवांत शिरतांना च दोन्ही बाजूंना जे दोन पडके बुरुज अजून आहेत – ते हि नाहींसे होण्याच्या पंथाला लागले च आहेत – ते दर्शवितात कीं, एके काळीं गांवाभोंवती चौफेर तट होता. गांवाला मोठी थोरली गढी होती, तिचा हि फार थोडा भाग आतां उरला आहे. घडीव दगडांचीं कांहीं जोतीं अजून शिल्लक आहेत, तीं सांगतात कीं, त्या जोत्यांवर एकदां मोठमोठाले चिरेबंदी वाडे उभे होते. या गांवीं एके काळीं हातमागांवर कापड विणण्याचा धंदा मोठ्या प्रमाणावर चालत असे. आज ती नुसती दंतकथा उरली आहे. एका पडक्या घराच्या उंच ओट्यावर – ज्याला कोंकणांत घरटा म्हणतात – देवांच्या पाषाणाच्या मूर्ति उपेक्षित पडलेल्या आहेत, त्यावरून त्या जागीं पूर्वीं शंकराचें देवालय असावें, असें वाटतें. सध्यां वापरण्यांत नसलेली जुन्या पद्धतीची एक साधारण बरी च मोठी पायविहीर गांवांत च एका बाजूस आहे. ती विहीर पाहून असें मनांत येतें, एके काळीं गांवाचा विस्तार आजच्या पेक्षां बरा च मोठा असावा.

(८) ज्या जागीं बृहन्महाराष्ट्रियांच्या मदतीनें **श्रीसमर्थमंदिर** उभारलें गेलें व ज्यांत शक १८५४ च्या चैत्र शुद्ध ९ स श्रीसमर्थांच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाली, त्या जागीं पूर्व काळीं कुळकर्ण्यांचा वाडा होता व जेथें श्रीसमर्थांचा देह धरणीमातेनें प्रथम झेलला, बरोबर त्या जागीं, पुनरपि श्रीसमर्थ येऊन कायमचे उभे ठाकले आहेत. श्रीसमर्थमंदिराच्या आवाराला लागून च पूर्वेस पूर्वीं पाटलांचा वाडा होता. त्या जागीं आतां, श्रीसमर्थांच्या दर्शनास बाहेरून येणाऱ्यांच्या सोयीसाठीं **श्रीदासविश्रामधाम** नांवाचें निवासस्थान बांधण्यांत आलें आहे. मंदिराच्या पश्चिमेस कांहीं अंतरावर पुरातन स्वतंत्र **श्रीराममंदिर** आहे. अशा रीतीनें गांवाच्या बाह्य स्वरूपांत जरी थोडा फार फरक झाला असला, तरी हवापाणी पूर्वींचें च कायम आहे व तें फार उत्तम आहे. हवा उल्हासकारक आणि पाणी पाचक आहे. गांवाला लागून एक लहान नदी वाहत आहे. श्रीसमर्थांच्या मूर्तिस्थापनेच्या समारंभाला जे हजारों लोक आले होते, त्यांनीं या नदीचें नांव **आनंदी** म्हणून ठेविलें. आनंदीहून हि दुसरी एक लहान नदी, तिला येथें च येऊन मिळते. जांबेस हि पूर्वीं पांच वड होते. ती जागा आज हि दाखविण्यांत येत असते. जशी नाशिकची पंचवटी, तशी ही जांबेची पंचवटी होय. जांबेच्या अशा या नैसर्गिक स्वरूपाच्या चिंतनांत च आज समाधान मानून रहावयाचें आहे.

( ९ ) श्रीरामांनीं प्रत्यक्ष दर्शन देऊन श्रीसमर्थांवर अनुग्रह केला, तो या पंचवटीस होय, असें कोणी मानतात, तर नाशिकच्या पंचवटीस अनुग्रह झाला, असें दुसरे कोणी म्हणतात. जांब ही च त्यांच्यावर श्रीरामाची कृपा झाल्याची भूमि होय, असें मी मानतों. त्यांचे शिष्य तिसगांवमठपति दिनकर, यांनीं आपल्या अपूर्व ग्रंथाच्या सोळाव्या कलापाच्या चवथ्या निरूपणांत सविस्तर वर्णन करून हें च सांगितलें आहे व तें च सत्य होय. तें अद्भुत वर्णन पुढच्या च उल्लासांत आपण वाचूं.

( १० ) वडील पुत्र गंगाधर आणि धाकटा नारायण, या उभयतां बंधूंना अगदीं लहानपणीं, निरनिराळ्या वेळीं, पैठणास श्रीएकनाथ-महाराजांच्या दर्शनास नेलें होतें, असें वर्णन बखरींत आहे. " नारायणास नेऊन त्यांच्या पायांवर घालणार, तों च नाथांनीं नारायणबालकास उचलून, त्याचें चुंबन घेतलें आणि परम संतोष पावून सूर्याजीपंत आणि राणुबाई यांना नाथ म्हणाले, ' तुमची कूस धन्य, तुम्ही धन्य, तुमचा वंश धन्य, तुमची भक्ति धन्य, तुमची उपासना धन्य, तुम्हांस किती वानावें ? हा साक्षात् मारुतीअंशेंकरून पुत्र जाहाला, परम समर्थ, श्रीकृष्णातीरीं राहून जगविख्यात होऊन जगदुद्धार करील, ' म्हणोन वारंवार स्तवन करून ' आमचें कृत्य राहिलें आहे तो हा शेवटास नेईल, आम्ही आतां अवतार समाप्त करतों, ' म्हणोन यासी कांहीं दिवस ठेवून घेऊन नंतर नाथांनीं त्यांना निरोप दिल्हा. "

( ११ ) असें बखरींत वर्णन आहे. तसेंच या भेटीच्या प्रसंगाचा उल्लेख वाकेनिसी टिपणांत हि आहे. यावर एक शंका उद्भवते, ती अशी. श्रीसमर्थांचा जन्म शक १५३० त झाला, हें निश्चित आहे. पण पैठणास नाथमहाराजांची समाधी असून तीवर कोरलेल्या श्लोकांत त्यांच्या समाधी-कालाचा शक दिला आहे, तो १५२१ चा. पण हे श्लोक तत्कालीन कोरलेले नव्हत. नाथांच्या पश्चात् पाऊणशें शंभर वर्षांनीं होऊन गेलेल्या कृष्णदयार्णवांनीं हे श्लोक रचलेले आहेत. तेव्हां त्यांत चुकी होण्याचा संभव आहे. नाथांचा समाधीशक १५२१ नसून १५३१ होय व तसा तो बखरीच्या एका प्रतींत आढळतो हि. तेव्हां नारायणास वडीलमातु:श्रींनीं नाथांच्या दर्शनास नेऊन त्यांच्या पायांवर घातल्याची गोष्ट मी सत्य मानतों.

( १२ ) नारायणाच्या सर्व बाललीला जांबेस च झाल्या. त्या साऱ्या आपणांस कोठून कळणार ? प्रतापांत आणि धामांत ज्या कांहीं थोड्या

वर्णिलेल्या आहेत, त्या च तेवढ्या ऐकून आणि त्यावर आपली कल्पना चालवून वाचकांनीं आपल्या मनाशीं त्यांचा विचार करावा.

( एक ) नारायणाला लहानपणीं गांवांतील इतर मुलांच्या बरोबर गोट्या खेळण्याचा नाद असे. §

( दोन ) गांवाबाहेर सदा सर्वदा उदासवृत्तीनें रानावनांत हिंडणें, घोड्यावर बसणें, शस्त्र फिरविणें, झाडांवर चढणें, झाडांवरून भिंतीवरून उड्या मारणें, पाण्यांत डुंबणें, कोठेंतरी एकीकडे जाऊन दुश्चितासारखें बसणें, इत्यादि त्याला फार छंद असे.

( तीन ) बुद्धि अति तीव्र असल्यामुळें, पंतोजींनीं जें कांहीं शिकवावें, तें याचें तत्काळ तयार व्हावें.

( चार ) सातव्या वर्षीं च मुंज झाली. नंतर वर म्हणून यांना कोणी पहावयास आले, तर वडील माणसांच्या देखत यांनीं कांहीं बोलूं नये, पण बाहेर आलेल्या गृहस्थास म्हणावें,

**आपणासी आश्रम करणें नाहीं । श्रीरामआज्ञा समर्थ कांहीं ।**
**चतुर्विधा कांता वरूनि गेलों पाहीं । निर्मळ निश्चळ निरंजनीं ॥**

— श्रीसमर्थप्रताप, २ – १९

( पांच ) बाल समर्थ अक्षयीं बाहेर असावयाचे, घरांत क्वचित् च. तेव्हां एकदां आई त्यांना म्हणाली, "नारायणा, गंगाधर तरी तुझ्यापेक्षां तीन च वर्षांनीं मोठा, त्याला कुळकर्णीपणाचें काम पहावें लागतें, तूं कांहीं घराकडे पहात जा, थोडी तरी प्रपंचाची चिंता करावी." आईचे तेवढे च शब्द ऐकून कोणास न कळत नारायण अडगळीच्या खोलींत जाऊन आसन घालून चिंतन करीत बसले. तिनीसांज झाली, तरी नारायण

§ श्रीसमर्थप्रताप, २ – १५ व उद्धवसुत, ३ – ४१ पहा. श्रीसमर्थमंदिराचा पाया खोदण्याचें काम शक १८५०–५१ त चालू असतां, पायांत एक पंचपात्री, मुलांच्या खेळांतील धातूचा एक घोडा, कांहीं कवड्या वगैरे वस्तु सांपडल्या, त्यांत एक गोटी हि पण आहे. या सर्व वस्तु श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील प्रदर्शनीय वस्तूंच्या कांचेच्या कपाटांत पाहण्यासाठीं १८६९ कार्तिक शु. ६ ( टिळक पंचांग ) या दिवसापासून ठेवण्यांत आल्या आहेत.

घरीं आला नाहीं, असें वाटून आई वाट पहात राहिल्या. कांहीं कामानिमित्त आई त्या खोलींत गेल्या

**तंव समर्थमूर्ति घव्यवाणो देखिली ।**
**ब्रह्माडघरींची चिंता देवें मांडिली ।**

आई विचारते

**बापा काय हें करितोसी येकांतस्थळीं ।**

नारायण उत्तर देतात

**आई चिंता करितों विश्वाची ॥**

—श्रीसमर्थप्रताप, २–२२

आईनें सांगितलें होतें, प्रपंचाची चिंता करावयाला आणि नारायण एकांतांत जाऊन विश्वाचें कल्याण कसें होईल, याची चिंता करीत बसले ! § ही जी वयाच्या अकराव्या वर्षीं नारायणानें चिंता केली, ती च सर्व जन्मभर केली.

( सहा ) एकदां घरीं कांहीं प्रयोजन निघालें होतें. त्यासाठीं ताक पाहिजे होतें. आईनें आदल्या दिवशीं नारायणापाशीं ताकाची गोष्ट सहज काढली होती. तेवढें च ऐकून नारायणानें गांवांतील सर्व ब्राह्मणांच्या घरीं, उद्यांला सूर्योदयापूर्वीं ताक पाहिजे, म्हणून गाडगीं नेऊन ठेविलीं. त्याप्रमाणें ब्राह्मणबायांनीं ताक करून गाडगीं भरून आणलीं, तीं दिवस उजाडण्या-पूर्वीं च नारायणानें मागील दरवाजानें आंत आणून ठेवलीं. आई व भावजय उठून पाहतात, तों जिकडे तिकडे ताक च ताक त्यांना दिसलें.

( सात ) सूर्याजीपंतांचें घर लहानसें च होतें. एकदां कोणी एक प्रतिष्ठित गृहस्थ त्यांना भेटावयास आले असतां म्हणाले, कोणी थोर मंडळी आल्या-गेल्यास तुमच्या घरीं बसण्यास स्वतंत्र अशी कचेरीची जागा नाहीं, ती असावी. त्या गृहस्थाचें हें म्हणणें नारायणानें ऐकलें, त्यानें चार सवंगडे बरोबर घेऊन दिवसा लांकडें तोडून आणलीं व एका रात्रींत भिंती

---

§ प्रत्यंतरासाठीं पहा दासविश्रामधाम, ४–९८ ते १०२ व उद्धवसुत-कृत चरित्र, ५–१७

घालून बैठक तयार केली. दुसरे दिवशीं तो गृहस्थ येऊन पहातो, तों आश्चर्य च करूं लागला :

**अरे बा येके रात्रीं मोठी बैठक कैसी केली ।**
**अवतारपुरुषाची क्रिया देखिली ।**
**येके रात्रीं आणिला द्रोणाचळु ॥**

—श्रीसमर्थप्रताप, २-३२

( आठ ) **गाभण गायीनें दूध दिलें**

एकदां नारायणानें, दूध दे, म्हणून आईपाशीं हट्ट धरला. घरीं गाय होती, पण गाभण असून आटली होती, दूध देईनाशी झाली होती. नारायणानें फार च हट्ट चालविला. तेव्हां त्याची समजूत करण्यासाठीं आईनें त्याला गायीजवळ नेऊन म्हटलें, "पहा, गाय गाभण आहे. व्यायली म्हणजे पुष्कळ दूध देईल, मग खूप पीत जा." नारायणानें हट्ट सोडला नाहीं, "धार काढ, दूध देईल," असें म्हणून हट्ट चालविला च. त्याची समजूत व्हावी, म्हणून चरवी घेऊन आईनें गायीच्या कासेला हात लावला, तों गायीला पान्हा फुटला आणि दुधानें चरवी भरली. आईला च काय, सर्वांना च आश्चर्य वाटलें.

**भक्तअगत्य जानकीशा । मनोरथ भंगूं नेदी सहसा ।**
**जाले होतील भक्त अनेकशः । कदा न विसंबे जगदात्मा ॥**

— दासविश्रामधाम, ३-१०४

( नऊ ) **दुष्काळ**

जांबेस च नारायण असतां एक वर्ष दुष्काळ पडला. श्रीरामनवमीचा उत्सव कसा साजरा होणार, याची चिंता सूर्याजीपंतांस वाटून, मारुतीराय लाज राखणार, असे उद्गार त्यांनीं काढले, ते नारायणानें ऐकले. चिंता न करावी, असें नारायण वडिलांस म्हणाले आणि गहुं काढण्यासाठीं बळदांत उतरले. नारायण आंतून गहुं देत गेले आणि साठवणारे बाहेरून घेत गेले. गव्हाच्या राशी बाहेर झाल्या, पण बळदांतला गहुं संपला नाहीं. गहुं उत्सवाला तर पुरला च, पण प्रपंचाला हि पुरला.

( दहा ) **तूप**

दुष्काळामुळें दरवर्षापेक्षां उत्सवाला जास्त च लोक लोटले. पंक्तींत तूप कमी पडलें. वडील चिंतातुर झाले. नारायणास चिंतेचें कारण कळलें.

त्यानें एक घडा उचलला. त्यांत पाहिलें, "तूप तर आहे यांत, वाढा सर्वांना लागेल तितकें", असें म्हणाला. सर्वांना भरपूर तूप वाढलें, तरी घड्यांत जेवढें तेवढें शिल्लक च.

ही तुपाची गोष्ट अन्यत्र अन्य तऱ्हेनें सांगितलेली आढळते.

तो तुपाचा घडा जांबेस श्रीराममंदिरांत जपून ठेवलेला आहे.

## ( अकरा ) लोखंडाचें सुवर्ण झालें

बालपणीं नारायणाची वृत्ति खोडकर होती. एकदा त्यानें कांहीं खोडी केली, म्हणून आई रागावली व कडब्याचें ताट घेऊन त्यास मारण्यास पुढें गेली, तसा हा मागें मागें सरकत गेला, एका लोखंडाच्या तुकड्याला अडखळून पडला, दांताला लागलें, तसें मग आईला च उलट वाईट वाटलें. नारायण न थांबतां, गेला मुलांत खेळावयाला. आईनें पाहिलें, तों ज्या लोखंडाच्या तुकड्याला पाय अडखळून नारायण पडला, त्याचें सुवर्ण झालें होतें. (दासविश्रामधाम, ४–१६)

## (बारा) धान्याची मोट

एकदां खळवाड्यांतून सवा मण दाण्याची मोट उचलून, ती घेऊन पळत च नारायणानें घरीं आणली. "अरे, काय आणलेंस, कां पळत आलास ?" म्हणून आई विचारते, तों मागोमाग कुणबी धांवत च आला आणि आईला म्हणाला, "हा राक्षस आहे कीं काय ?" आईला समजलें आणि ती रागावली, "अरे काय ह्या तुझ्या अनन्वित खोड्या !" नारायण कुणब्यास म्हणाला, "घेऊन जा तुझी मोट." कुणब्यानें मोट कशीबशी उचलली, तों खालीं दुसरी मोट आहे च ! ती उचलली तों खालीं तिसरी तयार च ! अशा पन्नास-साठ मोटा निघाल्या.

( १३ ) इत्यादि नारायणाच्या शक्तीच्या, बुद्धीच्या, दैवी कृपेच्या अनेक बाललीला पाहून आईबापांस परम संतोष होई. गांवांतल्या सर्व च लोकांना नारायण आवडूं लागला. समवयस्क मुलांना तर त्याच्या संगतींत च सदा असावें, असें वाटे. नारायणाला हि त्यांच्यांत खेळणें, बागडणें आवडे. असा काळ आनंदांत जात असतां नारायणाला अकरावें वर्ष लागलें आणि त्याच्या भाग्याचा दिवस उजाडला. त्या दिवसाची रम्य हकिकत आतां पुढील उल्लासांत निवेदन करूं.



उ ल्लास च व था

# श्री राम कृपा

[ १५४१ ]



जन्मांतरपुण्यें श्रीरामचंद्रें।
नारायणासी गुणसमुद्रें ।
सगुणसाक्षात्कारें भक्तनरेंद्रें ।
दर्शन दिधलें निजग्रामीं ॥–स्वानुभवदिनकर, १६–४–४५
तुझिया कृपेचा महिमा ।
न कळे चि आगमादिनिगमा ।
तो तूं प्रसन्न होऊनि आम्हां ।
सांगसी स्वमुखें ॥

[ ( १ ) नारायणाच्या भाग्याचा दिवस – ( २ ) वयाच्या अकराव्या वर्षीं – ( ३ ) प्रत्यक्ष श्रीरामदर्शन – ( ४ ) नारायणाची अवस्था – ( ५ ) नारायणाचा शोध – ( ६ ) श्रीरामनाममुद्रांकित पत्र – ( ७ ) तें पत्र, वस्त्र व बाण – ( ८ ) गुरुपरंपरा – ( ९ ) श्रीसमर्थांचे गुरु श्रीराम ]

( १ ) याप्रमाणें आपल्या बाललीलांनीं आईबापांस रंजवीत असतां पूर्वजांच्या पुण्याईनें आणि स्वतःच्या पूर्वजन्मार्जित सुकृतानें नारायणाच्या अत्यंत भाग्याचा दिवस उजाडला. तो दिवस कोणता होता, हें निश्चित कळण्याला बखरीशिवाय साधन नाहीं. बखरींत म्हटलें आहे कीं, "जांबेंत पंचवटी म्हणून जें स्थळ आहे, तेथें शके १५३८ त श्रावण शुक्ल ८ स श्रीरघुपतीनें प्रसन्न होऊन अनुग्रह करून मस्तकीं हस्त ठेवून नारायणास आज्ञा केली कीं, तुम्हांस मारुतीचे अंशेंकरून निर्माण केलें आहे, सांप्रत दक्षिण देशीं, कृष्णातीरीं तुम्ही जाऊन, धर्मस्थापना करून, भक्ति व उपासना वाढवावी आणि जगदुद्धार करावा आणि म्लेंच्छांचे निवारणार्थ शिसोदे यांचे वंशीं शिवनामेंकरून राजा उत्पन्न होणार आहे, त्यास तुम्ही साह्य होऊन अनुग्रह देऊन धर्मस्थापना करावी." यांतील महिना व मिति आपण मान्य करूं व शक सोडून देऊं. शक अशासाठीं अग्राह्य मानावयाचा कीं, आपणांस अत्यंत विश्वसनीय मार्गानें ठाऊक झालें आहे कीं, त्या वेळीं श्रीनारायणाचें वय अकरा वर्षांचें होतें. म्हणजे शक १५४१ येतो.

( २ ) हा विश्वसनीय पुरावा म्हणजे स्वानुभवदिनकर ग्रन्थाचा होय. त्या ग्रन्थाचे कर्ते दिनकर यांनीं ग्रन्थाच्या सोळाव्या कलापाच्या चवथ्या किरणांत आपल्यावर श्रीसमर्थांची कृपा कशी झाली, ती सांगतांना सहज ओघांत श्रीसमर्थांवर हि श्रीरामाची कृपा कशी आणि कोठें झाली, त्याची हकिकत निवेदन केली आहे. तींत त्यांनीं म्हटलें आहे कीं, त्या वेळीं श्रीसमर्थांचें वय अकरा वर्षांचें होतें. दिनकरांवर श्रीसमर्थांची कृपा १५७६ त झाली आणि त्यानंतर सत्तावीस वर्षे श्रीसमर्थ होते च. तेव्हां श्रीसमर्थांच्या वयाच्या अकराव्या वर्षाची हकिकत, न जाणों, दिनकरांना श्रीसमर्थांकडून च समजली असावी.

( ३ ) ती हकिकत अत्यंत अद्भुत आहे. त्या दिवशीं कांहीं पर्वकाळ असावा, कारण वडील सूर्याजीपंत गंगेवर स्नानाला गेले होते. जांबेपासून

गंगा दक्षिणेस तीन कोस तरी येईल. एक वानर दूतवेषानें येऊन नारायणास धरून गांवाच्या बाहेर बळजबरीनें घेऊन गेला. नारायण भांबावून भयभीत झाला. आपणांस त्रास देत, सक्तीनें कोण, कोठें घेऊन जात आहे, त्यास कांहीं कळेना. गांवाबाहेर

**मेघश्यामरूप क्षत्रियवेषें । सिबिकेमाजीं बैसलीं स्त्रीपुरुषें ।**
**सभंवते निजगण यथासंतोषें । उभे असती दोहीं भागीं ॥**

—स्वानुभवदिनकर, १६–४–५०

त्यांच्या पुढें नेऊन दूतानें नारायणास उभें केलें. तीं स्त्री-पुरुषें कोण होतीं? दुसरीं कोण असणार? राम आणि जानकी शिबिकेंत बसलेलीं होतीं. त्यांचा वेष रजपुतांच्या सारखा होता व भाषा हि तशी च होती. त्यांनीं नारायणास विचारिलें, "वडील कोठें आहेत?" यांनीं सांगितलें, "गोदेवर स्नानास गेले आहेत." मग प्रभूनें नारायणास जवळ घेतलें, कुरवाळिलें आणि त्याच्या हातांत निजमुद्रांकित एक पत्र दिलें.

तें पत्र हातीं पडतां च नारायणाची वृत्ति पालटली, सर्वांगाला कंप सुटला, जिव्हेची बोबडी वळली, घाम सुटला, घाबरा झाला, क्षणांत हांसे, क्षणांत रडे, चकित होऊन क्षणांत उड्या मारूं लागला,

**इतुकियामाजीं निजनिवाडे । कौतुक देखे निजदृष्टीं ॥**
**तवं मूर्ति देखिली घवघवीत । मेघश्याम प्रभा लखलखित ।**
**वामांगीं जानकी शोभत । पाठीसी सौमित्र भरत ॥**
**तया सेजीं उभा शत्रुघ्न । पुढें उभा वीर हनुमान ।**
**अकस्मात वाहादुळी येऊन । इतुकें देखे तत्काळीं ॥**
**ऐसें देखेना जवं अकस्मात । तवं श्रीरामें मस्तकीं ठेऊनि कृपाहस्त ।**
**महावाक्य उपदेशूनि त्वरित । हनुमंतासी निरविलें ॥**

—स्वानुभवदिनकर, १६-४-५६ ते ५९

याप्रमाणें श्रीरामचंद्रांनीं नारायणास "अहं ब्रह्मास्मि" या महावाक्याचा उपदेश करून "यापुढें सर्वस्वीं सांभाळ याला आणि याच्या परंपरेला" अशी मारुतीस आज्ञा करून त्याच्या स्वाधीन नारायणास केलें! श्रीसमर्थांचें केवढें हें भाग्य! ज्याचा कैवार श्रीरामानें घेतला आणि हनुमंतानें अंगीकार केला, त्याला काय उणें असणार? या निरविण्याची मारुतीला श्रीसमर्थांनीं पुढें अनेकदां आठवण करून देऊन मारुतीचें साहाय्य

मिळविलें असलें पाहिजे. याला प्रत्यंतर करुणाष्टकांतील 'फाणिवर उठवीला' या अष्टकांत स्पष्ट च मिळत आहे. त्या अष्टकांत श्रीसमर्थ मारुतीला म्हणतात

**तुजविण मज पाहे पाहतां कोण आहे ।**
**म्हणउनि मन माझें रे तुझी वास पाहे ।**
**मज तुज निरवीलें पाहिजे आठवीलें ।**
**सकळिक निजदासांलागि सांभाळवीलें ॥**

—करुणाष्टकें, १४४–५

आहे ना आठवण, असें म्हणून या श्लोकांत मारुतीला जी पूर्वींची आठवण करून दिली आहे, ती ह्या अकराव्या वर्षाच्या निरविण्याची होय, यांत काय शंका आहे ? जांबेस अकराव्या वर्षीं च श्रीसमर्थांवर श्रीरामानें कृपा केल्याचें जें अपूर्व वर्णन दिनकरांनीं केलें आहे, तें यथार्थ असल्याचें या श्लोकांत श्रीसमर्थांच्या मुखानें च सिद्ध होत आहे.

( ४ ) हा या संप्रदायाला वास्तविक केवढा आधार आहे ! पण आम्ही तो मानूं आणि तदनुसार वागूं तर ना ?

**उपेक्षा कदा रामरूपीं असेना । जिवां मानवां निश्चये तो वसेना ॥**

याला कोण काय करणार ? आमच्यावर याचा कांहीं परिणाम, आमच्या प्राक्तनानें, होत नसला, तरी नंतर नारायणाची काय अवस्था झाली, ती श्रीदिनकरांच्या तोंडून च ऐकली पाहिजे.

**ते समईं दिग्मंडळ दणाणिलें । तेणें नारायणाचें सर्वांग थरारिलें ।**
**म्हणे काय ब्रह्मांड कोसळलें । मजवरी ये काळीं ॥**

**म्हणौनि थरथरां असे कांपत । तेणें दांतखिळी बैसों पाहात ।**
**सभंवतें टकमकां अवलोकित । तवं धुधुकार देखिला ॥**

**इतुकियामाजी अकस्मात । विज्जुसारिखें लखलखित ।**
**निजांगीं दिव्य वस्त्र वेष्टित । सीतनिवारणार्थ ॥**

**वस्त्र रंगाथिलें अति मनोहर । आरक्त शोभामंडित सुंदर ।**
**हुमुजीसारिखें सपरिकर । दिव्य तेजें विलसे ॥**

**सव्य करीं पत्र राममुद्रांकित । वाम करीं अर्धचंद्र बाण राम देत ।**
**इतुकियामाजी तत्काळ जाली गुप्त । राममूर्ति निजांगें ॥**

—स्वानुभवदिनकर, १६-४-६० ते ६४

इतुकें सारें होत आहे तों नारायणाच्या डोळ्यांपुढें अंधारी आली, त्याची वाचा कुंठित झाली आणि पुढें त्या समाधिअवस्थेंत च एक वर्षभर नारायण तटस्थ च होऊनि राहिले !

( ५ ) इकडे हा प्रकार अरण्यांत घडत आहे, तों वडील गोदेहून घरीं परत आले आणि त्यांना कळलें कीं, कोणी एक दूत येऊन नारायणास हटानें घेऊन गेला. हें ऐकून वडील घाबरले आणि ते आणि इतर कांहीं जण, नारायणाच्या शोधार्थ लागलींच निघाले. शोधतां शोधतां ब्रह्मारण्यांत नारायण निपचित पडलेला सर्वांच्या दृष्टीस पडला. त्यास बोलविण्याचा प्रयत्न झाला, पण तो बोलला नाहीं. कर्णोपकर्णीं गांवांत सर्वत्र वार्ता कळली आणि गांवकरी गोळा झाले. त्यांचे तर्क सुरू झाले. त्या तर्कांना आगा ना पिछा. कोणी म्हणत यास भूतानें झडपिलें असावें, तर कोणीं म्हणावें, मुंज्या लागला असावा. असे अनेकांनीं अनेक तर्क केले व त्यांना अनुसरून उपचार हि करून पाहिले, पण नारायणाची निजसमाधी कांहीं उतरली नाहीं ! त्यास भूत लागलें होतें, हें खरें, पण तें लौकिक भूत नव्हतें. त्यानें च पुढें आईला दिव्य दृष्टि देतांना जें भूत सांगितलें, तें च हें अलौकिक भूत होतें. पण तें तेव्हां कोणाच्या लक्षांत आलें नाहीं. वडिलांनीं त्यास उचलून घरीं आणलें आणि लोकांना आपआपल्या घरीं जाण्याची आज्ञा केली. लोक गेले आणि वडिलांनीं नारायणाची मूठ उकलून पाहिली, तों श्रीरामनाममुद्रांकित पत्र त्यांच्या दृष्टीस पडलें. दुसऱ्या हातांत अर्धचंद्र बाण होता व अंगावर तें दिव्य वस्त्र होतें. वडिलांच्या लक्षांत आलें, ही झडपणी नसून प्रभु श्रीरामचंद्राची कृपा होय.

( ६ ) वडील सूर्याजीपंत आणि बंधु गंगाधर यांनीं तें श्रीरामनाममुद्रांकित पत्र वाचतां च त्या दोघांस हि समाधिसुख प्राप्त झालें. दिनकर सांगतात कीं, वडिलांनीं तर तत्काळ देह ठेवून निजवैकुंठीं साम्राज्यपद-सुखासनीं वास्तव्य केलें आणि बंधूंनीं श्रीरामचरणीं लेखणी वाहून रामाला प्रसन्न करून घेतलें.

( ७ ) अशा तऱ्हेचें कांहीं पत्र होतें व त्यांत बहुधा श्रीसमर्थावताराचें पुढील कार्य वर्तविलेलें असावें, याविषयीं मला शंका नाहीं. पण आपलें हें केवढें दुर्दैव म्हणावयाचें कीं, तें पत्र, तें वस्त्र आणि तो बाण, या तिन्ही वस्तूंचें

रक्षण करून ठेवावें, अशी बुद्धि तेव्हां कोणास झाली नाहीं. असें कांहीं तरी पत्र होतें, असें मी मानतों, त्याला कारण दिनकरांचें वरील वर्णन आहे च, पण गिरिधरांनीं हि श्रीसमर्थप्रतापांत अशा तऱ्हेच्या पत्राचा उल्लेख, थोडी निराळी हकिकत सांगून, केला आहे :

**समर्थाचें भविष्य अवतारमहिम्न । ग्रामाधिपतिरूपें श्रीरघुवीरें जाण ।**
**गंगाधरपंतांकरवीं लेहून । रात्रीं वटवृक्षातळीं दिधलें ॥**

**समर्थवटवृक्ष अद्यापि आहे ।**
**हनुमान मुळीं बैसला पाहे ।**
**गंगाधरस्वामि तीन दिवस समाधिस्थ राहे ।**
**समर्थचरित्रपत्रें हस्तीं घेऊनियां ॥**

—श्रीसमर्थप्रताप, २–३४ व ३५

अर्थात् अशा तऱ्हेचा कांहीं लेख होता, पण तो दृष्टीस पडण्याचें पुढल्या पिढ्यांच्या नशिबीं लिहिलेलें नव्हतें; असो.

(८) मागील दुसऱ्या उल्लासांत श्रीसमर्थांपर्यंतची जशी वंशपरंपरा आपण पाहिली, तशी आतां येथें त्यांच्या गुरुपरंपरेची आठवण करणें, योग्य होईल.

**प्रथम गुरु विष्णु आदिनारायण । त्यापासूनि ब्रह्मत्व पावला चतुरानन ।**
**पुढें ब्रह्मयानें वशिष्ठऋषीलागून । अनुग्रह केला ॥**

**वशिष्ठानुग्रह श्रीरामचंद्रासी । योगवाशिष्ठ निजसंवादेंसीं ।**
**पुढें श्रीरामदर्शन भूतळीं नारायणासी । जालें जन्मांतरसुकृतें ॥**

**नाना पुरश्चरणें अनुष्ठानें । जन्मांतरें कोट्यावधि आचरणें ।**
**ये हि जन्मीं नाना वैराग्यसाधनें । श्रीरामचंद्र आराधिला ॥**

**तिया जन्मांतरपुण्यें श्रीरामचंद्रें । नारायणासी गुणसमुद्रें ।**
**सगुणसाक्षात्कारें भक्तनरेंद्रें । दर्शन दिधलें निजग्रामीं ॥**

—स्वानुभवदिनकर, ४–४२ ते ४५

(९) श्रीसमर्थांचे गुरु कोण, याविषयीं आतां काय शंका उरली ? दिनकर म्हणतात :

**मुळींचें नाम नारायण । असोनि रामचंद्रीं आवडी गहन ।**
**म्हणौनि रामदास हें नामाभिधान । स्वेच्छां धरिलें ॥**

**त्यास हि गुरुत्व श्रीरामजीचें। दर्शनसादृश्य श्रीराममूर्तीचें।**
**यासी असत्य म्हणतील तयांचें। नर्की पतन यावच्चंद्रार्क॥**

**श्रीराम सीता लक्ष्मण। भरत शत्रुघ्न हनुमान।**
**या इतुकियांचें प्रत्यक्ष सगुणदर्शन। म्हणौनि नाम रामदास॥**

—स्वानुभवदिनकर, ४–३० ते ३२

याप्रमाणें वयाच्या अकराव्या वर्षी १५४१ च्या श्रावण शु. ८ स नारायणावर श्रीरामाची कृपा झाली आणि त्या दिवसापासून एक संवत्सर नारायण मौन्यमुद्रा धारण करून च होते. न जाणों, मनांतल्या मनांत पुढील आयुष्याचा चित्रपट तयार करीत राहिले असतील!



उल्लास पांचवा

# संगत्याग

[ १५४२ ]



जयास वाटे सुख चि असावें ।
तेणें रघुनाथभजनीं लागावें ।
स्वजन सकळ हि त्यागावे ।
दुःखमूळ जे ॥ —श्रीदासबोध, ३–१०–६३

जयासी वाटे वैराग्य करावें ।
तेणें कांहीं च न विचारावें ।
उठोनि वाटा चि लागावें ।
दिगांतराप्रती ॥ —एकवीस समासी, १८ – २४

[ ( १ ) नारायणाच्या लग्नाचा विचार – ( २ ) नारायणाचा त्रागा – डोहांत उडी – ( ३ ) तरी आईचा नाद सुटला नाहीं – ( ४ ) सावधान शब्द ऐकून सावध झाले – ( ५ ) हा केवढा अपूर्व चमत्कार – ( ६ ) महत्त्वाचा क्षण – ( ७ ) लोक आश्चर्य करीत च राहिले – ( ८ ) आईची अवस्था – ( ९ ) समर्थांचा मार्ग – ( १० ) ते निश्चित असणार – ( ११ ) पंचवटीस श्रीरामापुढें उभे राहिले – ( १२ ) श्रीरामाचा आशीर्वाद ]

( १ ) याप्रमाणें स्वतः त्यांनीं केलें. " आधीं केलें मग सांगितलें " हें श्रीसमर्थचरित्राचें जणूं सूत्रवाक्य आहे. मातुःश्री नारायणाच्या लग्नाच्या गोष्टी बोलूं लागल्या. परभारें बोलणीं होत तीं नारायण मुकाट्यानें ऐकत असे, कारण आपणांस काय करावयाचें तें त्याचें मनांत ठरलें असावें. बंधु गंगाधर हि जाणून होते. त्यांनीं तीं श्रीसमर्थचरित्रपत्रें वाचलीं होतीं. त्यांनीं आईला सांगून पाहिलें, तुम्ही नारायणाच्या लग्नाचा विचार हि मनांत आणूं नका. पण आई ती आई. जशा सर्व आया, तशा च श्रीराणुबाई. त्यांना वाटे, एकदांचे नारायणाचे दोन हाताचे चार हात व्हावेत. गंगाधरांनीं वारंवार सांगावें, तुम्ही हा विचार सोडा, नाहीं तर नारायण हातचा जाईल. तसें च अखेरीस झालें. तसा ईश्वरी संकेत च होता.

( २ ) गंगाधरांचें लग्न झालें होतें. त्यांना आंवडच्या काश्यपगोत्री देशमुखांची मुलगी केली होती. आईनें नारायणाजवळ त्याच्या लग्नाची गोष्ट काढली म्हणजे नारायण डोक्यांत राख घाली. एकदां तर लग्नाचा प्रश्न निघतां च, त्यानें त्रागा करून जवळच्या डोहांत च उडी टाकली, बाहेर येईना च. पुन्हां नाहीं बाबा लग्नाची गोष्ट काढणार, असें आईनें म्हटल्या-वर स्वारी बाहेर आली. डोहांत उडी टाकली, तेव्हां डोक्याला दगड लागून टेंगूळ आलें. तें च आवाळूं. तें आमरण होतें. कोणी म्हणतात, खेळांत पोरांनीं फेकलेल्या दगडानें तें आलें, तर कोणी म्हणतात, वाघानें ओरखडा काढला होता, त्यामुळें तें आलें होतें, तर आणखी कोणाचें म्हणणें, तें जन्मतः च होतें.

( ३ ) इतकें जरी झालें, तरी आईला राहवेना. आईचें हृदय तें. आईचें हृदय कसें असतें, त्याची कल्पना होणें कठीण आहे. आयांना च आयांच्या हृदयांची कल्पना करतां येईल, किंवा फार तर, जे मातृभक्त

पुत्र असतील त्यांना कांहींशी होऊं शकेल, इतरांना अशक्य. एकदां नारायणाला जवळ घेऊन लडिवाळपणानें आई त्यास म्हणाली, "नारायणा, तुला तर कांहीं बोलण्याची सोय च नाहीं, बोलावें तर तूं त्रागा करतोस, मी कांहीं बोलूं नको ना, तुला माझें ऐकावयाचें नाहीं ना ?" इत्यादि आईचें निराशेचें आणि दु:खाचें बोलणें ऐकून मातृप्रेमानें नारायण विरघळला आणि म्हणाला, "आई, असें कसें होईल, आईसारखें दुसरें कोणतें दैवत आहे ? तुझें मी ऐकणार नाहीं, असें कसें होईल ? तुला दु:ख होईल असा मी कसा वागेन ?" आईला हर्ष होऊन ती म्हणाली, "सांगूं तर मग, रागावणार नाहींस ना ? हें पहा, अंतरपाट धरीपर्यंत नाहीं म्हणूं नकोस." नारायणानें आईचें म्हणणें मान्य केलें. "बरें आहे" म्हणाला.

(४) आई आनंदानें लग्नाच्या तयारीला लागली. जांबेपासून कोस, पाऊण कोस आसनगांव म्हणून लहान गांव आहे. त्या गांवची मुलगी होती. जांबेहून वऱ्हाड लग्नाला आसनगांवीं गेलें. श्रीदासविश्रामधामकारांनीं लग्नाची मिति दिली आहे:

**फाल्गुनमासीं शुद्ध अष्टमी । येकादश घटिका द्वितीय यामीं ।**
**सुमुहूर्तकाल नेमूनि धामीं । घटिका स्थापिली जळांत ॥**

— दासविश्रामधाम, ५ – ७१

तिकडे मुलगी, इकडे मुलगा, मध्यें अंत:पट धरला गेला, मंगलाष्टकें सुरू झालीं. प्रत्येक अष्टकाच्या शेवटीं ब्राह्मणमुखानें उच्चारलेला **सावधान** शब्द ऐकून नारायणानें विचारलें, "हे ब्राह्मण सावधान, सावधान असें म्हणत आहेत, तें कोणाला आणि कां ?" कोणीं नेहमींच्या विनोदानें म्हटलें, "हें तुम्हांला म्हणत आहेत, आतां थोड्या वेळानें तुमच्या पायांत सवा मणाची बेडी पडणार आहे, म्हणून तुम्हांला सावध करीत आहेत." हा विनोद झाला खरा, पण तो समर्थांनीं खरा च मानला आणि, मारुतीचा अवतार च ते, उडी मारून निसटले आणि धूम ठोकली. हें काय झालें, याची जमलेल्या लोकांना कल्पना हि होईना. ते आश्चर्यचकित होऊन स्तब्ध च राहिले. नारायणाला तेवढी च संधी मिळाली. पळाले ते नाहीं च सांपडले. रात्र पडल्यावर, आतां आपल्या पाठीमागें कोणी येईल, अशी नारायणाला धास्ती च उरली नाहीं. प्रतापकार म्हणतात,

**समर्थासी फावली मध्यरात्री । समर्थ कोण्हासी दिसतील चर्मनेत्रीं ।**
**समस्त लोक हाहाकारिती वग्त्रीं । सकळ साधुसंत म्हणती धन्य धन्य**

—श्रीसमर्थप्रताप, २-४०

(५) श्रीसमर्थांच्या हातून अनेक चमत्कार घडले असतील, पण त्यांत कांहीं थोडे चमत्कार मला अपूर्व वाटतात. त्यांतला हा एक होय. हा चमत्कार नव्हे, तर याला काय म्हणावें? बारा वर्षांचें वय तें काय आणि सावधान शब्द ऐकून सावध होतात आणि पायांत पडणारी, म्हणतात त्याप्रमाणें, संसाराची बेडी झुगारून देऊन हें मूल चालतें होतें, हा चमत्कार नव्हे? ही काय बाललीला समजावी, कां सिद्धावस्था मानावी? विचार करून पहा, अशा अल्प वयांत

**संसार मिथ्या ऐसा कळला । ज्ञान समजोन निघोन गेला ॥**

याला काय म्हणावें? मोरोपंतांची आर्या प्रसिद्ध आहे.

**द्विज सावधान ऐसें सर्वत्र विवाहमंगलीं म्हणती ।**
**तें एक रामदासें आयकिलें, त्या असो सदा प्रणती ॥**

कोणाच्या लग्नांत सावधान शब्दाचा सारखा उच्चार होत नाहीं? पण तो शब्द आजपर्यंत दुसऱ्या कोणास ऐकूं आला काय?

**तें एक रामदासें आयकिलें ।**

बाकी आजपर्यंत ज्यांचीं लग्नें झालीं, त्यांच्या कानठळ्या बसल्या होत्या आणि यापुढें ज्यांचीं होतील, त्यांच्या बसतील, हें भविष्य कोणीं हि निर्धास्तपणें वर्तवावें! कारण,

**ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें । पूर्वीं अवतारादिकांसी न जालें ।**
**मायामोहनीनें ब्रह्मादिकां भुलविलें । नाना पुराणें आम्हीं ऐकिलीं ॥**

—श्रीसमर्थप्रताप, २–४१

आणि तुम्ही हि ऐका. पुराणें पहा, इतिहासग्रंथ धुंडाळा, तुम्हांला असलें दुसरें उदाहरण आढळणार नाहीं!

**समर्थदेवें ख्याती केली । सांगायासी ऐकायासी गोष्टी जाली ॥**

म्हणून च मला हा एक मोठा चमत्कार वाटतो.

( ६ ) हा चमत्कार म्हणजे त्यांच्या पुढच्या साऱ्या चरित्राचा पाया च समजावयाचा. समजा हा चमत्कार न होता, सावधान शब्दाकडे, तुम्हां आम्हां सर्वांच्या प्रमाणें च, त्यांचें हि लक्ष न जातें, त्यांनीं विचारलें नसतें आणि कोणीं विनोद केला नसता आणि आणखी एक क्षण लोटता, तो अंत:पट दूर होता, सवा मणाची बेडी राहूं द्या पण समर्थांच्या गळ्यांत माळ पडती, तर आज आपण आपले समर्थ म्हणून जे समजतों, ते आपणांस लाभले नसते. आणखी काय झालें असतें तें वेगळें, पण श्रीसमर्थ म्हणून आज आपण ज्यांना ओळखतों, ते आपल्या दृष्टीस न पडते. म्हणून मला तो विनोद आणि तो क्षण हीं फार महत्त्वाचीं वाटतात. त्यांनीं श्रीसमर्थचरित्राला वळण लावलें आणि महाराष्ट्राचा इतिहास घडविला.

( ७ ) मोठ्या संकटांतून निभावलों, असें नारायणाला वाटलें असेल ! आईला दिलेला शब्द हि पाळला, अंतरपाट धरीपर्यंत उभा राहिलों, नाहीं म्हटलें नाहीं आणि वैयक्तिक संसारपाशांत हि गुरफटलों गेलों नाहीं ! नारायणावरील संकट टळलें खरें, पण मागें काय हाहाकार झाला असेल, याची कल्पना हि करवत नाहीं. सर्वांचा कोण विरस झाला असेल. प्रथम तर कोणाला उमज च पडला नसेल. कल्पनेंत हि न येणारी गोष्ट घडली. असें होईल तरी कसें ? या आश्चर्यांत च सर्व जण गुंग होऊन राहिले असतील आणि तेवढा च अवसर नारायणाला मिळाला. मग लोकांना बोध होऊन ते शोधावयास लागले असतील. नारायण गेला तरी कोठें ? आधीं गांवांत च इकडे तिकडे शोधलें असेल. मग जांबेंत शोधावयास कोणी गेले असतील. तों तिकडे नारायण गंगापार होऊन दक्षिण तीराला हि लागला असेल.

( ८ ) पण, वडील बंधु गंगाधर आणि मातु:श्री राणुबाई यांची काय अवस्था झाली असेल ! बंधूंना थोडी तरी कल्पना होती, त्यांनीं आपलें समाधान करून घेतलें असेल व आईची हि समजूत घालण्याचा प्रयत्न केला असेल. पण आईची समजूत कशी पटणार आणि समाधान कसें होणार ! आईला झालेल्या दु:खाची आपणांस कल्पना करतां येणार नाहीं. आई ती आई ! ते पोटागी वेगळी च ! मुलगा हातचा गेला, अशा प्रसंगीं गेला ! रडत बसणें त्यांच्या कपाळीं आलें ! वाचक हो, आईला झालेल्या

या दु:खाचें तुम्ही कृपा करून स्मरण ठेवा, कारण यानंतर चोवीस वर्षांनीं, या झालेल्या दु:खाची परत आठवण करून देऊन मला तुम्हांस प्रश्न विचारावयाचा आहे. सारखें रडून रडून आईचे डोळे हि गेले.

( ९ ) तिकडे नारायण गंगेच्या दक्षिण तीरानें नदीच्या उगमाकडे चालूं लागले. त्यांना नाशिकपंचवटी ऐकून ठाऊक असेल, कदाचित् वडिलांच्या बरोबर पूर्वीं कधीं पाहण्यांत हि असेल. अवघ्या दोन वस्त्रांनिशीं फडकलेलें बारा वर्षांचें मूल! मार्गांत कोठें थांबले असतील, कोणीं आश्रय दिला असेल, काय हाल झाले असतील, ते त्यांचे त्यांना ठाऊक! झोप, तहान, भूक यांची विस्मृति पडली असेल! मनांत भावी कार्याचे संकल्प मात्र चालले असतील. क्षणोक्षणीं रामाचा धांवा मांडला असेल :

**रामा निदान पाहसी किती रे । धांव धांव गा जानकीपति ।**
**तुजवेगळी न घडे गति । नाम तारक वेद बोलती रे ॥ ध्रु० ॥**

**जळीं पाषाण तारिले वाड । काय त्याहुनी तुज मी जड ।**
**माझे जीवींचे पुरवी कोड । मनें घेतला विषयीं मोड रे ॥ १ ॥**

**तुझे भेटीचें आरत मोठें । तुजवेगळें न गमे कोठें ।**
**तुजवांचुनी सर्व हि खोटें । तुझें बाळक दीन धाकुटें रे ॥ २ ॥**

**वृत्ति गुंतली तुजपासीं । जैसी गुळासी जडली मासी ।**
**देहीं असोनि गुप्त कां होसी । दास उदास देहभावासी रे ॥ ३ ॥**

कोणा चरित्रकारानें म्हटल्याप्रमाणें, न जाणों, जीवावर उदार होऊन, ज्याला आपण अविचार म्हणूं, असा हि कांहीं प्रकार घडला असेल! आणि मग, ज्यांच्या स्वाधीन रामरायानें या धाकुट्या बाळकाला केलें होतें, त्या मारुतिरायाचें किराण पावलें असेल आणि त्यांनीं आश्वासन देऊन त्या प्रकारापासून परावृत्त केलें असेल!

( १० ) मार्गांत त्यांचे काय हाल झाले असतील, याविषयीं आम्हां-सारख्या अननुभवी, अनभिज्ञ माणसांच्या मनांत असले प्रश्न उभे रहावे, हें स्वाभाविक आहे, पण ज्याच्या मानसिक संकल्पाच्या सामर्थ्याचें सुरवरांनीं हि कौतुक करावें आणि ज्याचें तीव्र वैराग्य पाहून अष्ट दिक्पालानीं

**सीत उष्ण वात पर्जन्य वन्ही ।**
**भय रोग पीडा दैन्य शस्त्रपात न करी कोण्ही ।**
**नाना अमृतफळें प्राप्त विपिनविपिनीं ।**
**आमुची दिक्पाळसेवा चरणीं असो ॥**

—समर्थप्रताप, २-७०

असा आशीर्वाद द्यावा, त्या श्रीनारायणबालस्वामीला सर्व आयुष्यांत केव्हां हि आणि कोठें हि कांहीं कमी पडलें नसणार.

(११) याप्रमाणें ही बालमूर्ति सर्वसंगपरित्याग करून १५४१ च्या फाल्गुन शुद्ध ८ स आसनगांवाहून लग्नसमारंभांतून निसटली, ती १५४२ च्या चैत्र शुद्ध प्रतिपदेस पंचवटीस श्रीरामापुढें जाऊन उभी राहिली. हल्लींचें श्रीराममंदिर डोळ्यांपुढें येतें, पण हें तेव्हांचें नव्हे. हें अलीकडचें, सत्राशें दीडशें वर्षांमागचें आहे, असें म्हणतात. श्रीसमर्थांच्या काळीं तें केवढें आणि कसें होतें, कोण जाणे! नऊ दिवसांच्या उत्सवाचा तो पहिला च दिवस होता. मंदिरांत बाल-वृद्ध नर-नारी यांची खूप गर्दी झाली होती. त्या गर्दींत च रघुनाथाकडे थक्कीत होऊन पहात हे बालस्वामी एका कोपऱ्यांत जाऊन उभे राहिले आणि मनांतल्या मनांत रामाला म्हणाले :

**रामचंद्रा! तुझा वियोग। ऐसा नको रे प्रसंग।**
**तुजकारणें सर्व संग। त्यक्त केला ॥**
**रामा! तुझिया स्वामीपणें। मी हें ब्रह्मांड मानी ठेंगणें।**
**स्वामी! तुजविण कोण जाणे। अंतर आमुचें ॥**
**तुजविण मज माया। कांहीं नाहीं रे रामराया।**
**आम्हा अनाथा कासया। उपेक्षिसी ॥**
**तुज समुदाव दासांचा। परी आम्हांसी स्वामी आणिक कैचा।**
**तुजकारणें जिवलगांचा। संग सोडिला ॥**

—एकवीस समासी, २-२ ते ५

"रामा! केवळ तुझ्यासाठीं! तुझ्या पायीं अखंड ठाव मिळावा म्हणून घरदार, आई, बंधु वगैरे सर्व सोडून तुझ्या चरणांपाशीं आलों रे!"

रामानें विचारलें, "पण बाळ, बरोबर काय आणलें आहेस?"

"प्राक्तनाशिवाय दुसरें बरोबर काय आणणार! आपले चरण हें च आतां माझें सर्वस्व होय!

**सगुण रघुनाथ मुदल ।**
**माझें इतुकें चि भांडवल ।**

या भांडवलाच्या आधारावर, मला विश्वास आहे, मी

**कास धरूनि टाकीन पैल- ।**
**पार या भवाचा ॥ "**

( १२ ) थोड्या वेळानें गर्दी ओसरली आणि

**समर्थें मिठी घातली श्रीचरणकमळीं ।**
**येक मुहूर्त मानसपूजा संपूर्ण केली ।**
**उठोनि सप्रेमें डोळां जंव देखिली ।**
**तंव ब्रह्मगोळीं परिपूर्ण श्रीराम पूजिला ॥**

—समर्थप्रताप, २–८२

मानसपूजेचा शेवट करतांना प्रार्थना हि मानसिक च केली. त्या प्रार्थनेंत मुख्य मागणें धर्मरक्षणाचें आणि समाजरक्षणाचें—समाजांतील हि विशेषत: स्त्रीसमाजरक्षणाचें—होतें. समर्थांच्या सर्व मागण्यांचा समावेश '**रामराज्य करणें सर्वत्र हो**' या एका मागणींत होऊं शकेल. राष्ट्रांत पुनरपि रामराज्याची स्थापना व्हावी, ही एक च चिंता त्यांना होती. तें च मागणें त्यांनीं मागितलें. प्रभु रामचंद्रानें आश्वासन देऊन म्हटलें, " तुम्ही आम्ही एक च आहोंत, माझी आज्ञा म्हणून तुम्ही धर्मस्थापनेच्या कार्याला लागा, भरतखंड ही कर्मभूमि आहे, तुम्हां सर्व साधु-संतांचे संकल्प मी सिद्धीस नेईन, निश्चिंत असा."

**आतां धर्मस्थापना करावी तुम्ही ।**
**सेव्यसेवकभावें ऐक्य तुम्ही आम्ही ।**
**सकळ साधुसंतसंकल्प कर्मभूमीं ।**
**सिद्धीसी नेईन निर्धारें ॥**

—समर्थप्रताप, २–९२

श्रीरामचंद्राचा असा आशीर्वाद घेऊन श्रीसमर्थ पुरश्चरणास आरंभ करिते झाले.



उल्लास सहावा

# पुरश्चरण

[१५४२–१५५४]



॥ नाना पुरश्चरणें करावीं ॥

ब्रह्मचर्य आंगीं उत्कट । वरी अद्भुत दशा पिसाट ।
एकांत वनीं निकट । गांठी हृद्यस्थेसीं ॥

अप्रांत वनाचा पैसार । नसे चि जनाचा संचार ।
तेथें महारुद्रसाक्षात्कार । समर्थासी ॥

[ ( १ ) टाकळीस राहून पुरश्चरण करण्याचें ठरविलें – ( २ ) कालक्रमणा – वाल्मीकि रामायणाची प्रत – ( ३ ) प्रतीचा लेखनकाल – ( ४ ) अयोध्या आणि उत्तर हीं दोन कांडें केव्हां, कोठें, कोणीं उतरून काढलीं – ( ५ ) आज ती संपूर्ण प्रत कोठें आहे – ( ६ ) कालक्रमणा आणि संकल्प – ( ७ ) या अवताराची ही केवढी अपूर्वता – ( ८ ) पुरश्चरणाचा मंत्र गायत्री – ( ९ ) कशावरून? दिनकर म्हणतात म्हणून – ( १० ) मेरुस्वामी हि तसेंच म्हणतात – ( ११ ) निष्कर्ष – ( १२ ) तेरा कोटी जप कोठें संपविला – ( १३ ) पुरश्चरणाच्या काळांतील इतर कार्यक्रम – ( १४ ) सहकारी गोपीनाथ – ( १५ ) या बालमूर्तीविषयीं प्रपंची लोकांच्या कल्पना – ( १६ ) लोकांचें लक्ष ह्याकडे लागत चाललें – ( १७ ) शहाजी राजांची भेट – ( १८ ) तीस आधार – ( १९ ) अष्टपुत्रा सौभाग्यवती भव – ( २० ) उद्धवजन्म – ( २१ ) आत्ता येतों – ( २२ ) या उल्लासाची फलश्रुति – ( २३ ) तीर्थाटणास निघाले ]

( १ ) याप्रमाणें श्रीसमर्थ घरदार सोडून व जिवलगांचा त्याग करून पंचवटीस आले, श्रीरामापुढें उभे राहिले, रामाला आपलें हृद्गत त्यांनीं निवेदिलें आणि त्याची आज्ञा घेऊन पुरश्चरणाचा संकल्प केला. त्यासाठीं कोठें रहावें, असा विचार पडला. पंचवटीस च रहावें, तर लोकांचा फार उपसर्ग होऊन निवांतपणा मिळणार नाहीं, म्हणून जवळ च तपोवनाच्या पलीकडे, गोदावरीच्या कांठीं च टाकळी म्हणून एक अगदीं लहान खेडें आहे, तेथें रहावयाचें त्यांनीं ठरविलें. कालांतरानें तेथें मठ झाला असेल, पण आरंभीं तर, न जाणों, एखाद्या प्रचंड वृक्षाचा आश्रय करून च राहूं लागले असतील ! बाल नारायणानें प्रातःकाळीं उठून, टाकळीला लागून च वाहणारी एक लहानशी नदी गोदेला जवळ च मिळते, तेथें संगमावर स्नानसंध्या करून पात्रांत च उभे राहून, सूर्य मस्तकीं येईपर्यंत गायत्री-मंत्राचा जप करावा, मग पंचवटीस जाऊन माधुकरी मागावी, ती रामाला अर्पण करावी आणि नंतर रामाचा प्रसाद म्हणून सेवन करावी. असा त्यांचा नित्य क्रम सारखा बारा वर्षें चालू होता.

( २ ) दुपारपासून सायंकाळपर्यंतचा त्यांचा काळ कांहीं टाकळींत लेखनवाचनांत व कांहीं नाशिक-पंचवटींत विद्वान् शास्त्रीपुराणिक यांच्या संगतींत जात असावा. या च अवधींत त्यांनीं वाल्मीकिरामायणाची प्रत केली असावी. सुदैवानें ती संपूर्ण प्रत आज उपलब्ध आहे. तिच्या प्रत्येक

कांडाचा शेवटचा लेखनसमाप्तीचा काळ महत्त्वाचा आहे. तो विचार करण्यासारखा आहे.

## श्री आदिकाण्ड १

इत्यार्षे रामायणे वाल्मीकीये बालचरिते आदिकांडं समाप्तमिति ॥ समाप्तमादिकांडं ॥

॥ श्रीराम ॥ ॥ श्रीरस्तु ॥ ॥ रामार्पणमस्तु ॥

शक संवत् १५४४ ॥ दुंदुभिनामसंवत्सरे माघ शुद्ध १३ रवौ अस्मिन् शुभदिने रामेण रामदासेन लिखितमिदं पुस्तकं ॥ ॥ श्रीरघुनाथार्पणमस्तु ॥ ॥ रमाकांतप्रीतो भवतु ॥ ॥ श्रीराम राघव रमेश्वर रामचंद्र राजीवनेत्र रघुवर्य रमेश ईश ॥ श्रीरामभद्र भुवनेश्वर तीर्थपाद कंठे करोमि सततं तव नाममालां ॥ १ ॥

॥ करकृतमपराधं क्षंतुमर्हंति संतः ॥ १ ॥

## श्री अयोध्याकाण्ड २

इत्यार्षे श्रीरामायणेऽयोध्याकांडे नंदिग्रामे भरतवासः सर्गः ॥ समाप्तमिदं कांडं ॥ ॥ श्रीमत् शक १५७१ विरोधीनाम संवत्सरे ह्युत्तरायणे फाल्गुनमासे कृष्णपक्षे सप्तम्यायां पुण्यतिथौ अस्मिन् शुभदिने राघवनाम्ना कश्चित्सत्पुरुषचरणानुचरस्तेनालेखि ॥ अस्मिन् दिने समाप्तमिति ॥ ॥ श्रीराघवः प्रीतो भवतु ॥ ॥ शुभमस्तु लेखकपाठकयोः ॥ राम

## श्री अरण्यकाण्ड ३

इत्यार्षे श्रीरामायणे आदिकाव्ये वाल्मीकीये आरण्यकं कांडं समाप्तं ॥ ॥ समाप्तमिदं कांडमारण्यकं ॥ ॥ श्रीरमारमण दूषणमर्द्दन जानकीजीवन दशरथनंदन अहिल्योद्धरण पतीतपावन राजीवलोचन मनमोहन रघुनंदन सहलक्ष्मण प्रीतो भवतु ॥ श्रीशक १५४४ दुंदुभिनामसंवत्सरे माघ वदि १२ रवौ अस्मिन् शुभदिने रामेण रामदासेन सह गोपिनाथेन लिखितमिदं पुस्तकं ॥ ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥ ॥ श्रीरामभद्र भुवनेश्वर दूषणारे राजीवलोचन रमेश जगन्निवास ॥ कोदंडधारि करुणैकरस श्रियेश कंठे वहामि सततं तव नाममालां ॥ ॥ करकृतमपराधं क्षंतुमर्हंति संतः ॥ ॥ श्रीराम ॥ ॥ श्रीराघव ॥

# श्री किष्किंधाकांड ४

इत्यार्षे श्रीरामायणे वाल्मीकीये किष्किंधाकांडे सर्गः ॥ पंचषष्ठितमः सर्गः ॥ ॥ समाप्तमिदं किष्किंधाकांडं ॥ ४ ॥ श्रीमारुतिवल्लभार्पणमस्तु ॥ किष्किंधाकांडसर्गांतेष्व्येकैकाक्षरलेखने ॥ यांति न्यायेन वर्णैश्च लोकशुभ्रैश्च निर्मितः ॥ यांति न्यायप्रवृत्तस्य तिर्यंचोपि सहायतां अपंथानं तु गच्छंतं सोदरोपि विमुंचति ॥ ॥ श्रीमत् शके १५४५ संवत्सरे आश्विन वदि दशम्यायां पुण्यतिथौ अस्मिन् शुभदिने रामेण लिखितमिदं पुस्तकं ॥ ॥ श्रीमद्रमारमण जानकिजीवन दशरथनंदन पतीतपावन अहिल्यातारण कौशल्यानंदवर्द्धन जनरंजन मानसमोहन सुंदरवदन कमलनयन करुणार्णवपरमहंसनिषेवितचरण दशशतवदनवंदितराम मनविश्राम कैवल्यधाम नमोस्तु ते ॥ ॥ श्री

# श्री सुंदरकांड ५

इत्यार्षे रामायणे आदिकाव्ये वाल्मीकीये सुंदरकांडे सीतासंदेशो नाम सर्गः ॥ ६७ ॥ ॥ समाप्तं सुंदरकांडमिति ॥ ॥ श्रीमद्राम कृपानिधे रघुवर श्रीराम सीतापते श्रीरामेश दयालयाद्यविजयानंदैक देव प्रभो ॥ श्रीरामाव्ययसुंदरैककरुणासिंधो रमानायक श्रीदेवेश सुखार्णवाप्रतिम हे मां त्राहि मामुद्धर ॥ ॥ श्रीमत् शके १५४५ रुधिरोद्गारीसंवत्सरे मार्गशीर्षमासे शुक्लपक्षे प्रतिपदायां गुरुवासरेऽस्मिन् शुभदिने रामेण रामदासेन लिखितमिदं रामायणं सुंदरकांडं समाप्तं ॥ श्रीमद्रमारमण जानकीजीवन पतीतपावन सुरवरवंदन मानसमोहन रावणमर्द्दन वालिनिकंदन सज्जनरंजन पापनिवारण कारण रघुवर देव नमामि नमामि नमामि ॥

# श्री युद्धकांड ६

इत्यार्षे श्रीरामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकांडं समाप्तमिति ॥ सर्गः ॥ १४० ॥ श्रीमत् शके १५४६ ॥ रक्ताक्षीनामसंवत्सरे वैशाख शुद्ध तृतीयायां पुण्यतिथौ अस्मिञ्छुभदिने दिवा शुभलग्ने रामेण परोपकारार्थेऽलेखि ॥ ॥ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥ ॥ दशरथनंदन रावणमर्द्दन पतीतपावन मानसमोहन अहल्यातारण त्रिदशवंदन कारण भूतपरात्पर राजिवनयन जनमनरंजन जनश्रमनाशन रघुनंदन तव दासोहं ॥ ॥ राम अवाप्तसकळकाम कैवल्यधाम मनविश्राम नाथ नमामि ॥

## श्री उत्तरकाण्ड ७

इत्यार्षे श्रीरामायणे आदिकाव्ये श्रीवाल्मीकीये चतुर्विंशतिसहस्रिकायां संहितायां श्रीमदुत्तररामायणे दशशततमः सर्गः ॥ ॥ श्रीमद्रामायणं समाप्तं ॥ ॥ नमोस्तु रामाय सलक्ष्मणाय देव्यै च तस्यै जनकात्मजायै ॥ नमोस्तु रुद्रेंद्रयमानिलेभ्यो नमोस्तु चंद्रार्कमरुद्गणेभ्यः ॥ ॥ यत्र यत्र रघुनाथकीर्तनं तत्र तत्र कृतमस्तकांजलिं ॥ बाष्पवारिपरिपूर्णलोचनं मारुतिं नमत राक्षसांतकं ॥ ॥ एवमेतत्पुरावृत्तमाख्यानं भद्रमस्तु वः ॥ प्रव्याहरतु विस्रब्धं बलं विष्णोः प्रवर्ततां ॥ ॥ रामं रामानुजं सीतां भरतं भरतानुजं ॥ सुग्रीवं वायुसूनुंच प्रणमामि पुनः पुनः ॥ ॥ श्रीरामचंद्राय नमः ॥ ॥ शुभमस्तु ॥ ॥ हरिः ॐम् ॥ ॥परगुणपरिदानप्रस्तुताशेषकृत्या निजगुणकलिताभिर्लोकमामोदयंतः॥ अविदितपरदोषज्ञानपीयूषपूर्णाः करकृतमपराधं क्षंतुमर्हंति संतः ॥ ॥ ॥ श्रीमत्तुळस्यै नमः ॥ ॥ हरिः ॐ ॥ श्रीरामाय नमः ॥ ॥ रामेण रामचरितं प्राप्तं यदुकुलोद्भवं ॥ अनेन जगदीशोयं रामचंद्रः प्रसीदतु ॥ १ ॥

शके १५६७ पार्थिवसंवत्सर कार्तिक शुद्ध दशम्यां शुभदीने कांडउत्तरं समाप्तं ॥ ॥ समाप्तमितिह्युत्तरकांडं ॥ ॥

( ३ ) हा लेखनकाल थोडक्यांत सांगतां येईल, तो असा –

| | |
|---|---|
| आदिकांड – | १५४४ माघ शुद्ध १३ |
| अयोध्याकांड – | १५७१ फाल्गुन वद्य ७ |
| आरण्यकांड – | १५४४ माघ वद्य १२ |
| किष्किंधाकांड – | १५४५ आश्विन वद्य १० |
| सुंदरकांड – | १५४५ मार्गशीर्ष शुद्ध १ |
| युद्धकांड – | १५४६ वैशाख शुद्ध ३ |
| उत्तरकांड – | १५६७ कार्तिक शुद्ध १० |

या लेखनसमाप्तीच्या काळावरून असें दिसतें, प्रथम साहजिक च आदिकांड लिहिलें गेलें आणि नंतर अयोध्याकांड बाजूस सारून आरण्यकांड घेण्यांत आलें व तें पंधरा दिवसांच्या आंत च संपविलें. आदिकांडाच्या लेखनास आरंभ केव्हां केला, तें कळण्यास मार्ग नाहीं, पण तो बहुधा माघ शुद्ध प्रतिपदेस च केला असावा, असें अनुमानितां येतें. आदि

आणि आरण्य हीं दोन हि कांडें १५४४ च्या माघांत संपविण्यांत आलीं. पुढें १५४५ च्या आश्विनांत किष्किंधा व मार्गशीर्षांत सुंदर, हीं दोन कांडें पुरीं झालीं आणि नंतर एकट्या युद्धकांडानें बरोबर पांच महिने दोन दिवस घेतले. आदिकांड उतरण्यास आरंभ केव्हां केला, हें जरी नक्की सांगतां येत नसलें, तरी स्थूल मानानें म्हणतां येईल कीं, १५४४ च्या माघापासून तों १५४६ च्या वैशाखापर्यंत, म्हणजे सरासरी सवा वर्षांत आदि, आरण्य, किष्किंधा, सुंदर आणि युद्ध अशीं पांच कांडें श्रीसमर्थांनीं उतरून काढलीं. राहिलीं दोन : अयोध्या आणि उत्तर.

( ४ ) रामोपासकांना या दोन कांडांपैकीं अयोध्याकांडाविषयीं निश्चित च व उत्तरकांडाविषयीं बहुधा, मोठी अप्रीति वाटत असते. हीं दोन्ही कांडें वाचतांना वाचकाच्या मनाला फार दुःख होतें. नको तीं वाचावयास, असें त्यास वाटत असतें. १५५४ पर्यंत श्रीसमर्थ पंचवटीच्या परिसरांत च होते. हीं दोन कांडें त्यांना उतरून काढावयाचीं असतीं, तर सहज उतरतां आलीं असतीं, पण तीं त्यांनीं तेव्हां टाळलीं. नंतर मध्यंतरीं १५५४ ते १५६६ तीर्थाटणाचा काळ गेला. मग कृष्णातटाकीं गेल्यावर, ग्रंथ पुरा असावा, या कल्पनेनें हीं दोन कांडें लिहिलीं गेलीं, असें लेखनकालावरून स्पष्ट दिसतें. या दोन कांडांच्या लेखनसमाप्तीचा मजकूर व त्यांचें हस्ताक्षर, यांचें सूक्ष्म निरीक्षण करून आज माझ्या मनांत असें येतें कीं, या दोन कांडांचा उतारा श्रीसमर्थांनीं स्वतः केला नसून राघव नांवाच्या कोणा सत्पुरुष-चरणानुचराकडून त्या दोन कांडांची त्यांनीं प्रत करवून घेतली असावी.

( ५ ) आज ही संपूर्ण प्रत श्रीसमर्थवाग्देवतामंदिराची अधिष्ठात्री देवता म्हणून त्या मंदिरांत विराजमान आहे. मंदिरांतील संग्रहांत तिचे क्रमांक ६५३ व ६५४ असे आहेत. तेथें ती श्रीसमर्थांच्या कृपेनें अखंड नांदो. तिच्या प्राप्तीची कथा वाचकास मनोरंजक वाटेल. श्रीरामदासी संशोधनखंडांत ती सविस्तर सांगण्यांत आली आहे.

( ६ ) याप्रमाणें टांकळीस असतां पुरश्चरण वगळून इतर वेळांत श्रीसमर्थ पंचवटींत कांहीं काळ विद्वानांच्या संगतींत आणि बहुतेक काळ

**उपासनामूर्तिध्यानीं । अथवा आत्मानुसंधानीं ।**
**नाहीं तरी श्रवणमननीं । निरंतर ॥**

असा कंठीत असले पाहिजेत. मनाशीं काय बरें संकल्प करीत असतील? दुसरा कोणता संकल्प करणार ? भगवंतानें त्यांना जन्मास घालण्यांत जो संकल्प केला असेल, तो च त्यांच्या सर्व कर्माचा संकल्प असणार. परमेश्वराची कृपा संपादन करून धर्मसंस्थापना आणि धर्मरक्षण करणें यासाठीं त्यांचा जन्म आणि तो च त्यांचा संकल्प. पुरश्चरणास आरंभ करण्यापूर्वी संकल्प करीत असतात. श्रीसमर्थांनीं दुसरा कोणता संकल्प केलेला असणार ?

( ७ ) या अवताराची ही केवढी अपूर्वता म्हणावयाची ! बावीस-तेवीस पिढ्या ज्या कुळांत एकसारखी रामोपासना चालत आली, त्या कुळांत जन्म, तो हि श्रीरामजन्माच्या तिथीला आणि घटकेला, बाळपणीं च प्रत्यक्ष प्रभु रामचंद्राचा अनुग्रह, उपासना रामाची च आणि कैवार घेतलेला मारुतीनें, अखंड जप त्रयोदशाक्षरी राममंत्राचा आणि हातून लेखन झालें तें हि रामायणाचें च ! या सर्व पुण्यकर्माचें फळ म्हणजे महाराष्ट्रांत स्थापन झालेलें रामराज्य होय !

( ८ ) एक प्रश्न असा विचारण्यांत येत असतो कीं, श्रीसमर्थांनीं पुरश्चरण केलें, तें कोणत्या मंत्राचें, गायत्रीचें कां त्रयोदशाक्षरी मंत्राचें ? माझ्या जेवढें कांहीं अवलोकनांत आलें आहे, त्यावरून माझा अभिप्राय असा झाला आहे कीं, गायत्री हा च त्यांच्या पुरश्चरणाचा मंत्र होता आणि अखंड स्मरणाचा मंत्र होता तेरा अक्षरांचा व तो च ते इतरांना सांगत.

**तुला सांगतों गूज हा बीजमंत्रु । जेणें नीरसे थोर संसारशत्रु ।**
**नव्हे मिथ्य हें बोलणें सत्य वाचा । जपा अंतरीं मंत्र तेराक्षरांचा ॥**

— करुणाष्टकें, ७४–१९

( ९ ) माझा असा अभिप्राय होण्याचें कारण सांगतों. दिनकर हे श्रीसमर्थांचे प्रत्यक्ष शिष्य आणि मेरुस्वामी हे नातशिष्य, हें आपणांस ठाऊक झालें आहे. ते उभयतां आपआपल्या ग्रन्थांत काय म्हणतात, तें पहा.

दिनकर म्हणतात :

**आपुली मुळींची जे कां उपासना । ते जोंपर्यंत हा प्राणी विचारीना ।**
**आणि मंत्र तंत्र शिकला नाना । तरि तेणें काय होणें यासी ॥**

— स्वानुभवदिनकर, ६–२–५७

तसेंच

**मुख्य प्राणियांची उपासना । ते प्रणवरूप सत्य आणितां ध्यांना ।**
**त्रिपदागायत्रीमाजीं अर्थविचारणा । पाहातां असंभवनीयत्वें ॥**
**हे गोष्टी प्रगट बोलतां नये । बोलतां घडती नाना अपाय ।**
**म्हणौनि त्रिवर्णासी मुख्य उपासना होय । प्रणवसहित हे ॥**
**ब्राह्मण आपुलिया स्वानंदमेळीं । संध्या प्रातर्मध्यान्हसायंकाळीं ।**
**पुरश्चरण आचरे त्यासी कदा काळीं । दरिद्र व्यथा मृत्यु नसे ॥**

– स्वानुभवदिनकर, ६–३–५२ ते ५४

पुरश्चरणासाठीं इतर मंत्रांचा अन्यत्र स्पष्ट निषेध च करीत आहेत :

**म्हणौनि सांगावया हें चि कारण । प्राणी मुळींची निज उपासना सोडून ।**
**धरूनि नाना दैवतांचे साभिमान । तदनुसार वर्तती ॥**
**तरि सहसा ऐसें न करावें । मुळींचे उपासनेसी विचारावें ।**
**विचारूनि तदनुसार वर्तावें । प्रपंचपरमार्थीं ॥**
**अहो जे उपासनेनें ब्रह्मत्वासी आला । निज नाम ब्राह्मण ऐसें पावला ।**
**सर्वोत्कर्षें जगमान्य जाला । वेदवाक्यगौरवें ॥**
**च्यान्ही वर्ण आणि आश्रम । सर्व यातीकुळक्रम ।**
**शास्त्रविधि सत्कर्मधर्म । श्रेष्ठत्व पावला सर्वांचें ॥**
**वेदवाक्याश्रइं पूर्ण अधिकार । आंगीं सर्व शास्त्रांचा बडिवार ।**
**जे उपासनेकरितां पावला साचार । तियेसी सोडिलें सर्वस्वें ॥**
**पाहा नवल वाटतसे अपूर्व । सोडूनि मुळींचा उपासनागौरव ।**
**आपणां म्हणविती वैष्णव कीं शांभव । शाक्त सौर कां गाणपत्य ॥**

– स्वानुभवदिनकर, ६–४–२३ ते २८

या हि पेक्षां पुढें स्पष्ट सांगतात कीं, आपण स्वतः श्रीसमर्थांना विचारून गायत्रीमंत्राचें च पुरश्चरण केलें–

**ऐसिया प्रणवसूर्याची उपासना । सोडूनि अन्य पदार्थ किंबहुना ।**
**म्हणौनि मुद्राध्यानविधाना । याचिया विचारावें ॥**
**येणेंकरूनि सकळ कृतार्थता । इहपरलोक सार्थकरूप तत्त्वता ।**
**हें आधीं साधूनि मग स्वभावता । भजन करावें या सूर्याचें ॥**
**म्हणिजे तें सौरपण खरेंखुरें । संसारसार्थक जालें पुरें ।**
**त्रिकाळसंध्येमाजीं परमादरें । उपासना नित्य जयाची ॥**

**ज्याचें आचरतां पुरश्चरण। होतसे अनंत जन्मांचें दुरित दहन।**
**ब्रह्मप्राप्ति होऊनियां गहन। निजमोक्ष तत्काळ॥**

**स्वानुभवदिनकरीं याचें उपासन। दिनकरें रामदासीं विचारून।**
**निजमोक्षप्राप्तीचें विंदाण। गुरुकृपाबळें साधिलें॥**

—स्वानुभवदिनकर, ७–१–३५ ते ३९

(१०) श्रीमेरुस्वामी तर या हि पेक्षां पुढें जाऊन म्हणतात कीं, एखाद्यानें गायत्रीमंत्र वर्जून आपल्या इष्ट देवतेच्या आराधनेचा च मंत्र नुसता जपला, तर त्या मंत्राचा कांहीं एक उपयोग न होतां, तो जप वाया जातो. त्यांचें म्हणणें, गायत्रीचा जप करून नंतर आराध्यमंत्राचा जप करावा, आराध्यमंत्राचा च केवळ जप वृथा होय.

**नित्य विध्युक्त प्रातःस्नान। काळत्रय संध्यावंदन।**
**सहस्र गायत्री उच्चारोन। आराध्यमंत्र जपिजे॥**

**गायित्री मंत्रजप न होतां। अन्य मंत्र जपों जातां।**
**गायित्री त्या मंत्रासी तत्त्वता। भक्षूनि जाय॥**

**तेणें गायित्रीची क्षोभता। दैवत हि क्षोभे तत्त्वता।**
**त्यास्तव गायित्री संतोषतां। दैवत जपें तोषवीजे॥**

—रामसोहळा, ४–८–३८ ते ४०

(११) तात्पर्य, श्रीसमर्थांनीं जें पुरश्चरण केलें, तें गायत्रीचें नसतें आणि त्रयोदशाक्षरी मंत्राचें च असतें, तर हे दोघे त्यांचे शिष्य आणि प्रशिष्य वरील विधानें न करते. म्हणून आपणांस निःसंशय म्हणतां येतें कीं, प्रत्यहीं सकाळीं स्नानोत्तर नदींत उभे राहून सूर्य डोक्यावर येई तों श्रीसमर्थांनीं गायत्रीचा च जप करावा आणि इतर वेळांत त्रयोदशाक्षरी मंत्रानें व अन्य तऱ्हेनें श्रीरामाला आळवीत असावें. श्रीचरित्राच्या पुढच्या खंडांत श्रीसमर्थांच्या च वचनाधारें त्यांच्या हृदयाचा ठाव घेण्याचा आपण प्रयत्न करूं, तेव्हां या प्रश्नावर आणखी कांहीं प्रकाश पडतो का, तें पाहूं.

(१२) कित्येक जण, अंकांची घडामोड करून, आणखी अशी एक शंका उपस्थित करीत असतात कीं, इतर जरूर त्या कार्यांत जाणारा वेळ सोडून, तेरा कोटी जप, मग तो गायत्रीचा असो वा त्रयोदशाक्षरी मंत्राचा असो, बारा वर्षांच्या अवधींत होणें शक्य आहे काय? याचें उत्तर

दासविश्रामधाम, संतविजय आणि उद्धवसुतकृत श्रीचरित्र, या तीन ग्रन्थांत मिळतें, तें असें कीं, पुरश्चरणाच्या आणि तीर्थाटणाच्या काळांत साडे नऊ कोटी जप झाला आणि उरलेला साडे तीन कोटी जप कृष्णातटाकीं गेल्यावर झाला. मला हा प्रश्न गौण वाटतो. श्रीसमर्थांनीं तेरा कोटींचें पुरश्चरण केलें हें सत्य, मग त्याला काल किती हि लागला असो व तें कोठें हि संपविलें असो.

**श्रीरामजी जयरामजी जयजयरामजी ।**
**तारक तुजविण न दिसे दुसरा पूर्ण करी मनकाम जी ॥**

**श्रीराम राघव रमेश्वर रामचंद्र ।**
**राजीवनेत्र रघुवय रमेश ईश ।**
**श्रीरामभद्र भुवनेश्वर तीर्थपाद ।**
**कंठे करोमि सततं तव नाममालां ॥**

**राघवा राजसा रामा रामचंद्रा रघोत्तमा ।**
**रत्नविभूषणा देवा रम्य राजीवलोचना ॥**

असा नामस्मरणाचा छंद तर अखंड च लागलेला होता.

( १३ ) पुरश्चरणाच्या बारा वर्षांच्या काळांत त्यांचा मुख्य कार्यक्रम हा असा होता. याशिवाय आणखी ते काय करीत, तें आज कळण्याला साधन नाहीं. पवित्र विचार एकांतांत सुचतात, तदनुसार आचार हि एकांतांत च घडतो· निरहंकारवृत्तीचे थोर पुरुष एकांतांत जो साधनमार्ग आचरतात, त्याविषयीं ते सहसा कोणापाशीं बोलत नसतात. स्वतःविषयीं एकंदरींत च ते फार थोडें बोलतात, बहुधा नाहीं च बोलत. त्यामुळें श्रीसमर्थांनीं स्वतः कोणतीं साधनें केलीं, कोठें आणि कशीं केलीं, वगैरे माहिती त्यांच्या तोंडून कळण्याचा संभव च नाहीं. ही गोष्ट निर्विवाद आहे कीं, ते महान् योगी होते, पण योगमार्ग त्यांना कोणीं दाखविला, कां योगापुरते ते स्वतः च स्वतःचे गुरु होते, हें आपणांस सांगतां येत नाहीं. श्रीरामकृपा कशी, कोठें आणि केव्हां झाली, हें तरी त्यांनीं स्वतः कोठें सांगितलें आहे? तें आपणांस स्वानुभवदिनकरावरून च कळत आहे. सारांश, आम्ही अभागी कीं, त्यांनीं अवलंबिलेला साधनमार्ग कळण्यास अनुमानाशिवाय आपणाजवळ दुसरें साधन नाहीं. त्यांनीं आपल्या शिष्यांना

वेळोवेळीं कोणतीं गायनें सांगितलीं, तीं त्यांच्या अंतर्भावादि काव्यांवरून आपणांस कळतात आणि

**मुखें बोलिल्यासारिखें चालताहे।**
**मना सद्गुरु तो चि शोधूनि पाहें॥**

—मनाचे श्लोक, १८२

या सिद्धान्तान्वयें तो च त्यांचा हि साधनमार्ग असला पाहिजे, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. तेव्हां विस्तार न करतां आपण म्हणूं शकतों कीं, पुरश्चरणाच्या काळांत, एकांतवास, एकाग्रता, वैराग्य, ध्यान, मानसपूजा, जप, देवदर्शन, ग्रन्थावलोकन, हा च त्यांचा इतर वेळांतला कार्यक्रम असावा.

( १४ ) या अवधींत ते कोणाकडे जात किंवा त्यांच्याकडे कोणी येत, या विषयीं कांहीं कोठें उल्लेख सांपडत नाहीं. नाहीं म्हणायाला, आरण्यकांडाच्या समाप्तिलेखनांत कोणा गोपिनाथाचा उल्लेख आहे, यावरून त्यांच्याकडे येणाऱ्या समवयस्क मंडळींपैकीं गोपिनाथाचें सहकार्य त्यांना लाभलें होतें, असें दिसतें. या गोपिनाथांचा आपणांस शोध कसा लागावा ? त्या वेळेपासून आतांपर्यंत नाशिक पंचवटीच्या भागांत कोणतीं घराणीं नांदत आलीं आहेत, याचा शोध त्या भागांतील मंडळींनीं करून, त्या काळीं एकाद्या घराण्यांत कोणी गोपिनाथ होऊन गेले कीं काय, हें पाहिलें पाहिजे.

( १५ ) टांकळीस राहूं लागल्यानंतर आरंभीं आरंभीं, या पुरश्चरण करीत असलेल्या मुलाच्या वयाकडे पाहून नाशिक पंचवटींतील प्रपंची जनांना काय वाटलें असेल ? अशा मुलाला पाहून आपणांस जें आज वाटेल, तें च त्या वेळच्या लोकांना वाटलें असेल. दुसरें काय वाटणार ? त्याची ती वैराग्यशील वृत्ति आणि तें धार्मिक आचरण पाहून प्रपंची लोकांना जरी अत्यंत कौतुक आणि आदर वाटला असेल, तरी ते असें च म्हणाले असतील कीं, मुलगा आंधळा नाहीं, पांगळा नाहीं, चांगला धड आहे आणि असा कां वेडा झाला, परमार्थाला लागण्याचें याचें वय तरी आहे का ? उद्योगधंदा करावा, संसार करावा आणि म्हातारपणीं देवाच्या नादीं लागावें, तें या मुलाचें कांहीं विचित्र च, संसारांत राहून काय देव

भेटत नाहीं, पण या मुलाची रीत कांहीं वेगळी च, आम्ही सर्व वेडे आणि हें मूल तेवढें शहाणें कीं काय, संसार कसा तो पाहिला नाहीं, तों च संसाराला उबगलें आणि अहंतेच्या भरीं भरून चारी पुरुषार्थांना मुकलें, तेव्हां याला काय म्हणावें, कोणी याला घरचें मायेचें वडीलधारें माणूस नसेल, म्हणून हा मुलगा असा बहकला आणि पिसाटासारखें करतो, दुसरें काय? असले विचार प्रपंची लोकांच्या मनांत आले असतील व कोणीं त्याच्या जवळ जाऊन हि व्यक्त केले असतील ! टांकळीमठांतील एका बाडांत एक अप्रकाशित अभंग आहे, त्यांत हे च प्रपंची लोकांचे विचार श्रीसमर्थांनीं गोवले आहेत:

**विषयांचीं सोयरीं प्रपंचाचीं सखीं ।**
**मिळोनि येकमेकीं करिती मात ॥ १ ॥**
**यासी काय जालें धड चि कां विघडलें ।**
**वयेवीण लागलें देवपीसें ॥ २ ॥**
**देव काय आम्हां सकळांपासीं नसे ।**
**जनावेगळें कैसें भजन याचें ॥ ३ ॥**
**हें आधीं चि विषयसंसारा उबगलें ।**
**पुरुषार्थें सांडवलें अहंतेच्या ॥ ४ ॥**
**यासी कोण्ही मोहाचें वडिलधारें नाहीं ।**
**म्हणउनियां पाहीं छंद करी ॥ ५ ॥**
**न करवे म्हणउनि तजिला विषयधंदा ।**
**जल्पतसे सदा रामनाम ॥ ६ ॥**
**रामीरामदास पिसाळलें माय ।**
**म्हणौनि मोकली धाय विषयजनु ॥ ७ ॥**

( १६ ) पुरश्चरणाचा काळ जसजसा लोटत चालला असेल, तसतसें जनस्थानांतील लोकांचें लक्ष या मुलाकडे साहजिक गेलें असलें पाहिजे. त्यांतून दशकपंचक गांवच्या कुळकर्ण्याची सून सती जावयास निघाली असतां ‘ अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ’ असा तिला आशीर्वाद देऊन तिच्या पतीला प्राणदान दिलें असेल, तर मग या मुलाच्या गोष्टी नाशिक-पंचवटीच्या पंचक्रोशींत घरोघरीं कौतुकानें निघूं लागल्या असतील ! तथापि कसल्या हि आधारावांचून इतकें मानतां येईल कीं, या बालकाचें घोर

तपाचरण, त्यांची भगभगीत वैराग्यवृत्ति आणि प्रखर तेजस्विता हीं पाहून १५५१ पर्यंत बऱ्याच लहान मोठ्या लोकांचें लक्ष या तरुणानें आपल्याकडे वेधून घेतलें असलें पाहिजे.

( १७ ) श्रीसमर्थांच्या पुरश्चरणाच्या काळांत नाशिक–त्र्यंबक हा प्रदेश शहाजी महाराजांच्या सत्तेखालीं होता. त्या काळांत त्यांचा मुक्काम हि त्या भागांत वारंवार होत असे. १५५१ त तर त्यांचा मुक्काम नाशकास च होता. तपोवनाच्या पलीकडे टांकळीस तप करीत बसलेल्या या तरुणाच्या गोष्टी त्यांच्या कानांवर जाऊन ते त्याच्या दर्शनास हि गेले असावेत. श्रीसमर्थ पुढें जे कृष्णातीरीं मसुरास गेले ते स्वेच्छेनें गेले नसून कोणाशीं तरी संकेत ठरून गेले असावेत असें जें, त्यांच्या तिकडून आलेल्या पत्रांतील ' आणि मी पडलों दूरी देशीं ' या शब्दांवरून आपण मानतों, तो संकेत दुसऱ्या कोणाशीं ठरला नसून शहाजी महाराजांशीं च ठरला असावा, कारण मसूरची पाटिलकी त्या वेळीं शहाजी महाराजांनीं आपल्याकडे घेतली होती. या घटनेचा विशेष प्रपंच आपण योग्य स्थळीं अन्यत्र करूं. पण या विचारसरणीला मुख्य आधार म्हणजे १५५१ त, अगर त्या सुमारास शहाजीमहाराजांचा मुक्काम नाशिक–त्र्यंबक भागांत होता, ही गोष्ट सिद्ध झाली पाहिजे. सुदैवानें तसें सिद्ध करणारा पुरावा माझ्या अवलोकनांत आलेला आहे.

( १८ ) भोसल्यांचें त्र्यंबकेश्वर येथील तीर्थोपाध्येपण ढेरगे या घराण्याकडे होतें. त्या घराण्यांतील बरे च जुने महत्त्वाचे कागद पाहण्याची मला एकवार संधी मिळाली होती. त्यांपैकीं कांहीं कागदांचीं मीं टिपणें हि करून घेतलीं होतीं. त्यांत प्रस्तुतच्या प्रश्नावर किंचित् प्रकाश पाडणारा एक अस्सल कागद आढळला. तो शक १५५६ खमस सलासीन यांत त्र्यंबकेश्वराच्या समस्त ब्राह्मण व देशमुख मंडळींनीं केलेला एक निवाडा होता. सिउभट व भिकंभट ढेरगे असे दोघे बंधु होते, त्यांच्यांत वांटणीचा कलह उत्पन्न झाला, तो ग्रामस्थांनीं या निवाड्यानें मिटविला. दोन रकाने करून डावे रकान्यांत भिकंभटाच्या वांटणीस काय दिलें तें लिहिलें व उजवे रकान्यांत सिउभटाची वांटणी लिहिली. प्रस्तुत आपल्या उपयोगाच्या दृष्टीनें उजव्या रकान्यांतील एक कलम महत्त्वाचें आहे, तें असें :

**" सीउ भटी नवे उपार्जित आहेती**
**राजश्री शाहाजी राजे व याचे दिमतीचे**
**जे अहेती ते सीउ भटी आपले घरास**
**+ णे भिकं भटीसी निसबत नाही "**

म्हणजे, शक १५५६ च्या पूर्वीं च शहाजी राजे यांचे कडून सिउभटानें जें कांहीं नवीन संपादन केलें होतें, तें सिउभटानें घ्यावें, त्याच्याशीं भिकंभटाचा कांहीं संबंध नाहीं.

या आधारावर मी म्हणतों कीं, १५५१ त किंवा त्या सुमारास नाशिकत्र्यंबकेश्वरीं शहाजीमहाराजांचा मुक्काम झाला असावा, असें मानण्यास हरकत दिसत नाहीं. त्या वेळीं त्यांना श्रीसमर्थांचें हि दर्शन घडलें असावें व उभयतांचें संभाषण होऊन कांहीं पुढील संकेत हि ठरला असावा.

( १९ ) या च पुरश्चरणाच्या काळांत, बखरीप्रमाणें शक १५४५ त टांकळीजवळच्या दशकपंचक गांवच्या कुळकर्ण्याचा मुलगा वारला आणि त्याची स्त्री सती जावयास निघाली असतां तिनें श्रीसमर्थांना पाहिलें आणि तिच्या मनांत आलें, आपण सती जाण्यास निघालों असतां दैववशात् सत्पुरुषाचें दर्शन घडत आहे, तेव्हां त्यांना नमस्कार करून सती जावें. तिनें नमस्कार केला, समर्थांनीं तिच्याकडे न पाहतां व काय प्रकार चालला आहे, तो लक्षांत न घेतां, " अष्टपुत्रा सौभाग्यवती भव " असा तिला आशीर्वाद दिला. तो ऐकून ती स्त्री चकित च झाली आणि म्हणाली, " महाराज, आपला हा आशीर्वाद केव्हां सफल व्हावयाचा, या जन्मीं कां पुढच्या ? " हे तिचे शब्द ऐकून श्रीसमर्थ जणूं भानावर आले, त्यांनीं पाहिलें आणि सारा प्रकार त्यांच्या लक्षांत आला. त्यांनीं मुलाचें शव जवळ आणविलें, त्यावर गंगोदकाचें सिंचन केलें आणि झोपेंतून जागें व्हावें, त्याप्रमाणें तो मुलगा उठला, त्याचे प्राण परत आले ! श्रीरामावर भार पडल्याचें श्रीसमर्थांना कष्ट वाटले. तेव्हांपासून त्यांनीं पुढें, कोणीं हि नमस्कार करो, ' जय राम ' असा आशीर्वाद देण्याचा प्रघात सुरू केला व तो च दंडक पुढें संप्रदायांत हि चालू झाला.

( २० ) त्या दंपतीनें संकल्प केला आणि तो श्रीसमर्थांपाशीं बोलून हि दाखविला कीं, आपणांस जो पहिला मुलगा होईल, तो आपण

श्रीसमर्थचरणीं अर्पण करूं, त्याप्रमाणें त्यांनीं झालेला पहिला मुलगा अर्पण करण्यास आणला, तेव्हां श्रीसमर्थ त्यांना म्हणाले, "आम्ही अरण्यवासी, आम्हांस हें मूल घेऊन काय करावयाचें?" त्या नवरा-बायकोंचा आग्रह पाहून श्रीसमर्थ म्हणाले, "बरें, हें मूल आतां आमचें झालें, आतां आमची आज्ञा म्हणून या बालकाचा प्रतिपाल तुम्ही करा व मोठें झाल्यावर त्यास घेऊन या." त्या बालकाचें केवढें भाग्य म्हणावयाचें कीं, त्यास श्रीसमर्थांनीं [illegible], पायांवर घेऊन, दुधांत टाकूं कां दह्यांत टाकूं, असें विचारण्या-ऐवजीं, प्रपंचांत टाकूं कां परमार्थांत, असें विचारावें! त्या बालकाची मुंज श्रीसमर्थांच्या मांडीवर लागली. त्याचें पाळण्यांतलें नांव शिवराम§ होतें, समर्थांनीं उद्धव नांव ठेवलें. उद्धव हे श्रीसमर्थांचे पहिले शिष्य होत. त्यांचे मठ दोन ठिकाणीं आहेत: एक टांकळीस आणि दुसरा, तेलंगणांत इंदुरबोधन या गांवीं. दोन्ही ठिकाणीं श्रीसमर्थस्थापित मारुती आहेत. टांकळीची मारुतीची मूर्ति गायीच्या शेणाची आहे.

(२१) पुरश्चरणाचा काळ संपला आणि तीर्थाटणास निघण्याचा दिवस आला. त्या वेळीं या मुलानें हट्ट धरला कीं, आपण हि बरोबर येतों. आई बाहेर जातांना मुलानें हट्ट केला, म्हणजे आई जशी त्यास म्हणते, 'मी आत्तां येतें' आणि असें म्हणून जाते आणि मग तिला वेळ लागल्यास मूल रडूं लागतें, तेव्हां घरांतील दुसरीं माणसें हि त्याची समजूत घालतांना म्हणतात, 'आई आत्तां येईल अं, रडूं नकोस.' अगदीं तद्वत्, 'मी आत्तां येतों' असें उद्धवबाळास सांगून समर्थ फडकले. नंतर उद्धवास कोणीं हि विचारलें, 'श्रीसमर्थ केव्हां येणार?' कीं त्यानें उत्तर द्यावें, 'आत्तां येतील.' पण तें आत्तां ठरलें कमींत कमी बारा वर्षांचें!

(२२) श्रीसमर्थचरित्रांत हा पुरश्चरणाचा काळ अति महत्त्वाचा होय. तो सर्व कार्यकर्त्यांना मार्गदर्शक वाटला पाहिजे. श्रीसमर्थ लग्नांतून पळाले, ही असामान्य गोष्ट होय. तसें दुसरें उदाहरण नाहीं. तसें च, जांबेस च बाळपणीं च त्यांच्यावर श्रीरामाची कृपा झाली, ही त्यांची आणि त्यांच्या पूर्वजांची पूर्वपुण्याई होय. पण राष्ट्रकार्य आणि धर्मकार्य करण्यास प्रारंभ

§ शिवराम ऊर्फ उद्धव यांची थोडी जास्त माहिती **श्रीरामदासी संशोधन,** खंड १ ला, पृष्ठें ४२ ते ५० यांत पहावी.

करण्यापूर्वी त्यांनीं बारा वर्षें पुरश्चरण करून ज्ञान, वैराग्य, सामर्थ्य हीं संपादिलीं, ती त्यांची या च जन्मांतील कमाई होय आणि याप्रमाणें तपाचरण करून ज्ञानवैराग्यसामर्थ्यसंपन्न होण्याचा मार्ग त्यांनीं सर्वांस दाखविला आहे, असें मला वाटतें. पुरश्चरण संपवून त्यांनीं आपल्या जीवींची एक गोष्ट, अंतरींची पटलेली एक खूण, मोठ्या प्रेमानें आपणांस सांगितली आहे, ती आपण उत्सुकतेनें ऐकली पाहिजे आणि श्रद्धेनें आचरणांत आणली पाहिजे. ती च मी या उल्लासाची फलश्रुति समजतों.

**राघवाचें नाम राखसील जरी । तुज राखे तरी देवराणा ॥ १**
**देवराणा माझे जीवींचें जीवन । आवडीनें खूण सांगतसे ॥ २**
**सांगतसे खूण माझे अंतरींची । सर्व हि सुखाची सुखमूर्ति ॥ ३**
**सुखमूर्ति राम सोडूं नको कदा । तुज तो आपदा लागों नेदी ॥ ४**
**लागों नेदी कष्ट आपुल्या दासासी । रामीरामदासीं साहाकारी ॥ ५**

( २३ ) पुरश्चरणाचा काळ संपला, भगवत्कृपा झाली, तीर्थाटणास निघण्याची रामानें आज्ञा केली, वियोगाची कल्पना होऊन समर्थांना जड वाटलें, रामानें आश्वासन दिलें कीं, मी सतत जवळ आहे समजा, स्मरण कराल तेव्हां आणि तेथें मी प्रकट होईन. श्रीसमर्थांना कृतार्थता वाटून ते तीर्थाटणास निघाले. चला, आपण हि त्यांच्या पाठोपाठ जाऊं.



उ ल्ला स सा त वा

# ती र्था ट ण

उत्तरेकडे

[ १५५४–१५६१ ]



॥ नाना तीर्थाटणें फिरावीं ॥

सकळ तीर्थांचें माहेर । गुरुपदयोग निर्धार ।
नित्य आत्मानुसंधानपर । तीर्थें पावन ॥ १

प्रवृत्तीचें पाप निरसावया । तीर्थें पवित्र असती भूमींत या
तीर्थांचें पापमळ हरावया । साधु तीर्थरूप स्वयें ॥ २

[ ( १ ) तीर्थाटणाचा महत्त्वाचा काळ – ( २ ) केव्हां केव्हां समुदायाबरोबर, पण बहुधा एकटे – ( ३ ) तीर्थ-क्षेत्रांचीं तीन कवनें – ( ४ ) त्यांतील क्षेत्रस्थानें समर्थांच्या पाहण्यांत असावींत – ( ५ ) हिमालयांत हनुमंताकडून मेखळा प्राप्त – ( ६ ) हिमालयकुंडीं देह झोकला तों च – ( ७ ) दत्त प्रकट होऊन पायाला मणका बांधतात – ( ८ ) काशी, गया, जगन्नाथ, प्रयाग आणि अयोध्या – ( ९ ) एका सिद्धाकडून टोणपा व गोरखाकडून तीरकमटा मिळाला – ( १० ) पैठणास तिरकमट्यानें पक्षी मारले व जीवंत केले – ( ११ ) अंबाजोगाई येथें फकिराच्या वेषांत दत्तात्रेयांचें आगमन – ( १२ ) श्रीसमर्थचरित्रांत अंबाजोगाई या क्षेत्राचें महत्त्व – ( १३ ) तेथून जांबेस जावयास निघतात. ]

( १ ) कोणा हि माणसाच्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचा काळ म्हणजे वयाच्या चोविसाव्या वर्षापासून तों छत्तिसाव्या वर्षापर्यंतचा होय. कोणाच्या हि पुढील चरित्राला जें वळण लागावयाचें, तें या काळांत ठरतें. चोविसावें वर्ष म्हणजे अत्यंत उमेदीचें वर्ष. चोवीस ते छत्तीस म्हणजे आयुष्यांतील महत्त्वाकांक्षेचा काळ. बारा वर्षें पुरश्चरण करून रघुनायकाला आपुलेंसें करून घेऊन श्रीसमर्थांनीं आपल्या आयुष्याचा तो काळ तीर्थाटणांत आणि तन्निमित्तानें देशस्थितीच्या निरीक्षणांत खर्च केला. त्या काळांत त्यांनीं सारा भरतखंड पायांखालीं तुडविला. दुर्दैव माझें आणि तुमचें कीं, त्या काळांत ते केव्हां, कोठें, कसकसे गेले, कोठें किती दिवस राहिले, कोठें काय केलें, बरोबर कोणी होतें का नव्हतें, वगैरे दिवसादिवसाची इत्थंभूत हकिकत कोणीं लिहून ठेवलेली नाहीं व ठेवलेली असल्यास अजून उपलब्ध नाहीं.

( २ ) माझ्या वाचण्यांत आलेलें आहे कीं, त्या काळांत, दोन दोन, चार चार हजार लोक, एकत्र जमून, देशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत यात्रा करण्यासाठीं निघत असत. असे प्रचंड मेळावे, मुक्काम करीत करीत जात. त्यांच्या बरोबर उंट, हत्ती, घोडे, बैलगाड्या, पालख्या, मेणे असत. तथापि बहुजन पादचारी च असत. श्रीसमर्थ क्वचित् अशा मेळाव्याबरोबर हि फिरले असतील, क्वचित् बरोबर दहा पांच सांगाती असतील, पण बहुधा, माझ्या मनांत येतें, ते एकटे च, आपल्या च मनाशीं रमत, संचार करीत हिंडले असतील. पुढें पुढें, न जाणों, कोणीं कोणीं शिष्यभावानें हि त्यांची संगति केली असेल.

पुरश्चरणाचा काळ निदान महाराष्ट्रांतील च एका प्राचीन पवित्र क्षेत्राच्या सान्निध्यांत राहून तरी समर्थांनीं कंठला, पण तीर्थाटणाचा त्यांचा बहुतेक काळ महाराष्ट्राच्या बाहेर अनोळखी अशा परप्रांतांत गेला. तीर्थाटणाच्या निमित्तानें साऱ्या देशभर – हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत व द्वारकेपासून जगन्नाथपर्यंत – त्यांनीं संचार केला. भाषा भिन्न भिन्न, आचार-विचार निरनिराळे असलेल्या लोकांच्या सहवासांत त्यांना रहावें लागे. आपणांस कोणी ओळखत नाहीं, अशा ठिकाणीं राहण्यांत त्यांना फार आनंद वाटे. अशा ठिकाणीं स्वछंदानें भगवद्भजनांत आणि चिंतनांत निमग्न होऊन स्वत:शीं च रमतां येतें.

( ३ ) त्यांचा तीर्थाटणाचा क्रम कसा होता, याचें तत्कालीन वर्णन उपलब्ध नाहीं. तथापि त्यांनीं कोणकोणतीं तीर्थें पाहिलीं, याचें अनुमान करण्यापुरती त्यांची च थोडी स्फुट कविता उपलब्ध आहे, त्यांत एक ‘ तीर्थावळी दंडीगाणं ’ म्हणून च एक गाणें आहे, तसा च एक अभंग व एक पद हीं आहेत. या तिन्ही कवनांत उल्लेखिलेलीं तीर्थ-क्षेत्रें त्यांनीं केलेलीं असलीं पाहिजेत, असें मला वाटतें. हीं तिन्हीं कवनें स्वत: श्रीसमर्थांचीं च असल्यामुळें या उल्लासांत तीं सर्वांच्या अवलोकनांत येणें इष्ट होय. त्यांत त्यांनीं उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील, असा भेद केलेला नाहीं. बाडांक ४६९ व ६१८ या तत्कालीन बाडांवरून तीं येथें उद्धृत करतों.

१

## ।। तीर्थावळी दंडीगाणं ।।

**स्वर्ग मृत्य आणि पाताळीं । देव राहाती तिन्ही ताळीं ।<br>येक राहाती अंतराळीं रे रे रे रे। स्थळें निराळीं निराळीं रे ॥१॥**

**माझा राम तो जेथें तेथें । आत्मारामेंवीण सर्व रितें रे रे रे रे ॥ ध्रु० ॥**

**सर्व तीर्थांमध्यें कासी । गति होते पूर्वजांसी ।<br>धन्य धन्य ते पंचक्रोसी रे रे रे रे । अमर इच्छिती मरणासी रे ॥२॥**

**रामेश्वरा कावडी नेती । पुण्य उदंड सांगती ।<br>देवदर्शनें होते गति रे रे रे रे । लोक उदंड बोलती रे ॥ ३ ॥**

उडपेचा कृष्णनाथ । कावेरीं रंगनाथ ।
वडीया जगन्नाथ रे रे रे रे । देव नांदतो समर्थ रे ॥ ४ ॥

इच्छा धरूनि रामअवतारीं । उभी राहिली कन्याकुमारी ।
तीर्थ चालतें अद्यापिवरी रे रे रे रे। काये सांगावी तेथील थोरी रे ॥ ५ ॥

वेंकटेशा यात्रे जाती । लोक उदंड कानग्या वाहाती ।
आणी नैवेद्य उभ्यां खाती रे रे रे रे । रचना उदंड सांगती रे ॥ ६ ॥

श्रीशैलीं महिमा आहे । साठी वरुषें वाट पाहे ।
लोक बहुतेक न राहे रे रे रे रे। तेथें पाताळगंगा वाहे रे ॥ ७ ॥

आवढाचा नागनाथ । परळीचा वैजनाथ ।
सोरटीचा सोमनाथ रे रे रे रे । देव नांदतो समर्थ रे ॥ ८ ॥

सेवाळें घुष्मेश्वर । पश्चिमेचा भीमाशंकर ।
हिमाचळीचा हिमकेदार रे रे रे रे । तेथें महिमा तो अपार रे ॥ ९ ॥

बारा वरुषां सिंहस्थासी । मिळे यात्रा ते गंगेसी ।
जाती नासिका त्रिंबकासी रे रे रे रे। पुण्य मोठें प्रदक्षणेसी रे ॥ १० ॥

लोक हरेश्वरा जाती । घरीची घुमों चि लागती ।
आंगा ब्राह्मणसमंध येती रे रे रे रे। जन्मांतरीचें निवडिती रे ॥ ११ ॥

माणदेशीं माहादेव । तेथें उदंड मोहोछाव ।
मिळे यात्रा समुदाव रे रे रे रे । सीखरीचा संभया देव रे ॥ १२ ॥

कृष्णाउगमीं माहादेव । तळकोंकणीचा भार्गव ।
गोकर्ण तें अपूर्व रे रे रे रे । धन्य होताती मानव रे ॥ १३ ॥

शक्तीचें माणकेश्वर । लक्ष्मीचें कोल्हापुर ।
सुब्रह्मणीं फणीवर रे रे रे रे । पक्षतीर्थीचे खेचर रे ॥ १४ ॥

शिवकंची विष्णुकंची । महिमा अरुणाचळाची ।
ठांई ठांई नरहरीची रे रे रे रे । थोर महिमा अयोध्येची रे ॥ १५ ॥

ज्वाळामुखी ते अंबिका । सप्तशृंगीची चंडिका ।
हीगळाज ते कळिका रे रे रे रे । भद्रगिरीचा राम ऐका रे ॥ १६ ॥

कामाक्षी बनशंकरी । मीनाक्षी जोगेश्वरी ।
आदिशक्ती भुवनेश्वरी रे रे रे रे । कितीयेक त्या जळांतरीं रे ॥ १७ ॥

लोक उदंड द्वारके जाती । माया मात्रा कोंबे नेती ।
कृष्णातें पाहोनि येती रे रे रे रे । तीर्थमहिमा सांगती रे ॥ १८ ॥

मातापुर तुळजापुर । पोहाँ चालतो अपार ।
भक्त मिळती थोर थोर रे रे रे रे । तेणें दाटलें देवद्वार रे ॥ १९ ॥

लिंगाकार पृथ्वी आहे । लिंगमहिमा कोण पाहे ।
त्यासी उपमा न साहे रे रे रे रे । लिंगरूप हें सकळ आहे रे ॥ २० ॥

भीमातीरीं पंढरपुर । तेथें कीर्तनाचा गजर ।
नामघोष वारंवार रे रे रे रे । भक्त मिळती अपार रे ॥ २१ ॥

ठांई ठांई खंडेराव । बहु जनासी उपाव ।
भरे यात्रा मोहोछाव रे रे रे रे । रोकडा चि तो पावे देव रे ॥ २२ ॥

क्षेत्रपाळ सांगों किती । देव ठांई ठांई असती ।
दुरी-दुरीचे लोक येती रे रे रे रे । तेथें रोकडी सप्रचीती रे ॥ २३ ॥

महीमंडळीं चिंतामणी । ठांई ठांई घातलीं ठाणीं ।
न बोलवे महिमा कोण्ही रे रे रे रे । लोक बोलताती पुराणीं रे ॥२४॥

आदिशक्ति ठांई ठांई । स्थळें सांगों किती काई ।
तेथें होईजेना उतराई रे रे रे रे । भक्त दाटले ठांईचा ठांई रे ॥ २५ ॥

ठांई ठांई विष्णुमूर्ति । पुण्यक्षेत्रां नाहीं मीती ।
कीर्ति पुराणें बोलती रे रे रे रे । नाममात्रें होते गती रे ॥ २६ ॥

देव नांदती अपार । येकाहूनि येक थोर ।
किती सांगावा विचार रे रे रे रे । भक्त पावती पैलपार रे ॥ २७ ॥

देवस्थानें उदंड होती । आतां जाले म्लेंछ नृपती ।
ठांई ठांई उरुस भरती रे रे रे रे । कीर्ति उदंड सांगती रे ॥ २८ ॥

आत्माराम तो ठांई ठांई । नांदे म्लेंछाचे हृदईं ।
तेथें फोडुनी पाहाती काई रे रे रे रे । तेणेंकरितां चाले सर्व हि रे ॥ २९ ॥

दास म्हणे देव हा येक । येर सकळ हि माईक ।
पाहाणें तो अंतर्विवेक रे रे रे रे । तेणें होतसे सार्थक रे ॥ ३० ॥

१ कावा = कोवळा नारळ.

२ मेळा, थवा, समुदाय.

२

विश्वेश्वर घुष्मेश्वर रामेश्वर सोमेश्वर ।
माणकेश्वर कुणकेश्वर काळेश्वर ॥ १ ॥

धारेश्वर पारेश्वर मलकार्जुन भीमशंकर ।
नाटेश्वर वटेश्वर पिंपळेश्वर ॥ २ ॥

बकेश्वर वांकेश्वर गुप्तेश्वर बेलेश्वर ।
सिधेश्वर संकेश्वर हरेश्वर ॥ ३ ॥

कडकेश्वर खडकेश्वर घाटेश्वर पाटेश्वर ।
कोपेश्वर धोपेश्वर सिधेश्वर ॥ ४ ॥

संगमेश्वर कनकेश्वर तारकेश्वर कोटेश्वर ।
मोरेश्वर भुलेश्वर पांडवेश्वर ॥ ५ ॥

समुद्रेश्वर रुद्रेश्वर चापेश्वर कपाळेश्वर ।
मुक्तेश्वर सर्वेश्वर नागेश्वर ॥ ६ ॥

मातापुर तुळजापुर जोगेश्वरी पंढरपुर ।
नर्सीपुर कोल्हापुर सप्तशृंग ॥ ७ ॥

त्रिंबक शंभुचें शिखर । वैजनाथ कपिलेश्वर ।
स्वामी कार्तिक केदार वेंकटेश ॥ ८ ॥

रघुनाथ कृष्णनाथ वैजनाथ जगन्नाथ ।
दिगंबर लोकनाथ ज्वाळामुखी ॥ ९ ॥

सुब्रह्मणी रंगनाथ बनशंकरी सोमनाथ ।
अष्ट भैरव नव नाथ सोळा सिध ॥ १० ॥

हिंगळाज हरिद्वार । नाना लिंगाचा विस्तार ।
भूमंडळीं नाहीं पार कोण जाणे ॥ ११ ॥

खंडेराव भवनेश्वरी । क्षेत्रपाळ जोगेश्वरी ।
खंडेश्वरी भुवनेश्वरी जाखमाता ॥ १२ ॥

देव देवता देवतें । भूमंडळीं भुतेंकेतें ।
येक आत्मा चि समस्तें । चालवितो ॥ १३ ॥

दास म्हणे रे वावडा[1] । आधीं त्यासी ठाई पाडा ।
पापपुण्याचा निवाडा । तेथें होतो ॥ १४ ॥

---

१ वावड = भटक्या, हिंडणारा, दौरे काढणारा.

३

**सकळ तीर्थासी आधार । तो विचार सारासार ॥ ध्रु० ॥**
**अयोध्या मथुरा माया । काशी कांती द्वारावती ॥ १ ॥**
**तुळजापुर पंढरपुर । नर्सीपुर कोल्हापुर ॥ २ ॥**
**नागनाथ वैजनाथ । जगन्नाथ त्रिमलनाथ ॥ ३ ॥**
**मोरेश्वर भुलेश्वर । औंद संभूचें शिखर ॥ ४ ॥**
**नासीक त्रिंबक भीमाशंकर । माभळेश्वर हरेश्वर ॥ ५ ॥**
**पाहिलें पेंबर जेजुरी । सोनारी ते जोगेश्वरी ॥ ६ ॥**
**रंगनाथ रामेश्वर । नाना स्थळींचे ईश्वर ॥ ७ ॥**
**परमेश्वरी परमेश्वर । भूमंडळीं हरिहर ॥ ८**
**उत्तरमानस दक्षिणमानस । करितां होती कासावीस ॥ ९ ॥**
**रामीरामदास म्हणे । अधीक महिमा कोटीगुणें ॥ १० ॥**

( ४ ) हीं तीन कवनें वारंवार वाचून माझ्या मनांत येतें कीं, त्यांतील सर्व पुण्यक्षेत्रें स्वतः पाहून श्रीसमर्थांनीं त्यांचा उल्लेख केला आहे व महिमा वर्णिला आहे. शेवटच्या पदांत एके ठिकाणीं 'पाहिलें' असें त्यांनीं म्हटलें च आहे. पहिल्या गाण्यांतील 'पोहा' शब्द महत्त्वाचा आहे. त्या काळीं हजार हजार यात्रेकरू जमावानें जात असत, असें जें आपण म्हणतों, त्याचें हें प्रत्यंतर च होय. अशा जमावाबरोबर हि श्रीसमर्थ क्वचित् जात असावेत.

( ५ ) श्रीसमर्थ पर्यटणास निघाले ते प्रथम, श्रीदासविश्रामधामाप्रमाणें, त्र्यंबकास गेले व तेथून थेट उत्तरेकडे हिमाचलापर्यंत गेले. मार्गांत, अर्थात्, गांवें घेत घेत, लोकस्थिति अवलोकन करीत च गेले. हिमालयांत वशिष्ठाश्रम, व्यासाश्रम, हनुमंताश्रम वगैरे आश्रम त्यांनीं पाहिले. हनुमंताश्रमांत भयंकर थंडीनें त्रस्त झाले असतां मारुतिरायांनीं श्रीसमर्थांच्या अंगावर प्रेमानें हुर्मुजी रंगाची मेखळा टाकली. हनुमंताला ती मेखळा राज्याभिषेकप्रसंगीं श्रीरामाकडून मिळाली होती व रामाला हि ती मेखळा, वनवासाला निघतांना श्रीवशिष्ठाकडून प्राप्त झाली होती. अशी ती पवित्र मेखळा श्रीसमर्थांना अर्पण करतांना तिचा वृत्तान्त आणि तिचे गुण, हीं हनुमंतांनीं सांगितलीं तीं आपण आदरानें ऐकावीं. हनुमंत श्रीसमर्थांना सांगतात :

**प्रसादमेखळा स्वकरेंकरूनी। मज लेवविला कोदंडपाणीं।**
**तो तुज वोपिला तरी येथूनि। विजय सर्वार्थीं पावावें॥**
**या रंगवस्त्रानें भ्रम भ्रांति उडे। तप साधित्यासी सिद्धि घडे।**
**सदा स्वानंदीं सद्वृत्ति जडे। विसर चि पडे देहबुद्धि॥**

—दासविश्रामधाम, ९-११८ व ११९

( ६ ) हिमालयांत संचार करीत असतां, एकदां श्रीसमर्थांच्या ठिकाणीं तीव्र वैराग्य उत्पन्न झालें. त्यांनीं विचार केला, " देह नश्वर आहे, आत्मा अमर आहे, मी ब्रह्म आहें, मग हा देह तरी ठेवून काय करावयाचें आहे ? " असें मनांत आणून एका अथाक कुंडांत देह झोकून देण्यास तत्पर होऊन कुंडाच्या कांठावर उभे राहिले आणि देह झोकणार—नव्हे, झोकला—तों च वरच्या वर श्रीरामानें त्यांना धरलें. समर्थ म्हणाले, " कां उगी च धरतां, या देहाला ठेवून काय करावयाचें आहे ? " प्रभु सांगतात आणि आज्ञापितात :

**तुम्हासी जगोद्धार करणें आहे। तुमची तनु ते आमुची तनु पाहे।**
**दोनी § तपें तुमची रक्षिली काया हे। धर्मस्थापनेकारणें॥**
**केवळ वैराग्य तीव्रतर केलें। अन्नवस्त्रविवर्जित भलें।**
**आतां लोक पीडा पावतील दुष्काळें। कां जें तुम्ही ईश्वरतनु म्हणोनियां॥**
**अग्निहोत्री राजा संन्यासी। देव द्विज मुनि संत साधु उपवासी।**
**तरी राष्ट्रभंग होईल निश्चयेंसीं। कां जे आत्माराम सर्व हे म्हणोनियां॥**
**समस्त देवांसी उपवास पडले। समस्त भूदेव वस्त्रहीन जाले।**
**समस्त जीव दरिद्रें पीडिले। तुम्ही अन्न वस्त्र भूषणें धरावीं॥**
**येक वेष तुम्ही न धरावा। येक वेष तुम्ही न करावा।**
**भोग त्याग विवेकें विवरावा। त्यागात्याग सर्वज्ञपणें॥**

—समर्थप्रताप, ३-८ ते १२

श्रीरामाच्या सर्व आज्ञा समर्थांनीं शिरसा मान्य करून देहविसर्जनाचा विचार सोडून दिला आणि वस्त्रें, भूषणें, अन्नें, यांचा अंगीकार केला.

( ७ ) हिमालयांत हिंडत असतां त्यांना किती त्रास सोसावा लागला असेल, याची कल्पना करवत नाहीं. कोठें थंडीचा त्रास, तर केव्हां उन्हाचा. उन्हानें जीभ कोरडी पडली, तरी पाणी मिळूं नये, असें हि निर्जलारण्य लागावें. तथापि त्यांची वृत्ति स्वाभाविक निर्भय होती. त्यांच्या जवळ एक

§ पुरश्चरणाच्या काळांत व तीर्थाटणाच्या काळांत.

खात्रीचा उपाय होता — सतत श्रीरामाचा धांवा आणि प्रार्थना! अशा प्रकारें, एका संकटांत धांवा मांडला असतां

**मातापुरनगीं जयाचें शयन । मनकर्णिकेमाजीं नित्य मज्जन ।**
**करवीरीं जयाचें भिक्षाभोजन । जो सिद्धसिद्धांचा मुनिराय ॥**

— दासविश्रामधाम, १०-११०

ते श्रीगुरुदेव दत्त प्रकट होऊन त्यांनीं श्रीसमर्थांना समस्त योग सांगून

**मणका अमोल्य ईश्वरी दत्त । त्यांच्या पाया स्वहतें बांधिला ॥**

— पूर्वोक्त, १०-११५

(८) याप्रमाणें, केदार, हरिद्वार करून गोकुळवृंदावनास जाऊन श्रीसमर्थ काशीस आले. तेथें त्यांचें वास्तव्य सहा महिने झालें. त्या अवधींत त्यांनीं रामानंद, तुळसीदास, कबीर वगैरे संतांच्या आश्रमांना नित्य भेट द्यावी. काशीहून निघून गया करून जगन्नाथास गेले व तेथून पुन्हां उत्तरेकडे प्रयागास जाऊन श्रीसमर्थ अयोध्येस शरयूतीरीं कांहीं काळ स्थिरावले. अयोध्येस श्रीसमर्थ कां एकदां च गेले असतील? अनेकदां गेले असतील व अशा एका खेपेच्या वेळीं मेरुस्वामी त्यांच्या बरोबर होते कीं काय, न कळे. असतील तर, त्यांनीं प्रत्यक्ष पाहून केलेलें वर्णन रामसोहळ्याच्या नवव्या रुद्राच्या दुसऱ्या उल्लासांत आहे, तें वाचकांनीं संपूर्ण अवलोकिलें पाहिजे. मी येथें त्यांतील अगदीं थोडें देतों :

**निजवेधक स्वभावस्थिति । भक्तिसमारंभें गर्जना करिती ।**
**कीर्तनाच्या गजरें अयोध्येप्रति । चालिले समर्थ स्वसुखें ॥**
**समर्थसहवासी अनंत संत । सप्रेमें नाचती आनंदभरित ।**
**रामकीर्तनें मार्ग क्रमित । आरोळ्या देती नामगजरें ॥**
**राम अवतरला सर्वांप्रति । जाहला रामवेध महास्थिति ।**
**ठसावली राममूर्ति । श्रीरामपिसें अनिवार ॥**

* *

**स्वानंदाश्रूनें पाझरती नयन । सप्रेमयुक्त प्रतीतीनें पूर्ण ।**
**थरकती रोमांच चमत्कारेंन । कांपती गदगदा ॥**
**स्तब्ध अंतःकरण स्तंभीभूत । पराकाष्ठा निचेष्टित ।**
**लोटांगणीं दंडवत । पडती भुमीवरी ॥**

* *

सुनीळ तेज गाळीव चोखडें । मनोहर रामाचें रूपडें ।
ठाणठकारें चहुंकडे । उभें ठाकलें सुंदर ॥

* *

प्रत्यक्ष पिसें केलें दर्शनीं । ईक्षणें अवलोकित मजलागूनि ।
तेणें अंतर्भाव वोसरोनि । दाटे रघुवीर ॥
नेणों येतो अवचट कैसा । आंगीं भरे विस्मयासरिसा ।
अनिवार प्रेमाचा वळसा । आलोट लोट न संवरे ॥
भरींव सुखवेधें उत्कट । निजहृदईचा चि होय प्रकट ।
निघोंट सुखें पिसें चि अवचट । लाऊनि सोडी ॥
नुमजे चि उमजवी पष्ट । त्याचेनि मी जालों पिसाट ।
काय करूं प्रेमें हृदयस्फोट । सुखें चि प्राण घेतो ॥
हे श्रीरामाची झडपण । जाली न दिसे गुणागुण ।
अयोध्येच्या मार्गीं स्वानंदघन । समर्थ सहवासें ॥

* *

रामस्मरणें आकाश फुटे । निरावकाश अनुसंधान प्रगटे ।
अमरवृंद पाहों लोटे । सुमनवृष्टि तोषें ॥
रामस्मरणसंकीर्तन होय । तेणें पडसादें नभहृदय ।
दाटोनि तैसें चि गाये । पूर्णप्रतिध्वनीनें ॥

* *

गायक हो तुम्ही ज्यासी गाता । मायिक सांडूनि समाधीअवस्था ।
पायिक होऊनि तयाचे आतां । पाहों निवास दृष्टीनें ॥
पाहा रामनिवास मनोहर । ज्ञानपताकांनीं अर्चिलें अंबर ।
चित्त चि चित्तरत्नसार । कळसहारी शोभती ॥

* *

निर्मळ वाळवंट शरयूचें । प्रकाशवज्रकिरण पांसुचे ।
पाहातां पाहातां दृष्टीचें । तेज तटस्थ होय ॥
मनें देखोनि शरयूचें तीर । लोळण घातलें स्वसुखें निर्मळ ।
शरयुदर्शनें चि रघुवीर । हृदयासी आला ॥

—रामसोहळा, ९-२-४४ ते ४६, ४९ व ५०,
५३, ५६ ते ६०, ६२ व ६३,
७३ व ७४, ८२ व ८३.

याप्रमाणें, श्रीसमर्थसहवासांत मेरुस्वामींना अयोध्येचें, शरयूचें आणि श्रीरामाचें दर्शन घडलें होतें ! त्याचें स्वारस्य अनुभवावांचून कोणास हि कसें कळणार !

(९) येथून पुढें श्रीसमर्थ कास्मिरांत गेले व परततांना पूर्वेकडील चित्रकूट, रामटेक वगैरे व पश्चिमेकडील सुदामनगर, द्वारका वगैरे तीर्थें करीत व मार्गांत राजे, तपस्वी वगैरे भेटतील त्यांच्या भेटी घेत, भिल्ल देशांतून जात असतां, जवळ कांहीं शस्त्र असावें, अशी इच्छा झाली. तेव्हां एक सिद्ध पुरुष भेटले, त्यांनीं एक टोणपा म्हणजे लांकडाचा ओंडा च दिला व गोरख भेटले त्यांनीं तीरकमटा दिला. तो लांकडाचा ओंडा म्हणजे आज गडावर समाधीमागें पादुकांच्या पेटीच्या एका बाजूस कोपऱ्यांत जी वांकडी-तिकडी काठी आहे, ती तर नसेल ? ती च असावी, एरव्हीं असली काठी आजपर्यंत जपून ठेवली गेली नसती. कां, जी पुढें श्रीसमर्थांनीं शिंगणवाडीच्या रानांत रोवली व जिला पल्लवी फुटून जिचें झाड झालें, ती ही काठी होय ? त्या तीरकमट्याचा मात्र पत्ता नाहीं.

(१०) याप्रमाणें उत्तरेकडून दक्षिणेकडे येत येत मुंगीपैठणास पोचले. तेथें मग ती तीरकमट्यानें पक्षी मारल्याची आणि पुन्हां जीवंत केल्याची गोष्ट घडली. त्यांचा वेष पाहून पैठणच्या ब्राह्मणांना मोठें नवल वाटलें. वेष पाहावा तर आहे साधूचा, पण हातीं तीरकमटा, ही काय तऱ्हा आहे, असें मनांत येऊन ब्राह्मणांनीं विचारलें, “ महाराज, या शस्त्राचा आपणांस कांहीं अभ्यास आहे कीं काय ? ” “ होय, ” असें उत्तर येतां च ब्राह्मणांनीं म्हटलें, “ दाखवा पाहूं प्रत्यय, ते आकाशांत दूर पक्षी उडत आहेत, मारा पाहूं. ” श्रीसमर्थांनीं एका च तीरानें सात पक्षी पाडले. हें पाहून ब्राह्मण उलटले, म्हणाले, “ हें काय, ही हत्या घडली, प्रायश्चित्त घेतलें पाहिजे. ” समर्थ म्हणाले, “ ठीक आहे, तुम्हीं च मारावयास सांगितलें आणि तुम्ही च प्रायश्चित्त देणार, बरें आहे, द्या प्रायश्चित्त. ” ब्राह्मणांनीं प्रायश्चित्त दिलें आणि समर्थांनीं घेतलें, पण पक्षी तसे च मृत पडलेले पाहून समर्थ ब्राह्मणांना म्हणाले, “ प्रायश्चित्त झालें, तरी पक्षी जीवंत होऊन आकाशांत उडून गेले च नाहींत ? ” ब्राह्मण म्हणाले, “ मेलेले पक्षी कोठें जीवंत होणार काय ? ” “ मग प्रायश्चित्ताचें फळ काय ? ” असें म्हणून

श्रीसमर्थांनीं पक्षी हातांत घेतले, त्यांस गोंजारून उडून जाण्याची आज्ञा केली आणि पक्षी भुर्दिशीं उडून गेले ! ब्राह्मण थक्क होऊन चरणीं लागले.

( ११ ) तेथून श्रीसमर्थ अंबाजोगाईस गेले. दत्तदर्शनासाठीं तप करीत बसलेल्या ब्राह्मणांची गोष्ट अंबाजोगाईच्या रानांत घडली, असें दासविश्रामधामांत आहे, तर ती गोष्ट, आईला व बंधूला भेटल्यानंतर त्यांना विचारून श्रीसमर्थ मातापुरास गेले असतां तेथें घडली, असें बखरींत आहे. कोणतें बरोबर मानावें ? कोणतें हि ठिकाण असलें तरी गोष्ट खरी आणि बोधप्रद आहे. पण कथानकांत असे फरक कां आढळावे, याचें मला नवल वाटत असतें. धामकर्ते आत्माराम आणि बखरकार हनुमंतस्वामी दोघे हि परंपरेंतील असून समकालीन होते; असो. ती गोष्ट अशी —

श्रीदत्तात्रेयाच्या स्थानीं दहा पांच ब्राह्मण अनुष्ठान करीत बसले असतां श्रीसमर्थांचें तेथें आगमन होऊन, "कां बसलां आहांत ?" म्हणून त्यांनीं ब्राह्मणांना विचारलें. ब्राह्मण म्हणाले, "श्रीदत्तदर्शन व्हावें, म्हणून अनुष्ठान करीत बसलों आहोंत." "उत्तम, तुमच्या निमित्तानें आम्हांस हि दर्शन घडेल, तेव्हां आपण हि बसतों," असें म्हणून श्रीसमर्थ हि तेथें बसले. रात्रीचा समय प्राप्त झाला, तों बरोबर स्त्री व पोरें पांच, कोंबडीं पंचवीस, बकरीं सहा, एक बोकड, एक छोकरी, अशीं एका गोणींत घालून ती गोणी एका रेड्याच्या पाठीवर लादून, अशा लटांबरासह फकिराच्या वेषांत श्रीदत्तात्रेयांचें तेथें आगमन झालें. तें सारें लटांबर तेथें च जवळ उतरलें. ब्राह्मण पाहत च होते. फकीर स्त्रीस म्हणाला, "जागा अच्छी है, ह्या खाना खानेका इरादा है, वास्ते हंडी पकाना." स्त्रीनें रेड्यावरून सामान खालीं काढलें, दगडाची चूल मांडून तीवर हंडी चढविली आणि विचारलें, "हंडीमे क्या डालना." फकीर बोलला, "मुरघीं काटके डाल." पंचवीस कोंबडीं होतीं, तीं कापून स्त्रीनें मडक्यांत घातलीं. तथापि मडकें रिकामें पाहून तिनें विचारलें, "हंडी भरी नहीं, क्या डालना." फकीर म्हणाला, "छोरे काटकर डाल." हें ऐकून तिनें तिन्ही मुलें कापून मडक्यांत घातलीं, तरी हंडी रिकामी च. स्त्री म्हणाली, "अबलग हंडी भरी नहीं." फकीर म्हणाला, "बकरीं काटकर डाल." तसें तिनें केलें, तरी हंडी रिकामी पाहून ती म्हणाली, "इस्सेही हंडी भरी नहीं." याप्रमाणें क्रमाक्रमानें

छोकरी, बोकड हंडींत पडले, अखेरीस रेडा हि कापून घातला, तरी हंडी भरली नाहीं. तेव्हां जवळ च बसलेल्या ब्राह्मणांकडे पाहून फकीर म्हणाला, " इस बह्मनोकूं काटकर डालो. "

आतांपर्यंतचा सर्व प्रकार ब्राह्मण पाहात च होते. तेव्हां, ' बह्मनोकूं काटकर डालो ' हे शब्द ऐकतां च, अनुष्ठानाचें सर्व सामान तेथें तसें च टाकून देऊन त्या ब्राह्मणांनीं पळ काढला, एकटे श्रीसमर्थ मात्र हलले नाहींत. बाई फकिरास म्हणाली, " सब बह्मन भाग गये, एक बैठा है. " फकिरानें हुकुम सोडला, " अच्छा, इसकु काट डालो. " बाई सुरी घेऊन सरसावली आणि श्रीसमर्थांनीं मान पुढें केली मात्र, तों फकीर कसला, स्त्री कसली आणि हंडी कसली, सारी उभारलेली माया होती, ती अदृश्य होऊन श्रीदत्तात्रेय प्रकट झाले आणि श्रीसमर्थांनीं त्यांच्या चरणीं मस्तक ठेविलें.

गरीब बिचारे अनधिकारी ब्राह्मण आधीं च पळून गेले होते. श्रीसमर्थांना त्यांची दया येऊन त्यांनीं त्यांना परत बोलाविलें व त्यांना हि श्रीदत्तदर्शन करविलें.

ही गोष्ट म्हणजे एक रूपक होय. स्त्री म्हणजे इच्छा मोहिनी, रेडा = अहंकार, गोणी = ममता, पंचवीस कोंबडीं म्हणजे पांच पंचकें, सहा बकरीं म्हणजे षड्रिपु, बोकड = गर्व, छोकरी = कुविद्या, तीन पोरें म्हणजे त्रिगुण आणि हंडी म्हणजे अंतरस्थिति. गोष्टीपासून बोध इतका च घ्यावयाचा कीं अहंकार, ममता, षड्रिपु, कुविद्या इत्यादि दोष नष्ट होऊन त्यांच्या जागीं निरहंकारवृत्ति, निर्लोभता, वैराग्य, निष्ठा इत्यादि सद्गुणांची स्थापना झाल्यावर देवदर्शनास वेळ लागत नाहीं.

( १२ ) ही दत्तदर्शनासाठीं अनुष्ठान करीत बसलेल्या ब्राह्मणांची गोष्ट अंबा जोगाईस घडलेली असो, वा इतर कोठें घडलेली असो, श्रीसमर्थचरित्रांत अंबा जोगाई या क्षेत्राचें विशेष महत्त्व आहे, असें मी मानतों. आपल्या मराठी भाषेंत ग्रन्थरचना करणाऱ्या, आजपर्यंत ज्ञात असलेल्या ग्रन्थकारांत दासोपंता इतकी ग्रन्थरचना दुसऱ्या कोणाची नाहीं. ग्रंथसंख्येच्या दृष्टीनें मराठी ग्रन्थकारांत ते अग्रस्थानीं असून शिवाय

दशोपनिषदांवर त्यांनीं संस्कृत भाषेंत भाष्यें लिहिलेलीं आहेत. अंबा जोगाई हें त्या दासोपंतांचें निवासस्थान होय. त्या दासोपंतांचा **ग्रन्थराज** म्हणून एक १२०९ ओव्यांचा ग्रंथ आहे.

तसें च आद्यकवि मुकुंदराज यांची समाधी येथें च जवळ असल्याची लोकांची समजूत आहे. कोणी बैतुल हें त्यांचें निवासस्थान असून त्या भागांत त्यांची समाधी आहे, असें म्हणतात. दोन्ही ठिकाणीं त्यांचा संबंध असणें शक्य आहे.

मला सध्यां इतकें च म्हणावयाचें आहे कीं, या गांवीं श्रीसमर्थांचा मुक्काम झाला असतां दासोपंत आणि मुकुंदराज यांचे ग्रंथ—त्यांत मुख्य म्हणजे दासोपंतांचा **ग्रंथराज** व मुकुंदराजांचा **विवेकसिंधु** हे ग्रंथ—श्रीसमर्थांच्या अवलोकनांत येथें आले व या दोन्ही ग्रन्थांचा त्यांच्या मनावर इतका कायमचा परिणाम झाला होता कीं, कालांतरानें, कृष्णातटाकीं गेल्यावर, या दोन ग्रंथांचा ठसा खुद्द श्रीसमर्थांच्या श्रीमत् ग्रन्थराज दासबोध या ग्रन्थावर उमटलेला आज आपल्या प्रत्ययास येत आहे. त्याचा आणखी थोडा विस्तार ‘ श्रीसमर्थांचीं वैशिष्ट्यें ’ या उल्लासांत पुढें, आठवण ठेवून, करूं.

( १३ ) बखरीप्रमाणें पैठणास व दासविश्रामधामाप्रमाणें अंबा जोगाईस च एके दिवशीं श्रीसमर्थ कीर्तन करीत असतां, जांबेचे कोणी एक वृद्ध गृहस्थ कीर्तनाच्या जागीं उपस्थित होते. कीर्तनकाराचें तें भव्य रूप, ती सुंदर दीक्षा, तें दिव्य तेज पाहून आणि ती अमृत वाणी ऐकून त्या गृहस्थाच्या मनांत, कीर्तन श्रवण करीत असतां, सहज एक विचारतरंग येऊन गेला कीं, पांच पंचवीस वर्षांमागें, आपल्या गांवच्या सूर्याजीपंतांचा धाकटा मुलगा लग्नांतून पळाला होता, तो तर हा नसेल ना ! कीर्तन संपलें, आरती झाली आणि समर्थ बसले. त्या गृहस्थानें जवळ जाऊन विचारलें, “ महाराज, आपण मूळ राहणारे कोणत्या गांवचे ? ” समर्थांनीं **जांब** म्हणून सांगतां च त्या गृहस्थास शंका उरली नाहीं. तो अति आनंदला, पण त्यांत च किंचित् रागावला हि, कारण त्यानें आईचा विलाप आणि दुःख आणि सारखें रडणें पाहिलें होतें ! तो एकदम म्हणाला, “ महाराज, आपण हें वैभव प्राप्त करून घेतलें, हें ठीक, पण आपण गेल्यापासून रडून रडून आपल्या मातुःश्रीचे डोळे गेले, आपणांस आणखी कोठें

जावयाचें असेल तर खुशाल जा, पण आतां एकवार आईला भेटल्यावांचून दुसरीकडे कोठें जाऊं नका. ”

श्रीसमर्थांचें ठरलें च होतें, ते उत्कंठित झाले च होते. दुसरे च दिवशीं ते तेथून जांबेस जावयास निघाले. आपण हि त्यांच्या पाठोपाठ मातुःश्रींच्या दर्शनास जाऊं.



उ ल्ला स आ ठ वा

# आईची भेट

[ १५६२ ]



ते पोटागी वेगळी च ॥

धन्य धन्य ते प्रपंची जन ।
जे मायबापाचें भजन ।
करिती, न करिती मन ।
निष्ठुर जिवलगांसी ॥

—दासबोध, ३–४–३६ व ४१

[( १ ) कोण? माझा नारायण आला कीं काय?–( २ ) करा आईच्या हृदयानंदाची कल्पना – ( ३ ) आईला नारायणानें दिव्य दृष्टि दिली –( ४ ) उभय बंधूंत झालेलीं बोलणीं –( ५ ) आधीं जन्मदात्या मातेचा उद्धार करून मग भूमातेच्या उद्धारार्थ गेले –( ६ ) यानंतर पुन्हां एकदां जांबेस आले, पण आतां कायमचे येऊन उभे टाकले आहेत.]

( १ ) श्रीसमर्थ अंबा जोगाईहून तडक निघाले, ते जांबेस च गेले. जीवाला हळुवार करून सोडणारा तो प्रसंग आहे. वयाच्या बाराव्या वर्षीं घर सोडलें होतें, ते आतां सरासरी बत्तिसाव्या वर्षीं येऊन, घरांत एकदम न शिरतां, दारापुढें उभे राहून, खड्या आवाजांत

**सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं । मिळेना कदा कल्पनेचेनि मेळीं ।**
**चळेना मनीं निश्चयो दृढ ज्याचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥**
**जय जय रघुवीर समर्थ**

असा श्लोक त्यांनीं म्हटला, रघुवीराचा जयजयकार केला, तरी आंतून उत्तर आलें नाहीं म्हणून

**नसे अंतरीं कामकारी विकारी । उदासीन जो तापसी ब्रह्मचारी ।**
**निवाला मनीं लेश नाहीं तमाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥**

असा दुसरा श्लोक म्हणून जयजयकार केला. तरी जबाब आला नाहीं, म्हणून

**नसे मानसीं नष्ट आशा दुराशा । वसे अंतरीं प्रेमपाशा पिपाशा ।**
**ऋणी देव हा भक्तिभावें जयाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥**

असा तिसरा श्लोक म्हटला, जयजयकार केला, घरांत मातु:श्री खंगलेल्या, पायांत डोकें घालून बसल्या होत्या, त्यांनीं तिन्ही श्लोक आणि तीन वेळां केलेला रघुवीराचा जयजयकार ऐकला, पण त्यांच्या कांहीं लक्षांत आलें नाहीं. कोठून येईल हो, वीस वर्षांचा काळ लोटला होता, त्यांनीं किती वर्षें वाट पाहिली असेल? आज येईल, उद्यां येईल अशीं दोन चार, नव्हे, दहा पांच वर्षें वाट पाहिली असेल, पण वर्षांमागें वर्ष लोटत चाललें, तेव्हां आतां या जन्मांत पुन्हां नारायण आपल्या म्हणजे दृष्टीस पडेल, अशी त्यांना आशा हि उरली नसेल! विस्मृति कोठून होईल म्हणा? वीस नाहीं, विसावर आणखी एक टिंब द्या, दोनशें वर्षें लोटलीं, तरी आईला पोटच्या गोळ्याची कधीं विस्मृति होईल, हें संभवतें तरी का? मातु:श्रींनीं ते श्लोक ऐकले, त्या श्लोकांतल्या वर्णनाप्रमाणें नारायणाची वृत्ति झाली

असेल काय, असें हि त्यांच्या मनांत येऊन गेलें, पण नारायण च आला अशी कांहीं त्यांना कल्पना झाली नाहीं ! त्या उलट, सुनबाईस म्हणजे श्रेष्ठांच्या पत्नीस म्हणाल्या, "बाहेर कोणी गोसावी आला आहे, त्यास मूठभर भिक्षा नेऊन घाला." तें ऐकून श्रीसमर्थ बाहेरून च म्हणतात, "हा गोसावी भिक्षा घेऊन जाणारा नाहीं." तीन श्लोक आणि तीन वेळां जयजयकार ऐकला तरी कल्पना झाली नाहीं, पण 'हा गोसावी भिक्षा घेऊन जाणारा नाहीं', हे शब्द मातु:श्रींनीं ऐकले मात्र, त्यांचा चेहरा प्रफुल्लित झाला, हृदयांत परमानंदाच्या ऊर्मि उठल्या आणि ब्रह्मानंद वाटून त्या एकदम म्हणाल्या, "कोण, माझा नारायण आला कीं काय?" 'कोण, माझा नारायण आला कीं काय,' हे शब्द मातु:श्रींच्या तोंडून निघताहेत, तोंच, "हो मी नारायण आलों आहे", असें म्हणत च नारायणानें जाऊन मातु:श्रींच्या चरणांवर मस्तक ठेवलें ! ! !

(२) करा त्या वेळच्या आईच्या हृदयाची कल्पना ! तुम्हांस कल्पना करण्यास सांगतों, कारण, त्या क्षणीं आईच्या हृदयाची काय अवस्था झाली असेल, तें वर्णन करून सांगण्यास मजजवळ शब्द नाहींत आणि शब्दांनीं त्याचें वर्णन हि होऊं शकत नाहीं ! काय वाटलें असेल आईला ? "मी स्वप्नांत तर नाहीं ना? ध्यानीं, मनीं, स्वप्नीं नसतां नारायण एकाएकीं येऊन चरणांवर मस्तक ठेवतो ! मी समजूं तरी काय?" आईच्या हृदयाची कल्पना कोण करूं शकेल? लग्नसमारंभांतून अचानक निसटले, त्या वेळीं आईला झालेल्या दु:खाची जशी आपण कल्पना करूं शकलों नाहीं, तशी च या वेळच्या आनंदाची हि आपणांस कल्पना होत नाहीं ! आईचें हृदय आया च जाणोत. नारायण आला, खरं च नारायण आला आणि आईच्या हृदयाला कंप सुटला आणि नेत्र भरून आले. नारायणानें हि आईच्या चरणांवर नेत्राश्रूंनीं अभिषेक केला. उभयतांचे नेत्राश्रु स्रवताहेत ! न स्रवतील तर काय होईल ! प्रसंगाशीं तदाकार वृत्ति होऊन लेखकाचे, त्यास न कळत, स्रवताहेत व वाचकांचे स्रवतील, तर त्या प्रत्यक्ष माय-लेकरांचे स्रवले असतील, हें काय सांगावयास पाहिजे !

(३) वीस वर्षें आईनें दु:खांत काढलीं ! रडून रडून डोळे हि गेले ! पण आज, आज म्हणजे तेव्हां, आज म्हणजे त्या अचानक भेटीच्या

दिवशीं, त्या दुःखाचा किंचित् तरी अंश शिल्लक उरला असेल काय? डोळे गेलेले! आई चाचपूं लागली, हात फिरवून पाहूं लागली. मस्तकावरून, तोंडावरून, हातांपायांवरून हात फिरवीत असतां काय हो आईची दशा झाली असेल! त्या जटा नि ती दाढी, तो एक एक दंड आणि त्या मांड्या! लग्नांतून पळाला तेव्हां आधीं आईनें न्हाऊं माखूं घातलें असेल, तेव्हां कोठें होत्या त्या जटा नि दाढी, ते दंड आणि त्या मांड्या! अंगावरून हात फिरवीत असतां आणि आनंदाश्रु ढाळीत असतां आई म्हणाली, "नारायणा, अरे तुझें हें रूप पाहण्यास मला डोळे उरले नाहींत!" नारायणानें आईच्या डोळ्यांवरून हात फिरविला – वाचक हो, तुम्ही इतर चमत्कार माना वा नका मानूं, मी हि मानीन किंवा मानणार नाहीं, पण हा चमत्कार तुम्हांला आणि मला मानला च पाहिजे, कारण श्रीसमर्थांचें च त्यासंबंधीं एक पद आहे – समर्थांनीं आईच्या डोळ्यांवरून आपला हात फिरविला मात्र, तावत् श्रीसमर्थांचें नखशिखान्त स्वरूप मातुःश्रीस दृग्गोचर झालें आणि त्या म्हणाल्या, "नारायणा, अरे, ही भूतचेष्टा तूं कोठून शिकून आलास?" "आई, ही भूतचेष्टा नाहीं, ही प्रभु रामचंद्राची कृपा होय! सर्व प्राणिमात्राच्या हृदयांत वास करणारा जो परमेश्वर

**सर्वां भूतांचें हृदय। नाम त्याचें रामराय।**
**रामदास नित्य गाय। तें चि भूत गे माय॥**

आई, हें दुसरें तिसरें भूत नसून शरयुतीरनिवासी रामरायाची ही लीला होय." त्या भूताचें साद्यन्त चरित्र श्रीसमर्थांनीं एका पदांत त्या वेळीं आईला ऐकविलें :

**होतें वैकुंठींचे कोनीं। शिरलें अयोध्याभुवनीं।**
**लागे कौसल्येचे स्तनीं। तें चि भूत गे माय॥ १**

**जातां कौशिकराउळीं। अवलोकिली तये काळीं।**
**ताटिका ते छळूनि मेली। तें चि भूत गे माय॥ २**

**मार्गीं जातां वनांतरीं। पाय पडला दगडावरी।**
**पाषाणाची जाली नारी। त चि भूत गे माय॥ ३**

**जनकाचे अंगणीं गेलें। शिवाचें धनु भंगिलें।**
**वैदेहीअंगीं संचरलें। तें चि भूत गे माय॥ ४**

**जेणें सहस्त्रार्जुन वधिला। तो हि तत्काळ चि भ्याला।**
**धनु देऊनी देह रक्षिला। तें चि भूत गे माय॥ ५**

**पितयाचे भाकेशीं। कैकेयीचे वचनासी।**
**मानुनी गेलें अरण्यासी। तें चि भूत गे माय॥ ६**

**चौदा संवत्सर तापसी। अखंड हिंडे वनवासी।**
**सांगातें भुजंग पोसी। तें चि भूत गे माय॥ ७**

**सुग्रीवाचें पालन। वालीचें निर्दालन।**
**तारी पाण्यावरी पाषाण। तें चि भूत गे माय॥ ८**

**रक्षी भक्त बिभीषण। मारी रावण कुंभकर्ण।**
**तोडी अमरांचें बंधन। तें चि भूत गे माय॥ ९**

**वामांगीं स्त्रियेला धरिलें। धांवुनी शरयुतीरा आलें।**
**तेथें भरतासी भेटलें। तें चि भूत गे माय॥ १०**

**सर्वां भूतांचें हृदय। नाम त्याचें रामराय।**
**रामदास नित्य गाय। तें चि भूत गे माय॥ ११**

(४) समर्थांचें जांबेस राहणें थोडे च दिवस झालें. आईची व इतरांची इच्छा, त्यांनीं आतां निरंतर येथें च रहावें, अशी असणार, पण ते राहणार कोठून? विधीनें त्यांचें अवतारकार्य निराळें च नियत केलेलें होतें. तथापि ते कांहीं दिवस तरी राहिले च असले पाहिजेत. त्यांना पाहून आणि त्यांच्या संगतींत राहून गांवच्या लोकांना फार आनंद वाटला असेल. घरांतल्या माणसांविषयीं तर बोलावयास च नको. घरांत माणसें तरी किती? इन मिन तीन—आई, बंधु आणि भावजय. आईच्या आनंदाला पारावार उरला नव्हता. तो आपण पाहिला च. बंधुबंधूंत हि खूप प्रेमाचीं बोलणीं झालीं असतील. श्रेष्ठांनीं विचारली असेल व गेल्यापासून येईपर्यंतच्या लोटलेल्या वीस वर्षांची हकिकत समर्थांनीं सविस्तर सांगितली असेल. तींत अर्थात्, देशस्थिति किती चिंताजनक झालेली आहे व धर्म कसा प्राणांतिक संकटांत सांपडला आहे, यांचें हि, जीवाला लागणारें वर्णन समर्थांनीं केलें असेल. तें सारें ऐकून श्रेष्ठांनीं उद्गार काढले, "अरेरे, असा का संकटकाळ धर्मावर आलेला आहे, जनता इतकी का त्रस्त झाली आहे, स्त्रियांच्या पातिव्रत्यावर

असे का घाले पडत आहेत, अरेरे, नारायणा, हें तुझें बोलणें ऐकून जीवाचें पाणी होतें, काय करावें, देवाचें नांव घ्यावें, दुसरें तरी कोण काय सांगणार, ज्ञानेश्वरांसारखे महाभागवत या काळीं अवतरले तरी ते हि दुसरें काय सुचविणार !"

**नाहीं तरी महाभागवत नर । काय करिते ये काळीं ॥**

—भक्तिरहस्य, ७३–९०

हें निराशेचें बोलणें श्रीसमर्थांना मुळीं च पटलें नाहीं. यत्न हा त्यांचा देव होता. ते म्हणाले, "असें निराश होऊन बसण्याचें केव्हां च कारण नाहीं, देवानें मनुष्याला स्वतंत्र बुद्धि दिली आहे. ती बुद्धि चालवून प्रयत्न केल्यास ही स्थिति हटकून पालटेल. परमेश्वरावर भार टाकावा, पण आपण हि यथामति यथाशक्ति प्रयत्न केल्यास यश निश्चित आहे.

**घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड ।**

—दासबोध, १२–९–२९

तेथें निराशेला मुळीं च थारा देतां कामा नये."

(५) असो. याप्रमाणें कांहीं दिवस मातु:श्रीच्या प्रेमळ सहवासाचें अनुपम सुख भोगून, पूर्वी मातु:श्रीला आणि इतरांना न विचारतां सर्वांना दु:खांत टाकून जरी श्रीसमर्थ चालते झाले होते, तरी आतां या खेपेस मातु:श्रीला पुसून, तिला दिव्य दृष्टि देऊन आणि कृतार्थ करून, वडील बंधूंची परवानगी घेऊन व गांवकरी मंडळींचा निरोप घेऊन श्रीसमर्थांनीं जांब सोडलें. मी नेहमीं म्हणत असतों, असे पुत्र पोटीं जन्मास यावे, कीं ज्यांनीं आईबापांचा हि उद्धार करावा. पहा, आमच्या समर्थांनीं कष्ट करून, हाल सोसून, देह झिजवून, श्रीरामरायाला आपलेसे करून घेऊन प्रथम जन्मदात्या मातेचा उद्धार केला आणि मग भूमातेच्या उद्धारार्थ ते दक्षिणेकडे चालते झाले.

(६) यानंतर श्रीसमर्थ जांबेस आणखी एकदां च आल्याचा दाखला सांपडतो. त्यांचें बाळपण जांबेस च गेलें, आईसाठीं या वेळीं जांबेस आले व पुढें आणखी एकदां १५७६ च्या सुमारास जांबेस येऊन गेले, असें स्वानुभवदिनकरावरून दिसतें. पण आतां ते १८५४ च्या चैत्र शुद्ध ९ स

कायमचे च येऊन, सर्वांना दर्शन देण्यासाठीं, सर्वांचें कल्याण करण्यासाठीं, उभे ठाकले आहेत. ज्या ठिकाणीं त्यांचा देह प्रथम धरणीला लागला, किंवा मी नेहमीं म्हणत असतों त्याप्रमाणें, ज्या ठिकाणीं मातुःश्री राणुबाईनें हें बालक दिलें आणि धरणीमातेनें अलगत झेललें, बरोबर त्या जागेवर भव्य मंदिर उभारलें जाऊन वरील मितीस त्यांच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाली आहे. अशा त्या पवित्र स्थानाकडे सर्वांचें सतत लक्ष असावें, अशी माझी प्रार्थना आहे.



उल्लास नववा

# तीर्थाटण

## दक्षिणेकडे

[ १५६२-१५६६ ]



जयंत्यादिकें नाना पर्वें। तीर्थें क्षेत्रें जें अपूर्वें।
जेथें वसिजे देवाधिदेवें। सामर्थ्यरूपें ॥

तया तीर्थातें जे न मनिती। शब्दज्ञानें मिथ्या म्हणती॥
तया पामरां श्रीपति। जोडेल कैंचा ॥

नाना तीर्थां क्षेत्रांस जावें। तेथें त्या देवाचें पूजन करावें
नाना उपचारीं आर्चावें। परमेश्वरासी ॥

—दासबोध, १४-५-७ व ८, ४-५-१७

[ ( १ ) मार्गांत सर्व पवित्र स्थानें पहात पहात लंकेपर्यंत जाऊन परतले आणि पंचवटीस आले – ( २ ) देशासाठीं, धर्मासाठीं किती हे कष्ट – रामसोहळ्यांतील उतारा – ( ३ ) या समर्थाची सरी । कोण्ही न पावे ॥ – ( ४ ) उताऱ्याचें प्रयोजन – ( ५ ) फिरे दास उदास लोकांस पाहे । – ( ६ ) तसे लोक हि यांच्याविषयीं अनेक तर्क करीत – ( ७ ) प्रवासांत हाल – ( ८ ) भिन्न भिन्न क्षेत्रांत निरनिराळ्या दैवतांची प्रार्थना – ( ९ ) सर्वांच्या भेटी घेत आणि शोध काढीत – ( १० ) पंचवटीस पुनरागमन आणि तेथून कृष्णातीरीं गमन ]

( १ ) मातेचा आशीर्वाद व बंधूंचा निरोप घेऊन दक्षिणेकडील तीर्थक्षेत्रें करावयास श्रीसमर्थ जांबेहून निघाले. जातांना आणि येतांना सोयीप्रमाणें पूर्व आणि पश्चिम बाजूचीं स्थानें पहात, थेट कन्याकुमारीपर्यंत त्यांचें जाणें झालें. मार्गांत हि लागतील तीं स्थानें पहात गेले. शंकराचीं स्थानें, व्यंकटेशाचीं स्थानें, शंकराचार्यांचें स्थान, मध्वराय, कुमारस्वामी, सुब्रह्मण्य, विरूपाक्ष यांचीं स्थानें, पंपासरोवर व ऋष्यमूक, अंजनी-सुग्रीव-स्थान, शबरीस्थान, जटायूद्धरणस्थान, अगस्तिस्थान, कावेरीतटीं श्रीरंगनाथ-स्थान, श्रीरामानुजसंप्रदायाचीं स्थानें, पद्मनाभ, गोकर्ण, पक्षीतीर्थ, कांची, अरुणाचल, त्रिपति, कामाक्षी, हरिहरेश्वर, वरदराज वगैरे मार्गांत लागतील तीं तीं स्थानें करीत च श्रीरामेश्वरास श्रीसमर्थ पोचले. तेथें सेतुस्नान घडलें, मारुतीच्या स्कंधावर बसून लंकेस जाऊन आले, बिंदुस्थानगुहा पाहिली, भोगावतीचे तीरीं हाटकेश्वराचें दर्शन घेतलें आणि परतले, ते चार वर्षांनीं पुनरपि पंचवटीस येऊन पोचले.

( २ ) उत्तरेकडील काय आणि दक्षिणेकडील काय तीर्थक्षेत्रें करीत पायांनीं हिंडत असतां श्रीसमर्थांना किती कष्ट पडले असतील, कोण जाणे ! कठीण प्रदेशांतून जावें लागलें असेल, बरे वाईट, सुष्ट दुष्ट लोक भेटले असतील, हिंस्र श्वापदांची हि अनेकदां गांठ पडली असेल, नाना तऱ्हेचीं त्यांच्यावर संकटें आलीं असतील. या सर्वांची आपणांस बरोबर कल्पना करून देणारा एक प्रसंग मेरुस्वामींनीं वर्णिला आहे, तो एक च प्रसंग पाहिला म्हणजे या महापुरुषानें देशासाठीं आणि धर्मासाठीं किती कष्ट सहन केले, याची आपणांस पूर्ण जाणीव होईल. उतारा मोठा आहे, पण तो श्रीसमर्थांच्या तीर्थाटणाच्या काळांतील दगदगीची यथार्थ कल्पना करून देणारा असल्यामुळें तो येथें उद्धृत करणें

आवश्यक होय. तो ज्या अगत्यानें मी येथें देत आहें, त्याच अगत्यानें वाचकांनीं तो वाचावा. तो टाळून पुढें जाऊं नये. तो टाळल्यानें समर्थांना च टाळल्यासारखें होणार आहे. त्यांत आपणांस श्रीसमर्थ तर दिसतील च, पण त्यांचे कैवारी धनुर्धारी रघुवीर यांचें हि दर्शन घडेल !

**सावधान म्हणतां संसारीं । सावध जाहले ॥ ३**

**निजविरक्तीच्या बळें । वधिले षड्वैरी छळें ।**
**करूनि कल्पनेचें वाटोळें । पावले स्वरूपीं ॥ ४**

**सूर्याचें प्रतिबिंब जळीं । जळ आटतां पावे सूर्यमंडळीं ।**
**तेवि कल्पनानाशें निश्चळीं । निश्चळ जाले ॥ ५**

**प्रारब्धयोगें वनांतर । विरक्तिदशेनें दुर्धर ।**
**नाना स्थळांतरें दुस्तर । संचरती तेथें ॥ ६**

**पंचभूत दृश्याकर । मूळ अविद्येचा संसार ।**
**महावसुमतीचा विस्तार । धुंडित चालले ॥ ७**

**विरक्तीचें आंगीं वारें । उदासवृत्तीनें वावरे ।**
**वस्तीनें गिरिकंदरें । वसविलीं बहु ॥ ८**

**महातपस्वी अनुष्ठाते थोर । वसविती गुंफा योगेश्वर ।**
**नाना हटयोग विस्तार । पाहिले दृष्टीसी ॥ ९**

**सात्त्विक प्रेम भाविक भक्त । स्वरूपप्रतीतीनें विरक्त ।**
**अखंड समाधि नित्य मुक्त । सिद्ध दृष्टीसी पाहिले ॥ १०**

**निवृत्तिदरकुटांचे निवासी । अनुभवगुहा सुखवासी ।**
**विरक्तिपर्णकुटीचे तापसी । तपोधन पाहिले ॥ ११**

**स्वानंदशिखरीं विसावले । जे वृत्तीस नाहीं आले ।**
**निजउन्मनीमाजि राहिले । ते पाहिले समर्थ ॥ १२**

**एक बाह्यदीक्षेनें संपन्न । योगदीक्षा प्रकाशमान ।**
**अंतरीं इच्छा धरूनि ध्यान । बैसले किती ॥ १३**

**कुटिल वासना जडली । दिगंबरतनु सलोभ मुळीं ।**
**सकाम इच्छा ध्यान समेळीं । दीक्षाविभूषित ॥ १४**

**अनेक प्रकारचे महंत । हटयोगसाधनें समाधिस्थ ।**
**नाना चमत्कारें अत्यद्भुत । सिद्धी वोळल्या ॥ १५**

नाना तीर्थे क्षेत्रें विशेष । महा पट्टणें वनें उद्वस ।
स्वइच्छाविहार तोष । अति विरक्तीचा ॥ १६

विश्रांतिनदीतीरीं बसले । तपतेजें सूर्यसम प्रकाशले ।
महा सिद्ध तपस्वी भले । अनुष्ठाते पुरुष ॥ १७

कोणासी नाहीं संभाषण । ईक्षणें चि हृदय घेऊन ।
निजांगविरक्तीनें पूर्ण । भरले विजनीं ॥ १८

नाहीं जनविकल्पाचा वारा । चालिले विचारीत विचारा ।
स्वरूपसाक्षात्कारजिव्हारा । प्रकटीत ॥ १९

द्वादश वर्षे पूर्व वनवास । त्यावरी द्वादश वर्षे संचारास ।
आहारेंवीण शरीरास । शक्ति कांहीं च नसे ॥ २०

नाहीं क्षुधेतृषेच्चें देहीं भान । नसे विश्रांति निद्रा जाण ।
वायूसारिखें संचरण । होतसे स्वइच्छा ॥ २१

शरीरउपजीविकाजीवन । सदोदित रघुनंदन ।
निजप्राणाचा हि प्राण । नित्यतृप्तीनें असे ॥ २२

निजध्यासें राम चि सर्वत्र दिसे । जिवलग त्यावीण कोणी नसे ।
कृपासंजीवनीनें जीवितसे । जिवाचा निजजीव ॥ २३

जैसें हिरण्यकश्यपें द्वेषछळें । प्रल्हादाचें धारिष्ट पाहिलें ।
तैसेपरी च चित्त शोधिलें । आपआपण समर्थे ॥ २४

प्रल्हादासी त्या सेवकजनीं । लोटिले कडेलोटणी ।
स्वइच्छा चि समर्थांनीं । ते हि प्रतीति पाहिली ॥ २५

वनदाहो अग्नींत रिघाले । व्याघ्रसिंहसहवासें राहिले ।
सर्प स्वइच्छा खेळविले । आंगावरी ॥ २६

विषाची निर्विष प्रतीति । मरणाची चिरंजीव स्थिति ।
बुडण्याची तारक रीति । पाहिली समर्थे ॥ २७

अक्षोभजळीं उडी टाकूनि । चळवळ न करितां जीवनीं ।
पाहिले धारिष्ट शोधूनि । सख्य श्रीरामाचें ॥ २८

मासोपवासी महामहिमे । येथें वर्षानुवर्षे चालिली क्रमें ।
साक्षात् रामावतार नेमें । वनविचरण ॥ २९

दीक्षा रामाची पावन । ते चि दीक्षेनें समर्थ पूर्ण ।
फिरतां वनवासी दारुण । काळयोग जाहला ॥ ३०

पहा काय प्रसंग श्रीसमर्थांवर आला होता :

राम प्रत्यक्ष व्हावयासी कारण। क्षोभलीं पंचभूतें संपूर्ण।
भूमि तापली सूर्येकडून। महाउष्णकाळीं ॥ ३१

पर्वताचे पाठार लागले। विस्तीर्णतेसी विस्तारले।
वृक्षतृणादि उगवले। नाहीं च ज्यावरी ॥ ३२

जीवनाचा लेश नाहीं। सारिखें चि सर्वत्र हि।
जैसें समुद्रजळ पाहीं। सारिखें च समान ॥ ३३

तैसें पाषाणाचें काळेपण। जैसें दृश्यरहित गगन।
तैसें स्थळ तें विस्तीर्ण। समर्थ तेथें ठाकले ॥ ३४

कोणतें हें ठिकाण, उत्तरेकडचें कां दक्षिणेकडचें, कोण जाणे !

सूर्य मध्यान्हीचा महा खडतर। किरणें वरुषती वैश्वानर।
अग्निरूप तो स्थावर। पदगतीस पोळवी ॥ ३५

नाहीं विश्रांतीचा पवन। धैर्यास भेडसावीत रान।
कल्पांतवेळा ते निर्वाण। वोडवली सहजें ॥ ३६

संतप्त तीव्र चंडकिरणीं। पोळों लागली क्षमाधरणी।
सूर्यकांत खडतरोनि। सूर्यरश्मीनें प्रज्वळ ॥ ३७

करूनिया निजनिर्धार। स्वामी स्थिरावले अतिस्थीर।
तव तो पर्वत हरहर। शब्दें गडाडिला ॥ ३८

जय जय जय जय रघुवीर। घोष प्रगटती भयंकर।
घुमों लागलीसे गंभीर। आकाशवाणी ॥ ३९

उदासीनतायोग निर्लोभ। निघाले धारिष्ट ते अक्षोभ।
क्षोभलें चित्त सलोभ। कारुण्य उदेलें ॥ ४०

क्षुधातृषाबाधा झळंबली। प्राणांतदशा जाणवली।
संपूर्ण ममतेनें आठवली। मूर्ति रघुत्तमाची ॥ ४१

त्या निर्वाणदशे माझारीं।
आला समर्थांचा साहकारी।
काळनिवर्तक निर्धारी।
धनुर्धारी रघुवीर ॥ ४४

स्वकरें समर्थासी कुर्वाळिलें। मंत्रसंजीवनीसंधान केलें।
श्रवणावाटें पाजिलें। परमामृत ॥ ४५

समर्थाची नेत्रारविंदें । रघूत्तमकरारविंदें ।
स्पर्शतां चि स्वतेजस्वानंदें । दृष्टी उघडली ॥ ४६

दृष्टीसी देखिला राजीवनयन । आनंदलें समर्थाचें मन ।
समीप बैसले उठोन । अभिवंदन केलें ॥ ४७

रघुराजपद्कमळीं । समर्थें ठेविला मौळी ।
हात माथां ठेऊनि तात्काळीं । दिधलें आलिंगन ॥ ४८

सिद्धयोगियांचा विसावा । स्वसुखसायुज्यतेचा ठेवा ।
तो प्रत्यक्ष होऊनि तेव्हां । अनुग्रह करितसे ॥ ४९

कृपावात्सल्यरसें उचित । विचारलें जें अपेक्षित ।
आलों तुझिया प्रीतीनें धांवत । पुरवीन अभीष्ट ॥ ५०

राम सप्रेमें असे द्रवत । माय बहु काळें पुत्रासि देखत ।
कळवळिलें तैसें चित्त । जगज्जनकाचें ॥ ५१

समर्थ म्हणती तुजवीण कांहीं । मज इच्छा उरली च नाहीं ।
आतां ठाव दे तुझिये पायीं । हे चि मज अपेक्षा ॥ ५२

अंतर परीक्षूनि आलासी । विरुदें आलीं प्रत्ययासी ।
आतां देहसंस्कारवृत्तीसी । उरों नेदीं सर्वथा ॥ ५३

जालिया हि तुझें दर्शन । उरावें काय माझें मीपण ।
आतां कृपा करूनि निर्वाण । गती देईं ॥ ५४

बोधसमुद्र रघुनंदन । आत्मदीक्षा भवकंदन ।
ब्रह्मोपदेशें सावधान । समर्थासी केलें ॥ ५५

—रामसोहळा, १–७

(३) कोणत्या पर्वतावरील हें वर्णन आहे, हिमालयांतील कां विंध्यपर्वतावरील, सातपुड्यांतील कां सह्याद्रीवरील, हें सांगतां येत नाहीं. पण देशासाठीं आणि धर्मासाठीं, भगवत्कृपेसाठीं आणि जगदुद्धारार्थ इतके कष्ट सहन केल्याचा, कोणत्या हि अवताराचा, आपणांस कोठें दाखला सांपडतो कां ? नसेल सांपडत तर,

कृतत्रेतद्वापारीं । जाले अद्भुत अवतारी ।
परी या समर्थाची सरी । कोण्ही न पावे ॥

— रामसोहळा, १ – ६ – १०५

असें जें मेरुस्वामींनीं म्हटलें आहे, ती अतिशयोक्ति नव्हे, हें आपण मान्य केलें पाहिजे.

( ४ ) हा एवढा मोठा उतारा दोन कारणांसाठीं मीं उद्धृत केला आहे. एक तर, तीर्थाटणाच्या काळांत श्रीसमर्थांवर आलेल्या प्रसंगांचें इतकें विश्वसनीय वर्णन माझ्या वाचण्यांत दुसरीकडे कोठें आलें नाहीं म्हणून, आणि दुसरें असें कीं, धनुर्धारी रघुवीराला श्रीसमर्थांची काळजी किती आणि कां लागली होती, हें आपल्या लक्षांत येऊन, आपण आपल्या ठिकाणीं जी इच्छा करीत असतों, ती कां पूर्ण होत नाहीं, आपला प्रयत्न किती कमी पडतो व जो होतो, तो हि कसा वरपंगी असतो, हें आपणांस कळावें, म्हणून.

( ५ ) कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें । भिक्षामिसें लाहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥ अशी सूचना शिष्यांना देणारे श्रीसमर्थ, तीर्थाटणाच्या निमित्तानें देशभर संचार करीत असतां स्वतः, भेटतील त्या सर्वांची परीक्षा केल्यावांचून थोडे च राहिले असतील ? त्यांनीं केलेल्या परीक्षेचे पांच § श्लोक आहेत.

**महीं मंडळीं लोक नाना गुणाचे । असंभाव्यलीळाकळाकूसरीचे ।**
**किती येक साधे किती येक बोधे । किती येक ते देखिले मंदबोधे ॥ १**
**किती येक लाताड लाबाडवाणे । किती येक पापी पुराणे पुराणे ।**
**किती येक तोंडाळ वोढाळ ऊणे । कुशब्दी किती येक वाचाळ सूणे ॥ २**
**करंटे कुरूपी विकारी भिकारी । किती येक ते तामसी दुःखकारी ।**
**किती येक ते पातकी पापरूपी । किती येक ते दक्ष पुण्यस्वरूपी ॥ ३**
**भले नष्ट पापी दुरात्मे चि कांहीं । जनीं पाहतां सारिखे येक नाहीं ।**
**बहु लोक हे तों बहुता परीचे । भले तें हरीचे तथा दुर्भरीचे ॥ ४**
**भल्याचे भले बोलती रम्य वाचा । देहे सुकृती चालतो सुकृताचा ।**
**फिरे दास उदास लोकांस पाहे । मनामाजि थकीत होऊनि राहे ॥ ५**

( ६ ) हे जशी लोकांची परीक्षा करीत, तसे लोक हि यांच्याकडे पहात आणि आश्चर्य करीत. त्यांची निरिच्छ, वैराग्यशील मूर्ति पाहून लोकांना मोठें नवल वाटे. त्रैलोक्याची पर्वा नाहीं, अशी या तरुणाची वृत्ति पाहून, स्त्रियापुत्रमित्रादिकांच्या मोहजाळांत गुरफटलेल्या जनाला कौतुक वाटावें,

§ श्रीसांप्रदायिक विविध विषय, प्रथम खंड, विषयांक २४ वा.

हें स्वाभाविक आहे. आपण कोण, कोठील म्हणून यांना विचारण्याचें लोकांना धैर्य होत नसे. ते आपसांत च कुजबुजत, कोण बरें हा तेजस्वी तरुण पुरुष असावा, याला कसली च अपेक्षा दिसत नाहीं, याला आईबाप किंवा आणखी कोणी जवळचे नातलग नाहींत कीं काय? दारोदारीं भीक मागत कां बरें हा हिंडतो? भिक्षेची तरी कोठें याला पर्वा आहे? जरुरीपुरतें घेतो व बाकीचें टाकून तर जातो. अशा अनोळखी लोकांत आणि मुलखांत हिंडण्याची समर्थांना हि फार गोडी वाटत असे. ते म्हणतात च, साधकानें अशा च ठिकाणीं मुद्दाम वास करावा.

**कोण कैंचा हा भिकारी। भीक मागे दारोदारीं॥ १**
**ऐसें म्हणती तेथें जावें। सुखें वैराग्य करावें॥ २**
**लोक पुसती कोण काय। पुसों जातां सांगों नये॥ ३**

लोकांनीं आपसांत म्हणावें

**आहे ब्राह्मण विदेशी। नाहीं ठाऊक आम्हांसी॥ ४**
**रामीरामदास म्हणे। कोण आहे कोण जाणे॥ ५**

(७) त्यांना वाटले नसतील, पण प्रवासांत त्यांचे हाल झाले च असणार! कोठलें खाणें आणि कोठलें पिणें! विश्रांति कसली आणि निद्रा कोठली! एक च निदिध्यास आणि सारखें परिभ्रमण!

**येक्या ग्रामीं सारूनि स्नान। येक्या गांवीं भिक्षा भोजन।**
**येक्या खेड्यांत करिती शयन। अनुसंधानीं जागत॥**
**शय्या भूमितटे दिशोऽपि वसने। विरक्तवाक्य दिधलें मान्य।**
**सर्वांगामाजीं येक कौपीन। पात्र उपपात्र हस्तांजळी॥**
**श्रीभागवतीं व्यासात्मज। निस्पृहलक्षणें बोलिले जे जे।**
**ते सार्थकीं लाविले दासमहाराज। क्रिया करूनि स्वतःसिद्ध॥**
**भू पर्यटितां वैराग्यभरें। भूकताहनाचा पडतसे विसर।**
**नामामृत वसे हृदयीं सार। कायाक्लेश न वाटे॥**
**देही असोन पूर्ण विदेही। धनमानईषणीं चाड नाहीं।**
**वृत्ती जडलीसे श्रीरामपाईं।**

–दासविश्रामधाम, १९–४८ ते ५२

अशा विदेही पुरुषाला कष्टाचें भान कोठून असणार? अशा आत्मानुसंधानी पुरुषाला कोणतीं संकटें आपल्या ध्येयापासून परावृत्त करूं शकतील?

(८) ज्या ज्या क्षेत्राच्या ठिकाणीं श्रीसमर्थ जात, त्या त्या क्षेत्रांतील दैवताची ते प्रार्थना करीत. मागणें काय मागत, याची कल्पना, परशुराम-क्षेत्राला गेले असतां केलेल्या प्रार्थनेच्या श्लोकांवरून करतां येते. त्या श्लोकांत त्यांच्या जीवींचें आर्त प्रकट झालेलें आढळतें. श्रीसमर्थांच्या अंतरंगांतील तरंग, त्यांच्या काव्यांत उमटलेले, जेव्हां आपण पुढील खंडांत शोधूं, तेव्हां हि या श्लोकांकडे आपली नजर जाईल च. पण क्षेत्राक्षेत्राच्या ठिकाणीं प्रार्थना काय करीत, याची कल्पना व्हावी, म्हणून ते श्लोक येथें हि उद्धृत करणें अगत्याचें वाटतें. ते वारंवार वाचावे लागले, तरी त्यांत काय बिघडेल? उलट फायदा च होईल, तितक्या वेळां श्रीसमर्थांच्या अंतरंगांत प्रवेश करण्याची आपणांस संधि मिळेल.

**महां कोप अग्नी ऋषी जामदग्नी। समर्था तया जाणिजे सर्व सूज्ञीं।**
**सदा सर्वदा घेतसे नाम तूझें। वरिष्ठा स्वभावें चि हें गोत्र माझें॥**
**वसे सागराचे तिरीं सूत तूझा। समाचार तो घेत नाहीं च माझा।**
**तयाला बहूतापरी शीकवावें। स्वभावें चि वोढेल ऐसें करावें॥**
**किती येक मागें बहू युध्य केलें। किती वेळ या ब्राह्मणा राज्य दिल्हें।**
**अकस्मात सामर्थ्य तें काय जालें। युगासारिखें काय नेणों विझालें॥**
**चिरंजीव आहेसि ऐसी वदंती। समर्था तुझें चित्तकाठिण्य कीती।**
**तुझे नामधारी तुला हें कळेना। कृपाळूपणें चित्त कैसें वळेना॥**
**नको रे उदासीन हें वाक्य मानी। समर्था असावें बहू साभिमानी।**
**करावी दिनानाथ हे सत्य वाचा। तुला चिंतितों दास मी राघवाचा॥**

– करुणाष्टकें, २० – १ ते ५

या अर्थपूर्ण करुणापंचकाचा विशेष प्रपंच श्रीसमर्थहृदयांत करूं.

(९) श्रीसमर्थ ज्या ज्या क्षेत्रस्थानीं जात, तेथें तेथें तपास काढून जे जे संत, साधु, सिद्ध, योगी, तपस्वी, संन्यासी, वीतरागी, अनुष्ठाते असल्याचें कळून येई, त्यांच्या त्यांच्या अवश्य भेटी घेत. क्वचित् कोणी शिष्यभावानें जवळ आला, तर त्याचा हि संग्रह करीत. भिन्न भाषेचा प्रांत लागला तर त्या भाषेचा हि परिचय करून घेत. आणि सर्वांत विशेष म्हणजे सूक्ष्म दृष्टीनें लोकांची स्थिति अवलोकन करीत व भेटावयास येणारे लोक विश्वासानें परिस्थितीची जी माहिती सांगत, ती हि ऐकून घेत. याप्रमाणें तीर्थाटणाच्या काळांत स्वतः पाहून व लोकांच्या तोंडून ऐकून

देशस्थितीच्या अवनत स्वरूपाचा त्यांना जो बोध झाला, जो प्रत्यय आला, तो बोध किंवा तो प्रत्यय च त्यांच्या पुढच्या चरित्राचा पाया होय, असें मी मानतों. मी तर असें म्हणेन, श्रीसमर्थांनीं तीर्थाटण केलें नसतें आणि लोकस्थिति त्यांच्या प्रत्यक्ष अवलोकनांत न येती, तर त्यांचे वडील बंधु, श्रेष्ठ, यांच्या प्रमाणें दोन चार पौराणिक व केवळ अध्यात्मपर ग्रंथ लिहून च त्यांनीं आपला अवतार संपविला असता. पण तीर्थाटणाच्या काळांत देशस्थितीचें त्यांना प्रत्यक्ष ज्ञान झालें, धर्म प्राणांतिक संकटांत सांपडल्याचें त्यांच्या प्रत्ययास आलें आणि त्या च वेळीं त्यांनीं संकल्प केला असला पाहिजे कीं, या परिस्थितीचा शेवट आपल्या हयातींत झाला पाहिजे. यात्रा संपवून आणि तसा संकल्प करून च ते पुनरपि पंचवटीस श्रीरामाच्या दर्शनास गेले. पूर्वी पुरश्चरणाच्या बारा वर्षांच्या अवधींत पंचवटीस अनेकांचीं त्यांना ओळख झालेली असेल. त्या सर्वांची या वेळीं भेट झाली असेल व त्यांच्याशीं समर्थांनीं विचारविनिमय केला असेल. न जाणों, शहाजीमहाराज हि भेटले असतील व त्यांच्या च विचारानें कृष्णातटाकीं जाण्याचें ठरलें असेल.

(१०) या खेपेस पंचवटींत ते विशेष प्रकट रीतीनें लोकांत मिसळले. महाद्वारीं त्यांचीं कीर्तनें हि झालीं. बाल, वृद्ध, नर, नारी असे हजारों लोक त्यांचीं कीर्तनें ऐकण्यास लोटत. त्यांना गाण्याचें अंग अप्रतिम होतें आणि त्यांचा आवाज खडा होता, हृदयांत राम आणि जिव्हाग्रीं सरस्वती, शरीर भव्य आणि वेष आकर्षक, आणि या सर्वांवर ताण, वृत्ति निःस्पृह ! लोकांचीं मनें वेधून घेण्यास आणखी काय असावें लागतें? सारा गांव त्यांच्या कीर्तनास लोटे म्हटलें, तरी चुकीचें होणार नाहीं. वैदिक, पंडित तसे च वैश्य, शूद्र, सारे च येत.

याप्रमाणें पंचवटीस कांहीं दिवस राहून, मनोमनीं संकल्प करून, श्रीरामाची आज्ञा घेऊन, पुढील नियोजित अवतारकार्यासाठीं श्रीसमर्थ कृष्णातीराकडे गेले. त्यांना जाऊं द्या पुढें. आपण, जी देशस्थिति पाहून आणि ऐकून त्यांचें हृदय कळवळलें आणि जिचा शेवट आपल्या हयातींत झाला पाहिजे, असा त्यांनीं संकल्प केला, ती देशस्थिति पुढील उल्लासांत किंचित् पाहूं आणि मग कृष्णातीरीं पुन्हां त्यांच्या चरणांपाशीं जाऊं.



## उल्लास दहावा

## श्रीसमर्थपूर्वकालीन व श्रीसमर्थकालीन

# देशस्थिति

[ ५५१–१६०३ ]



म्लेंछ दुर्जन उदंड । बहुतां दिसांचें माजलें बंड ।
या कारणें अखंड । सावधान असावें ॥

बोलतां कलीचें महिमान । धर्म जाला कंपायमान ।
जे युगीं राजा यवन । तेथें अन्य वार्ता कायसी ॥

राजा देवद्रोही जाला । देवस्थळांचा उच्छेद केला ।
तीर्थमहिमा सकळ मोडिला । ठाईठाईंचा ॥

[ ( १ ) या देशाच्या शेंकडों वर्षांच्या इतिहासावर श्रीसमर्थांचा शिक्का – ( २ ) मुसलमानांचें बंड – ( ३ ) श्रीसमर्थचरित्राचा पाया – (अ) मुसलमानांचा उत्तरेकडील पाशवी धिंगाणा – ( ४ ) हुयेनसंगच्या वेळचा महाराष्ट्र – ( ५ ) मुसलमान धर्माचें बीं या देशांत प्रथम सिंधमध्यें पडलें – ( ६ ) सबक्तगिनाची स्वारी – ( ७ ) बहुतां दिसांचें म्हणजे किती शतकांचें – ( ८ ) त्या बंडाची उत्पत्तिस्थिति-लय – ( ९ ) बंडाचीं प्रमुख चार अंगें – ( १० ) मोगल सत्तेचा संस्थापक तैमुर, याच्या शब्दांत च बंडाचा उद्भव – ( ११ ) तो च अभिप्राय तद्धर्मियांचा व परस्थांचा हि – ( १२ ) स्त्रीलंपटपणा – ( १३ ) त्यांचे हेतु आणि दुर्गुण – ( १४ ) त्या दुर्गुणांचा क्रम – (**एक**) स्त्रिया व मुलें यांचा अपहार आणि त्यांची विटंबना – १. गुजराथच्या राजाची राणी कमलादेवी व कन्या देवलदेवी – २. चौरागड येथील जोहार – ३. इ. स. १६३५तील बुंदेलखंडाच्या भांडणांत – ४. मथुरेच्या एका फौजदाराची तऱ्हा – ५. तहांत लाजिरवाणी शर्त – ६. श्रीसमर्थांच्या अवलोकनांत असले प्रकार आले होते – ७. स्त्रियांची विटंबना होण्याचें केव्हां थांबणार – ८. गुरुचरित्राचा दाखला – ९. हे प्रकार सहन कसे होत – १०. माझ्या स्वराज्यांतला कायदा – (**दोन**) देवालयांचा विध्वंस व मूर्तींचा भंग आणि त्यांची विटंबना – १. याचीं हजारों उदाहरणें, पण – २. आपण १६३२ ते १६८० दरम्यानचीं दहा पांच पाहूं – ३. पहिलेंच उदाहरण १६३२ तील काशी प्रांतांतील ७६ देवालयांच्या विध्वंसाचें – ४. दुसरें उदाहरण १६६५ तील कोलारस येथील – ५. तिसरें १६६९ तील, काशीच्या विश्वनाथाच्या देवालयाचें व मथुरा येथील डेहरा केसुरायाचें – ६. जोधपुर, चितोड, आंबर येथील देवालयांचा विध्वंस – ७. सप्त मोक्षदायक पुरींची दुर्दशा – ८. श्रीसमर्थांच्या पाहण्यांत – ९. गंजीकोट किल्ल्यांतील – (**तीन**) लूट, जाळपोळ, कत्तल, धर्मांतर – १. वर्गीकरण परस्परव्यापी झालें आहे – २. पण त्यांत बिघडत नाहीं, हा मानसशास्त्राचा ग्रन्थ नव्हे, हा इतिहास आहे – ३. देवगिरीचें उदाहरण १२९४ तील – ४. दिल्लीचें उदाहरण १३९८ तील – ५. सरसकट कत्तल – ६. १६३१ त बादशाही सैन्य विजापुरावर चालून जातांना – ७. गोवळकोंडा – विजापुर भागांतील उदाहरण – (**चार**) क्रौर्य – १. अतर्क्य उदाहरणें – २. महमद तघलख माणसांची शिकार करवी – ३. ऐशीं काफरांचा बळी – ४. सैन्याला उत्साह वाटावा म्हणून – ५. कत्तल केलेल्यांचीं मुंडकीं प्रदर्शनार्थ झाडांना टांगणें – ६. टॅव्हरनिअरची साक्ष – ७. नियम आणि वर्तन यांच्यांत मेळ नसणें – ८. जहानगीरचें अनुशासन व त्याचा भंग – ९. लिहीत असतां क्षणोक्षणीं श्रीसमर्थांची आठवण – (**पांच**) धर्मवेडेपणा – १. शिकंदर लोदीचें एक उदाहरण, मताबद्दल एका ब्राह्मणाची हत्या –

२. श्रीसमर्थांना असा कोणी धर्मवेडा भेटता तर– ३. शिकंदर लोदीनें केलेला देवळांचा विध्वंस–(**सहा**) बेइमान– १. वचनें देणारा आणि मोडणारा औरंगजेब–२. औरंगजेबाची राजनीति–३. दिलेलीं वचनें कधीं च पाळीत नसे– ४. औरंगजेबाविषयीं मनुसीचें मत– ५. तें श्रीसमर्थांच्या मताशीं जुळतें– ६. कपट ही च त्यांच्या यशाची किल्ली– ७. मोगलांचे दोन विशिष्ट गुण– ८. पैसा हें दैवत– ९. चितोडच्या राण्याचा कायमचा इषारा– १०. मनुसी देखील मोगलांच्या नीतीला विटला– ११. मोगलांच्या नीतीविषयीं श्रीसमर्थांचा अभिप्राय–(**सात**) न्यायाची विटंबना– १. तडकाफडकी न्याय– २. बाह्य देखावा मात्र किती गंभीर– ३. दशक ३, समास ७, ओव्या ६३–७८ यांतील शिक्षेचे प्रकार काल्पनिक नव्हत तर?–(**आठ**) विलास, ऐषआराम, लंपटपणा– १. अकबराच्या जनानखान्यांत पांच हजार स्त्रिया– २. बाहेरख्यालीपणा आणि जुगार– ३. जहानगीरचा आनंद कशांत– ४. जहानगीरचा एक च पेला– ५. शहाजहानाचा निराळा छंद–**निष्कर्ष**– १. मनुसीचा अभिप्राय– २. बर्निअरचा अभिप्राय– ३. त्याचें भविष्य खरें झालें– ४. श्रीसमर्थांचा अभिप्राय आणि आश्वासन– ५. आतां दक्षिणेकडे–(**आ**) पोर्तुगीज लोकांनीं दक्षिणेकडे मांडलेला धुमाकूळ–(१) फिरंगण म्हणजे गोव्याकडील मुलुख–(२) माझी विचार करण्याची तऱ्हा–(३) मनुसीनें पोर्चुगीजांच्या केलेल्या गुणवर्णनाचा सारांश–(४) त्यांचे हेतु–(५) वास्को ड गामा–(६) १५०२ तील क्रूरपणाचा एक मासला–(७) १५०३ तील दुसरा मासला–(८) तिसरें उदाहरण–(९) देवळांचा विध्वंस, जाळपोळ, लूट–(१०) मानव कां दानव–(११) दानवांना शोभणारी १५६० तील कृति–(१२) स्त्रियांचे धिंडवडे–(१३) मऱ्हाटदेश थोडा उरला–(**इ**) महाराष्ट्राच्या पोटांतील कांचेचे तुकडे–(१) **बहामनी** राज्याचा पहिला सबंध तुकडा–(२) त्या राजांचा वंशवृक्ष–(३) महमदचे अत्याचार–(४) तिसरे राजश्री–(५) फेरोजशहाचा छंद–(६) अहमदशहाची कत्तल करण्याची लहर–(७) त्यानें केलेला विश्वासघात–(८) अल्लाउद्दीनाचा सुखनिवास–(९) क्रूरकर्मा हुमायून–(१०) असें हें राज्य दोनशें वर्षें कसें टिकलें–(११) या एका तुकड्याचे झालेले पांच तुकडे–**कुतुबशाही**– १. सर्व च शाह्यांचे सामान्य गुण– २. कुतुबशाहीचा वंशवृक्ष– ३. देवरकोंडा किल्ला जिंकल्यावर– ४. विश्वासघाताचें उदाहरण– ५. कुतुब सुलतान महमद याचा संकल्प आणि आचार– ६. विलासी वृत्ति– ७. मोगल सैन्याचें वर्तन –**निजामशाही**– १. वंशवृक्ष– २. क्रूरकर्मा हुमायूनचा अवतार मीरन हुसेन– ३. आधीं मुलगा गादीवर, मग बाप– ४. जांबेचे

ठोसर व वेरूळचे भोसले यांचा स्नेहसंबंध – **आदिलशाही** – १. वंशवृक्ष – २. संस्थापक युसफ याचा निका हिंदु स्त्रीशीं – ३. मुल्लूला अनैसर्गिक व्यसन – ४. इब्राहिमला दारू पिण्याचा छंद – ५. दिलावरखान थेरडा, तरी – ६ अल्लीचा खोजा – ७. अशीं राज्यें कां टिकलीं – ८. विजयानगरच्या रामराजाचें मुंडकें – ९. विलासी विजापुर शहर – **एकंदरींत** – १. मुसलमानांची जूट आणि हिंदूंची अभिमानशून्यता – २. प्रबळ स्वार्थ ३. एक बाजू पाहिली, आतां दुसरी पाहूं – (ई) लोकस्थिति – (१) लोक त्रस्त झाले होते – (२) वारंवार दुष्काळ पडत, इ. स. १६३०–३१ तला दुष्काळ – (३) बरनिअरच्या मतानें दारिद्र्याचें आणखी एक कारण – (४) तशी च टॅव्हरनिअरची साक्ष – (५) हिंदूंचा बावळटपणा – (६) गुलाम वृत्ति – (७) श्रीसमर्थांचें परचक्रनिरूपण – (८) अवघा धुंधुकार – (९) ऐक्याचा अभाव – (१०) जयसिंग, जसवंतसिंग, चितोडचा राणा, हे तिघे एक होते तर – (११) आश्चर्यांतलें आश्चर्य – (१२) मनुसी सतरांदा म्हणतो – (१३) श्रीसमर्थांनीं दिलेला मंत्र आणि गांठ घालून दिलेला देव ]

(१) मथळ्याच्या जागीं दिलेल्या पहिल्या ओवींत कारण सांगून नेहमीं सावध राहण्याचा इषारा श्रीसमर्थांनीं श्रीशिवरायाला दिला आहे. ही ओवी अठराव्या दशकाच्या सहाव्या समासांतील बारावी होय. अफझुलखानाच्या भेटीला जाण्यापूर्वीं श्रीशिवरायाला जणूं हृदयाशीं धरून, त्याचा गौरव करून, श्रीसमर्थांनीं जो उपदेश केला, तो या समासांत गोंवलेला आहे. त्या समासाकडे पुढें एका महत्त्वाच्या उल्लासांत आपणांस वळावयाचें च आहे. येथें आज इतकें च म्हणावयाचें आहे कीं, आपल्या पूर्वींच्या अनेक शतकांचा इतिहास आठवून व तीर्थाटणाच्या काळांत स्वतः पाहून व इतरांच्या तोंडून ऐकून, आपल्या वेळच्या देशस्थितीची जाणीव होऊन

**म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिसांचें माजलें बंड ॥**

हें या देशाच्या अनेक शतकांच्या इतिहासाचें स्वरूप होय, असा श्रीसमर्थांनीं या देशाच्या शेंकडों वर्षांच्या इतिहासावर या अर्ध्या ओवीनें जणूं शेरा मारला आहे. या अर्ध्या ओवींत, या देशाचा अनेक शतकांचा इतिहास सामावला आहे.

(२) या दोन चरणांतील प्रत्येक शब्द महत्त्वाचा आहे. त्या वेळचे सत्ताधारी जे मुसलमान त्यांच्या सत्तेला श्रीसमर्थांनीं बंड म्हणून संबोधिलें

आहे. प्रजा राजाविरुद्ध जी उठावणी करते, तिला बंड म्हणण्याचा प्रघात आहे, पण येथें राजानें च प्रजेवर चालविलेल्या जुलमाला श्रीसमर्थ बंड म्हणत आहेत. म्लेंच्छ उदंड दुर्जन कसे आणि बहुतां दिसांचें म्हणजे किती शतकांचें त्यांचें बंड माजलेलें आहे, याचा विचार आपण हि केला नाहीं, तर श्रीसमर्थांचा हा अभिप्राय बरोबर आहे किंवा कसा, हें आपणांस कळणार नाहीं, इतकें च नव्हे, तर श्रीसमर्थांच्या अवतारकार्याचें स्वरूप च मुळीं आपल्या लक्षांत येणार नाहीं.

( ३ ) तीर्थाटणाच्या काळांत सर्व देशभर संचार करीत असतांना जी देशस्थिति श्रीसमर्थांच्या प्रत्यक्ष पाहण्यांत आली व इतरांच्या सांगण्या-वरून त्यांना कळली, तिनें श्रीसमर्थचरित्राचा पाया घातला, असें मीं नुकतें च म्हटलें आहे, तें सर्वथैव सत्य होय. याप्रमाणें त्यांचा देशभर संचार झाला नसता आणि देशस्थिति त्यांच्या प्रत्यक्ष अवलोकनांत आली नसती, अनेक शतकांच्या इतिहासाकडे त्यांचें लक्ष न जातें, तर श्रीसमर्थ समर्थ झाले च नसते, ते आणि त्यांचे बंधु यांच्या जीवनक्रमांत फारसा फरक पडला नसता. त्यांचे बंधु गंगाधर ऊर्फ रामीरामदास, ऊर्फ श्रेष्ठ, हे परमार्थमार्गांत श्रीसमर्थांपेक्षां कांहीं कमी नव्हते, पण ते समर्थ न होतां सदाचारानें वागून, भक्तिरहस्य, सुगमोपाय इत्यादि ग्रंथ करून, आपलें बारा गांवचें कुळकर्णपण सांभाळून, प्रपंच करीत समाधानानें काळ कंठीत होते. ती च दिशा श्रीसमर्थांच्या चरित्राला हि लागती. पण ईश्वरी संकेत निराळा होता. श्रीसमर्थांनीं आपल्या पर्यटणांत समाजाची भयंकर अवनति झालेली पाहिली, शतकानुशतकें तसा च अनन्वित प्रकार चालत आल्याचें त्यांना दिसलें, तत्काळ प्रतिबंध झाला नाहीं, तर धर्म कांहीं टिकत नाहीं, हें त्यांच्या प्रत्ययास आलें. **(अ) उत्तरेकडे** मुसलमान सत्ताधाऱ्यांनीं घातलेला पाशवी धिंगाणा, **(आ) दक्षिणेकडे** पोर्चुगीज लोकांनीं धर्मप्रसारार्थ मांडलेला धुमाकूळ आणि **(इ) मध्यभागीं**, महाराष्ट्रांत च – महाराष्ट्राच्या जणूं पोटांत च – रुतून बसलेला बहामनी राज्याचा कांचेचा तुकडा आणि त्यांतून च उद्भवलेल्या पांच शाह्यांचे तुकडे, या योगें महाराष्ट्र जणूं रक्तबंबाळ होऊन पडला होता, ही सारी स्थिति त्यांनीं पाहिली आणि मनाशीं निश्चय केला. श्रीसमर्थांच्या अवतारकार्याचें

यथार्थ स्वरूप आपल्या लक्षांत येण्यासाठीं तो **इतिहास** आणि ती **परिस्थिति** आपण हि पाहिली पाहिजे, जी पाहून च श्रीसमर्थांनीं

**कित्येक म्लेंछ होऊन गेले। कित्येक फिरंगणांत आटले ॥**

– दासबोध, १५–२–३

असे उद्गार काढले आहेत.

## ( अ ) मुसलमानांचा उत्तरेकडील पाशवी धिंगाणा

(४) शालिवाहन शक ५५१ ते ५६७ म्हणजे सोळा वर्षें सर्वश्रुत चिनी प्रवासी हुयेन संग हा आपल्या या देशांत हिंडत होता. त्या काळापर्यंत आपल्या धर्माला परधर्मियांचा उपसर्ग कायमचा पोंचला नव्हता. देशांत चारी दिशांना ठिकठिकाणीं क्षत्रिय राजघराणीं राज्य करीत होतीं. आम्ही आमचे आपसांत काय भांडावयाचें तें भांडत होतों, एकमेकाच्या तत्त्वज्ञानपर विचारावर जे काय तात्त्विक हल्ले चढवावयाचे, ते चढवीत होतों, पण बाहेरून कोणी येऊन या देशांत आपली पथारी पसरली नव्हती. राजकीय बाबतींत देशांतल्या देशांत राजघराण्यांची उलथापालथ होई, पण धर्म सुरक्षित होता आणि देश निर्भय होता. बुद्धधर्म हि आम्हांस परका नव्हता व कधीं परका वाटला नाहीं. तें एक स्वतंत्र तत्त्वज्ञान होतें. महाराष्ट्रापुरतें च पाहिलें तर, हुयेन संगच्या निरीक्षणाप्रमाणें सर्व देशांत महाराष्ट्रियांची स्थिति विशेष च स्पृहणीय होती[1]. कनोजच्या शिलादित्यांनीं सारा देश पादाक्रांत केला होता, पण त्यांना महाराष्ट्र जिंकतां आला नव्हता.

(५) पण पुढें एका शतकाच्या आंत च, ही समाधानाची स्थिति पालटण्याला सुरुवात, महाराष्ट्रापासून दूर, प्रथम सिंधप्रांतांत झाली. इ. स. ७१२ च्या सुमारास बगदादच्या वालीद नामक खलिफाच्या आज्ञेनें व इराणच्या सुभेदाराच्या मदतीनें महमद कासीमनें सिंधप्रांत पादाक्रांत केला व तसें करीत असतां त्यानें ठिकठिकाणीं हजारों पुरुषांची सरसकट कत्तल केली किंवा त्यांना मुसलमान करून सोडलें, पांच पन्नास नव्हे, शें दोनशें नव्हे, हजारों कुलीन स्त्रियांना दासी करून इराणांत पाठविलें किंवा त्या

१. History of India, by Mountstuart Elphinstone, VI Edition of 1874, p. 295.

आपसांत वांटून घेतल्या, अनेक भव्य आणि सुंदर देवालयें उद्ध्वस्त केलीं आणि त्यांच्या जागीं मशिदी उभारल्या, गणना करवत नाहीं, इतकी अलोट संपत्ति लुटून नेली, इत्यादि अनेक प्रकारचा, अंगावर शहारे आणणारा त्यानें धुमाकूळ केला ! सिंध प्रांतावर त्या वेळीं एका ब्राह्मणघराण्याचें राज्य होतें. त्याची अशी वाताहत झाली आणि मुसलमान धर्माचें बीं या देशांत प्रथम पडलें.

(६) नंतर सुमारें अडीचशें वर्षांचा काळ लोटला. त्या काळांत पंजाब व सिंध यांच्या पश्चिमेकडील राष्ट्रांत, म्हणजे अफगाणिस्थान, इराण, तुर्कस्थान वगैरे देशांत मुसलमान घराण्यांत च जी उलथापालथ होत होती व जें भावी संकट शिजत होतें, त्यावरून त्या संकटाची झळ लागल्यावांचून आपला देश फार काळ सुरक्षित राहूं शकेल असें वाटत नव्हतें. त्या संकटाची जाणीव, पंजाबांत जयपाल म्हणून जो राजा राज्य करीत होता, त्यास होऊन चुकली होती. ज्या संकटाची त्यास कल्पना झाली होती, तें अखेरीस आलें च. गिझनीच्या सबक्तगिनानें पंजाबावर स्वारी केली. तीस तोंड देण्यासाठीं जयपालानें उत्तरेकडील प्रमुख हिंदु राजांची जूट घडवून आणली. तथापि तिचा उपयोग न होतां, त्याचा पराभव झाला व कत्तल आणि लूटमार करीत सबक्तगिन सिंधुनदीपर्यंत चालून आला. तथापि मुसलमानांचें हें हि आक्रमण तात्पुरतें च होतें.

(७) त्यांना त्या काळीं मुलुख जिंकण्याचा तितकासा हव्यास नव्हता. लूट मिळविणें आणि धर्मप्रसार करणें याची च लालसा विशेष होती. त्या लालसेच्या पायीं च इ. स. १००१ ते १०२७ या सत्तावीस वर्षांच्या काळांत महमुदानें या देशावर सतरा स्वाऱ्या केल्या. या ठिकाणीं तो सारा इतिहास आपणास पहावयाचा नाहीं, पण श्रीसमर्थांच्या कानांवर यांपैकीं कोणत्या गोष्टी गेल्या असतील, एवढ्यापुरता च विचार करावयाचा आहे. एका स्वारींत त्यानें, हिमालयाच्या एका अलीकडच्या रांगेंत नगरकोट म्हणून एक तटबंदी देवालय होतें, तें लुटून अगणित संपत्ति वाहून नेली, दुसऱ्या एका स्वारींत ठाणेश्वर येथून असंख्य

२. चिंतामणराव वैद्यांचें मध्ययुगीन भारत, भाग पहिला, पुस्तक दुसरें, सन १९२०, पृष्ठें १५ ते ४६.

हिंदु स्त्रियांना आणि पुरुषांना च कैद करून तो घेऊन गेला, आणखी एका स्वारींत त्यानें मथुरा लुटली, तींतील देवालयें भ्रष्ट केलीं, मूर्ति फोडल्या, विपुल संपत्ति मिळविली, घरांना आगी लावल्या आणि अनेकांना गुलाम केलें! हृदयविदारक अशी त्याची प्रख्यात स्वारी म्हणजे गुजराथें-तील सोमनाथाची. तेथील अत्याचाराची कथा सांगण्याची मला आणि ऐकण्याची तुम्हांला, आज काय आवश्यकता आहे! आपण येथें इतकें च लक्षांत घेतलें म्हणजे पुरें होईल कीं, हिंदु समाजाच्या दुर्दैवाच्या या साऱ्या काहण्या श्रीसमर्थांना ऐकून ठाऊक झाल्या असल्या पाहिजेत. तथापि आपणांस आज निश्चित असें काय मानतां येईल? शक्य आहे कीं, इ. स. ७१२ त सिंधचा उच्छेद महमद कासीमच्या नेतृत्वाखालीं आरबांनीं केला, १००९ त महमुदाच्या नेतृत्वाखालीं तुर्कांनीं पंजाबचा केला आणि १२०० त महमद घोरीच्या नेतृत्वाखालीं अफगाणांनीं उत्तर हिंदुस्थानचा केला, इतक्या दूरच्या मागील काळाकडे श्रीसमर्थांनीं आपली दृष्टि पोंचविली असेल किंवा नसेल, पण बाबर ( १५२६–३० ), हुमायून ( १५३०–५६ ), अकबर ( १५५६–१६०५ ), जहांगीर ( १६०५–२७ ) आणि त्यांचे स्वतःचे समकालीन शहाजहान ( १६२७– ५८ ) आणि औरंगजेब ( १६५८–१७०७ ) यांच्या कारकीर्दींतील धुमाकुळाकडे त्यांचें लक्ष गेलें च असलें पाहिजे, नाहीं तर वरील ओवींतील ‘ बहुतां दिसांचें ’ या शब्दांना अर्थ च राहणार नाहीं! तसें च खुद्द महाराष्ट्रांतील, म्हणजे प्रत्यक्ष त्यांच्या सान्निध्यांतील बाहमनी राज्य आणि त्या राज्याच्या पोटांतून निघालेल्या पांच शाह्या, यांतील अत्याचार तर त्यांच्या देखत च घडत होते किंवा कानांवर येत होते.

( ८ ) फार पूर्वींपासून चालत आलेले हे अनन्वित प्रकार पाहून च मुसलमानांच्या सत्तेला श्रीसमर्थांनीं बंड म्हटलें आहे आणि त्यांना दुर्जन म्हणून संबोधिलें आहे. तेव्हां ते दुर्जन कसे आणि त्यांचें बंड बहुत दिवस टिकूं तरी शकलें कसें, त्या बंडाची उत्पत्ति कशी झाली, स्थिति कशी होती आणि त्याचा लय कशानें झाला, या सर्व प्रश्नांचा आपणांस उलगडा झाला, म्हणजे श्रीसमर्थांचा अवतार कां झाला, या प्रश्नाचें उत्तर आपणांस आपोआप मिळणार आहे.

( ९ ) या बंडाचीं प्रमुख अंगें चार : ( १ ) लुटणें, ( २ ) स्त्रियांना पळविणें, भ्रष्टविणें, जनानखान्यांत कोंबणें, ( ३ ) देवालयें उध्वस्त करणें, मूर्ति फोडणें, भ्रष्टविणें, तुडविणें आणि ( ४ ) लोकांना बाटविणें. हीं चार अंगें त्यांच्या धर्माचीं जणूं मूलभूत मानलीं गेल्यामुळें पांचसहाशें वर्षें त्या लोकांनीं या देशांत सारखा धुमाकूळ घातला होता.

( १० ) मोगलसत्तेचा संस्थापक जो तैमुर, त्याच्या शब्दांत च, या बंडाचा उद्भव कसा झाला, तो पहावयास सांपडतो —

" मोगलांमध्यें शिरलेले बहुतेक दुर्गुण तैमुरमुळें च त्यांच्यांत आले, असें दिसतें. धर्मवेडेपणा ( fanaticism ), क्रौर्य ( cruelty ), संपत्तीचा अभिलाष ( greed for wealth ) आणि लंपटपणा ( lust ) हे जे दुर्गुण कित्येक मोगलांत आढतात, त्यांचें उगमस्थान म्हणजे तैमुरचें धोरण च होय. तो म्हणे च कीं, ' हिंदुस्थानावर स्वारी करण्यांत माझा हेतु, हिंदूंना मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन अश्रद्धा आणि बहुदेव मानण्याची बुद्धि, यांची हिंदुस्थानांतून हकालपट्टी करावी, त्यांचीं देवळें पाडावीं आणि मूर्ति फोडाव्या आणि आपण गाझी व्हावें, असा आहे. ' त्याच्या कृत्याचा पाढा त्याच्या च शब्दांत असा : ' इस्लामाची तलवार, नास्तिकांच्या रक्तानें माखली गेली, कैक वर्षांपासून किल्ल्यांत सांठविलेलें धान्य, इतर पदार्थ व संपत्ति, ही सर्व लूट माझ्या लढवय्यांना मिळाली, त्यांनीं नास्तिकांचीं घरें जाळून त्यांची राख केली आणि किल्ला जमीनदोस्त केला.'[३] "

( ११ ) तैमुरच्या च शब्दांत, ही या बंडाची उपपत्ति पाहिली, म्हणजे पुढचा सर्व ग्रंथ बरोबर लागतो व तसा च तो तद्धर्मियांनीं व इतरांनीं लावलेला आहे. त्याचीं एक दोन उदाहरणें देऊं.

( एक ) Shash Fath-I Kangru यांतील लेखक[४], जहांगीरबद्दल म्हणतो:

" ईश्वराच्या प्रेरणेनें बादशहाच्या मनांत नेहमीं येई कीं, आपल्या राज्यांतील सर्व बंडखोरांना धुळीस मिळवावें, सर्व नास्तिकांचा सपशेल

३. Mughal Empire in India, Part II, by S. R. Sharma, M.A., Edition of 30. 11. 1934, Chapter XII, p. 829.

४. Elliot & Dowson, Vol. VI, p. 528.

नाश करावा आणि त्यांचीं देवळें जमीनदोस्त करावीं. त्यानें आपली सर्व शक्ति मुसलमानी धर्माच्या प्रसाराकडे खर्च केली आणि ईश्वराच्या कृपेनें आणि आपल्या तलवारीच्या साहाय्यानें त्यानें राज्याचा विस्तार केला आणि महमदाच्या धर्माचा लौकिक वाढविला."

दोघा परस्थांचीं हि मतें याहून भिन्न नाहींत. बर्निअर म्हणतो :

"मुसलमानी आचार म्हणजे शस्त्रांच्या साहाय्यानें स्थापिलेला आणि अद्यापि हि त्या च पाशवी शक्तीच्या बळावर मानवजातीवर लादलेला एक अनिष्ट आणि अपायकारक प्रचार आहे."[५]

असा च किंवा याहून हि कठोर अभिप्राय मौंटस्टुअर्ट एलफिन्स्टननें व्यक्त केला आहे.

(१२) "इंद्रियदमनाऐवजीं इंद्रियांना मोकळा मार्ग करून देणें हा त्यांचा स्वभाव बनला आहे" असें बर्निअर म्हणतो, तर चाळीस वर्षे मोगलांच्या दरबारांत व मुसलमान सरदारांच्या संगतींत वावरलेला मनुसी म्हणतो, "सर्व मुसलमान स्त्रियांचे फार शोकी असतात. स्त्रियांची संगति ही च त्यांची विश्रांति आणि त्यांचा सहवास हा च त्यांचा आनंद होय."[६] शाह आलमचा बहुतेक काळ स्त्रियांच्या संगतींत जाई, हें सांगून मनुसी आपला सरसकट अभिप्राय व्यक्त करतो कीं, "इतर सर्व च मुसलमान आपला बहुतेक काळ स्त्रियांच्या संगतींत कंठतात." सर्व जगाची च जणूं साक्ष देऊन तो म्हणतो, "सर्व जगाला हें ठाउक आहे कीं, मुसलमान फार विषयलोलुप असतात आणि म्हणून सर्वांचें च, विशेषतः सरदार आणि राजे यांचें थोड्या बायकांवर भागत नाहीं, म्हणून आपली कामवासना तृप्त करण्याचे ते इतर मार्ग शोधीत असतात.[७] शहाजहानाची तऱ्हा, याहून कांहीं निराळी नव्हती. आपल्या वाड्यांतील स्त्रिया त्याच्या वासनेला पुऱ्या न पडून, आपल्या दरबारांतील सरदारांच्या

---

५. Bernier, p. 291. तसेंच मत मौंटस्ट्युअर्ट एलफिन्स्टननें हि व्यक्त केलें आहे. पहा, त्याचा हिंदुस्थानचा इतिहास, आवृत्ति सहावी, पृ. ३०२.

६. Manucci, Vol. II, p. 232.

७. „ „ p. 400.

बायकांशीं तो संधान बांधीत असे, आणि या त्याच्या वर्तनाच्या पायीं च त्याचा नाश होऊन त्यास मृत्यु आला."

स्त्रीलंपटपणा हा अत्यंत दुष्ट दुर्गुण त्या समाजाच्या हाडीं मासीं खिळलेला दिसतो. त्यांची दृष्टि या देशाकडे वळण्याला जीं आमिषें कारणीभूत झालीं, त्यांत स्त्रिया पळविणें, हें एक आमिष होतें, अशी साक्ष एलफिन्स्टननें दिलेली[९] आहे : " फार पूर्वीं उमर खलिफाच्या वेळीं च आरब लोक जलमार्गानें सिंधमध्यें आले होते, असें म्हणतात. तें खरें असल्यास, या देशांतील स्त्रिया पळवून नेण्यापुरते च त्यांचे ते चांचेगिरीचे हल्ले असले पाहिजेत, कारण या देशांतील स्त्रियांच्या सौंदर्याविषयीं आरबांमध्यें फार प्रख्याति होती."

१३. तात्पर्य, लूट मिळविणें, स्त्रिया पळविणें, देवालयें भ्रष्ट करणें आणि बळजबरीनें मुसलमानी धर्माचा प्रसार करणें हे ज्या लोकांचे चतुर्विध हेतु व Fanaticism = धर्मवेडेपणा किंवा माथेफिरूपणा, Cruelty = क्रौर्य, Greed = अभिलाष, Lust = स्त्रीलंपटपणा, Treachery = विश्वासघात, Ungratefulness = कृतघ्नपणा, Hypocracy = ढोंग, False oath = असत्य वचन, इत्यादि ज्यांचे उपजत किंवा कमावलेले दुर्गुण, त्यांचा सारा पूर्व इतिहास आठवून

**म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिसांचें माजलें बंड ॥**

असें श्रीसमर्थांनीं त्या इतिहासाचें सार काढलें आहे.

१४. या दुर्गुणांच्या लक्षणांपैकीं कोणाला हि संताप यावा, कोणाचें हि मन उद्विग्न व्हावें, कोणाला हि प्रतिकार करण्याची प्रवृत्ति व्हावी, किंवा प्रतिकार करण्याचें अंगीं सामर्थ्य नसल्यास कोणाच्या हि मुखांतून शापवाणी बाहेर पडावी, अशा प्रकारें चीड आणणारीं विशेष लक्षणें दोन : एक, स्त्रियांची विटंबना, आणि दुसरें, मंदिरांचा आणि त्यांतील मूर्तींचा विध्वंस. बाकीचीं लक्षणें कमी महत्त्वाचीं नव्हत, पण तीं या दोन लक्षणांपुढें फिकीं वाटतील. कमी अधिक दुष्टपणाच्या मानानें या लक्षणांचा मी क्रम लावतों तो असा : ( १ ) स्त्रिया आणि मुलें यांचा अपहार व

८. Manucci, Vol. I, Pp. 192-193.

९. Elphinstone, p. 307.

त्यांची विटंबना, ( २ ) देवालयांचा विध्वंस आणि मूर्तींचा भंग आणि त्यांची विटंबना, ( ३ ) लूट, जाळपोळ, कत्तल, धर्मांतर, ( ४ ) क्रौर्य, ( ५ ) धर्मवेडेपणा, ( ६ ) बेइमान, ( ७ ) न्यायाची विटंबना, ( ८ ) विलास, ऐषआराम, लंपटपणा.

या लक्षणांचीं शेंकडों उदाहरणें श्रीसमर्थांच्या ऐकण्यांत आलीं असतील व कांहीं प्रत्यक्ष पाहण्यांत हि आलीं असतील! इतिहासग्रंथाधारें आपण येथें कांहीं थोडीं पाहूं, कीं जेणेंकरून श्रीसमर्थांनीं इतिहासावर मारलेला शेरा बरोबर असल्याचें आपणांस कबूल करावें लागेल. सर्वत्र हजारों प्रकार प्रत्यहीं घडले असतील, इतिहासग्रंथांत त्यांपैकीं फार थोडे नमूद असतील आणि त्यांतून हि, फार च थोडीं उदाहरणें, केवळ नमुन्यासाठीं, आपणांस येथें दाखल करावयाचीं आहेत. बाकी सर्व वाचकांच्या अनुमानावर सोंपवावयाचें आहे.

## (एक) स्त्रिया व मुलें यांचा अपहार आणि त्यांची विटंबना

अत्याचारांतील महान् अत्याचार, अत्यंत निंद्य, गर्हणीय, पापमूलक अत्याचार म्हणजे स्त्रियांची विटंबना! या हतभागी देशांत स्त्रियांचे धिंडवडे जितके निघाले असतील, तितके, पृथ्वीच्या पाठीवर कोणत्या हि अन्य देशांत निघाले नसतील! न निघोत, रामा, सर्व देशांतल्या सर्व स्त्रियांच्या अब्रूचें रक्षण तूं कर. या देशांत पूर्वीं झालेल्या असल्या अत्याचाराचीं शेंकडों उदाहरणें पुढें असतां, सहज लक्षांत येतील, अशीं चार पांच च उदाहरणें, केवळ नमुना म्हणून, आपण येथें नमूद करूं. प्रत्येक उदाहरण, तसल्या च प्रकारच्या अनेक उदाहरणांपैकीं एक समजावें.

१. इ. स. १२९६ च्या आधींपासून करण वाघेला हा रजपूत राजा गुजराथेंत राज्य करीत होता. अल्लाउद्दीन खिलजीची लहर लागली कीं, गुजराथ प्रांत जिंकावा. मलिक काफुर या आपल्या सरदाराच्या हाताखालीं सैन्य देऊन त्यानें त्यास गुजराथवर स्वारी करण्यास पाठविलें. राजाचा पराभव झाला, त्यानें पळ काढला आणि राणी कमलादेवी मुसलमानांच्या हातीं लागली. तिचें पुढें जें व्हावयाचें तें च झालें. तिला दिल्लीस पाठविण्यांत

आलें आणि अल्लाउद्दीनच्या जनानखान्यांत तिचा प्रवेश झाला ! ही दुर्दैवाची काहणी येथें च संपत नाहीं. राणीला देवलदेवी नांवाची एक मुलगी होती. या विचित्र काहणीच्या सर्व तपशिलाची आपणांस जरूरी नाहीं. येथें इतकें च पहावयाचें कीं, ती मुलगी प्राप्त करून घेण्यासाठीं पुन्हां सैन्य आलें, देवलदेवीला जिंकून नेण्यांत आलें आणि ती अल्लाउद्दीनच्या मुलाची बायको झाली !

२. जोहार करण्याचे प्रसंग रजपूतांवर किती तरी आले असतील ! ते जोहार कां करीत, याचें कारण हि उघड आहे. जितांच्या स्त्रियांची विटंबना करणें, हें मुसलमानी सत्तेचें एक हीन स्वरूप होतें. जोहार न केला किंवा करून हि त्यांतून कोणी स्त्रिया सुरक्षित राहिल्या च, तर त्यांची काय दशा होई, याचें एक मासलेवाईक उदाहरण आहे. शिवाय, उदार म्हणून गाजलेल्या अकबराच्या कारकीर्दीतील तें उदाहरण आहे.

"चौरागड येथें एक विशेष विचित्र प्रकार घडला. राणी दुर्गावतीचा मुलगा, राजा बीरशाह, किल्ल्यांत अडकून पडला तेव्हां, पराभव झाल्यास जोहार करण्याची कामगिरी कांहीं जणांवर आधीं च सोंपविण्यांत आली होती. जोहार करणें ही हिंदी राजांची एक जुनी चाल आहे. पराभवाच्या प्रसंगीं ते स्त्रियांना घरांत कोंडतात आणि कचरा, लांकडें, कापूस आणि तूप भोंवतीं पसरून त्यास आग लावतात आणि जाळतात. स्त्रियांची अब्रू बचावण्याचा त्यांना हा एक मार्ग वाटतो. किल्ला पडण्याचा क्षण आला, त्या वेळीं, नेमलेल्या माणसांनीं आग लावली आणि सर्व स्त्रियांची जळून राख झाली. किल्ला हस्तगत झाल्याच्या दुसऱ्या दिवशीं आग विझली, तेव्हां शोधून पाहतां एका मोठ्या लांकडाच्या ठोकळ्याखालीं दोन स्त्रिया आढळल्या : एक राणीची बहीण आणि दुसरी राजाची नवीन केलेली बायको. त्यांना बाहेर काढण्यांत आलें. त्यांना इजा झाली नव्हती. त्यांना बादशहाच्या जनानखान्यांत पाठविण्यांत आलें."[१०]

३. इ. स. १६३५ त, म्हणजे श्रीसमर्थांच्या उत्तरेकडील तीर्थाटणाच्या काळांत च, बुंदेलखंडांत जीं आपसांत भांडणें झालीं, त्यांत एक

१०. E. & D., Vol. VI, Akbarnama by Faizi Sirhindi, Pp. 121-122.

बाजू उचलून शहाजहानानें औरंगजेबाच्या प्रमुखत्वाखालीं दुसऱ्या बाजूवर हल्ला चढविण्यास फौज पाठविली. त्या हल्ल्यांत शत्रूकडील जे मेले ते भाग्यवान्, जे जिवंत राहिले ते हतभागी, असें सांगतांना बंगाल्यांतील प्रसिद्ध इतिहासकार यदुनाथ सरकार अंतःकरण पिळवटून लिहितात:

"जे लढाईत मेले, ते तुलनेनें भाग्यवान् म्हणावयाचे! बीरसिंगची विधवा स्त्री जखमा लागून मेली ती हि भाग्यवान् च. सुटली बिचारी! ज्या स्त्रिया जिवंत राहिल्या आणि पकडल्या गेल्या, त्यांच्या दुर्दैवाला पारावार नव्हता. त्या सामान्य नव्हत. राजाच्या आया आणि मुली होत्या. त्यांना भ्रष्ट करून जनानखान्यांत कोंबण्यांत आलें! तेथें एकाददुसरा दिवस धन्याची कामवासना तृप्त करण्याचें हृदयशून्य, प्रेमरहित साधन व्हावयाचें आणि बाकी सारा जन्म, गृहिणीच्या वैभवाचा किंवा मातेच्या आनंदाचा अनुभव न घेतां, कैदखान्यांतल्याप्रमाणें दुःखांत कंठावयाचा! ज्यांच्या ठिकाणीं स्त्रीदाक्षिण्याचा गंध हि नाहीं आणि जितांविषयीं औदार्य नाहीं, अशा जातीच्या लोकांच्या तावडींत सांपडण्यापेक्षां, आपल्या च जिवलग माणसांच्या हातून मरण आलेलें त्यांना जास्त आवडलें असतें!

"झुंजारचे दोन अल्पवयी मुलगे व एक नातु पकडले गेले व त्यांना मुसलमान करण्यांत आलें. दुसरा मुलगा उदयभान व जुना आणि विश्वासू दिवाण श्याम यांनीं मुसलमान धर्म स्वीकारण्याचें नाकारलें, म्हणून त्यांना निर्दयपणें ठार करण्यांत आलें."

४. मथुरेचा एक फौजदार मुर्शिदकुली नांवाचा होता. श्रीसमर्थांच्या उत्तरेकडील तीर्थाटणाच्या काळांत तो होता. एकाद्या गांवचा सारा थकला म्हणजे त्यानें त्या गांवावर हल्ला चढवावा आणि स्त्रियांना पळवून नेऊन जनानखान्यांत कोंबावें. त्याची एक लीला पहा:

"मथुरेस यमुनेच्या परतीरावर गोवर्धन आहे. तेथें कृष्णाष्टमीच्या दिवशीं स्त्रीपुरुषांचा मोठा मेळा जमत असे. त्या वेळीं या फौजदारानें धोतर नेसावें, कपाळावर टिळा लावावा, हिंदूचा वेष घ्यावा, स्त्रीपुरुषांच्या घोळक्यांत शिरावें आणि सुंदर स्त्री आढळली कीं तिच्यावर लांडग्याप्रमाणें

११. History of Aurangzib by Jadunath Sarkar, 1912, Vol. 1, p. 27.

झडप घालून, आधीं च तयार ठेवलेल्या होडींत तिला टाकून आग्र्यास पळवावी. आपल्या मुलीचें काय झालें, म्हणून अब्रूसाठीं तिच्या आईबापांनीं तोंडावाटे शब्द हि काढूं नये![१२]"

तोंडावाटे त्यांनीं शब्द नसेल काढला, पण अशांचा तळतळाट च मोगलसत्तेला भोवला असला पाहिजे!

५. लढायांत हस्तगत होत, अशा स्त्रियांची जी विटंबना होत असेल, ती विचारावयास च नको, पण हिंदु राजांचा पराभव होऊन तहाचीं बोलणीं सुरू झालीं, म्हणजे तहांत हिंदु राजानें आपली मुलगी, किंवा बहीण, किंवा आणखी कोणी हि नातलग स्त्री द्यावी, अशी एक शर्त असावयाची! याचीं कैक उदाहरणें आढळतात. येथें आपण सहज एक च पाहूं. औरंगजेबाच्या कारकीर्दींत, जोधपुरच्या राज्यांत, देवळें पाडून जेथें त्यांवर मशिदी उभारण्यांत आल्या होत्या, त्या मशिदी, औरंगजेबाच्या मृत्यूनंतर, जोधपुरचा राजा अजितसिंग यानें नाहींशा करून पूर्ववत् देवळें बांधलीं. या त्याच्या अपराधाबद्दल महमद फरुकशियर याचें सैन्य राजावर चालून गेलें, तेव्हां जो तह झाला, त्यांत राजानें आपली मुलगी फरुकशियरला द्यावी, अशी एक शर्त होती व ती लाजिरवाणी शर्त कबूल करणें राजाला भाग पडलें.[१३]

अशा शर्ती हिंदु राजांना निमूटपणें मान्य कराव्या लागत, याचा अर्थ जो कांहीं होत असेल तो वाचकांनीं करावा.

६. हे च, असें आपण म्हणूं शकत नाहीं, पण असले च अनेक प्रकार श्रीसमर्थांच्या पाहण्यांत आणि ऐकण्यांत आले असावेत व ते पाहून आणि ऐकून, ईश्वरी कृपेला पात्र झालेल्या त्या महापुरुषाच्या मनाची काय स्थिति होत असेल, याची कल्पना करावी! त्यांचीं जीं अस्मानीसुलतानी म्हणून प्रकरणें आहेत, त्यांतील एका प्रकरणाच्या शेवटून दुसऱ्या श्लोकावरून आपण ती कल्पना करूं शकूं. असलीं कित्येक उदाहरणें त्यांच्या अवलोकनांत आलेलीं होतीं, हेंच अनुमान त्या श्लोकांवरून[१४] निघतें.

---

१२. History of Aurangzib by Jadunath Sarkar, Vol. III, Pp. 331-332.

१३. E. & D., Vol. VII, Pp. 446-47.

१४. सांप्रदायिक विविध विषय, खंड १ ला, विषयांक ४४, पृ. २६२.

**किती गुर्जिणी ब्राह्मणी भ्रष्टवील्या।**
**किती शांमुखी जाहजीं फांकवील्या।**
**किती येक देशांतरीं त्या विकील्या।**
**किती सुंदरा हाल होऊनि मेल्या ॥**

असले स्त्रीहरणाचे प्रकार घडण्याला लढाया च व्हाव्या लागत, असें हि नव्हे. गुंडांनीं वाटेल तेव्हां आणि वाटेल तेथें धाडी घालून स्त्रियांना पळवून न्यावें, असे प्रकार हरहमेश घडत असत. याला प्रमाण श्रीग्रंथराजाचें च आहे. तिसऱ्या दशकाच्या स्वगुणपरीक्षेच्या शेवटच्या समासांत तिसरें लग्न करून विचारा प्राणी मागील सर्व दुःख विसरून कांहीं आनंद मानतो

**तव तों गल्बला जाला। परचक्र आलें ॥**

**अकस्मात धाडी आली। कांता बंदीं धरून नेली।**
**वस्तभाव हि गेली। प्राणीयाची ॥**

**तेणें दुःख जालें भारी। दीर्घ स्वरें रुदन करी।**
**मनीं आठवे सुंदरी। गुणवंत ॥**

**तव तिची वार्ता आली। तुमची कांता भ्रष्टली।**

—दासबोध, ३–५–२७ ते ३०

७. आपल्या पवित्र देशाच्या इतिहासांतील 'स्त्रीविटंबना' हा एक अत्यंत हृदयद्रावक भाग आहे. हा भाग संपला, त्याची पुन्हां केव्हां हि आवृत्ति निघणार नाहीं, असें हि म्हणतां येत नाहीं. याची जबाबदारी सर्वस्वीं हिंदु समाजावर आहे. ती जबाबदारी त्यास पार पाडतां आली नाहीं, तर तें त्याच्या दुर्बलतेचें लक्षण समजलें पाहिजे. ही विटंबना होण्याचें केव्हां थांबणार, तें हि सांगतां येत नाहीं.

८. या विटंबनेला प्रत्यंतर गुरुचरित्र या पवित्र ग्रन्थांत हि आढळत आहे. त्या ग्रन्थाच्या एकोणतिसाव्या अध्यायांत भस्माचा महिमा सांगतांना कृतयुगांतल्या म्हणून एका ब्रह्मराक्षसाची गोष्ट सांगितली आहे. कृतयुग कसलें आणि ब्रह्मराक्षस तरी कोठचा! श्रीगुरूंचा अवतार झाला शक १३८० आणि १४४० च्या दरम्यान आणि गुरुचरित्र ग्रन्थाची रचना झाली शक १५०० च्या सुमारास. कृतयुगांतले ब्रह्मराक्षस शालिवाहनाच्या

चवदाव्या, पंधराव्या शतकांत या देशांत धुमाकूळ घालीत होते आणि त्याचें च वर्णन कृतयुगांतील म्हणून २९ व्या अध्यायांत आलें आहे. तो ब्रह्मराक्षस आत्मचरित्र सांगत आहे, तें ऐका—

**पूर्वजन्म पंचविसीं । होतों राजा यवन देशीं ।**
**'दुर्जय' नाम आपणासी । दुराचारीं वर्तलों जाण ॥**

**म्यां मारिले बहुत लोक । प्रजेसी दिधलें दुःख ।**
**स्त्रिया वरिल्या अनेक । राज्यमदेंकरूनियां ॥**

**वरिल्या स्त्रियांव्यतिरिक्त । बलात्कारें धरिल्या अमित ।**
**एक दिवस देवोनि रतिसुख । पुनरपि न भोगीं तयांसी ॥**

**एके दिवशीं एकीसी । रति देऊनि त्यजी तिसी ।**
**ठेविलें अंतर्गृहासी । पुनरपि तीतें न देखे नयनीं ॥**

**ऐसें अनेक स्त्रियांसी । ठेविलें म्यां अंतर्गृहासी ।**
**मातें शापिती अहर्निशीं । दर्शन नेदी म्हणोनियां ॥**

**समस्त राजे जिंकोनियां । आणी स्त्रिया धरोनियां ।**
**एकेक दिवस भोगूनियां । त्यांतें ठेविलें अंतर्गृहासी ॥**

**जेथें स्त्रिया स्वरूपें असती । बळें आणोन देईं मी रति ।**
**ज्या न येती संतोषवृत्तीं । तयां द्रव्य देऊनि आणवीं ॥**

**विप्र होते माझे देशीं । ते जाऊनि राहिले आणिक देशीं ।**
**जाऊनि आणी त्यांचे स्त्रियांसी । भोगी आपण उन्मत्तपणें ॥**

**पतिव्रता सुवासिनी । विधवा मुख्य धरोनि आणी ।**
**त्यांतें भोगीं उन्मत्तपणीं । रजस्वला स्त्रियांसी देखा ॥**

**विवाह न होतां कन्यांसी । बलात्कारें भोगीं त्यांसी ।**
**येणेंपरी समस्त देशीं । उपद्रविलें मदांधपणें ॥**

या यवनाची प्रौढी ऐका—

**ब्राह्मणस्त्रिया तीन शतें । शत चारी क्षत्रिया ते ।**
**वैश्यिणी वरिल्या षट् शत । शूद्रस्त्रिया सहस्र जाण ॥**

---

१. नुकत्या च वर उल्लेखिलेल्या तिसऱ्या कलमांत बुंदेलखंडांतील भांडणाविषयीं लिहितांना हृदय पिळवटून यदुनाथ सरकारांनीं 'एकाददुसरा दिवस' म्हणून जो निर्देश केला आहे, त्याला येथें गुरुचरित्रांत कसें तंतोतंत प्रत्यंतर मिळत आहे!

**एक शत चांडाळिणी । सहस्र वरिल्या पुंलिंदिनी[2] ।**
**पांच शत स्त्रिया डोंबिणी । रजकिणी[3] वरिल्या शत चारी म्यां ॥**

**असंख्यात वारवनिता । भोगिल्या म्यां उन्मत्तता ।**
**तथापि माझे मनींची तृप्तता । नाहीं जाली स्वामिया ॥**

**इतुक्या स्त्रिया भोगून । संतुष्ट नव्हे माझें मन ।**
**विषयासक्त मद्यपान । करीं नित्य उन्मत्तें ॥**

**वर्ततां येणेंपरी देखा । व्याधिष्ट जालों यक्ष्मादिका ।**
**परराष्ट्रराजे चालोनि ऐका । राज्य हिरतलें स्वामिया ॥**

—श्रीगुरुचरित्र, २९-३० ते ४४

पुढें तो यवनराजा कोणत्या नरकाचा धनी झाला आणि त्यांत देवांचीं किती सहस्र वर्षें खितपत पडला आणि नंतर कोण-कोणते जन्म पावला, वगैरे जो पुढचा कथाभाग त्या अध्यायांत आहे, त्याच्याशीं आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. आपणांस येथें एवढें च विचारांत घ्यावयाचें आहे कीं, स्त्रियांच्या विटंबनेचे हे असले संतापकारी, निंद्य, पापी प्रकार श्रीगुरु नृसिंहसरस्वती यांच्या देखत आणि त्यांच्या चरित्रकाराच्या काळीं, या देशांत सररास घडत होते. ते च श्रीसमर्थांच्या वाचण्यांत आणि ऐकण्यांत येत असावेत.

९. तत्कालीन स्त्रीजीविताचे हे हाल पाहिले, म्हणजे मोठें नवल वाटतें. कोणाच्या हि जीवाला ही गोष्ट लागावी. पृथ्वीच्या पाठीवर कोणत्या हि देशांत, आपल्या पतिसमवेत, मुलाबाळांत, गणगोतांत आनंदानें नांदणाऱ्या, कोणत्या हि धर्माच्या आणि जातीच्या, एका हि निरपराध अबलेवर असा प्रसंग आला, तिला परक्यांनीं पळवून नेली, भ्रष्ट केली, कोंडली, बाटविली, तर तिच्या केवळ रक्षणार्थ च नव्हे, तर त्या विटंबने-बद्दल सूड घेण्यासाठीं हजारों तलवारी म्यानांतून बाहेर पडल्या पाहिजेत. मग जेथें एक दोन नव्हे, शें दोनशें नव्हे, तर हजारों स्त्रियांवर, एकादे वेळीं नव्हे, तर नित्य असले प्रसंग येत, तेथें ते सहन कसे होत, हा प्रश्न च आहे.

१०. क्षमा मागून, थोडें विषयांतर करून बोलतों. हें जग पापी तर खरें च, पण अशा या जगांत हि अत्यंत आदरणीय वस्तु म्हणजे

२. भिल्लिणी. ३. धोबिणी.

स्त्रीजात आणि अत्यंत पवित्र सद्गुण म्हणजे पातिव्रत्य, हीं वाटलीं पाहिजेत. त्या जातीपैकीं एकाद्या हि स्त्रीवर आणि तिच्या पातिव्रत्यावर घाला घालणें, यासारखा घोर अपराध दुसरा कोणता च नाहीं. जाणूनबुजून विषयांतर करीत आहें, म्हणून सांगतों, मी एकदा एका वरिष्ठ न्यायाधीशाला माझ्या स्वराज्ययोजनेंतील कायदा सांगितला होता. माझ्या स्वराज्यांत खून करणाराला फांशीची शिक्षा नाहीं, तर स्त्रीवर बलात्कार करणाराला फांशीची शिक्षा ठेवलेली आहे. फरक इतका च कीं, माझें हें स्वराज्य या पृथ्वीच्या पाठीवर कोठें हि नाहीं. तें स्वर्गांत आहे. तरी पण मला वाटतें, हें पाप या जगांत हि एकदम बंद झालें पाहिजे. पाप करण्याची हौस च असेल, तर इतर अमानुष कृत्यें करा, पण स्त्रियांच्या पुढें नम्र व्हा. ही नीति साऱ्या जगानें एकदम मान्य केली पाहिजे.

स्त्रियांची विटंबना, हें म्लेंच्छांच्या दुर्जनत्वाचें श्रीसमर्थांनीं पहिलें लक्षण मानलें व अशा दुर्जनांच्या सत्तेला आपल्या हयातींत आळा बसला पाहिजे, असा त्यांनीं श्रीरामापाशीं हट्ट धरला.

## (दोन) देवालयांचा विध्वंस आणि मूर्तींचा भंग व त्यांची विटंबना

१. याचीं शब्दशः हजारों उदाहरणें सांगतां येतील आणि कांहींच्या खुणा तर आज हि प्रत्यक्ष पाहतां येतील. आज हि पाहतां येतील, याचा अर्थ आज हि आपण पाहूं शकूं कीं, कित्येक मशिदींच्या कामीं जे दगड वापरण्यांत आले आहेत, ते मूळचे देवालयांचे असावेत. अहमदाबादे-जवळच्या सरकेजला जाऊन पहा, किंवा हैद्राबाद प्रांतांतील कंधार गांवीं जाऊन पहा. कंधार येथें मशिदीच्या बाहेर बसावयास ज्या बैठकी केल्या आहेत, त्या जमिनींत उलट्या गाडलेल्या शंकराच्या पिंड्यांच्या केल्या आहेत. जा, पाहून या. पण इतकें लांब जावयाचें नसेल तर जवळ च आमच्या खानदेशांतील नंदुरबारेस जाऊन पहा. तेथें तुम्हांस एका मशिदीच्या दरवाजाच्या चौकटीच्या वरच्या बाजूस जी शिला बसविली आहे, ती आपल्या विटंबनेची काहणी मुकाट्यानें सांगेल. त्या शिलेवर गणपतीची मूर्ति कोरलेली असून, ती तेथें वर पाय, खालीं डोकें करून बसविलेली आहे.

२. अशीं हजारों उदाहरणें जरी असलीं, तरी आपणांस श्रीसमर्थांच्या पर्यटणकाळापासून तों अवतारसमाप्तीपर्यंतच्या काळांतील च

मुख्यत: पहावयाचीं आहेत. तीं पाहून आणि ऐकून च श्रीसमर्थांच्या जीवाचा संताप झाला असला पाहिजे. असा काळ म्हणजे त्यांनीं पर्यटणास आरंभ केला इ. स. १६३२ त, तें वर्ष आणि श्रीशिवाजीमहाराजांनीं आपला अवतार संपविला तेव्हांपासून श्रीसमर्थांनीं बाहेर पडणें टाकलें तें वर्ष १६८०, यांच्या दरम्यानचा होय. तेव्हां १६३२ ते १६८० एवढ्या काळांतील च, दहा पांच उदाहरणें, नमुन्यादाखल आपण दाखल करूं.

३. पहिलें उदाहरण इ. स. १६३२ तील च आहे. तें काशी येथील आहे व न जाणों, श्रीसमर्थ त्या च वेळीं, किंवा थोड्या च दिवसांनीं नंतर काशीस जाऊन पोंचले असतील. अबदुल हमीद लाहोरी यानें लिहिलेल्या बादशहानाम्यांतील तें उदाहरण आहे. शहाजहानाची कारकीर्द सुरू होऊन सहा वर्षें झालीं होतीं. लाहोरी लिहितो :

"बादशहाच्या नजरेस अशी गोष्ट आणण्यांत आली कीं, काफिरांचें मोठें ठिकाण जें काशी, तेथें गेल्या कारकीर्दीपासून अनेक देवालयें बांधण्यास सुरुवात झाली, पण तीं देवालयें तशीं च अपुरीं राहिलीं होतीं, तीं आतां पुरीं करावीं, असा काफिरांचा मनोदय आहे. तेव्हां सद्धर्माचे रक्षक बादशहा यांनीं असा हुकुम फर्माविला कीं, काशी येथें व आपल्या राज्यांत सर्वत्र, जेथें जेथें देवळें बांधलीं जात असतील, तेथें तेथें तीं सर्व देवळें पाडण्यांत यावीं. त्याप्रमाणें अलाहाबाद प्रांताकडून आतां च अहवाल येऊन पोंचला कीं, बनारस जिल्ह्यांत ७६ देवालयांचा नाश करण्यांत आला आहे."

४. दुसरें उदाहरण इ. स. १६६५ तील सांगतों. मूर्तींचा भंग करणें हा मुसलमानांचा कसा खेळ झाला होता, त्याचें तें उदाहरण आहे. तें स्वत: टॅव्हरनिअरच्या पाहण्यांत आलें होतें. त्याचें वर्णन त्यानें केलें आहे :

"आदल्या च वर्षीं शिवाजीनें सुरत शहर लुटलें होतें. त्याच्या पारपत्यार्थ उत्तरेकडून दक्षिणेकडे तोफखाना चालला होता. ग्वाल्हेरच्या हद्दींत मोगलसराईपासून सुमारें तीस कोसांवर कोलारस म्हणून एक गांव आहे. तेथें गांवाबाहेर रस्त्याच्या दुतर्फा मोठमोठाले आम्रवृक्ष असून

---

१५. E. & D., Vol. VII, p. 36.

त्यांपैकीं कित्येक वृक्षांच्या तळाशीं लहान लहान देवळें होतीं. अशा एका झाडाच्या आश्रयानें आपण (टॅव्हरनिअर) एक दिवस मुक्काम केला असतां हा तोफखाना तेथें येऊन पोंचला. तोफखाना प्रचंड होता. त्याच्या बरोबर दोन हजार तरी माणसें होतीं. सर्वांच्या पुढें एक मोठा हत्ती चालला होता. पुढें च एका देवळांत पांच फुट उंचीच्या तीन मूर्ति होत्या. लोकांच्या म्हणण्याप्रमाणें माहुतानें सूचना केल्यावरून त्या हत्तीनें एक मूर्ति सोंडेंत धरून तिचे दोन तुकडे केले, दुसरी मूर्ति सोंडेनें इतकी उंच आणि दूर भिरकावली, कीं तिचे चार तुकडे झाले, आणि सोंडेच्या एका तडाख्यानें तिसऱ्या मूर्तीचें डोकें च उडविलें."

मार्गांत ठिकठिकाणीं अशा लीला करीत हा तोफखाना चालला होता.

५. तिसरें उदाहरण इ. स. १६६९ तील आहे. साकी मुस्ताईदखान यानें इ. स. १७१० त लिहिलेल्या 'मा-आशीर-इ-आलमगिरीं'तील तें आहे :

" १७ जिल्काद १०७९ म्हणजे ता. १८ एप्रिल १६६९ रोजीं सद्धर्मरक्षक बादशहा यांचे कानावर अशी वार्ता आली कीं, ठठ्ठा, मुलतान आणि विशेषतः बनारस या ठिकाणीं मूर्ख ब्राह्मण आपल्या शाळांतून बालिश ग्रन्थांचें प्रतिपादन करीत असून त्यांच्या चेटकविद्येचा आपणांस परिचय व्हावा, म्हणून दूरदूरचे हिंदु, तसे च मुसलमान विद्यार्थी त्यांच्या कडे त्या दुष्ट विद्या शिकण्यास येत असतात. त्यावरून सर्व प्रांतांच्या अधिपतींना पत्रें पाठवून आज्ञा करण्यांत आली कीं, काफिरांच्या त्या शाळा आणि त्यांचीं तीं देवळें यांचा खुशाल नाश करावा आणि मूर्तिपूजेचे सर्व प्रकार कायमचे बंद होतील, असें करावें. या आज्ञेप्रमाणें बनारस येथील विश्वनाथाच्या देवालयाचा नाश केल्याची वर्दी ता. १५ रबिलाखर रोजीं एकेश्वरीवादाचे पुरस्कर्ते व धार्मिक प्रवृत्तीचे बादशहा यांच्या पर्यंत येऊन पोंचली.

" जुलमी राजांचा कायमचा विरोधी, अशा या न्यायप्रिय बादशहानें, आपल्या कारकीर्दीच्या तेराव्या वर्षी, १०८० च्या रमजान महिन्यांत, म्हणजे इ. स. १६६९ च्या डिसेंबर महिन्यांत मथुरा येथील 'डेहरा

---

१६. Tavernier's Travels in India, Edn. of 1925, Vol. I, p. 48.

केसुराय ' नांवानें ओळखल्या जाणाऱ्या हिंदु मंदिराचा नाश करावा, अशी आज्ञा केली आणि त्याप्रमाणें भ्रांतिष्टांचा तो बालेकिल्ला तत्काळ जमीनदोस्त करण्यांत येऊन त्या च जागेवर, पुष्कळ खर्च करून, एका मोठ्या मशिदीचा पाया घालण्यांत आला.

" हें जें पापाचें कोठार जमीनदोस्त करण्यांत आलें, तें त्या अडाणी आणि पतित नरसिंग देव बुंदेला यानें उभारलें होतें. गादीवर बसण्यापूर्वी जहानगीरची मर्जी, अनेक कारणांमुळें, एक वेळ, शेख अबदुल फाझलवर खपा झाली होती आणि त्याला मृत्यूच्या गोत्यांत आणण्याच्या हेतूनें, राजपुत्रावर आपली फार भक्ति आहे, अशी त्या हिंदु माणसानें बतावणी केली होती. तिचें बक्षीस म्हणून राजपुत्र जहानगीर गादीवर आल्यानंतर त्याच्याकडून त्यानें तें मथुरेचें देवालय बांधण्याची परवानगी मिळविली होती. तें देवालय बांधण्याच्या कामीं त्यानें तेहतीस लाख रुपये खर्च केले होते.

" ज्या ईश्वरानें आम्हांस इस्लामावरील निष्ठा दिली आहे, त्याची ही केवढी थोरवी म्हणावी कीं, साधण्यास अति कठीण, असें हें असाध्य कार्य घडून आलें. .... काफरांच्या देवळांतील हिरेमाणकांनीं नटविलेल्या मूर्ति आग्रा येथें पाठविण्यांत येऊन नबाब साहेबाच्या मशिदीच्या पायऱ्यांखालीं घालण्यांत आल्या, कीं जेणें करून सद्धर्मीयांच्या पायांखालीं त्या सतत तुडविल्या जाव्या. मथुरा शहराचें नांव हि बदलण्यांत येऊन इस्लामाबाद ठेवण्यांत आलें आहे आणि या च नांवानें सरकारी कागदपत्रांत त्याचा उल्लेख करण्यांत येऊं लागला. लोक हि याच नवीन नांवानें तें शहर ओळखूं लागले. "

६. त्या च साकी मुस्ताईदखानानें पुढें आणखी माहिती पुरविली आहे. ती इ. स. १६७९–८० या सालांतील आहे. ती देऊन नंतर आपण, दुर्जनत्वाच्या तिसऱ्या लक्षणाकडे वळूं.

" कारकीर्दीचें बाविसावें वर्ष १०९० ( इ. स. १६७९ ).

" जमीनदोस्त केलेल्या हिंदु देवळांतील मूर्ति कित्येक गाड्या भरून, आपल्या बरोबर घेऊन जोधपुराहून खान जहान बहादुर ता. २४ रबिलाखर

१७. E. & D., VII, Pp. 183-185.
१८. E. & D., VII, Pp. 187-188.

रोजीं येऊन पोचला. बादशहानें त्याची फार वाहवा केली. बऱ्याचशा मूर्तींच्या अंगावर मौल्यवान हिरेमाणिकें होतीं. कांहीं मूर्ति सोनें, रुपें, पितळ, तांबें, दगड यांच्या केलेल्या होत्या. कांहीं मूर्ति बाहेरच्या बाजूस फेकून द्याव्या व बाकीच्या मूर्ति जुम्मा मशिदीच्या पायऱ्यांखालीं घालाव्या, कीं जेणें करून त्या पायांखालीं तुडविल्या जातील, असा हुकुम झाला. कित्येक तशा च बरे च दिवस पडून होत्या, शेवटीं त्यांचा कांहीं मागमूस राहिला नाहीं.

" .... .... ....

.... .... ....

" छ १२ जिल्हेज १०९० ( इ. स. १६८० जानेवारी ता. ६ ) रोजीं राजपुत्र मुहमद आझम आणि खान जहान बहादुर यांनीं उदेपुरला जाण्याची परवानगी मिळविली. तेथें जाऊन मूर्तिपूजकांच्या देवळांचा नाश करण्याच्या हेतूनें त्यांच्या बरोबर रुहुल्लाखान आणि यकताझखान हे हि गेले. हीं देवळें राण्याच्या राजवाड्याच्या शेजारीं च होतीं. त्यांची गणना जगांतील आश्चर्यांत होत होती. आपल्या संपत्तीचा दुरुपयोग करून व आत्म्याची अधोगति पतकरून काफरांनीं तीं उभारलीं होतीं. या ठिकाणीं मंदिराच्या रक्षणार्थ जीवावर उदार होऊन सुमारें वीस रजपूत पुढें सरसावले. त्यांपैकीं एकानें हल्ला करणारांपैकीं बऱ्याच जणांना ठार केलें आणि मग तो मारला गेला. सर्व वीसच्या वीस जण पडेपर्यंत एका मागें एक ते चालून आले. शेवटचा नरकांत जाऊन पडेपर्यंत सद्धर्मीयांपैकीं हि बरे च जण कामास आले. अखेरीस मंदिर ताब्यांत आलें आणि त्यांतील मूर्तींचा भंग करण्यांत आला.

" छ २ मोहरम सन १०९१ ( ता. २४ जानेवारी १६८० ) रोजीं, राण्यानें बांधलेल्या उदिसागर तलावास बादशहानें भेट देऊन तेथें असलेलीं तिन्ही हिंदु देवालयें पाडून टाकण्याचा हुकुम केला. ........

" छ ७ मोहरमच्या दिवशीं राण्याचे वीस उंट घेऊन हसन अली खान आला आणि त्यानें कळविलें कीं, राजवाड्याच्या शेजारचें मंदिर आणि शिवाय जवळपासच्या मुलखांतील १२२ मंदिरें यांचा नाश करण्यांत

आला आहे. या प्रशंसनीय कामगिरीबद्दल त्यास बहादुर ही पदवी बहाल करण्यांत आली.

" छ १ सफर रोजीं बादशहाची स्वारी चितोडकडे जाण्यास निघाली. तेथें त्रेसष्ट मंदिरांचा विध्वंस करण्यांत आला.

" आंबर येथील देवळांचा विध्वंस करण्याच्या कामगिरीवर अबु तुरब यास पाठविण्यांत आलें होतें. त्यानें छ २४ रजब रोजीं स्वत: येऊन कळविलें कीं, ६६ मंदिरें जमीनदोस्त करण्यांत आलीं."

७. अशीं आणखी किती उदाहरणें देत बसून वाचकांचा अंत पाहूं ? असलीं उदाहरणें सांगतां सांगतां इटालियन प्रवासी मनुसी याला हि वाचकांची कींव आली होती. तो म्हणतो, " औरंगजेबानें आपल्या राज्यांतील ज्या प्रमुख देवळांचा नाश केला, तीं, हिंदु लोकांत मोक्षदायक म्हणून ज्या सप्त पुरी मानल्या जातात, त्यांपैकीं मायापुरी, मथुरा, काशी आणि अयोध्या येथील होतीं आणि इतर हि पुष्कळ च ठिकाणचीं होतीं. पण वाचकांस शीण वाटेल म्हणून नांवें देत बसत नाहीं."

अयोध्या येथें दशरथाचा वाडा ज्या जागीं होता, त्या जागेवर आज राममंदिर नसून मशिद आहे !

८. यांपैकीं बऱ्या च ठिकाणच्या मूर्तींच्या विडंबनाचे प्रकार श्रीसमर्थांच्या ऐकण्यांत आणि कांहीं तर प्रत्यक्ष पाहण्यांत आले असले पाहिजेत, असें श्रीमत् ग्रन्थराज दासबोधांतील त्यांच्या पुढील उद्गारांवरून स्पष्ट च दिसतें—

**येक देव दुराचारीं। फोडिला बळें ॥**
**येक देव जापाणिला। येक देव उदकीं टाकिला।**
**येक देव नेऊन घातला। पायातळीं ॥**

—श्रीदासबोध, ६–६–३४–३५

९. हीं सारीं उदाहरणें उत्तरेकडचीं झालीं. एकादें तरी दक्षिणेकडील पाहिलें पाहिजे. म्लेंच्छांनीं जसा उत्तरेकडे मंदिरांचा उच्छेद मांडला होता, तसा च तो दक्षिणेकडे हि कांहीं कमी प्रमाणांत नव्हता. मुसलमानी रियासतींत नबाब मीर जुमला ही एक प्रख्यात व्यक्ति होऊन गेली. प्रारंभीं तो गोवळकोंड्याच्या कुतुबशहाच्या नोकरींत होता. तेथून कांहीं

१९. Manucci, Vol. III, p. 245.

भानगडीमुळें सुटून शहाजहान आणि औरंगजेब यांच्या नोकरींत शिरला. त्यानें कर्नाटकांत बरा च धुमाकूळ मांडून पुरातन देवालयांतील मूर्तींची विटंबना करून विपुल संपत्ति मिळविली होती. त्याची लीला ऐका —

" गंजीकोट किल्ला जिंकल्यावर मीर जुमलाच्या मनांत आलें कीं, किल्ल्यावर कांहीं तोफा असाव्या. त्या खालून आणणें अवघड होतें, तेव्हां वर च कांहीं तोफा ओताव्या, असें योजून, मायले नांवाचा एक तोफा ओतणारा, पाश्चात्य राष्ट्रांतील मनुष्य होता, त्यास त्यानें तसें विचारलें. मायलेनें कबूल केलें. तेव्हां चोवीस चोवीस शेरांच्या दहा व बारा बारा शेरांच्या दहा, अशा वीस तोफा ओतण्यास जुमलानें त्यास सांगितलें. "

तोफांना लागणारी धातु कोठून आणावयाची? ती पंचाईत नव्हती.

" जुमलानें ठिकठिकाणच्या देवळांतील सोनें, रुपें, तांबें, पितळ, या धातूंच्या असंख्य मूर्ति गोळा केल्या होत्या. शिवाय खुद्द गंजीकोट येथें च एक प्रख्यात देवस्थान होतें, त्यांतील हि मूर्ति कामास आल्या! अशा सर्व मूर्ति वितळून त्यांच्या तोफा पाडण्यांत आल्या."

ही हकिकत इ. स. १६५२ तील होय. अशी च सर्व देशभर मूर्तींची विटंबना चालली होती! ती श्रीसमर्थांना कशी सहन होणार? हृदयाला पीळ पाडणारें दुर्जनत्वाचें हें दुसरें लक्षण होय. आतां तिसरें लक्षण पाहूं.

## ( तीन ) लूट, जाळपोळ, कत्तल, धर्मांतर

१. एतद्देशीयांचे इतिहासग्रन्थ आणि परदेशीयांचीं प्रवासवर्णनें पाहिलीं, म्हणजे लूट, जाळपोळ, कत्तल, स्त्रीहरण, धर्मांतर, क्रौर्याचे, अनीतीचे, अन्यायाचे आणखी कांहीं राक्षसी प्रकार असतील तर ते, या सर्वांचा धिंगाणा, या हतभागी देशांत शतकानुशतकें सारखा माजून राहिला होता, असें दिसतें. त्यांत कत्तल कशास म्हणूं आणि क्रौर्यांत कशाची गणना करूं, असा मला प्रश्न पडतो. सारे च पाशवी अत्याचार एकत्र झालेले आढळतात. त्यांचें मीं वर्गीकरण केलें आहे, करीत आहे, पण तें वृथा होय. त्या सर्व प्रकारांना, मानवजातीला काळिमा फासणारे,

२०. Tavernier, Vol. I, Pp. 231-32.

अमानुष राक्षसी अत्याचार, या एका च नांवानें संबोधिलें असतें, तरी चाललें असतें. परंतु वर्गीकरण करून येथवर विवेचन करीत आलों च आहे, तेव्हां आतां तें च वर्गीकरण शेवटपर्यंत चालवितों. अत्याचाराच्या निरनिराळ्या तऱ्हांचें मिश्रण होईल, त्याची वाचकांनीं क्षमा करावी.

२. मीं केलेलें वर्गीकरण परस्परव्यापी झालें आहे, पण त्यांत कांहीं विघडत नाहीं. आपण कांहीं मानसशास्त्रावर एकादा ग्रंथ लिहिण्यास प्रवृत्त झालों नाहीं, तर एका प्रकारापासून दुसरा प्रकार कसा भिन्न आहे, हें दाखविण्याची जबाबदारी आपण पतकरावयाची आहे? ज्याच्यावर आज कोणाचें च सुखदुःख अवलंबून नाहीं, असा अडीचशें तीनशें वर्षांच्या मागचा इतिहास आपणांस पहावयाचा आहे. त्यांत आपला हेतु एक च. हे सारे प्रकार पाहून त्या ईश्वरी पुरुषाच्या मनाची काय स्थिति झाली असेल, याची तुम्हाआम्हांस यथार्थ कल्पना होऊन त्यांच्या चरित्राचा ग्रंथ आपणांस बरोबर लागावा. तो आपला हेतु सिद्ध झाला, म्हणजे वर्गीकरण शास्त्रोक्त नसलें तरी कांहीं बिघडणार नाहीं. या विश्वासानें, केलेलें वर्गीकरण कायम ठेवून, प्रस्तुतच्या मथळ्याखालीं कांहीं उदाहरणें साधार सादर करतों.

३. फार मागचें, पण श्रीसमर्थांच्या जन्मभूमीपासून जवळचें च उदाहरण द्यावयाचें तर देवगिरीचें देतां येईल. अल्लाउद्दीनानें इ. स. १२९४ त दक्षिणेवर स्वारी केली, तेव्हां “अडथळा न होतां देवगिरि त्याच्या ताब्यांत आला आणि त्यानें शहर लुटण्याला आपल्या सैन्याला खुशाल परवानगी दिली! लूट चालू असतां जो छळ झाला तो काय सांगावा!”[२१]

४. बहुतां दिसांचें म्हणजे अनेक शतकांचें. तेव्हां शतकांमागें शतकें ओलांडीत आपण गेलें पाहिजे. एक एका शतकांतलें एक एक उदाहरण म्हणजे त्या त्या शतकांतल्या अनेक उदाहरणांचा मासला समजावयाचा. तसें च एक दक्षिणेकडील व दुसरें उत्तरेकडील, अशीं उदाहरणें पाहिलीं, म्हणजे मधल्या साऱ्या मुलखाची ती च गत समजावयास हरकत नाहीं. देवगिरीनंतर पुढच्या शंभर वर्षांचें उदाहरण म्हणजे

२१. Elphinstone's History of India, 1874, p. 387.

वर त्याच्या स्वाऱ्या होत. त्यांना अनुलक्षून, मुसलमान ग्रंथकारांचे च आधार देऊन, यदुनाथ सरकार लिहितात :

" जातांना मार्गांत सर्व ठिकाणीं मोगल सैन्यानें पिकांचा सपशेल नाश केला, घरें जाळलीं, गुरें पळविलीं, गांवकऱ्यांच्या कत्तली केल्या, किंवा गुलाम म्हणून विकण्यासाठीं त्यांना बरोबर नेलें. .... .... भरभराटींत असलेलीं गांवें कायमचीं बुडालीं आणि लोकसंख्या कमी झाली. "

## ( चार ) क्रौर्य

१. क्रौर्याचीं उदाहरणें अतर्क्य आहेत ! तीं इतकीं विचित्र आहेत कीं, त्यांवर विश्वास तरी कसा ठेवावा, असा प्रश्न पडतो. जगांत मानवा-सारखे मानव इतके दुष्ट असूं शकतात, यावर विश्वास ठेवणें कठीण जातें. पण विश्वास ठेवणें अपरिहार्य आहे, कारण या साऱ्या घडलेल्या गोष्टी आहेत, त्या इतिहासग्रंथांत नमूद आहेत, स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलेल्या लोकांनीं त्या लिहून ठेवल्या आहेत.

२. श्रीसमर्थकालीन उदाहरणें तर आपणांस पहावयाचीं च आहेत, पण ज्याच्या दुष्टपणाची ख्याति साऱ्या जगभर पसरून जग हि आश्चर्य करीत राहिलें होतें, ज्याचा एक दांत पडला असतां त्यावर कबर बांधण्यांत आल्याचें आपण मराठी शाळेंत शिकत असतां क्रमिक पुस्तकांत वाचलें होतें, त्या महमद तघलखच्या अमानुष क्रौर्याचा पाढा श्रीसमर्थांच्या हि कानांवर गेला असला पाहिजे. तेव्हां ज्याच्यापुढें त्याच्या क्रौर्याचीं इतर कृत्यें फिकीं पडतील, असें महमद तघलखचें एक च उदाहरण देऊन, नंतर आपण श्रीसमर्थकालीन व इतर दोन चार उदाहरणें पाहूं.

" गंगायमुनेच्या दुआबांतील लोक जुलमी करांच्या ओझ्याखालीं अगदीं त्रस्त होऊन गेले होते. हीं आपलीं धान्याचीं कोठारें हि नकोत व ते कर देणें हि नको, इतके ते लोक त्रासून कोठारांना आगी लावून, आपलीं गुरें ढोरें घेऊन, वाट फुटेल तिकडे चालते होत. यावर सुलतान महमद तघलख यानें हुकुम काढला कीं, असे सोडून जाणारे शेतकरी, सांपडतील तेथें पकडून ठार करावे आणि त्यांचा सारा मुलुख खुशाल लुटावा आणि

२५. J. N. Sarkar's History of Aurangzib, 1922, Vol. I, p. 37.

तैमुर-इ-लंगचें देतां येईल. "सिंधुनद ओलांडून तैमुर इ. स. १३९८ च्या सप्टेंबरांत दिल्लीवर चालून जात असतां मार्गांत अनेक लोकांना कैद करून तो बरोबर नेत होता. अशा कैद्यांची संख्या फार च वाढली व एवढें मोठें लटांबर बरोबर नेण्याचें त्याला जड वाटूं लागलें. दिल्ली जशी जवळ आली, तशी त्यानें एक लक्ष कैद्यांची अगदीं शांतपणें (in cold blood) कत्तल केली." करा कल्पना.

५. त्यानें दिल्ली गांठली आणि तेथें मग "सरसकट कत्तल सुरू झाली. कांहीं रस्त्यांवर तर प्रेतांचे एवढाले ढीग पडले कीं, त्या रस्त्यांनीं जाणें अशक्य झालें. सर्व मोगल सैन्य शहरांत घुसलें आणि नंतर जे भयंकर अत्याचार झाले, त्यांचें वर्णन करून सांगण्यापेक्षां कल्पनेवर च सोंपविणें बरें! कत्तल करून करून सैन्य थकलें आणि लुटण्याला च कांहीं राहिलें नाहीं, तेव्हां स्वारीनें मुक्काम हलविला."

६. कत्तल करून तैमूरचें सैन्य थकलें आणि त्यांच्या कत्तलींचें वर्णन करून माझें मन विटलें, तेव्हां दोन तीन शतकें तशीं च ओलांडून पुढें जातों. इ. स. १६३१ त बादशाही फौज विजापुरावर चालून जाण्यास निघाली असतां "जेथें जेथें सैन्याला पुरवठा होण्यासारखें ठिकाण आढळे, तेथें तेथें सैन्याचा तळ पडे आणि चहूंकडून लुटून आणून पुरवठा करण्यास निरनिराळ्या तुकड्या पाठविण्यांत येत. ज्या मार्गानें सैन्य जाई, त्या मार्गांत जे लोक आढळत, त्यांची कत्तल होई अथवा त्यांना कैद करण्यांत येई. दुतर्फा रस्त्यावरील घरें लुटलीं जात आणि मुलुख बेचिराख केला जाई. याप्रमाणें सर्व मुलुखभर, येतांना आणि जातांना, लूट, नासधूस आणि कत्तल सारखी चाले." याचें नांव स्वाऱ्या, लढाया आणि प्रजापालन!

७. इ. स. १६३६ ते १६४४ म्हणजे जवळ जवळ श्रीसमर्थांच्या तीर्थाटणाच्या काळांत, औरंगजेब दक्षिणेचा सुभेदार होता. त्या अवधींत गोवळकोंडा व विजापुर, म्हणजे कुतुबशाही व आदिलशाही यांच्या मुलुखा-

---

२२. Islam by E. Denison Ross, Benn's Six penny Library, No. 19, p. 56.

२३. Elphinstone, Pp. 415-16.

२४. E. & D., Vol. VII, p. 30.

उध्वस्त करून सोडावा. या कामगिरीवर स्वतः सुलतान, जणूं शिकारीला चालला आहे, असा सरंजाम बरोबर घेऊन बाहेर पडे आणि शिल्लक राहिले असतील, त्या सर्व शेतकऱ्यांची कत्तल करवी आणि त्यांचीं मुंडकीं किल्ल्याच्या तटावर, सर्वांच्या नजरेस पडतील, अशीं ठेवण्याचा हुकुम करी. अशा रीतीनें त्यानें, आपला सारा मुलुख निर्जन, उजाड करून सोडला. त्यानें अशा क्रूर शिक्षा अंमलांत आणल्या कीं, त्या ऐकून च सारें जग थक्क झालें ! "[२६]

" माणसांच्या अशा शिकारी त्यानें अनेक वेळां केल्या व पुढें एका प्रसंगीं तर कनोजसारख्या मोठ्या शहरांतील रहिवाश्यांची त्यानें सरसकट कत्तल च करविली. "[२७]

३. बादशहा मोहिमेवर किंवा दौऱ्यावर निघाला, म्हणजे शुभ व्हावें, म्हणून बळी देत. याचें एक चमत्कारिक उदाहरण मनुसीनें दिलें आहे. विजापुर व गोवळकोंड्यावर स्वारी करण्यासाठीं औरंगजेबानें औरंगाबाद सोडलें, त्या वेळीं

" कुच करण्याच्या पूर्वीं सहा दिवसांहून जास्त दिवस आधीं, ज्या मार्गानें त्यास जावयाचें होतें, त्या रस्त्यावर ऐशीं काफरांना बळी द्यावें, असा त्यानें हुकुम सोडला. त्याचा प्रत्यक्ष हुकुम असा होता कीं, त्या ऐशीं लोकांना एका रांगेंत हात बांधून ओणवें उभें करावें आणि क्रमानें एकएकाचें डोकें उडवीत जावें. "[२८]

४. बापाविरुद्ध बंड करून औरंगजेब आपल्या भावाशीं लढत असतां एकदां त्याचें सैन्य निरुत्साह होऊन थकलें असतां त्या सैन्याच्या ठिकाणीं उत्साह भरून त्याला चेव आणण्यासाठीं मीर जुमलानें जो सल्ला दिला व जो औरंगजेबानें मानला आणि तत्काळ अंमलांत आणला, त्याला पृथ्वीच्या पाठीवर अन्यत्र कोठें तोड सांपडेल, असें वाटत नाहीं.

" सांपडतील त्या हिंदूंना लुटावें आणि ठार करावें, असा हुकुम करून सैन्याला हुरूप वाटेल, असें करावें, असा मीर जुमलानें औरंगजेबास

२६. E. & D., Vol. VI, Pp. 184-85.
२७. Elphinstone, p. 406.
२८. Manucci, Vol. II, p. 468.

या प्रसंगीं सल्ला दिला. त्याप्रमाणें सैन्याला हुकुम देण्यांत आला. एक तासाहून जास्त थोडा वेळ कत्तल चालली आणि त्यायोगें सैन्यांत उत्साह भरला. या कत्तलीविरुद्ध कोणीं ब्र हि काढला नाहीं. "[२९]

५. इटालिअन प्रवासी मनुसी हा श्रीशिवसमर्थांचा समकालीन होय. क्रौर्याच्या व इतर बाबतींत त्याची साक्ष विशेष महत्त्वाची होय. पुष्कळदां त्याचें म्हणणें केवळ ऐकीव नसून प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्याचें असतें. पाहिल्याचें च जेव्हां तो सांगतो, तेव्हां मग विश्वास ठेवावा च लागतो. तो म्हणतो —

"एकाद्या सरदारानें पराक्रम केला, म्हणजे त्याच्या विजयाचा दाखला म्हणून, कत्तल केलेल्या लोकांचीं मुंडकीं आग्र्यास पाठविण्यांत येत व तेथें तीं सर्वांच्या नजरेस पडावीं, म्हणून बादशहाच्या राजवाड्याच्या चौकांत ठेवलीं जात. चोवीस तासांनंतर तीं मुंडकीं तेथून उचलून बाहेरच्या रहदारी रस्त्याच्या दुतर्फा झाडांना टांगलीं जात, किंवा एवढ्यासाठीं च मुद्दाम उभारण्यांत आलेल्या बुरुजांच्या भोंकांत ठेवीत. प्रत्येक बुरुजांत शंभर शंभर मुंडकीं मावत. अशा मुंडक्यांच्या राशी मीं कैक वेळां शहरांत पाहिल्या आहेत. एकदां तर अशीं दहा हजार मुंडकीं माझ्या पाहण्यांत आलीं. बहुधा तांबुस रंगाच्या लांबलांब मिशा आणि बोडलेलीं डोकीं, यावरून तीं मुंडकीं ओळखूं येत. मोगलाच्या राज्यांत माझें राहणें चौतीस वर्षें झालें, तेवढ्या अवधींत आग्र्याहून दिल्लीला माझें जाणें वारंवार होई आणि दर खेपेस, नुकतीं च कापलेलीं कित्येक मुंडकीं व रस्तालूट केल्याबद्दल ठार केलेल्या लुटारूंचीं प्रेतें, रस्त्याच्या दुतर्फा झाडांना टांगलेलीं दिसत. "[३०]

६. या च प्रकारची साक्ष, फ्रेंच प्रवासी टॅव्हरनिअर याची हि आहे.

"काळाबस हें एक मोठें शहर आहे. पूर्वीं तें शहर एका मांडलिक राजाच्या राजधानीचें होतें. तो मोगलाला खंडणी देत असे. परंतु औरंगजेब गादीवर आल्यानंतर त्यानें, त्या एकट्या राजाचें च नव्हे, तर त्याच्या

२९. Manucci, Vol. I, p. 329.
३०. Manucci's Storia Do Mogor, Vol. I, p. 134.

प्रजेपैकीं कित्येकांचीं डोकीं उडविलीं. शहराजवळ रस्त्याला लागून दोन बुरुज आहेत आणि त्या बुरुजांच्या चार हि बाजूंना खिडक्यांप्रमाणें कित्येक भोकें आहेत आणि त्या प्रत्येक भोकांत, दोन दोन फुटांच्या अंतरावर, माणसाचें एक एक मुंडकें ठेवलेलें आहे. इ. स. १६६५ तील माझ्या शेवटच्या प्रवासाच्या वेळीं, ही कत्तल नुकती च झाली असावी, वाईट घाण सुटली होती, पण सर्व मुंडकीं सबंध शाबूत होतीं.[३१]"

७. शहाजहानाच्या बापाचें—जहानगीरचें—एक उदाहरण देऊन आपण पुढील लक्षण हातीं घेऊं. जहानगीरनें न्यायनीतीचा केवढा आव आणला होता आणि वर्तन कसें उलटें केलें, हें या उदाहरणावरून दिसणार आहे. त्यानें स्वत:ला आणि इतरांना सदाचाराचे बारा नियम घालून दिले होते. ते इलियट आणि डाउसन यांनीं आपल्या इतिहास-ग्रन्थमालेच्या सहाव्या खंडाला जोडलेल्या एका परिशिष्टांत देऊन त्यावर इलियटनें टीका करून व त्यांच्या भंगाचीं उदाहरणें देऊन, शेवटीं एक च शेरा मारला आहे कीं, "नियम आणि वर्तन यांच्यांत इतका ढळढळीत विरोध आपल्या कोठें पाहण्यांत आला नाहीं." त्या बारांपैकीं पांचवें अनुशासन व त्यावरील इलियटची टीका, हीं आपल्या प्रस्तुतच्या विषया-पुरतीं पाहण्यासारखीं आहेत. त्यावरून त्या काळच्या न्यायाची, सुरक्षिततेची, भूतदयेची आपणांस योग्य कल्पना होईल.

८. **जहानगीरचें पांचवें अनुशासन.**— "दुसऱ्या कोणाच्या हि राहत्या जागीं जाऊन तेथें आपलें बिऱ्हाड लावण्याचा कोणाला हि हक्क नाहीं, असें मीं जाहीर केलें. न्यायाधीशांना मीं ताकीद दिली कीं, आरोपींचा गुन्हा कशा हि प्रकारचा असो, त्यांचीं नाकें आणि कान कापण्याची शिक्षा देऊं नये व मीं स्वत: ईश्वराला स्मरून शपथ घेतली कीं, असली शिक्षा मी कोणाला करणार नाहीं."

यावर इलियटची विस्तृत टीका आहे. तींतून अनुशासनभंगाचीं पांच सहा च उदाहरणें आपणांस पुरेशीं होतील.

(क) "गांवेंच्या गांवें जाळण्याची जहानगीरला लहर लागली, तेव्हां गरिबांचीं घरें जळतात, याची त्यानें फिकीर केली नाहीं. सर थॉमस रो

३१. Tavernier, Bangbasi Edition, p. 46.

यानें लिहून ठेवलें आहे, अजमीरच्या लष्कराला त्यानें आग लावली, तेव्हां मला दुसरीकडे जाणें भाग च झालें. सबंध शहर जळालें. .... .... पुढें तो आणखी म्हणतो, जेथें याचा तळ पडे, तेथील जवळपासचीं गांवें जाळून टाकण्याचा हा हुकुम फर्मावीत असे. गरीब लोक आपलें गांव सोडून जात, जे रहात त्यांना, जाहीरनामा काढून हा घालवून देत असे.[३२] "

( ख ) " ता. ९ ऑगस्ट रोजीं शंभर लुटारूंची टोळी पकडून आणून जहानगीरपुढें उभी करण्यांत आली. चौकशीचा देखावा हि न करतां, त्यानें हुकुम दिला, यांना घेऊन जा आणि ठार करा, त्यांच्यांतील मुख्याला कुत्र्यांकडून फाडवा. त्याप्रमाणें त्या सर्व कैद्यांना शहराच्या निरनिराळ्या भागांत नेऊन भर रस्त्यांत ठार करण्यांत आलें. सर थॉमस रो म्हणतो, मी उतरलों होतों, त्या ठिकाणाच्या जवळ च चोरांच्या मुख्याला बारा कुत्र्यांकडून फाडविण्यांत आलें, त्यांच्यापैकीं तेरा जणांचे हात व पाय बांधून त्यांच्या माना तलवारीनें कापल्या, त्या हि पुऱ्या कापल्या नाहींत आणि त्यांना तसेंच रक्तबंबाळ स्थितींत कुजून जाईपर्यंत रस्त्यांत च पडूं दिलें.[३३] "

( ग ) " सुमारें चार हजारांना कैद करण्यांत आलें आणि इतर हलकटांना उदाहरण व्हावें म्हणून, माझ्या हुकमानें, त्यांना हत्तींच्या पायांखालीं तुडविण्यांत आलें.[३४] "

( घ ) " वीस लाख रुपये किंमतीचें जवाहीर असलेला राजाचा मुकुट, भाल्यांना अडकविलेलीं दहा हजार बंडखोरांचीं मुंडकीं व जिवंत पकडलेले सर्व नायक, अशीं माझ्यापुढें आणून हजर करण्यांत आलीं. आमच्या विरुद्ध बंड करून उठण्याची प्रवृत्ति इतरांना होऊं नये, त्यांना दहशत बसावी, म्हणून मीं असा हुकुम केला कीं, कनोज शहराचें रक्षण करण्यांत जे पडले, अशा दहा हजारांना, शहराच्या बाहेरच्या रस्त्यावरील झाडांना, खालीं डोकीं, वर पाय करून टांगून ठेवा. मला येथें दुःखानें नमूद करावें लागत आहे कीं, अशा प्रकारच्या शिक्षा आम्ही वारंवार करीत असून हि, बंड करण्याची

---

३२. Kerr's Collection of Voyages & Travels, Vol. IX, Pp. 317, 325, 335.

३३. Kerr's Collection, IX, p. 281.

३४. Price's Memories of Jahangueir, p. 40.

लोकांमधील प्रवृत्ति कमी झालेली दिसून येत नाहीं. माझ्या वडिलांच्या ( म्हणजे अकबराच्या ) कारकीर्दींत आणि नंतर माझ्या कारकीर्दींत, अमलीं उदाहरणें डोळ्यांपुढें असून हि, आमच्या राज्यांत क्वचित् एकादा प्रांत असेल कीं, ज्यांत बंड करण्याच्या प्रवृत्तीमुळें पांच सहा लाख लोक आपल्या प्राणास मुकले नाहींत ! मधून मधून, कोठें ना कोठें तरी, एकादा चांडाळ बंड करून उठतो च ! पूर्ण शांतता अशी हिंदुस्थानला कधींच लाभली नाहीं.[३५] ''

(ङ) " चौकशीला विलंब होत नसे व शिक्षा त्वरित अंमलांत येत. गुन्हेगारांना, गुन्ह्याचें स्वरूप पाहून, टांगीत, छाटीत, सुळावर चढवीत, कुत्र्यांकडून फाडवीत, हत्तीकडून तुडवीत, सर्पदंश करवीत, इत्यादि प्रकारांनीं शिक्षा होई. शिक्षा बहुधा चव्हाट्याच्या ठिकाणीं अंमलांत येत. ही च न्यायदानाची तऱ्हा सर्व प्रांतांत आणि शहरांत चालू[३६] आहे. ''

कोठें राहिली त्या पांचव्या अनुशासनाची प्रतिष्ठा ?

९. तत्कालीन देशस्थितीचें चित्र, मी अशा प्रकारें एक एक लक्षण विचारांत घेऊन, बाह्यत: शांतपणें रंगवीत चाललों आहें खरा, पण हृदय धडधडत असतें आणि पराकाष्ठेनें उद्गार निघत असतात कीं, अशा काळीं आणि अशा परिस्थितींत आपले श्रीसमर्थ सर्वत्र निर्भयपणें संचार करीत होते. त्यांचें रक्षण कोणीं केलें ? सदा सर्वदा संनिध असणाऱ्या श्रीरामाशिवाय दुसरे कोण करणार ? हें सारें मनांत येऊन मी मनानें च क्षणोक्षणीं त्यांच्या चरणीं मस्तक ठेवीत च चाललों आहें.

## ( पांच ) धर्मवेडेपणा

१. या धर्मवेडेपणाचीं उदाहरणें, आरंभापासून शेवटपर्यंत, असंख्य सांगतां येतील. तो वेडेपणा सुलतानापासून फकिरापर्यंत सर्वांत सारखा च आढळतो. त्याचें एक च उदाहरण देऊन आपण पुढें जाऊं. तें उदाहरण शिकंदर लोदीचें आहे.

" असें सांगतात कीं, एकदां एका ब्राह्मणानें, कित्येक मुसलमानांच्या समक्ष असें विधान केलें कीं, इस्लामचा धर्म खरा आहे, पण तसा च

३५. जहानगीरच्या सदरच्या आठवणी, पृ. १२८.

३६. The Rev. E. Terry in P. Pilgrims, Vol. II, p. 1476.

माझा हि धर्म खरा आहे. हें त्या ब्राह्मणाचें म्हणणें मौलवींच्या कानांवर गेलें आणि त्यांनीं तें सुलतान शिकंदर शहा यास जाऊन सांगितलें. धार्मिक चर्चेची सुलतानास फार आवड असल्यामुळें, त्यानें ठिकठिकाणच्या विद्वानांना बोलावून आणलें व त्यांच्या पुढें तें ब्राह्मणाचें विधान टाकलें. जमलेल्या विद्वानांनीं एकमतानें आपला अभिप्राय दिला कीं, त्या ब्राह्मणास कैद करून आणावें, त्याला इस्लामी धर्माचा स्वीकार करण्यास सांगावें आणि तसें करण्याचें त्यानें नाकारल्यास त्यास ठार करावें! त्याप्रमाणें त्या ब्राह्मणास धरून आणून सांगण्यांत आलें आणि त्यानें नाकारतां च त्यास ठार करण्यांत आलें! या सुलतानाच्या कारकीर्दींत धर्मवेडेपणाचीं असलीं आणखी कित्येक उदाहरणें घडलीं.[३७]"

२. आपल्या समर्थांनीं 'अल्ला निरंजन दोउ नही रे भाई" असें च त्या सुलतानास आणि त्याच्या धर्मवेड्या विद्वानांना एक दोन पदांनीं सुनावलें असतें[३८]; पण असा कोणी धर्मवेडा सुलतान त्यांना भेटला नव्हता. भेटला असता, तर कांहीं निराळा च थाट उडाला असता.

३. या च सुलतानाच्या कारकीर्दींत हिंदु देवळांवरून साफ नांगर फिरविण्यांत येऊन त्यांचें नांव किंवा कांहीं खूण, कांहीं एक शिल्लक ठेवण्यांत आलें नव्हतें.[३९]

## ( सहा ) बेइमान

मनुसी हा शहाजहान, दारा, औरंगजेब इत्यादिकांच्या नोकरींत कित्येक वर्षें असल्यामुळें त्याला, थोरापासून लहानापर्यंत, मुसलमानांच्या स्वभावाची चांगली पारख झाली होती. मुसलमानी अंमलांत लहानमोठ्यांच्या सहवासांत, तो अठ्ठेचाळीस वर्षें वावरला होता. तेव्हां एकट्या मनुसीनें च वेळोवेळीं त्यांच्या स्वभावाचें जें दिग्दर्शन केलेलें आढळतें, तेवढें च प्रस्तुतच्या सदराखालीं देण्याचा माझा विचार आहे. हें त्याचें दिग्दर्शन श्रीसमर्थांच्या निरीक्षणाशीं कसें तंतोतंत जुळतें, तें हि आपण शेवटीं पाहूं.

३७. इलियट आणि डौसन, खंड ६ वा, पृ. १८७.

३८. पहा पदपदांतरें, गिरिधरांच्या हातचीं पदें, २३७, २३८.

३९. इ. आणि डौ., खंड ६ वा, पृ. १८७ च.

१. " तुम्हांस चांगलीं बक्षिसें देऊं, तुमचा सन्मान करूं, अशीं अघळपघळ अभिवचनें देत असल्यामुळें पुष्कळ लोक औरंगजेबाच्या शब्दावर आंधळेपणानें विश्वास टाकून स्वपक्षाचीं छिद्रें आणि बिंगें त्यास सांगत असतात, पण शेवटीं, 'विश्वासघातकी' म्हणून च अशा लोकांची तो संभावना करी. मोगल देऊं करतो पुष्कळ, पण देतो थोडें, हें हे लोक विसरतात. औरंगजेबाचा हा स्वभाव सर्वांस ठाऊक झाला असून हि, तो वचनें देत च असतो आणि लोक फसत च असतात. असें हें आजपर्यंतचें औरंगजेबाचें जीवन आहे, म्हणजे केवळ ढोंगी, दिसण्यांत सच्छील आणि धार्मिक प्रवृत्तीचा, पण खरोखर घातकी आणि पापी."[४०]

२. सरदारांना कामगिरीवर पाठवितांना त्यांना औरंगजेबाची सांगणी च असे कीं, " एखाद्या शत्रूला नामोहरम करावयाचें एकदां ठरल्यावर, कशानें हि कचरूं नका, फसवा, खोटें बोला, खोट्या शपथा घ्या .... वाटतील त्या युक्त्या लढवा .... थोडक्यांत म्हणजे आपला डाव साधण्यावर लक्ष ठेवा व तो साधण्यासाठीं, जगांत असतील नसतील त्या साऱ्या बतावण्या करा."[४१]

३. " स्वतःचा डाव साधावयाचा असला कीं, कांहीं हि वचनें देण्याला औरंगजेब मागेंपुढें पहात नसे, कारण तीं वचनें आपणांस पाळावयाचीं नसतात च, हें त्याच्या मनांत आधीं च ठरलेलें असतें. शपथा घ्यावयाच्या त्या केवळ फसविण्यासाठीं घ्यावयाच्या असतात, हें एक त्याच्या वर्तनाचें जणूं सूत्र च बनलें होतें. या च सूत्राला अनुसरून शिवाजीला दिलेला शब्द त्यानें मोडला, पण त्याची त्याला किंमत केवढी पडली! चांगलें च प्रायश्चित्त मिळालें!"[४२]

४. मनुसी तर म्हणतो कीं, " औरंगजेबाच्या सर्व च लबाड्या आणि ढोंगें मी सांगूं लागलों, तर तीं केव्हां च संपणार नाहींत."[४३] औरंगजेबाचीं सर्व च काळींबेरीं कृत्यें ठाऊक असल्यामुळें, त्याचा निर्देश करतांना

४०. Manucci, Vol. III, p. 253.

४१. Manucci, Vol. III, p. 257.

४२. Manucci, Vol. II, p. 25.

४३. Manucci, Vol. III, p. 256.

" The wily Aurangzeb, the very quintessence of deceit " म्हणजे "तो कपटी औरंगजेब, दगलबाजीचा केवळ अर्क" असें मनुसी पुष्कळदां म्हणतो.

५. श्रीसमर्थांनीं औरंगजेबाची दुरून केलेली परीक्षा, मनुसीनें संनिध राहून केलेल्या परीक्षेशीं कशी पूर्णपणें जुळते, हें पाहून मोठें कौतुक वाटतें. आपल्या आनंदवनभुवन या प्रकरणांत श्रीसमर्थ म्हणतात—

**बुडाला औरंग्या पापी । म्लेंचसंव्हार जाहाला ।**
**मोडलीं मांडलीं छेत्रें । आनंदवनभुवनीं ॥**
**बुडाले भेदवाही ते । नष्ट चांडाळ पातकी ।**
**ताडिले पाडिले देवें । आनंदवनभूवनीं ॥**
**गळाले पळाले मेले । जाले देशधडी पुढें ।**
**निर्मळ जाहाली पृथ्वी । आनंदवनभुवनीं ॥**

—स्फुट प्रकरणें, ५८—३३ ते ३५

६. मनुसी म्हणतो, " पूर्वीच्या काय आणि अलिकडच्या काय, मोगल राजांनीं ज्या लढाया जिंकल्या आणि मुलुख पादाक्रांत केला, तें सारें शक्तीपेक्षां कपट आणि असत्य वचनें यांच्या च बळावर बहुधा साधलें गेलें. शत्रूकडील कोणी तरी घरभेद्या अनुकूल करून घेतल्याशिवाय, लढाई देण्याला किंवा किल्ल्यावर हल्ला चढविण्याला मोगल हा क्वचित् च प्रवृत्त होतो.[४५]" आणि श्रीसमर्थ म्हणतात,

**फितव्यानें बुडती राज्यें । खबर्दारी असेचिना ।**
**युक्ती ना शक्ती ना बेगी । लोक राजी असेचिना ॥**
**बेदादी बेकैद सेना । कारबारी च चोरटे ।**
**धण्यासी राखणें राजी । कदा काळीं घडेचिना ॥**
**चोरटीं होरटीं तुंदें । नासकें लांच इछिती ।**
**लौंढीचे दुरी घालावे । मारावे राजकारणें ॥**

—स्फुट प्रकरणें ६०—३४ ते ३६

७. मोगलांत दोन विशिष्ट गुण परंपरेनें चालत आलेले आढळतात : " एक, भावानें भावांचे खून करणें आणि दुसरा गुण-जो बहुतेक

४४. Manucci, Vol. I, p. 291.
४५. Manucci, II, p. 464.

त्यांच्या सर्व मोठ्या लोकांत दिसतो – प्रसंग पडला म्हणजे कुराणाची शपथ घेऊन आणि गोड बोलून वचन देणें आणि प्रसंग निघाला म्हणजे दिलेलें वचन साफ नाकारणें.[४६]"

८. आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ अनेक उदाहरणें देऊन मनुसी म्हणतो : " सपाटून पैसा कसा मिळवावा, या कलेंत, मोगलांच्या नोकरींत असलेले लहान मोठे सर्व अधिकारी पूर्ण वाकबगार आहेत. पैसा मिळविणें हें त्यांचें मुख्य ध्येय असतें, तें साध्य होत असेल तर, ते वाटेल तें करतील, राजाशीं हि प्रतारणा करण्याला ते मागेंपुढें पहाणार नाहींत. फार काय, लांबेल तितकें युद्ध लांबून आपली चंगळ चालावी म्हणून शत्रूशीं सुद्धां ते संगनमत करतात.[४७]"

९. ज्या अकबराच्या चांगुलपणाचे गोडवे गाण्याची रीत पडली आहे, त्या अकबरानें चितोडच्या राण्याशीं जें विश्वासघाताचें वर्तन केलें, तें पाहून

" चितोडचा किल्ला आधीं च उंच, त्यांत आणखी उंचवट्याचा भाग पाहून, त्यावर उंच स्तंभ उभारून ( देशाच्या जणूं या टोकापासून त्या टोकापर्यंत सर्वांना यावच्चंद्रदिवाकरौ दिसावें म्हणून ) त्यावर राण्यानें पुढील शब्द कोरून ठेवले : No faith should ever be placed in the treacherous Moguls ( विश्वासघातकी मोगलावर कोणीं केव्हां हि विश्वसून राहूं नये[४८] ). " असा सावधानतेचा इषारा चितोडच्या राण्यानें आपल्या धर्मबांधवांना कायमचा देऊन ठेवला होता.

१०. मोगलदरबाराची एकंदर तऱ्हा पाहून मनुसीचें हि मन विटलें होतें, असें दिसतें. तो वैतागून म्हणतो :

" ऐहिक आणि पारलौकिक, या दोन्ही दृष्टींनीं पाहतां, हा देश राहण्याला योग्य नाहीं ! ऐहिक दृष्टीनें पाहिलें तर कोणावर म्हणून विश्वास टाकण्याची सोय नाहीं, अखंड सावध च राहिलें पाहिजे. नेहमीं वाईट धरून च चाललें पाहिजे. बोलतात त्याच्या उलट खरें असेल,

---

४६. Manucci, I, p. 107.

४७. मनुसी, III, p. 270.

४८. Manucci, p. 129.

असें च मानून चालावें लागतें. तुम्ही सावध असा किंवा नसा, ते सर्वांशीं च लबाडीनें वागतात. मैत्रीचा त्यांनीं फार च बहाणा केला, तर मग अति च जपलें पाहिजे. याप्रमाणें जेथें न्यायबुद्धि नाहीं, वचनाची चाड नाहीं, वर्तनाला कसला च निर्बंध नाहीं, अशा देशांत आत्मोन्नति ती कोठून?" मोगलांच्या वर्तनाचा मनुसीला हि इतका वीट आला!

११. जवळ जवळ अर्धें शतक या देशांत मोगलांच्या नोकरींत राहून मनुसी सारख्या परदेशस्थ माणसाच्या जें पाहण्यांत आलें, त्याचे त्याच्या मनावर जे परिणाम घडले, त्यावरून त्याचे जे ग्रह झाले व जे आपण येथवर नमूद करीत आलों, त्यांच्याशीं श्रीसमर्थांच्या अभिप्रायाच्या अवघ्या तीन च ओव्या ताडून पाहिल्या, म्हणजे त्या अभिप्रायांत मनुसीचें सर्व कांहीं म्हणणें आलें, असें प्रत्ययास येऊन श्रीसमर्थांच्या सूक्ष्म अवलोकनाची धन्यता वाटते.

**तुंड हेंकाड कठोरवचनी। अखंड तोले साभिमानी।**
**न्याय नीति अंतःकर्णीं। घेणार नाहीं॥**
**तऱ्हे सीघ्रकोपी सदा। कदापि न धरी मर्यादा।**
**राजकारणसंवादा। मिळों चि नेणे॥**
**ऐसे लौंद बेइमानी। कदापि सत्य नाहीं वचनीं।**
**पापी अपस्मार जनीं। राक्षेस जाणावे॥**

—श्रीदासबोध, १८-६-३ ते ५

राक्षस या अभिधानांत सर्व कांहीं आलें!

## ( सात ) न्यायाची विटंबना

१. त्या काळीं न्यायदानाला मुळीं च उशीर लागत नसे. न्याय कसा तडकाफडकी होत असे. आरोपी पुढें येतां च तत्काळ चौकशी, शिक्षेची सुनावणी आणि शिक्षेचा अंमल हीं क्षणार्धांत होत. प्रवासी टॅव्हरनिअर याच्या समक्ष च अशी एक चौकशी झाल्याचें वृत्त त्यानें आपल्या प्रवासवर्णनांत नमूद केलें आहे. त्या एका हि उदाहरणावरून त्या काळच्या मुसलमानी न्यायपद्धतीची आपणांस कल्पना करतां येईल. टॅव्हरनिअर साक्ष देतात:

४९. Manucci, II, p. 324.

"ठरल्याप्रमाणें ता. १५ सप्टेंबर १६५२ रोजीं सकाळीं सात वाजतां आम्ही नबाब मीर जुमला यास भेटावयास गेलों. आम्ही आल्याची त्यास वर्दी मिळतां च त्यानें आम्हांस आंत बोलाविलें. त्याचें काम चाललें होतें. आम्ही जाऊन बसलों, तरी त्याचें काम चाललें च होतें. त्याचे दोन चिटणीस प्रकरणांची सुनावणी करीत होते आणि हा निकाल सांगत होता. कांहीं निकाल ते दोघे चिटणीस लिहीत होते आणि कांहीं तो स्वतः हि लिहीत होता. आम्ही बसलों च होतों. तेवढ्यांत एका शिपायानें येऊन वर्दी दिली कीं, चार कैदी आले आहेत. त्यानें ऐकलें पण आपलें काम चालू च ठेवलें. अर्धा तास गेला आणि बोलवा कैद्यांना, असा त्यानें एकदम हुकुम केला. कैदी आंत आले, ह्यानें त्यांना विचारलें आणि त्यांच्यावर जे आरोप होते, ते कबूल करण्यास त्यांना भाग पाडलें. नंतर सुमारें एक तास गेला, याचें काम चालू च राहिलें. तेवढ्यांत कांहीं लष्करी अधिकारी येऊन त्यांनीं मोठ्या आदबीनें यास सलाम केला आणि यानें मानेच्या खुणेनें च त्या सलामाचा स्वीकार केला. नंतर शिक्षा सुनावण्यांत आल्या. चौघांपैकीं एकानें घरांत शिरून एक बाई आणि तिचीं तीन मुलें यांना ठार केलें होतें. याचे हात आणि पाय तोडून त्यास रस्त्याच्या बाजूला शेतांत फेकून द्या आणि मरूं द्या त्यास तेथें, अशी शिक्षा झाली. दुसऱ्यानें भर रस्त्यावर चोरी केली होती. याचें पोट चिरा आणि त्यास गटारांत फेकून द्या, अशी त्यास शिक्षा झाली. राहिलेल्या दोघांचे काय गुन्हे होते, ते मला कळले नाहींत, पण त्यांचीं डोकीं उडविण्यांत आलीं. हें इतकें होतें, तों खाना तयार झाल्याची वर्दी आली. तेव्हां आम्हीं आमचें काम काढलें. तुम्ही गोवळकोंड्यास जा, तुम्ही तेथें पोंचण्यापूर्वीं माझें पत्र जाईल, असें त्यानें आम्हांस सांगितलें आणि तो उठला आणि आम्ही तंबूच्या बाहेर पडलों."

२. कसा आहे न्यायाचा मासला आणि कसे होते शिक्षेचे प्रकार ! बाह्य देखावा मात्र किती गंभीर ! तो पाहून एकाद्या आधुनिक वकिलाला, हल्लींच्या एकाद्या मुलकी अधिकाऱ्याच्या स्वारींतील काम करण्याच्या तऱ्हेची आठवण व्हावयाची !

---

५०. Tavernier's Travels in India, Vol. I, Pp. 233-34, Edition of 1925, Oxford University Press.

३. शिक्षेचे प्रकार पाहिले म्हणजे, श्रीसमर्थांनीं आदिभूतिकताप-निरूपणांत 'प्राणी राजदंड पावत' असें म्हणून तिसऱ्या दशकाच्या सातव्या समासांतील ६३ ते ७८ ओव्यांत जे शिक्षांचे अनन्वित प्रकार सांगितले आहेत, ते काल्पनिक नसून त्या काळीं प्रत्यक्ष अंमलांत येत होते, हें आतां सहज पटण्यासारखें आहे.

## ( आठ ) विलास, ऐषआराम, लंपटपणा

१. म्लेंच्छांच्या दुर्जनत्वाचें हें शेवटचें लक्षण होय. चैन करण्याची प्रवृत्ति आणि कामुक वृत्ति, हे त्यांच्या हाडींमासीं खिळलेले सहजगुण होत. शहाण्यांतला शहाणा अशी ज्याची ख्याति, त्या अकबराच्या जनान-खान्यांत पांच हजार स्त्रिया असत आणि प्रत्येकीचा महाल वेगळा, प्रत्येकीचें खाणें, पिणें, बसणें, उठणें, निजणें, वेगवेगळें ! आणि बंदोबस्त तरी केवढा मोठा असे ! त्याचे चरित्रकार लिहितात –

"बादशाही जनानखाना म्हणजे एक स्वतंत्र शहर च वाटावयाचें. प्राकाराच्या आंत कमींत कमी पांच हजार स्त्रिया असत आणि प्रत्येकीची राहण्याची जागा वेगळी असे..... आंतल्या बाजूस रखवाली करण्यास स्त्रीरखवालदार असत, बाहेरच्या बाजूस जवळ प्रथम खोजे, त्यांच्या पलीकडे विश्वासू रजपुत सैन्याच्या तुकड्या आणि त्यांच्या हि पलीकडे, बऱ्या च अंतरावर, इतर सैनिक बंदोबस्तासाठीं असत.[५१]"

२. त्या च अकबराच्या कारकीर्दींत आझाद बेग बऱ्हाणपुरास गेला असतां त्यानें तेथें काय पाहिलें ? जें पाहिलें तें त्यानें लिहून च ठेवलें व जें लिहिलें त्यांत बऱ्हाणपुराबरोबर इतर सर्व च ठिकाणांचा उद्धार केला आहे. तो लिहितो, "येथें च असें नव्हे, तर सर्वत्र बाहेरख्यालीपणा आणि जुगार हे दुर्गुण बड्या लोकांत मोठ्या प्रमाणावर आढळतात.[५२]"

३. "जहानगीर तर म्हणत असे, राज्यकारभार नूरजहाननें पहावा, ती धूर्त आहे, मला फक्त दारूची एक बाटली व मांसाचा तुकडा असला, म्हणजे माझा आनंद आहे.[५३]"

---

५१. Akbar by V. A. Smith, II Edition, p. 359.

५२. E. & D., VI, p. 154.

५३. E. & D., VI, p. 399.

४. जहानगीरचा स्वतःचा कबुलीजबाब आहे, तो 'एक च पेला' याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणतां येईल. जहानगीर स्वतःच्या आठवणींत लिहितो :

"तारुण्यांत चैन करण्याकडे मनाचा ओढा असतां मीं एकदां नोकराला हकीम अल्लीकडे पाठवून, हुषारी आणणारें कांहीं तरी एकादें पेय पाठवा, म्हणून कळविलें. गोड लागणारी, पिंवळ्या रंगाची, सुमारें दीड पेला दारू नोकरानें एका बाटलींत आणली, ती मी प्यालों. फार हुषारी वाटली. त्या वेळेपासून मी दारू प्यायला लागलों आणि दिवसानुदिवस तिचें प्रमाण इतकें वाढत गेलें कीं, तिचा माझ्यावर कांहीं च परिणाम होईनासा झाला आणि मग मी नुसता अर्क च पिऊं लागलों. नऊ वर्षांच्या अवधींत दारू पिण्यांत माझी प्रगति इतकी झाली कीं, दोनदां भट्टींतून काढलेला अर्क, दिवसाच्या कांठीं वीस वीस पेले मी पिऊं लागलों— चौदा पेले दिवसास प्यावे व बाकीचे सहा रात्रींतून पार करावे. त्यांचें वजन हिंदुस्थानांतल्या सहा शेरांइतकें, किंवा इराणांतल्या एक मणाइतकें भरे.... याबद्दल माझी कानउघाडणी करण्याचें धैर्य कोणास होत नसे. आणि शेवटीं हें प्रकरण इतक्या थराला गेलें कीं, मी धुंदींत असतां माझा हात कांपे व मला पेला धरवत नसे, म्हणून दुसऱ्यानें पेला माझ्या तोंडाला लावावा आणि मग मी प्यावें."

५. त्यांचे चिरंजीव शहाजहान. त्यांना निराळा छंद होता. त्यांचें पुष्कळ च वर्णन मनुसीनें केलेलें आहे, पण त्यांतलें आपण, नमुना म्हणून, एक च उदाहरण येथें पाहूं.

"आपल्या विलासार्थ स्त्रिया धुंडून काढाव्या, एवढा च एक उद्योग शहाजहानास होता कीं काय न कळे. यासाठीं तो आपल्या वाड्याच्या आवारांत दरवर्षी यात्रा भरवीत असे. ती आठ आठ दिवस टिकत असे. त्या अवधींत आवारांत येण्याची दुसऱ्या कोणास परवानगी नसे, फक्त स्त्रिया आणि त्यांत हि ज्या देखण्या असतील, तेवढ्यांना च परवानगी मिळे, मग त्या गरीबांच्या असोत कीं थोरामोठ्यांच्या असोत. प्रत्येक स्त्रीनें विक्रीसाठीं माल आणावयाचा, पण त्यांत मुख्य माल म्हणजे तिचें स्वतःचें सौंदर्य.

५४. E. & D., Vol. VI, His Own Memoirs, p. 342.

त्या आठ दिवसांत शहाजहानाची स्वारी, माल खरेदी करण्यासाठीं दिवसांतून दोनदां यावयाची. मुख्य मालाकडे पहात पहात स्वारी जावयाची. तो बरा वाटला म्हणजे तेथें थांबून इतर माल खरेदी करावयाचा व मागण्यांत येईल ती किंमत द्यावयाची. सर्व संकेत ठरलेले असावयाचे, त्याप्रमाणें ती स्त्री राजवाड्यांत यावयाची..... या यात्रेच्या दिवसांत शहाजहानाशिवाय सबंध वाड्यांत दुसरा कोणी पुरुष नसावयाचा." मनुसी लिहितो, "एकदां त्या सर्व स्त्रिया वाड्याबाहेर पडल्या, तेव्हां केवळ जिज्ञासा म्हणून त्या मोजल्या, तर त्या तीस हजारांहून हि जास्त भरल्या.[५५]"

## निष्कर्ष

१. जेव्हां स्वतः राजे आणि त्यांचे लहान मोठे कारभारी आणि अधिकारी, याप्रमाणें पिढ्यान्‌पिढ्या ऐषआरामांत दंग होऊन राहूं लागतात, तेव्हां त्यांच्या राज्याला उतरती कळा लागलेली असते, असें निश्चित समजावें. अशांचें राज्य फार काळ टिकत नसतें. त्यांच्या राज्याचा डोलारा बाहेरून जरी क्वचित् भव्य दिसत असला, तरी तो आंतून पोकळ झालेला असतो व ही स्थिति, राज्यांतल्या आणि राज्याबाहेरच्या चाणाक्ष माणसांच्या लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. पांच पन्नास वर्षे मोगलांच्या नोकरींत आणि निकट सहवासांत काढलेल्या मनुसीच्या लक्षांत ही गोष्ट येऊन चुकली होती, असें स्पष्ट च दिसतें. मोगलांच्या बाह्य वैभवाचें आणि अंतःस्थ सामर्थ्याचें वर्णन करून झाल्यावर त्यानें जे अंतर्यामींचे उद्गार काढले आहेत, त्यांवरून हें स्पष्ट होत आहे. इंग्रजी भाषेंतील उतारे न देतां, मी त्यांचीं मराठींत भाषांतरें च आतांपर्यंत देत आलों, पण मनुसीनें ठांसून केलेलें त्याचें हें महत्त्वाचें विधान इंग्रजींत हि द्यावेंसें मला वाटतें. तें प्रथम इंग्रजींत देतों आणि मग त्याचें मराठींत भाषांतर हि देतों. मनुसी म्हणतो :

"Having set forth all this grandeur and power of the Moguls, I will, with the reader's permission, assert from what I have seen and tested, that to sweep it entirely away and occupy the whole empire nothing is required beyond

५५. Manucci, Vol. I, p. 195. बर्निअरच्या प्रवासवर्णनांत हि अशी च हकिकत आढळते. Pp. 272-274.

a corps of thirty thousand trusty European soldiers, led by competent commanders, who would thereby easily acquire the glory of great conquerers."[५६] म्हणजे "मोगलांचें सर्व वैभव आणि सामर्थ्य काय आहे, तें सांगून झाल्यावर, माझ्या जें पाहण्यांत आलें आणि ज्याची मला परीक्षा झाली आहे, त्यावरून, वाचकांच्या परवानगीनें मी असें ठांसून म्हणूं शकतों कीं, हें साम्राज्य अजिबात उखळून लावून हस्तगत करण्याला वाकबगार सेनापतींच्या हाताखालीं अवघें तीस हजार युरोपिअन शिपायांचें लष्कर पुरें होईल, त्याहून जास्त लागणार नाहीं आणि तेणें करून त्या सेनापतींचा महान् जेते म्हणून सहज च लौकिक होईल."

२. मोगल साम्राज्याची ही दुर्बलता मनुसीच्या लक्षांत इ. स. १७०० त आली, पण तत्पूर्वीं च इ. स. १६६७ त बर्निअरनें हि तसाच अंदाज केला होता. मोगल साम्राज्य उलथून पाडण्यास मनुसीला तीस हजार युरोपिअन शिपाई पाहिजे होते, बर्निअर पंचवीस हजारांत काम भागविणार होता आणि आमच्या श्रीशिवाजीमहाराजांनीं आणि त्यांच्या पश्चात् मराठ्यांनीं किती थोडक्यांत तें च काम केलें ? बर्निअर काय म्हणून गेला, तें पहा :

"गुरांच्या कळपाप्रमाणें सैरावैरा उधळणारें हें मोगलांचें बेशिस्त सैन्य पाहिलें, म्हणजे माझ्या मनांत आल्यावांचून रहात नाहीं कीं, फ्रान्स-मधील नामांकित सेनापतींच्या (त्यानें फ्रान्समधील दोघा तत्कालीन विद्यमान सेनापतींचीं नांवें घेऊन म्हटलें आहे) आधिपत्याखालीं आमचें अवघें पंचवीस हजार तरबेज सैन्य, या मोगली सैन्याचा, तें किती हि प्रचंड असूं द्या, सहज धुव्वा उडवील." याचें हि मूळ इंग्रजी देतों : "I could never see these soldiers, destitute of order, and marching with the irregularity of a herd of animals, without reflecting upon the ease with which five-and-twenty thousand of our veterans from the army in Flanders, commanded by Prince Coude or Marshal Turenne, would overcome these armies, however numerous."[५७]

---

५६. Manucci, Vol. II, p. 441.

५७. Bernier's Travels in the Mogul Empire, A. D. 1656-1668, Edition of 1916, p. 55.

३. हे या दोघांचे प्रचीतीचे आणि आत्मविश्वासाचे बोल वाचून मला तर असें वाटलें कीं, ते जणूं भविष्य च बोलून गेले, कारण यानंतर पांच पन्नास वर्षांत च त्यांचे शब्द खरे झाले! थोडें विषयांतर करून मला असें म्हणावेंसें वाटतें कीं, या पाश्चात्य प्रवाश्यांचीं वर्णनें वाचून च पाश्चात्य राष्ट्रांची लोभी दृष्टि या समृद्ध पण अभागी राष्ट्राकडे वळली असावी !

४. मनुसी हा मोगलांच्या नोकरींतला तरी माणूस होता, पण बर्निअर हा तर निवळ प्रवासी होता, अशांच्या हि लक्षांत जी परिस्थिति आली, तिचा अंदाज

**कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें ।**
**भिक्षामिसें लाहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥**

अशी दुसऱ्यास शिकवण देणाऱ्या श्रीसमर्थांसारख्या सर्वत्र संचार करणाऱ्या महापुरुषाला झाला नसेल, हें कसें संभवेल ? विलासी वृत्ति, ऐषआरामाची आवड आणि दुराचार करण्याकडे स्वभावतः असलेली प्रवृत्ति, यायोगें मोगलसत्ता आंतून पोकळ झालेली होती, हें श्रीसमर्थांच्या हि लक्षांत येऊन चुकलें होतें. त्यांनीं महाराष्ट्राला जो क्षात्रधर्म सांगितला, त्यांत कांहीं क्षत्रियांचें नेहमीं वर्तन कसें असावें, याचें तात्त्विक विवेचन केलें नसून प्रत्यक्ष त्या काळच्या, त्यांनीं अजमावलेल्या परिस्थितींत क्षत्रियांनीं काय करावें, तें च सांगितलें आहे. त्यांनीं महाराष्ट्राला हालवून जागें केलें आहे, धर्मावरील संकटाची जाणीव करून दिली आहे, धर्म बुडत असतां आपण जगावें तरी कशासाठीं, असें म्हणून डवचिलें आहे, महाराष्ट्राचा अभिमान जागृत केला आहे. ही वेळ आहे, एक होऊन चालून जाल, तर यश निश्चित आहे, असा भरंवसा दिला आहे. या दृष्टीनें, क्षात्रधर्मातील शेवटच्या निदान दहा पांच ओव्या वाचकांनीं जरूर अवलोकाव्या :

**देवमात्र उछेदिला । आपला स्वधर्म उडविला ।**
**जिण्यापरीस मृत्य भला । ऐसें समजावें ॥**

**मऱ्हाठा तितुका मेळवावा । आपुला मऱ्हाटधर्म राखावा ।**
**येविषीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥**

**मरणें हक तें चुकेना । देह वांचवीतां वांचेना ।**
**विवेकी होऊन समजाना । काय करावें ॥**

**भले कुळवंत म्हणावें । तेहीं वेग हजीर व्हावें ।**
**हजीर न होतां भ्रष्टावें । लागेल पुढें ॥**

**येक जातीनें दोनि जाती पावला । तो कैसा म्हणावा भला ।**
**तुम्हा सकळांस कोप आला । तरी क्षमा केलें पाहिजे ॥**

**देवद्रोही तितुके कुत्ते । मारून घालावे परते ।**
**देवदास पावती फत्ते । यदर्थीं संदेह नाहीं ॥**

**देव मस्तकीं धरावा । अवघा हलकालोळ करावा ।**
**मुलुक बडवावा बुडवावा । धर्मस्थापनेसाठीं ॥**

**विवेक विचार सावधपणें । दीर्घ प्रेत्न केला चि करणें ।**
**तुळजावराचेनि गुणें । रामें रावण बुडविला ॥**

**ऐसी हे तुळजाभवानी । प्रत्यक्ष रामवरदायनी ।**
**रामदास ध्यातो मनीं । येतन्निमित्य ॥**

—क्षात्रधर्म, १२ ते २०

या विषयाचा आणखी थोडा विस्तार उत्तरार्धांत श्रीशिव-समर्थभेटीच्या वेळीं होईल च, म्हणून आज येथें इतकें च बोलणें पुरें.

५. उत्तरेकडील मोगल साम्राज्यांतील लोकस्थितीचा येथवर विचार झाला. आतां आपण दक्षिणेकडे जाऊं. प्रथम पोर्चुगीज लोकांनीं जो छळ चालविला होता, तो थोडक्यांत सांगून मग खुद्द महाराष्ट्राच्या पोटांत च जे कांटे रुतून बसले होते, ते कितपत खुपत होते, तें पाहूं आणि हा उल्लास संपवूं.

## (आ) पोर्चुगीज लोकांनीं दक्षिणेकडे मांडलेला धुमाकूळ

**कित्येक म्लेंच होऊन गेले ।**
**कित्येक फिरंगणांत आटले ।**

— श्रीदासबोध, १५–२–३

१. येथवर आपण विशेषतः उत्तरेकडे म्लेंच्छांनीं घातलेला धिंगाणा पाहिला, आतां दक्षिणेकडे फिरंग्यांनीं मांडलेला धुमाकूळ पहावयाचा. फिरंगी

म्हणजे मुख्यत: पोर्चुगीज. तेलंगण म्हणजे जसा तेलगु लोकांचा प्रांत, तद्वत् फिरंगण म्हणजे पोर्चुगीज लोकांच्या ताब्यांतील गोव्याकडील मुलुख. वरून मुसलमान, खालून फिरंगी आणि मध्यभागीं पोटांत च बहामनी राज्याचा कांचेचा मोठा तुकडा आणि त्याचे च पुढें झालेले लहान लहान पांच तुकडे, अशांच्या कांचांत एकंदर जनता अगदीं त्रस्त होऊन गेली होती. उत्तरेकडील प्रकार आपण पाहिला, आतां दक्षिणेकडील थोडा वेळ पाहून दु:ख करूं आणि मग एकदम कृष्णातीरीं जाऊन श्रीसमर्थांना गांठूं आणि आनंदानें श्रीरामाचें दर्शन घेऊन त्यांची करुणा भाकूं.

२. तसें करण्यापूर्वी, माझी विचार करण्याची नेहमींची तऱ्हा वाचकांस एकदां केव्हां तरी सांगावयाची च आहे, ती येथें च सांगतों. आकाशांत ध्रुवाच्या भोंवतीं जसे सप्तर्षि फिरत असतात, तद्वत् श्रीसमर्थांना ध्रुवाचा तारा समजून, त्यांच्या पूर्वींच्या आणि नंतरच्या काळाचा विचार करतांना माझ्या विचाराचें चक्र श्रीसमर्थांच्या सभोंवार परिभ्रमण करीत असतें. त्या माझ्या जीवनाच्या ध्रुवताऱ्याकडे अचल दृष्टि लावून च मी पूर्वींच्या काळाचा विचार करतों आणि त्यांच्या चरणांकडे, म्हणजे वास्तविक त्यांच्या पुनरागमनाकडे सारखी टक लावून च मी नंतरच्या काळाचा अंदाज करण्यांत आनंद मानीत असतों. मला पूर्ण विश्वास आहे कीं, श्रीसमर्थ आपली केव्हां हि उपेक्षा करणार नाहींत.

३. पोर्चुगिजांचे पाय या भूमीला कायमचे इ. स. १४९८ त, म्हणजे श्रीसमर्थांच्या जन्माच्या पूर्वी एकशें दहा वर्षें आधीं लागले. त्या वर्षीं वास्को-ड-गामा या देशांत आला. १५०३ त कोचीन येथें पोर्चुगिजांनीं आपला पहिला किल्ला बांधला. १५१० त आदिलशाहीकडून त्यांनीं गोवें घेतलें. स्थूल मानानें १५०० ते १६०० म्हणजे शंभर वर्षें बाहेरच्या एकट्या पोर्चुगिजांनीं च या देशांत सर्वत्र च मनस्वी धुमाकूळ मांडला होता. पुढें मग १६०० ते १६५० यांच्या दरम्यान डच, इंग्रज, फ्रेंच, डेन्स, क्वचित् जर्मन वगैरे बुभुक्षितांच्या धाडी या देशावर येऊन आदळल्या. त्यांच्या लीला काय सांगाव्या? ते सारे — सारे न म्हणतां, बहुतेक म्हणूं या — गुंड होते, दरिद्री होते. त्यांत फार च थोडे चांगले असतील. गुंडगिरींत वरचें स्थान पोर्चुगीज लोकांचें होतें. पशूंचे सर्व गुण त्यांच्यांत

होते. त्यांच्यांतील पुरुष आणि स्त्रिया सारख्या च भ्रष्ट होत्या. त्यांच्यांत चेटुक फार चाले. म्हाताऱ्या बाया चेटकी असत. द्रव्य आणि बायका मिळविण्यासाठीं ते चेटुक करीत. विषप्रयोग, खून, लूट, इत्यादि अत्याचाराचा आणि अनाचाराचा कोणता च प्रकार त्यांना वर्ज नव्हता. १६४६ ते १६६० गोवें शहर लूट आणि खून यांचें आगर बनलें होतें.

४. लूट मिळविणें आणि शक्य तर मुलुख हि हस्तगत करणें, हे त्यांचे हेतु होते च, पण त्यापेक्षां हि त्यांची प्रबळ इच्छा आणि धडपड, इकडील लोकांना बाटवून त्यांना खिस्ती धर्माचा स्वीकार करावयास लावण्याची होती.[५९] ही इच्छा सफल व्हावी म्हणून त्यांनीं अनन्वित अघोरी अत्याचार केले. हिंदु आणि मुसलमान या दोघांना हि, त्यांना बाटवावयाचें होतें. त्यामुळें असें हि घडलें असल्याचा संभव आहे कीं, मूळचा हिंदु, झाला होता मुसलमान आणि पोर्चुगीज आल्यावर बनला खिस्ती! ही दैवाची विचित्र करणी पाहून हंसावें कां रडावें, समजत नाहीं!!

५. धर्मवेडेपणामुळें लोकांचा छळ करण्यांत मुसलमान आणि पोर्चुगीज यांच्यांत कमीअधिक कोण, हें ठरविणें कठीण आहे. पोर्चुगिजांनीं कांहीं कमी केलें नाहीं. अमानुष कृत्यें करण्यांत पोर्चुगीज, मुसलमानांना मुळीं च हार जाणार नाहींत. “सार्वत्रिक समजूत अशी कीं, तत्कालीन पोर्चुगीजसमाज हा विश्वासघातकी, भरंवसा ठेवण्यास सर्वथैव अपात्र, निर्दय, क्रूर, वचन देऊन गळा कापणारा, असा होता. या देशांत आरंभीं जे त्यांच्यांतील धाडशी लोक आले त्यांनीं, त्यांच्यापैकीं विशेषतः ड-गामा यानें, जीं क्रूरपणाचीं कृत्यें केलीं, त्यांचा विसर लोकांना केव्हां च पडला नव्हता[६०]” व पडणार नाहीं.

अशा कृत्यांचीं शेंकडों उदाहरणें देतां येतील, कारण तशीं कृत्यें सर्वत्र आणि प्रत्यहीं घडत होतीं. आपण कांहीं थोडीं पाहूं आणि तेवढ्यांवरून च

---

५८. या कलमांतील सारा मजकूर म्हणजे मनुसीच्या वृत्तांताचा खंड तिसरा, पृष्ठें १ ते २२९ यांतील कथानकाचें सार होय.

५९. 'Malabar and the Portuguese' by K. M. Panikkar, 1919, Pp. 124, 183.

६०. Panikkar, p. 171.

त्या काळीं आमच्या पूर्वजांवर कसे कसे हृदयद्रावक प्रसंग आले होते, त्यांची कल्पना करूं.

६. इ. स. १५०२ तील हा प्रसंग आहे. "कालिकत येथील खोजा कासीमच्या भावाच्या मालकीचें एक जहाज मक्केहून परत येत होतें. ड-गामानें तें वाटेंत च गांठून उभें करविलें, आंतील सर्व माल लुटला व नंतर जहाजावरील सर्वांना बाहेर पडण्याची बंदी केली आणि यात्रेकरूं-सकट जहाजाला आग लावण्याचा हुकुम केला. पोर्चुगिजांना रक्ताची तहान इतकी लागली होती कीं, कसल्या हि मनधरणीचा आणि रदबदलीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. आग लावण्याचा जो हुकुम झाला, तो कायम झाला. पुढचें वर्णन कशास पाहिजे? पोर्चुगिजांच्या राक्षसी क्रूरपणाचा हा एक नुसता मासला आहे! याहून हि कित्येक अमानुष अत्याचार त्यांच्या हातून घडले आहेत.[६१]"

७. त्या च गामानें इ. स. १५०३ त समुद्रांतून कालिकतवर तोफांचा मारा सुरू केला. जमिनीवरून झामोरिनची हि तोफ चालू झाली. अशा प्रकारें लढाई जुंपली तरी सामोपचारानें लढा मिटावा, म्हणून झामोरिननें एक ब्राह्मण वकील ड-गामाकडे पाठविला. तोफांचा मारा चालू असतां च "जीं तांदुळाचीं गलबतें येऊन पोचलीं तीं सर्व गामानें लुटलीं व त्यांवरील सर्व नावाडी लोकांना कैद करून आपल्या माणसांना हुकुम केला कीं, या सर्व नावाड्यांचे हात, कान आणि नाक कापून त्यांना एका लहान गलबतांत टाका आणि त्यांतच या ब्राह्मण वकिलाचे हि हात, कान, नाक कापून त्यास बसवा. त्याचे कापलेले हात, कान, नाक त्याच्या च गळ्याभोंवतीं बांधा व त्याच्या त्या राजाला कळवा कीं, कढी करण्यासाठीं हे तुझ्या वकिलाचे हात-कान-नाक पाठविले आहेत! या अत्याचाराला इतिहासांत तोड सांपडणें कठीण आहे. हें ऐकून झामोरिननें प्रतिज्ञा केली कीं, सारें राज्य खलास झालें तरी बेहेत्तर, पण पोर्चुगिजांची खोड मोडीन.[६२]"

८. तिसरें उदाहरण हि १५०३ च्या च सुमाराचें आहे. "कोचीन-जवळ चेरुवाइपिल काइमल नांवाचा एक लहानसा संस्थानिक होता.

६१. Panikkar, Pp. 49-50.
६२. Panikkar, Pp. 51-52.

त्याची प्रजा सारी तीन हजार नायरांची होती. कोचीनच्या राजाच्या मदतीनें — ही एक त्यांतल्या त्यांत दुःखाची बाजू होय — पोर्चुगिजांनीं त्या संस्थानिकाच्या किल्ल्याला वेढा घातला, त्याचा पराभव केला आणि गांवाला आग लावून आंतील सर्व माणसांना — स्त्रिया, पुरुष, बालकें यांना — जाळून टाकलें. तसें च इडापल्लीच्या राजावर पोर्चुगिजांचा विशेष दांत होता. त्यांनीं त्या राजाचीं गांवें जाळलीं, देवळें भ्रष्ट केलीं आणि बायका-मुलांना गुलाम करून नेलें. जात तेथें हा च त्यांचा उद्योग होता — लुटावें, जाळावें, भ्रष्ट करावें.[६३]"

९. "मंदिरें आणि क्षेत्रांचीं गांवें लुटणें आणि त्यांचा विध्वंस करणें आणि तसें करतांना अमानुष क्रूरपणाचीं कृत्यें करतांना मागें पुढें न पाहणें, हा जणूं पोर्चुगिजांचा नित्याचा व्यवसाय बनला होता. मार्टिन अफोन्सो डी सौझा गव्हरनर म्हणून इकडे येण्यापूर्वीं दोन वर्षें आधीं, इ. स. १५४० त पोर्चुगालच्या राजानें फर्मान काढलें होतें कीं, गोव्यांतील सर्व देवळें पाडून टाकावीं. राजाचा हुकुम होता गोव्यापुरता, पण डी सौझा त्या हि पुढें गेला. त्याला वाटलें, या मूर्तिपूजकांचीं देवळें असतील तेथील सर्व च जमीनदोस्त करून त्यांवरून नांगर फिरविला, देवळांत सांठवून ठेवलेली संपत्ति लुटली आणि ती पोर्चुगालच्या ख्रिस्ती बांधवांत वांटून दिली, म्हणजे राजाच्या हुकमाची पूर्ण अंमलबजावणी केल्यासारखें होईल.[६४]"

त्यानें याप्रमाणें शब्दशः वर्तन केलें. पूर्वपश्चिम किनाऱ्यावरील कांजीवरं वगैरे ठिकाणचीं अनेक देवळें पाडलीं, ब्राह्मणपुजाऱ्यांचा छळ केला, शहरेंच्या शहरें जाळलीं, विपुल संपत्ति लुटून नेली. त्यानें तर दक्षिणे-कडील सारा मुलुख ख्रिस्तमय करून सोडण्याचा बेत केला होता, पण साधला नाहीं, ही गोष्ट वेगळी. तथापि आपल्या धर्मावर केवढें मोठें संकट आलें होतें, याची यावरून कल्पना करतां येते.

१०. शेंकडों उदाहरणांतून हीं चार च उदाहरणें सादर केलीं, त्यांवरून पोर्चुगिजांनीं कसा धुमाकूळ मांडला होता, याची कल्पना होते.

---

६३. Panikkar, Pp. 58-59.

६४. Panikkar, p. 121.

आज हि वाटल्यास श्रीवर्धनपासून गोव्यापर्यंत च समुद्रकिनाऱ्यानें जाऊन पहा, म्हणजे पोर्चुगिजांच्या अत्याचाराचीं दृश्यें नजरेस पडतील. कोणत्याशा युगांत मानवजातीचे पूर्वज वानर होते, म्हणतात. तसे ते होते कां नव्हते, कोण जाणे, पण हल्लींच्या पोर्चुगिजांचे अवघ्या चारशें वर्षांमागचे पूर्वज मानव नसून दानव होते, असें कोणीं सांगितल्यास, तें खरें मानण्याइतका ऐतिहासिक पुरावा आहे.

११. दानवांना शोभणारा आणखी एक च प्रसंग सांगून, आपण पोर्चुगिजांना रजा देऊं. इ. स. १५६० तला हा प्रसंग आहे.

" गोव्याचा मुख्य अधिकारी कोन्डे डी रोडोन्डो यानें डोमिंगस डी मेस्कीटा या तांडेलाच्या आधिपत्याखालीं एक आरमार तयार करून त्या तांडेलास स्पष्ट बजाविलें कीं, मलबारच्या सर्व किनाऱ्यावर जे लोक पकडाल, त्यांना जीवंत ठेवूं नका, ठार करा. वरिष्ठाची ही आज्ञा त्या तांडेलानें शिरसा मान्य करून मोठ्या आनंदानें पार पाडली. थोड्या च अवधींत त्यानें चोवीस गलबतें पकडलीं व त्यास झालेल्या आज्ञेप्रमाणें, त्या गलबतांवरील सर्व लोकांना, एक तर ठार केलें, किंवा अवजारांत शिवून समुद्रांत फेकून दिलें ! असा अंदाज आहे कीं, याप्रमाणें कमींत कमी दोन हजारांची त्यानें वाट लॊवली.[६५] "

तात्पर्य जाळणें, लुटणें, निर्दयपणानें कत्तल करणें, हा पोर्चुगिजांचा त्या काळीं खेळ झाला होता.

१२. पातकांतलें पातक, ज्याला प्रायश्चित्त च नाहीं, असें पातक म्हणजे स्त्रियांचे धिंडवडे. ते बोलावयास च नकोत. एक च सांगितलें म्हणजे पुरे कीं, " पोर्चुगिजांनीं हिंदुस्थानांत येतांना पोर्चुगालमधून बायका आणल्या नव्हत्या[६६] ", असें असतां इकडे त्यांची प्रजा मात्र वाढत गेली, ती कशी ? ज्या स्त्रिया पकडल्या जात, त्यांचीं लग्नें पोर्चुगिजांशीं लावून देण्यांत येत !

६५. Panikkar, p. 129.
६६. Panikkar, p. 129.

१३. हे सारे प्रकार, दक्षिणेकडील तीर्थाटणांत श्रीसमर्थांच्या प्रत्यक्ष पाहण्यांत आणि ऐकण्यांत येऊन च

**म्हाटदेश थोडा उरला ।**

तो कसा, हें सांगतांना त्यांनीं म्हटलें आहे

**कित्येक म्लेंच होऊन गेले ।**
**कित्येक फिरंगणांत आटले ।**
**देशभाषानें रुधिले । किती येक ॥**

–श्रीदासबोध, १५–२–३

## ( इ ) महाराष्ट्राच्या पोटांत रुतलेले कांचेचे तुकडे

प्रथम बहामनी राज्याचा एक सबंध कांचेचा तुकडा महाराष्ट्राच्या पोटांत इ. स. १३४७ पासून १५२६ पर्यंत खुपत राहिला. मग त्या एका तुकड्याचे आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही, इमादशाही आणि बरीदशाही, असे पांच तुकडे होऊन ते फार च जाचक होऊन बसले. तो जाच काय झाला, कीं ज्यापासून महाराष्ट्राला सोडविण्यासाठीं श्रीशिव-समर्थांना अवतार घ्यावे लागले, तो हि थोडक्यांत पाहिल्यावांचून या गुरु-शिष्यांच्या अवतारांची पार्श्वभूमि आपणांस नीटशी कळणार नाहीं.

### बहामनी राज्याचा पहिला सबंध तुकडा

१. हें बहामनी राज्य १३४७ ते १५२६ म्हणजे १७९ वर्षें टिकलें. तें स्थापन केलें अल्लाउद्दीन हुसन शहा गंगु बहामनी यानें व तो धरून त्या सुमारें पावणे दोनशें वर्षांच्या अवधींत त्याचे अठरा राजे झाले. त्याची राजधानी गुलबुर्गा येथें होती. आपणांस कांहीं या ठिकाणीं बहामनी राज्य, किंवा त्यांतून उद्भवलेल्या पांच शाह्या, यांचा सारा इतिहास पहावयाचा नाहीं, तर हिंदुसमाजाला त्यांचा उपसर्ग कसा झाला, एवढें च पहावयाचें आहे. तथापि पुढें ज्यांचा नामनिर्देश होईल, ते कोण होते, हें लक्षांत यावें म्हणून यांचे वंशवृक्ष व गादीवर आलेल्यांचा क्रम, हीं आपल्या नजरेसमोर असणें आवश्यक होय, म्हणून तीं तेवढीं येथें दर्शवूं.

२. बहामनी राजांचा वंशवृक्ष—

अल्लाउद्दीन हुसेन गंगु बहामनी १




३. अल्लाउद्दीनच्या पश्चात् त्याचा मधला मुलगा महमदशहा गादीवर आला. "वेलंपटणचा राजा विनायक देव हस्तगत झाल्यावर, त्यानें कांहीं उर्मटपणाचें उत्तर दिलें म्हणून, शहाच्या हुकुमानें प्रथम त्याची जीभ कापली व मग त्यास पेटवलेल्या खाईत टाकून जिवंत जाळलें.[६७]"

६७. Ferishta by John Briggs, Calcutta Edition of 1909, Vol. II, p. 303.

यानंतर श्रीसंभाजीमहाराजांपर्यंत या क्रूरपणाच्या किती आवृत्या निघाल्या व महाराजांची आवृत्ति कितवी होती, याचा हिशेब नाहीं.

या राजश्रीनें आपल्या सतरा वर्षांच्या कारकीर्दींत लाखों निरपराधी लोकांची कत्तल केली, ती इतकी अमानुष होती कीं, तींतून गर्भारश्या स्त्रिया व आयांच्या अंगावर दूध पिणारीं बालकें सुद्धां सुटलीं नाहींत! या कत्तल करून मारलेल्यांचीं मुंडकीं गुलबुर्ग्यास आणून त्यांची नगर-प्रवेशदरवाजापाशीं रास करण्यांत आली.[६८]

४. तिसरे राजश्री मुजाहिरशाहा यांनीं अनेक मंदिरें लुटून त्यांचा विध्वंस केला व साठ सत्तर हजार लोकांना कैद करून नेलें. त्यांत बहुतेक स्त्रिया च होत्या.[६९]

५. आठवे राजे झाले फेरोजशहा. या राजश्रीला स्त्रियांचा छंद फार असे. त्यांच्या धर्मप्रमाणें एका वेळीं चारापेक्षां जास्त बायका असतां कामा नये, असें आहे, तेव्हां ही अडचण दूर कशी करावी, म्हणून त्यानें धर्मज्ञांचा सल्ला विचारला. धर्मविरुद्ध आचरण न होतां मार्ग निघाला पाहिजे. धर्मज्ञांनीं सल्ला दिला कीं, एकएकीला सोडचिठ्ठी देत जावी व तिच्या जागीं दुसरी आणीत जावी! शियापंथाप्रमाणें हा सल्ला योग्य असला, तरी सुनीपंथाला तो अमान्य होता. सर्व धर्मग्रन्थ उलथेच्या पालथे करण्यांत आले. शेवटीं शियापंथाचें मत स्वीकारून या राजश्रीनें एका दिवसांत, एकामागें एक, अशा तीनशें बायका केल्या.[७०]

" निरनिराळ्या देशांशीं व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांवर हें एक काम सोंपविलेलें असे. त्यांनीं सर्व देशांतून बायका विकत घेऊन आणाव्या व त्यांतून या राजश्रीनें निवड करून कांहींचा स्वस्त्रिया म्हणून स्वीकार करावा व बाकीच्या त्यांच्या दासी म्हणून ठेवाव्या. याप्रमाणें या राजाच्या जनानखान्यांत अरेबिया, जॉर्जिया, टर्की, रशिया, इतर पाश्चात्य राष्ट्रें, चीन,

---

६८. Ferishta, Vol. II, Pp. 312, 326-327.

६९. फेरिस्ता, खंड २ रा, पृ. ३३३, ३३८.

७०. फेरिस्ता, खंड २ रा, पृ. ३६४--६५.

अफगाणिस्थान, राजस्थान, बंगाल, गुजराथ, तेलंगण आणि महाराष्ट्र इत्यादि देशांतील आणि प्रांतांतील स्त्रियांचा भरणा झालेला असे.[७१] "

विलासवृत्तीला कांहीं सीमा राहिली नव्हती.

कुठला हि राजा जिंकला वा अनुकूल करून घेतला, म्हणजे त्याची मुलगी याच्या जनानखान्यांत यावयाची[७२] च.

विजयानगरच्या राजाचा पराजय झाला तेव्हां त्याच्याशीं तह ठरला कीं, "राजानें आपली मुलगी याला द्यावी व शिवाय दहा लक्ष होन, पांच मण मोतीं, पन्नास निवडक हत्ती देऊन पुरुष व स्त्रिया मिळून दोन हजार गाणारे, नाचणारे, वाजविणारे पुरवावे[७३], वगैरे. "

या शर्ती मान्य करणें राजाला भाग पडलें ! फेरिस्ताचा भाषांतरकार व संपादक, यावर टीप देऊन म्हणतो, "आपल्या मुली मुसलमानांना देण्यानें होणारी मानखंडना हिंदु राजांना सहन करावी लागे, तेव्हां त्यांची अवस्था बरी च निकृष्ट झाली असावी. "

६. नववे राजे अहमदशहा. यानें विजयानगरच्या मुलखांत नुसता धुमाकूळ मांडला. देवळें पाडणें, मूर्ति फोडणें, संपत्ति लुटणें, ब्राह्मणांचीं विद्यापीठें उध्वळून लावणें, हा प्रत्येकाचा च उद्योग होता, याचा विशेष च. "ही स्वारी निघाली म्हणजे कत्तल करीत च जावयाची, दयामाया कांहीं न ये, कोणी हि येवो तडाख्यांत, पुरुष, स्त्रिया, मुलें कांहीं पहावयाचें नाहीं, ठार करीत जावयाचें ! अशा रीतीनें ठार केलेल्यांची संख्या वीस हजार भरली म्हणजे तीन दिवस थांबून, तत्प्रीत्यर्थ मोठा उत्सव करावयाचा.[७४] "

७. या राजश्रीचें आणखी एक उदारहण लक्षांत घेतलें पाहिजे. त्यांत दुर्जनपणाचे सर्व च प्रकार आढळतात. हा माहुरवर चालून गेला.

---

७१. फेरिस्ता, खंड २ रा, पृ. ३६९.

७२. ,, ,, ,, ३७८.

७३. ,, ,, ,, ३८५.

७४. ,, ,, पृ. ४०२ E. & D., VI, Pp. 232-33.

तेथील जमीनदार शरण आला व यानें त्यास अभयवचन दिलें. तरी "तो आल्यावर त्यास व त्याच्या बरोबरच्या पांच सहा हजार लोकांना यानें ठार केलें, स्त्रिया व मुलें यांना मुसलमानधर्माचा स्वीकार करणें भाग पाडलें आणि मंदिरें उध्वस्त करून त्यांच्या जागीं मशिदी उभारल्यों."[75]

८. दहावा शहा म्हणजे दुसरा अल्लाउद्दीन. याचा मोठा गुण म्हणजे स्त्रीलंपटपणा. "राज्याचा सर्व भार मंत्र्यांवर टाकून, या स्वारीनें एक हजार सुंदर सुंदर स्त्रिया गोळा केल्या आणि त्यांच्या साठीं एक भव्य राजवाडा बांधला. त्या वाड्याचें नांव सुखनिवास ठेवण्यांत आलें. या सुखनिवासांत त्या हजार रमणींच्या सहवासांत, त्यांचें अधरामृत आणि मदिरा प्राशन करण्यांत आणि गाणें, बजावणें ऐकण्यांत या स्वारीचा सारा काळ जाऊं लागला. इतका कीं, चार चार, पांच पांच महिन्यांनीं एकादे वेळेस स्वारी दरबारांत येऊन बसावयाची[76]!"

९. अकरावे विख्यात शहा हुमायून होत. याचीं कृत्यें पाहून, स्वतः फेरिस्तानें क्रूरकर्मा (Hoomayoon, the Cruel[77]) अशी पदवी त्यास बहाल केली होती, तेव्हां त्याच्या लीला काय वर्णाव्या! त्याच्या क्रूरपणाच्या कृत्यांचा पाढा येथें न वाचतां, असें म्हणावेंसें वाटतें कीं, फेरिस्तानें लिहिलेल्या इतिहासाच्या दुसऱ्या खंडांतील पृष्ठें ४६१ ते ४६४ वाचून ज्याच्या अंगावर शहारे येणार नाहींत असा, आईच्या पोटीं जन्म घेतलेला कोणी मनुष्य असूं शकेल, असें वाटत नाहीं. यानें आपल्या प्रत्यक्ष भावाला वाघाकडून फाडविलें, तापलेल्या तेलांत आणि आधणाच्या पाण्यांत माणसांना टाकून मारलें व निरपराधी अबलांना, त्यांच्या घरांतून ओढून आणून भर चौकांत मांगहृदयी गुंडांकडून त्यांची विटंबना इतकी करावी कीं, ते विटंबनेचे प्रकार निवेदन करण्याची फेरिस्ताला हि लाज वाटली! आणि हे सारे प्रकार पहात राहून या राजश्रीनें आपल्या डोळ्यांचें पारणें फेडून घ्यावें. "यानें स्वतः कित्येकदां

---

७५. फेरिस्ता, खंड २ रा, पृ. ४०७.

७६. फेरिस्ता, खंड २ रा, पृ. ४३६.

७७. फेरिस्ता, खंड २ रा, पृ. २८३ च्या समोरील वंशवृक्ष पहा.

लग्नाच्या मिरवणुकींतून वधूंना उचलून न्यावें, त्यांना भ्रष्ट करावें आणि नंतर त्यांना वरांच्या घरीं पावतें करावें."

१०. बहामनी राज्याची आणि राजांची कल्पना होण्याला एवढीं उदाहरणें बस व्हावींत, असें वाटतें. या उदाहरणांवरून आपणांस एवढें कळून चुकतें कीं, हे राजे दुराचारी, अत्याचारी, स्त्रीलंपट, व्यसनासक्त, विलासी, क्रूर, म्हणजे च श्रीसमर्थांच्या म्हणण्याप्रमाणें, 'उदंड दुर्जन' होते. अशा दुर्गुणांनीं युक्त असलेल्या राजांनीं जवळजवळ दोनशें वर्षें ज्या लोकांवर राज्य केलें, ते लोक किती दीन, दुबळे, लाचार, स्वाभिमान-शून्य, 'मला काय त्याचें' अशा वृत्तीचे असले पाहिजेत, याची हि त्याबरोबर च कल्पना होते.

११. महाराष्ट्राच्या पोटांत रुतून बसलेल्या कांचेच्या या एका तुकड्याचे १५२६ त पांच तुकडे झाले. एका शाहींतून पांच शाह्या उद्भवल्या. हे पांच तुकडे सारख्या आकाराचे नव्हते, लहानमोठे होते. त्यांचें आयुष्य हि त्या च प्रमाणांत होतें. इमादशाही आणि बरीदशाही फार काळ टिकल्या नाहींत व त्यायोगें त्या तितक्याशा तापदायक हि झाल्या नाहींत. त्यांचा मुळीं च ताप झाला नाहीं, असें मात्र नव्हे. पण ते दोन्ही तुकडे लवकर च उपटले गेले. उरलेल्या तीन तुकड्यांचा आतां आपण क्रमशः विचार करूं.

## [ १ ]

## कुतुबशाहीचा कांचेचा तुकडा

### [ इ. स. १४८९–१६८६ ]

१. मंदिरांचा विध्वंस, मूर्तींचा भंग, निरपराधी माणसांची कत्तल, धर्मांतराची सक्ति, विश्वासघात, मुलखाची नासाडी आणि स्वतःची विलास-वृत्ति, हे गुण या पांच हि शाह्यांत सामान्य होते, असें इतिहासग्रंथांवरून म्हणतां येतें. तेव्हां या दुर्गुणांची प्रत्येक शाहींतील दोन दोन, तीन तीन उदाहरणें देऊन या पांच हि – खरें म्हणजे तीन च – शाह्यांचें आपण धांवतें

७८. फेरिस्ता, खंड २ रा, पृ. ४६४ ; E. & D., VI, 235.

निरीक्षण करूं. इमाद ( १४८४–१५७२ ) आणि बुरिद ( १४९२-१६०९ ) या दोन शाह्या अल्पायुष्यी होत्या, त्या सोडून देऊं. कुतुब, निजाम, आदिल या क्रमांत या तीन शाह्या कशा खुपल्या तेवढें च पाहूं.

२. कुतुबशाहीचा जरुरीपुरता वंशवृक्ष :




३. “ पहिला च सुलतान कुली कुतुब देवरकोंडा किल्ला जिंकण्यास निघाला. तो किल्ला एका टेकडीवर असून फार मजबूत होता. पुष्कळ दिवस वेढा पडला, पण अखेरीस तो हस्तगत झाला च आणि नंतर सुलतानाच्या हुकमानें हिंदूंचे वाडे आणि देवळें यांना आगी लावून तीं खाक करण्यांत आलीं आणि त्यांच्या जागेवर मशिदी उभारण्यांत आल्या[७९]. ”

४. कदापि सत्य नाहीं वचनीं ॥ याविषयीं या च सुलतानाचें एक उदाहरण आहे. नलदुर्ग किल्ल्यांत हरिश्चंद्र नांवाचा राजा राज्य करीत होता. सुलतानानें त्याच्यावर स्वारी केली. पुष्कळ प्रयत्न केला, पण किल्ला सर होण्याचें लक्षण दिसेना. सुलतानाचे लोक हि फार मेले. तेव्हां जें कार्य शक्तीनें साधलें नाहीं, तें कपटानें साधण्याचा त्यानें डाव रचला. त्यानें राजास निरोप पाठविला कीं, “ तुम्ही आमचें मांडलिकत्व पत्करून आमच्या मुलखास त्रास देणार नाहीं असें अभिवचन द्याल, तर आम्ही वेढा उठवितों. ” राजानें शर्त मान्य करून सुलतानाकडे मौल्यवान नजराणा हि पाठविला आणि सुलतानानें वेढा उठविला. मग मनीं कपट धरून, किल्ला वर जाऊन

७९. फेरिस्ता, खंड ३ रा, पृ. ३५५.

पहावा, अशी सुलतानानें इच्छा दर्शविली आणि राजानें मान्यता दिली. " मी दोन चार माणसांनिशीं वर जातों, दरवाजावरील रखवालदारांना कापतों, दरवाजा ताब्यांत घेतों आणि तुम्हांस संदेश देतों – खूण करतों – तुम्हीं तत्काळ वर यावें. " असा आपल्या लष्कराशीं संकेत ठरवून सुलतान वर गेला आणि " आंत जातांक्षणीं च तलवार उपसून त्यानें स्वत: रखवालदारांच्या मुख्यास ठार केलें आणि त्याच्या बरोबर आलेल्यांनीं इतर रखवालदारांची वाट लावली. दरवाजा ताब्यांत आला आणि सुलतानाचे रक्षक व एकंदर लष्कर वर आलें. ( नंतर काय झालें, हें कशास सांगावयास पाहिजे ! ) वर एका हि पुरुषाला, स्त्रीला आणि बालकाला जीवंत ठेवण्यांत आलें नाहीं, राजाला कैद करून पिंजऱ्यांत कोंडलें आणि अखेरीस त्यास ठार केलें. "

५. शेवटचा कुली कुतुब सुलतान महमद यानें तर " संकल्प च केला होता कीं, हिंदूंचा धुव्वा उडविण्याच्या कामीं किती हि खर्च येवो किंवा माणसें कामास येवोत, तिकडे पहावयाचें नाहीं. " लष्कर चालूं लागलें म्हणजे " मार्गांत शत्रूच्या मुलखांत लागतील त्या सर्व गांवांना आगी लावीत जा, असा त्याचा हुकुम च होता. " त्याप्रमाणें ठिकठिकाणीं आगी लावण्यांत आल्या, नामांकित आणि भव्य मंदिरें उध्वस्त करण्यांत आलीं, मूर्ति फोडण्यांत आल्या !

६. विलासी वृत्ति आणि स्त्रीलंपटपणा, हे गुण या सुलतानांच्या आंगवळणीं इतके पडलेले दिसतात कीं, ते जणूं त्यांचे उपजत च गुण दिसतात. सुलतान कुली कुतुब याला त्याच्या च मुलानें मारविलें आणि नंतर त्याच्या च मुलामुलांत भांडणें लागून कोणीं कोणाचे डोळे काढले, कोणीं कोणाला मारलें आणि शेवटीं जमशेद कुतुब गादीवर बसला आणि " गोवळकोंड्यास जाऊन विलास करण्यांत ही स्वारी इतकी दंग होऊन गेली कीं, महिनेच्या महिने जनानखान्याच्या बाहेर तो कधीं कोणाच्या नजरेस हि पडला नाहीं. या विलासाच्या पायीं शेवटीं त्याला भयंकर रोग जडला आणि त्यांत च त्याचा अंत झाला. "

---

८०. फेरिस्ता, खंड ३ रा, पृ. ३७३–७४.
८१. " " " ४५६–६०.
८२. " " " ३८९.

७. शेवटचा सुलतान महमद कुतुब. भागामती म्हणून कोणी त्याची राख होती. तिच्या नांवावरून च हैद्राबादचें भागानगर हें नांव पडलें. त्याच्या कारकीर्दींत दिल्लीच्या दक्षिणेवरील स्वाऱ्या होत असतां " हैद्राबादच्या कोतवालानें वरिष्ठाकडे असा वाका पाठविला कीं, अलीकडे मोगलांचे बरे च सैनिक या शहरांत आले असून बाहेरख्यालीपणाशिवाय त्यांना दुसरा उद्योग उरला नाहीं.[८३] "

## [ २ ]

## निजामशाहीचा कांचेचा तुकडा

### [ इ. स. १४९०—१६३७ ]

१. या शाहीचा वंशवृक्ष—




आणि नववा निजाम कोठें गेला ? तर इब्राहिमनंतर रस्त्यांतलें च एक अहमद नांवाचें पोरगें गादीवर बसविलें होतें. तो ९ वा निजाम होय.

८३. फेरिस्ता, खंड ३ रा, पृष्ठ ४७७.

२. यांतले पांचवे निजाम—मीरन हुसेन—म्हणजे बहामनी घराण्यांतला क्रूरकर्मा जो हुमायून, त्याचा शुद्ध दुसरा अवतार होता. त्या क्रूरकर्म्याच्या दुष्टपणाच्या लीला नुकत्या च पाहिल्या, आतां याच्या पहा. श्रीसमर्थांच्या जन्मापूर्वी दहा वीस वर्षांत च याची कारकीर्द गाजली होती. अत्यंत तिरस्करणीय अशी त्याची कारकीर्द झाली. चैन, ऐषआराम, अत्याचार, प्रजेचा छळ, लोकांवर जुलुम, हे त्याचे गुण होते. याची तऱ्हा अशी असे: " दारूच्या धुंदींत घोड्यावर बसून याची स्वारी निघावयाची, बरोबर समानशील सोबती असावयाचे आणि रस्त्यांत भेटतील त्या माणसांना अपराधावांचून ठार मारावयाचें !

३. मुर्तुझाच्या कारकीर्दींत त्याचा भाऊ बुऱ्हाण पळून दिल्लीस अकबराकडे आश्रयार्थ जातो, मीरन हुसेननंतर बुऱ्हाणचा एक मुलगा इस्मायल गादीवर येतो, इतक्यांत अकबराच्या चिथावणीनें बाप बुऱ्हाण परत येऊन मुलाला च पदच्युत करून आपण गादीवर बसतो, पण चार महिन्यांत च मरतो आणि मग त्याचा च दुसरा मुलगा इब्राहिम सिंहासनारूढ होतो. वंशवृक्षाकडे पाहून वाचा, म्हणजे ही विचित्रता ध्यानीं येईल ! पण हे सारे खेळ श्रीशिवसमर्थावतारापूर्वी महाराष्ट्रांतील लोक, नुसते तमासगिरांप्रमाणें पहात च राहिले होते !

४. अहमदनगरची निजामशाही आणि विजापुरची आदिलशाही, या दोन्ही शाह्यांच्या राज्यांच्या सीमा वारंवार बदलत, तरी आंबड परगणा व त्यांतील ठोसरांचें जांब गांव, हीं बहुधा निरंतर निजामशाही अंमलाखालीं च असत. शहाजीमहाराज हि आरंभीं निजामशाहीच्या च नोकरींत होते. वेरूळ हें त्यांचें मूळचें ठिकाण. तें हि बहुधा निजामशाहीच्या अंमलाखालीं असे. श्रीसमर्थ आणि श्रीशिवराय यांच्या पूर्वींपासून च जांबेचे ठोसर आणि वेरूळचे भोसले, या दोन घराण्यांचा निकट स्नेहसंबंध आणि घरोबा होता, अशी जी एक कल्पना आहे, ती बरोबर असण्याचा फार संभव आहे.

---

८४. फेरिस्ता, खंड ३ रा, पृष्ठ २७१.

## [ ३ ]

# आदिलशाहीचा कांचेचा तुकडा

## [ इ. स. १४८९—१६८६ ]

१. या शाहीचा वंशवृक्ष :




२. इतरांप्रमाणें या हि शाहीच्या इतिहासांत दुर्जनपणाचे प्रकार उदंड आढळतात. या शाहीचा संस्थापक जो युसफ, त्यानें संस्थापना केली, तेव्हां त्यास कोणी मुकुंदराव मराठा व त्याचा एक भाऊ यांनीं विरोध केला होता. त्या विरोधास न जुमानतां युसफ विजयी झाला आणि "मुकुंदरावाच्या कुटुंबांतील सर्व माणसें त्याच्या हातीं सांपडलीं. त्यांत मुकुंदरावाची एक बहीण होती, तिच्याशीं युसफनें निका लावून तिचें नांव बुबुजी खानम् ठेवलें. तिच्या च पोटीं तीन मुली आणि इस्मायल यांचा जन्म झाला. तो च इस्मायल युसफनंतर गादीवरब सैला." हिंदूंची

८५. फेरिस्ता, खंड ३ रा, पृ. ३१.

आणि त्यांत हि त्यांच्या स्त्रियांची काय अवस्था झाली असेल, याची कल्पना करवत नाहीं.

३. तिसरे राजेश्री मुल्लु, "याला कांहीं च ताळतंत्र उरला नव्हता. स्त्रिया, दारू, गाणें, बजावणें, नाचणें आणि इतर निंद्य व्यसनें यांच्या नादांत तो सारखा गुंग होऊन राही........राज्यांतील संभावित लोक त्याचा तिरस्कार करूं लागले. प्रजाजनांतील लहान लहान देखण्या मुलांना त्यानें पकडून आपल्या वाड्यांत अनैसर्गिक निर्लज्जपणाच्या कार्यासाठीं ओढून न्यावें."[८६] असे हे बादशहा होते! अशाचा शेवट व्हावयाचा तो च झाला. त्यास गादीवर बसून सहा च महिने झाले होते, तों च त्याचे डोळे काढण्यांत येऊन त्याचा च भाऊ गादीवर आला.

४. बंधु इब्राहिम याची हि तऱ्हा कांहीं निराळी नव्हती. "त्याला दारू पिण्याचें व्यसन जबर जडलें आणि वाईट स्त्रियांच्या संगतींत त्याचा सारा काळ उघडपणें जाऊं लागला. त्यापायीं त्याला साहजिक च अनेक रोग जडले. त्यानें हकिमांना बोलवावें व त्यांच्या उपचारानें गुण न आला, म्हणजे त्यांचीं डोकीं उडवावीं किंवा हत्तीच्या पायीं द्यावें. अशा रीतीनें कित्येक हकिमांचा त्यानें निकाल लावला."[८७]

(५) जसा राजा तशी त्याची प्रजा. या च इब्राहिमच्या कारकीर्दींत "दिलावरखान आयशी वर्षांचा थेरडा झाला होता तरी त्याचें लक्ष एका दक्षिणी रूपसंपन्न कुमारिकेवर गेलें होतें व ती वश व्हावी म्हणून कैक दिवस त्याची खटपट चालली होती. अखेरीस त्याच्या खटपटीस यश आलें व त्यानें ती एक रात्र तिच्या संगतींत कंठली. त्या च वेळीं कांहीं संकटाची खबर देण्यास अनेक दूत आले असतां, त्यांची वर्दी दिलावर-खानापर्यंत पोंचविण्याचें रखवालदारांनीं साफ नाकारलें, कारण माझ्या कार्यांत कोणीं हि व्यत्यय आणतां कामा नये, अशी त्यानें त्यांना सक्त ताकीद देऊन ठेविली[८८] होती."

८६. फेरिस्ता, खंड ३ रा, पृ. ७६.

८७. पूर्वोक्त, पृ. १११.

८८. पूर्वोक्त, पृ. १६७.

६. इब्राहिमनंतर गादीवर आलेला अली आदिलशाहा याचें लक्ष, बेदरच्या बरीदशाहाच्या पदरीं असलेल्या एका देखण्या खोजावर च जडलें होतें! मुर्तुझा निजामशहानें बरीदशहावर स्वारी केली तेव्हां बरीदशहानें अली आदिलशहाकडे मदतीची याचना केली असतां, तो खोजा मला देशील तर मी मदत करीन, अशी शर्त अलीनें घातली. बरीदनें ती शर्त मान्य करून त्या षंढाला अलीकडे पाठविलें. तो षंढ येतां च त्याच्याशीं अलीनें जें वर्तन केलें, त्यायोगें चिडून त्या षंढानें, अलीच्या छातींत खंजीर खुपसून त्याचा प्राण च घेतला.

अशा दुराचारी, व्यसनी, विलासी शाह्यांचीं राज्यें महाराष्ट्रांत अनेक शतकें तरी कशीं टिकलीं, हें नवल नव्हे?

७. हे शहा आपसांत भांडत आणि लढत, तरी हिंदु राजांविरुद्ध ते एक होत व हिंदु मात्र 'मला काय त्याचें' अशा मनोवृत्तीनें अलग अलग रहात. त्यांचीं राज्यें इतकीं वर्षें कशीं टिकलीं, याचीं कारणें त्यांच्या आणि हिंदुसमाजाच्या या मनोवृत्तींत शोधल्यास उमगतील. म्हणून च, मराठा तितुका मेळवावा, हा साधा पहिला च धडा श्रीसमर्थांना हिंदुसमाजाला शिकवावा लागला.

८. याच्या उलट, या मुसलमानी शाह्यांनीं एक होऊन १५६४ त विजयानगरच्या वैभवशाली हिंदुराज्याचा पुरा नाश केला. त्या वर्षीं तालिकोटच्या लढाईत विजयानगरच्या रामराजाचा पराभव होतां च या शाह्यांनीं त्याचें शहर लुटून जणूं अगदीं धुवून काढलें, मंदिरें भ्रष्ट केलीं, प्रचंड वाडे जमीनदोस्त केले, इतर हि अनन्वित अत्याचार केले. शत्रु हातीं लागला म्हणजे त्याचे हालहाल करून त्यास मारावयाचें, याचें श्रीसंभाजी-महाराजांचें उदाहरण, हें च पहिलें नव्हे. त्यापूर्वीं तशीं अनेक उदाहरणें घडल्याची इतिहास साक्ष देत आहे. रामराजा हातीं सांपडल्यावर त्याचें शिर उडविण्यांत आलें व तें तेलांत ठेवून १५६४ पासून १८१८ पर्यंत सालोसाल विजयाच्या दिवशीं अहमदनगरच्या मुसलमानसमाजास दाखविण्यांत येत असे आणि त्यासारखें च धातूचें मुंडकें करून तें

---

८९. फेरिस्ता, खंड ३ रा, पृ. ४३८.

विजापुरच्या किल्ल्यांतील एका गटाराच्या तोंडाशीं बसविण्यांत आलें[९०] होतें.

९. या शहांच्या अंमलाखालीं, राजे आणि त्यांची प्रजा, सारे च ऐषआरामांत दंग होऊन रहात. त्या काळांत विजापुर हें एक अत्यंत विलासी राजधानीचें शहर बनलें होतें. एकानें स्वत: पाहिलेलें विजापुर शहराचें तत्कालीन वर्णन केलेलें आहे, तें वाचलें म्हणजे त्या शहराच्या त्या काळच्या रंगेलपणाची आपणांस कांहींशी कल्पना करतां येईल. तो म्हणतो—

" बाजाराच्या रस्त्याच्या एका बाजूस दारूचें दुकान आणि दुसऱ्या बाजूस, तऱ्हतऱ्हेच्या अलंकारांनीं नटलेल्या, म्हणावी ती इच्छा तृप्त करण्यास तत्पर, अशा सुंदर स्त्रिया आणि तितके च सुंदर त्यांचे साथीदार! थोडक्यांत सांगावयाचें तर, दारू, नाचणाऱ्या सुंदर स्त्रिया, सुवासिक तेलें, सर्व तऱ्हेचे अलंकार आणि खाण्याचे मिष्ट पदार्थ, यांनीं सर्व बाजार भरलेला असे. एका रस्त्यावर तर हजारों स्त्री-पुरुषांचा जमाव जमलेला होता. खावें, प्यावें, बागडावें, चेष्टा कराव्या, प्रेमाच्या गुजगोष्टी कराव्या, यांशिवाय त्यांना दुसरा उद्योग नव्हता. आणि हे सारे प्रकार सतत हांसून खेळून चाललेले असतात. असें वाटतें कीं, विजापुराहून जास्त अद्भुत देखावा पृथ्वीच्या पाठीवर अन्यत्र कोठें क्वचित् च पाहण्यांत[९१] येईल."

## एकंदरींत

१. या पांच हि शाह्या श्रीसमर्थांच्या पूर्वीपासून सुमारें शें सवाशें वर्षें महाराष्ट्राच्या पोटांत, कांचेच्या तुकड्यांप्रमाणें खुपत होत्या. त्यांची तऱ्हा पाहिली तर, त्या एकमेकींशीं एकाकी किंवा जोडीजोडीनें युद्ध करण्यांत सारख्या गुंतलेल्या असत. त्यांपैकीं कोणी हि दुसरीच्या विरुद्ध विजयानगरच्या राजाचें अनेकदां साहाय्य घ्यावें, पण अखेरीस तें च विजयानगरचें राज्य बुडविण्याच्या कामीं त्यांनीं आपसांत जूट केली. याच्या उलट हिंदूंची तऱ्हा होती. मुसलमानांच्या लष्कराला इस्लामचें लष्कर म्हणत,

---

९०. फेरिस्ता, खंड ३ रा, पृष्ठें १३१–१३८ व पृ. १३० वरील तळटीप.

९१. Elliot & Dowson, Vol. VI, p. 164.

तरी सुद्धां चमत्कार असा कीं, इस्लामच्या लष्करांत हिंदु सैनिक असत व ते विजयानगरच्या हिंदु राजाविरुद्ध मुसलमानांची बाजू घेऊन लढत. हा अभिमान-शून्यतेचा विपरीत प्रकार पाहून च महाराष्ट्रियांनो, एक व्हा आणि धर्म राखा, असला सामान्य उपदेश श्रीसमर्थांना करावा लागे.

२. हे शहा तरी हिंदूविरुद्ध एक होत पण व्यक्तिशः स्वार्थ साधण्या-साठीं वाटेल तें पापाचरण करण्यास कचरत नसत. एक शहा मेला म्हणजे त्याला एक च मुलगा असला तर ठीक, नाहीं पेक्षां मुलांत भांडणें लागून तट पडत. ज्याची सरशी होई, तो मग आपल्या भावांना ठार करी, किंवा त्यांचे डोळे काढी, किंवा तुरुंगांत डांबून ठेवी. मीरन हुसेन निजामशहा याच्या कारकीर्दींतील, सन १५८७ तील एक उदाहरण तर असें विचित्र आहे कीं, गादीबद्दल तंटा करण्यास कोणी उरूं च नये, म्हणून एका च दिवशीं राजघराण्यांतील पंधरा राजपुत्रांचे वध करण्यांत[९२] आले! कोण राक्षसी कृत्य हें !

३. राजे स्वतः विलासांत दंग राहून प्रजेवर अत्याचार करीत आणि प्रजा तो सारा छळ निमूटपणें सहन करी. अशी हिंदु समाजाची स्थिति झाली होती. येथपर्यंत आपण मुख्यतः एक च बाजू पाहिली· उत्तरेकडील, दक्षिणेकडील, आणि प्रत्यक्ष महाराष्ट्रांतील राज्यकर्ते कसे विलासी, व्यसनी, स्त्रीलंपट, दुराचारी, मदांध, घातकी, क्रूर, जुलमी इत्यादि उदंड दुर्गुण-संपन्न होते, हें पाहिलें, आतां थोडक्यांत दुसरी बाजू म्हणजे लोकांची काय स्थिति होती ती पाहून हें देशस्थितीचें निरीक्षण संपवूं.

## ( ई ) लोकस्थिति

**दुःखदारिद्र्यउद्वेगें। लोक सर्वत्र पीडिले ॥**

—स्फुट प्रकरणें, ६७

१. या टोकापासून त्या टोकापर्यंत, सर्व देशांतील लोक हीन, दीन, गलितधैर्य, अस्मानी सुलतानीनें त्रस्त, दुष्काळानें कावलेले, दुबळे झाले होते. श्रीसमर्थांच्या पूर्वीच्या शेंसवाशें वर्षांत लढाईवांचून क्वचित् च एकादें वर्ष सुनें गेलें असेल, धाडीवांचून क्वचित् च एकादा दिवस गेला

---

९२. फेरिस्ता, खंड ३ रा, पृ. २७१.

असेल ! सारख्या लढाया चालू होत्या, सारखी अंदाधुंदी माजली होती, शांतता मुळीं च नव्हती.

२. देवाचा हि कोप झाला होता. दुष्काळ वारंवार पडत. इ. स. १६३०–३१ त गुजराथ, खानदेश, दौलताबाद, बालाघाट, या भागांत भयंकर दुष्काळ पडला होता. " हा भाग एरव्हीं अत्यंत संपन्न असे, पण तो च या वर्षीं भाकरीच्या एका तुकड्याला महाग झाला होता. कुत्र्याचें मांस आणि मृतांच्या हाडांची भुकटी पिठांत मिसळून तें पीठ खाण्याचा प्रसंग लोकांवर आला होता. दुर्भिक्ष इतक्या शीगेला जाऊन पोंचलें होतें कीं, माणसें माणसांना खाऊं लागलीं होतीं आणि पितृप्रेमापेक्षां पुत्राचें मांस मिळेल तर बरें, असें म्हणण्याची वेळ आली होती. किती भयंकर अवस्था झाली होती म्हणावयाची ! अन्नावांचून तडफडत असलेल्या माणसांच्या योगानें रस्त्यानें जातांना अडथळा होऊं लागला होता[९३]. "

अस्मानी सुलतानीचे ते तीन प्रबंध[९४] अशा च प्रसंगाला अनुलक्षून असावेत, असें वाटतें. तसें च श्रीमत् दासबोधांतील स्वगुणपरीक्षेच्या शेवटच्या समासांत–म्हणजे तिसऱ्या दशकाच्या पांचव्या समासांत जें आवर्षणाचें वर्णन आहे, तें त्या काळीं नित्याचें च झालें होतें, असें दिसतें.

३. लोकांच्या दारिद्र्याचें आणखी एक प्रबळ कारण म्हणजे " प्रजेला दास्यांत आणि दाबांत ठेवण्यासाठीं बादशहांना जें अवाढव्य लष्कर पोसावें लागे त्यासाठीं व स्वतःच्या वैभवानें जगाला दिपवितां यावें म्हणून जो खर्च करावा लागे, तो रयतेला पिळून च भागवावा लागे. या छळाच्या पायीं रयत किती त्रस्त होत असे, याची तिऱ्हाइतास बरोबर कल्पना होणार नाहीं. बादशहांच्या दरबाराची चैन चालावी म्हणून बडग्याच्या भीतीनें रयतेला सारखें राबावें लागत असे. दरबारच्या छळणुकीमुळें मनाच्या वृत्ती किती हि उचंबळून अनावर झाल्या, तरी प्रचंड लष्करापुढें कोणाचें हि कांहीं चालत नसे[९५]."

---

९३. अबदुल हमीद लाहोरीचा बादशहानामा.

९४. श्रीसांप्रदायिक विविध विषयांक ४४ वा.

९५. बरनिअर, पृ. २३०.

४. अशी च टॅव्हरनिअरची हि साक्ष आहे. "लज्जारक्षणापुरता च खेड्यांतील लोकांजवळ कपडा असतो. त्यांच्या जवळ जास्त कांहीं असल्याचें अधिकाऱ्याला कळलें तर तो तें सक्तीनें घेतो, त्याचा तो जणूं हक्क च असतो. अधिकाऱ्यांच्या असल्या त्रासामुळें लोक गांवें सोडून जातात आणि प्रांतच्या प्रांत ओसाड पडतात. आपण मुसलमान आहोंत, म्हणून अधिकारी हिंदूंचा अनन्वित छळ करतात. आपल्या पाठीमागचा हा छळ चुकावा व श्रम करावयास लागूं नयेत, म्हणून कांहीं हिंदु मुसलमान धर्माचा स्वीकार करून सैन्यांत शिरतात किंवा फकीर बनतात. फकीर म्हटला म्हणजे त्यानें तत्त्वतः सर्वस्वाचा त्याग करून निवळ भिक्षेवर राहिलें पाहिजे, पण वस्तुतः हे फकीर अति डांबरट असतात. असे मुसलमान फकीर या देशांत आठ लाख आहेत, असें सांगतात[१६]."

५. अशा असह्य दारिद्र्याचा एक वाईट परिणाम असा झाला होता कीं, लोकांत स्वाभिमान मुळीं च उरला नव्हता, या स्वाभिमानशून्यतेचें एक दृश्य असे पहा. उत्तरेकडे रजपुत आणि दक्षिणेंत मराठे मुसलमानांतर्फे हिंदु राजांच्या विरुद्ध खुशाल लढत असत. यांत कांहीं स्वजनद्रोह आहे, अशी नुसती कल्पना हि त्यांच्या मनाला शिवत नसे. याचीं असंख्य उदाहरणें सांगतां येतील. तीन मुसलमान शाह्यांनीं एक होऊन विजया-नगरच्या राज्याचा जो धुव्वा उडविला, जो सपशेल नाश केला, जीं प्रचंड देवळें उध्वस्त केलीं, टोलेजंग वाडे जाळले आणि जमिनीसपाट केले, त्या वेळीं मुसलमानांच्या सैन्यांत मराठे होते च, आणि याचें वर्णन एका हिंदु इतिहासकारानें मोठ्या कौतुकानें आणि अभिमानानें केलेलें आहे. हिंदूंच्या बावळटपणाला सीमा च उरली नव्हती. सकाळच्या प्रहरीं बादशहा वाड्याच्या खिडकींत येऊन बसल्यावर त्याचें दर्शन घेतल्यावांचून अन्न ग्रहण करावयाचें नाहीं, असा कित्येक हिंदूंचा नियम होता! अशा हिंदूंना 'दर्शनी' म्हणत[१७].

६. या सर्व हीन स्थितीचें सार सर थॉमस रो यानें एका लहानशा वाक्यांत पांच च शब्दांत काढलें आहे. हा इंग्रज गृहस्थ या देशांत

१६. Tavernier, Vol. I, Book II, Pp. 311-12, Second edition of 1925.

१७. E. & D., Vol. VII, p. 284.

व्यापाराच्या सवलती मिळविण्यासाठीं जहानगीर बादशहाकडे ईस्ट इंडिया कंपनीतर्फे वकील म्हणून इ. स. १६१५ ते १६१९ सालांत आला होता. त्यानें ता. २४ नोव्हेंबर १६१५ रोजीं आपल्या कंपनीकडे पाठविलेल्या पत्रांत एक वाक्य आहे. त्या वाक्यांत या देशांतील तत्कालीन लोकस्थितीचें सर्व सार आलें आहे. 'The[९८] cuntrye (?) is all slavish' म्हणजे 'हा सारा देश गुलामवृत्तीचा आहे.'

७. ज्यांचा या देशाशीं कांहीं संबंध नव्हता, अशा परकीयांच्या नजरेस जी देशस्थिति पडली ती, डोळे आणि कान उघडे ठेवून सर्वत्र संचार करणाऱ्या श्रीसमर्थांच्या नजरेंतून कशी निसटणार ? त्यांचें 'परचक्र-निरूपण' म्हणून एक लहानसें प्रकरण आहे. पण दुर्दैव असें, तें अपुरें च मिळालें. जेवढें मिळालें तेवढें श्रीसांप्रदायिक विविध विषयांक २४ यांत दिलेलें आहे. त्यांतील कांहीं ओव्या पहा :

**पदार्थमात्र तितुका गेला । नुस्ता देश चि उरला ।**
**येणें करितां बहुताला । संकट जालें ॥ २८**

**लोकें स्थानभ्रष्ट जालीं । कितेक तेथें चि मेलीं ।**
**उरलीं तें मराया आलीं । गांवावरी ॥ २९**

**माणसा खावया धान्य नाहीं । आंथरुण पांघरुण तें हि नाहीं ।**
**घर कराया सामग्री नाहीं । काये करिती ॥ ३१**

**कितेक अनाचारीं पडिलीं । कितेक यातिभ्रष्ट जालीं ।**
**कितेक तें आक्रंदलीं । मुलें बाळें ॥ ३३**

**कितेकीं विषें घेतलीं । कितेक जळीं बुडालीं ।**
**जाळिलीं ना पुरिलीं । किती येक ॥ ३४**

**ऐसें जालें वर्तमान । पुढें हि अवघा अनमान ।**
**सदा दुश्चीत अवघे जन उद्वेगरूपी ॥ ३५**

**अद्यापि दुश्चिन्हें दिसतीं । दुष्ट ग्रह आडळती ।**
**पुढें हि वाईट सांगती । किती येक ॥ ३६**

**अखंड चिंतेच्या प्रवाहीं । पडिले लोक ॥ ३७**

---

९८. The Embassy of Sir Thomas Roe to India, Vol. I & II, Edition of 1899, Vol. I, p. 100.

प्राणीमात्र जाले दुखी । पाहातां कोण्ही नाहीं सुखी ।
कठिण काळें वोळखी । धरीनात कोण्ही ॥ ४०

लोक बहुत प्रस्तावले । किती येक जाजावले ।
किती येक ते कावले । उद्वेगरूपी ॥ ४१

८. तसें च हल्लींचा काळ आणि परिस्थिति हीं हठयोगाला अनुकूल नाहींत हें आपल्या मनावर बिंबवीत असतां श्रीसमर्थ काय म्हणाले, तें श्रीदिनकरांनीं आपल्या ग्रैन्थांत नमूद करून ठेवलें आहे, तें हि थोडक्यांत पहा :

बोलतां कळीचें महिमान । धर्म जाला कंपायमान ।
जे युगीं राजा यवन । तेथें अन्य वार्ता कायसी ॥ ७१

जे युगीं देव धर्म बुडाले । अवघें येकंकार जालें ।
सत्य जातीनसीं हारपलें । स्वधर्मासकट ॥ ७२

ब्राह्मण कर्मभ्रष्ट जाले । स्वाहास्वधाकार राहिले ।
वर्णाश्रमधर्म बुडाले । जातीकुळेंसीं ॥ ७३

राजा देवद्रोही जाला । देवस्थळांचा उछेद केला ।
तीर्थमहिमा सकळ मोडिला । ठाईठाईंचा ॥ ७४

राज्यांचीं अनेक बंडें जालीं । गोब्राह्मणावरी पालाणें पडिलीं ।
पृथ्वी हलकालोळ जाली । कोण्ही नव्हे कोण्हाचें ॥ ७५

पर्जन्याचें आवर्षण अखंड । राजा प्रजा लोक दुखंड ।
पृथ्वी जाली शतसहस्र खंड । सौख्यवार्ता न दिसे ॥ ७६

कुळस्त्रिया भ्रष्टविल्या यवनीं । ब्राह्मण जाले दासीगमनी ।
अंत्यजाचे गृहीं उत्तमवर्णी । बळात्कारें भ्रष्टिजे ॥ ७७

तेणें जाला वर्णसंकर । वृद्धि पावला अनाचार ।
परस्त्रीपरद्रव्यापहार । परन्युन्य स्वेच्छा बोलती ॥ ७८

कुळवधु निर्लज्जा जाल्या । त्या हीनयातीसीं रतल्या ।
लोकापवादें भ्रष्टल्या । देशोदेशीं फिरती ॥ ७९

श्रीपाद जाले द्रव्याभिलाषी । साळी कोष्टी जाले जटिळ संन्यासी ।
ब्राह्मण फिरती देशोदेशीं । उपार्जना करित ॥ ८०

---

९१. स्वानुभवदिनकर ९-१-७१ ते ८१.

**तीर्थें क्षेत्रें व्रतें उद्यापनें । सकळ हि उच्छेदिलीं यवनें ।**
**धर्मचर्चा पुराणश्रवणें । कथाकीर्तन राहिलें ॥ ८१**

याप्रमाणें अवघा धुंधुकार जाला होता. अशा या सर्व परिस्थितीचा आशय श्रीसमर्थांनीं मथळ्याच्या जागीं दिलेल्या एका अष्टाक्षरींत आणला आहे.

**दुःखदारिद्र्यउद्वेगें । लोक सर्वत्र पीडिले ॥**

पण चमत्कार असा, ही स्थिति पालटण्याचा प्रयत्न केला पाहिजे, असें श्रीशिवसमर्थांच्या पूर्वीं एकाच्या हि मनांत येऊन त्या दिशेनें पाऊल पडल्याचें आढळत नाहीं. सारी जनता गलितधैर्य होऊन, 'आलिया भोगासी असावें सादर', असें म्हणून हताश होऊन बसली होतीं.

९. या सर्वांत वाईट गोष्ट अशी होती कीं, देशांतील प्रमुख कर्तृत्ववान् हिंदु लोकांत ऐक्य नव्हतें, फूट होती; आणि या फुटीला प्रोत्साहन बादशहाकडून च मिळे. "हिंदुराजांत आपसांत मत्सर उत्पन्न करून कलह माजविणें, हें बादशहाचें धोरण च [१]असे." पाश्चात्यांना याचें मोठें नवल वाटे कीं, "हे हिंदु लोक मुसलमानांच्या पेक्षां संख्येनें पांचपट सहापट असतां मुसलमान राजांच्या जोखडाखालीं मुकाट्यानें आपल्या माना कशा देतात. पण या हिंदु लोकांत आपसांत सख्य व जूट नाहीं, त्यांच्यांत इतके भिन्न भिन्न पंथ आणि निरनिराळ्या चालीरीति आहेत कीं, त्यांच्यांत एकोपा होणें शक्य च [२]नव्हे" हें त्यांच्या लक्षांत आलें म्हणजे सकृद्दर्शनीं त्यांना वाटणाऱ्या आश्चर्याचें आपोआप निराकरण होई.

१०. आणि हें खरेंच कीं, हिंदूंच्या केवळ आपसांतील वैमनस्यामुळें मुसलमानांचें इतकीं शतकें फावलें. वास्तविक पाहतां, शक्तीनें, युक्तीनें, बुद्धीनें, ज्ञानानें, नीतीनें, सदाचारानें, तात्पर्य सुसंस्कृतीच्या सर्व अंगोपांगांनीं हिंदुसमाज श्रेष्ठ होता, पण त्याच्यांत केवळ विसकळितपणा होता, म्हणून परक्यांच्या जूंखालीं त्यानें शतकानुशतकें आपली मान वांकविली. त्या काळीं जयपुरचे जयसिंग, जोधपुरचे जसवंतसिंग आणि चितोडचे राणे, हीं

---

१००. बर्निअर, पृ. २१०.

१०१. हें त्या काळचें प्रमाण विचाराला चालना देईल.

१०२. Tavernier, Vol. II, Book III, ch. III, p. 141.

केवढालीं प्रस्थें होतीं ! हे तिघे च कां, असे आणखी शंभर राजे असतील, त्यांत निदान पंधरा सोळा तर सारखे बलवान् होते, त्यांत हे तिघे विशेष च प्रबळ होते. जयसिंगाच्या पदरीं असलेला मनुसी जयसिंगाविषयीं म्हणतो कीं, "राजा जयसिंग अत्यंत बलवान् आणि संपत्तिमान् असून साऱ्या हिंदुस्थानांत त्याचा तसा लौकिक होता. त्याचें सामर्थ्य इतकें मोठें होतें कीं, मोगलसाम्राज्यांत त्याच्या बरोबरीचा दुसरा कोणी नव्हता.[१०३]"

जयसिंगाविषयीं बर्निअरनें हि असें च मत व्यक्त केलेलें आहे. "मिरजा राजा या नांवानें विशेष ओळखला जाणारा राजा जयसिंग हा, हल्लीं साम्राज्यांत जे विशेष संपत्तिमान राजे आहेत, त्यांपैकीं एक असून सामर्थ्याच्या बाबतींत तर, सबंध राज्यांत तो सर्वांहून श्रेष्ठ आहे.[१०४]"

जसवंतसिंगाविषयीं हि बर्निअर म्हणतो कीं, "महत्त्व आणि सत्ता या बाबतींत जसवंतसिंग हा जयसिंगाहून कमी नाहीं.[१०५]"

आणि चितोडच्या राण्याच्या सामर्थ्याविषयीं तर बोलावयास च नको. पण दुर्दैव कसें तें पहा ! हे तिघे कधीं एक झाले नाहींत ! "ते तिघे एक होऊन बादशहावर चालून जाते, तर त्यांच्यापुढें बादशहाचा टिकाव लागला नसता, कारण या प्रत्येकापाशीं वीस वीस हजार घोडेस्वारांचीं पथकें नेहमीं सज्ज असत व तीं इतकीं तरबेज असत कीं, त्यांच्यापुढें सामन्याला उभें राहण्याची कोणाची ताकद नव्हती.[१०६]"

११. असें असतां, हें केवढें आश्चर्य म्हणावें कीं, या तिघांच्या मनांत आपण एक व्हावें, मोगलसत्ता झुगारून द्यावी, आपण स्वतंत्र व्हावें आणि देश स्वतंत्र करावा, धर्मावरील संकटाचें निवारण करून तो निर्भय करावा, असें कधीं आलें च नाहीं ! मोगलांच्या अवडंबराची इतकी मोहिनी त्यांच्या मनावर पडली होती. इ. स. १०११ ते १५२६ या पांचशें वर्षांत गिजनी, घोरी, कांहीं गुलाम घराणीं सुद्धां, खिलजी,

---

१०३. Manucci, Vol. I, p. 243.

१०४. Bernier, p. 35.

१०५. Bernier, p. 37.

१०६. Bernier, p. 208.

तघलक, सयद, लोदी आणि अखेरीस मोगल, इतकीं निरनिराळीं घराणीं दिल्लीच्या तक्तासाठीं भांडलीं, कांहीं कांहीं वेळां तर हे बादशहा इतके दुर्बल झाले होते कीं, दिल्लीच्या पंचक्रोशीच्या बाहेर त्यांची सत्ता चालत नव्हती, त्यांना कोणी विचारीत नव्हतें, मध्यंतरीं तघलक घराण्याच्या अवनतीनंतर छत्तीस वर्षें वस्तुतः कोणी सत्ताधारी बादशहा नव्हता च म्हटलें तरी चालेल, पण चमत्कारांतला चमत्कार आणि आश्चर्यांतलें आश्चर्य असें कीं, या पांचशें वर्षांच्या काळांत आणि अशा परिस्थितींत एका हि रजपुत राजानें वा संघानें पुन्हां दिल्लीचें तक्त हस्तगत करण्याचा प्रयत्न केला नाहीं!

१२. हें असें कां झालें? याचें उत्तर पूर्वीं दिलें तें च. सारीं रजपुत घराणीं एकमेकांना शत्रूप्रमाणें लेखीत होतीं, म्हणून कोणी च दिल्लीच्या तक्तावर जाऊन बसण्यास धजावला नाहीं. त्यांच्यांत सामर्थ्य होतें, पण संगनमत नव्हतें. सतरांदा मनुसीनें म्हटलें असेल, हे रजपुत राजे एक निश्चय करून उठले असते, तर त्यांनीं मोगलांना हिंदुस्थानाबाहेर क्षणार्धांत पिटाळून लावलें असतें.

१३. जी दुर्बलता दिल्लीच्या तक्ताला आली होती, ती च महाराष्ट्रांतील उरलेल्या तीन हि शाह्यांना, त्या च, तसल्या च कारणांमुळें आलेली होती. मुसलमानी सत्ता ढांसळून पडण्याच्या पंथाला लागली होती. ती नामशेष करण्याचा कोणी प्रयत्न करण्याचा अवकाश होता. श्रीसमर्थांनीं हें जाणलें होतें. ते काळाचे हि काळ होते. इतरांप्रमाणें काळापुढें मान न वाकवितां काळाला हि त्यांनीं आपलें अंकित केलें, परिस्थितीच्या आहारीं न जातां त्यांनीं परिस्थितीवर हि मात केली. त्यांनीं महाराष्ट्राला एकीचा मंत्र दिला आणि यत्नरूपी देवाची गांठ घालून दिली. हें सारें कसें, तें हळू हळू पुढें उकलत जाईल च. सध्यां आपलें मन कृष्णातटाकीं त्यांच्या चरणांपाशीं जाण्यास उतावीळ झालें आहे.

---

१०७. Manucci, Vol. II, p. 440.



भी मो ल्लास अकरावा

# कृष्णातीरगमन

[ १५६६–१५७८ ]



गंगातीरीं जो जन्मला ।
तो चि कृष्णातीरा गेला ।
तेथें प्रताप प्रकटला ।
तो धन्य साधु ॥

ब्रह्मदेवाचें भविष्यवचन ।
कलयुगीं हनुमान अवतार होईल जाण ।
आपआपणा जागें करून ।
जगदोद्धार करील ॥

[ ( १ ) श्रीसमर्थांना लागलेली चिंता – ( २ ) कृष्णातीरीं जाण्याचा निश्चय – ( ३ ) कृष्णातीरीं विशेष काय होतें – ( ४ ) पिसाटासारखें वागणें, चंद्रगिरीच्या डोंगरांतील घळ – ( ५ ) त्यांच्या मनांतील खळबळ व्यक्त करणारें पद – ( ६ ) कोल्हापुरास प्रसन्नता वाटली, कोल्हापुरवर्णन – ( ७ ) जमदग्नीची प्रार्थना – ( ८ ) सातारा ते कोल्हापुर संचार – ( ९ ) गांवोगांवचे लोक भजनीं लागले – ( १० ) श्रीसमर्थस्थापित मारुती ओळखण्याची खूण – ( ११ ) अकरा मारुतींची स्थापना – ( १२ ) स्थापनेचा काळ ]

( १ ) वरील पहिल्या ओवीनें श्रेष्ठांनीं आपल्या धाकट्या बंधूस पाठविलेल्या एका पत्राचा शेवट केला आहे. तीर्थाटण झालें, देशस्थिति नजरेस पडली, धर्मावरील प्राणांतिक संकटाची कल्पना आली, ही स्थिति लवकर पालटली नाहीं, तर धर्म कांहीं टिकत नाहीं, अशी खात्री झाली. चिंता वाटूं लागली, चित्त विव्हल झालें, ही स्थिति पालटण्याला काय करावें, याचा विचार सुरू झाला, स्वतःच्या मनाशीं झाला, तसा इतरांबरोबर हि झाला. श्रीसमर्थप्रतापांतील आतांपर्यंत सर्वतोमुखी झालेल्या त्या तीन ओव्यांत त्यांच्या अवताराचा हेतु प्रकट होत आहे. धर्म कसा टिकणार, लोक कसे वांचणार, ही च एक चिंता त्यांना लागून राहिली होती.

**श्रीगुरुसमर्थ येकांतीं बैसती ।**
**प्रांतीचे लोक दर्शनासी येती ।**
**सकळ प्रांतीचा स्वामी परामर्श घेती ।**
**चिंता करिती विश्वाची ॥**
**देशकाळवर्तमानें । आपण चिंताग्रस्त होती मनें ।**
**म्हणती कैसी वांचतील जनें । कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥**
**कैसी क्षेम राहेल जगती । कैसीं देवदेवाल्यें तगती ।**
**कैसे कुटुंबवत्सल लोक जगती । कोणेकडे जातील हे ॥**

–श्रीसमर्थप्रताप, २०–५८ ते ६०

( २ ) धर्मावर आलेलें संकट त्यांनीं स्वतः पाहिलें होतें आणि प्रांतोप्रांतींच्या लोकांच्या तोंडून ऐकलें होतें. धर्मसंस्थापना हें च त्यांच्या जीवितांचें कार्य होतें. त्या कामीं साहाय्य करण्याची पात्रता कोणांत असल्याचें, उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील पर्यटणांत त्यांना आढळून आलें नव्हतें. कैपक्षी परमार्थी राजसत्तेवांचून धर्मरक्षण होत नसतें. अशा

राजाच्या शोधांत ते होते. तीर्थाटण संपवून पुनरपि पंचवटीस श्रीरामचरणीं वृत्त निवेदन करण्यास ते आले असतां पुन्हां शहाजीराजांची भेट झाली असणार व त्यांच्याशीं देशस्थितीबद्दल बोलणें चालणें होऊन त्यांच्याशीं संकेत ठरून च कृष्णातीरीं जाण्याचा श्रीसमर्थांचा निश्चय झाला असला पाहिजे.

( ३ ) कृष्णातीरीं असें विशेष काय होतें ? त्या भागांत अरुणोदय झाला होता आणि स्वातंत्र्यसूर्य उदयास येऊं पहात होता. शक १५६६–६७ चा तो काल होता. शहाजीमहाराजांच्या पुत्रानें हिंदवी स्वराज्य स्थापण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून त्या दिशेनें पाऊल टाकण्यास हि सुरुवात केली § होती. आधीं महाबळेश्वर, जरंडा, वगैरे दहा पांच ठिकाणीं जाऊन व पाहून श्रीसमर्थांनीं अखेरीस तळ दिला मसुर येथें, कारण मसुरची पाटिलकी होती शहाजीमहाराजांकडे आणि संचार सुरू केला, हल्लीं ज्याला पुणें जिल्हा, सातारा जिल्हा, कुलाबा जिल्हा, सांगली, मिरज, कोल्हापुर इत्यादि संस्थानें म्हणतात, त्या प्रांतांत.

( ४ ) त्या प्रांतांत संचार करीत असतां आरंभीं आरंभीं त्यांचें वागणें पिसाटासारखें मुद्दाम च होतें. पिसाट रामदास म्हणून च त्या काळांत ते चहुंकडे ओळखले जात. ते निर्भयपणें एकांतांत रानावनांत, डोंगरांत रहात. डोंगरांतल्या घळींत राहण्याची त्यांना आवड फार असे. त्यांच्या राहण्याच्या अनेक घळी असतील, पण त्यांपैकीं माझ्या पाहण्यांत अवघ्या पांच आलेल्या आहेत. त्यांचें वर्णन मी यथावकाश पुढें एकाद्या उल्लासांत करीन. प्रस्तुतच्या प्रसंगीं एक घळ डोळ्यांपुढें येते. कृष्णेच्या एका हाताला मसुर, शहापुर, तर उंब्रज, चरेगांव दुसऱ्या हाताला. त्या चरेगांवच्या पाठीशीं चंद्रगिरीचा डोंगर असून त्यांत श्रीसमर्थांची एक घळ आहे. त्या घळींत आरंभीं ते फार करून रहात. ते राहण्यास येण्यापूर्वीं त्या घळींत एक वाघ रहात असे. त्यास त्यांनीं हुसकून[१] देऊन दुसरीकडे जाण्यास सांगितलें आणि आपण स्वत: त्या घळींत राहूं लागले. त्यांच्या सर्व च घळी रम्य आहेत, त्यांत कोणती विशेष रम्य म्हणून मी सांगूं ! पण, या घळीचें

§ मराठ्यांच्या इतिहासचीं साधनें, खंड १५ वा, लेखांक २६८.

१. श्रीसमर्थप्रताप, ३–६१ पहा.

त्यांनीं स्वत: च वर्णन केलेलें आहे, तसें दुसऱ्या कोणत्या घळीचें केलेलें मला आढळलें नाहीं. हें वाक्य लिहिलें गेलें आणि शिवतरच्या घळीचें त्यांनीं केलेलें वर्णन आठवलें. असो, तें हि पुढें पाहूं. चंद्रगिरीच्या डोंगरांतील या घळीचें श्रीसमर्थ वर्णन करितात.

( बाडांक ६१८ वरून )

**चंद्रगिरीचा डोंगर । त्यांत गुप्त येक शिखर[1] ।**
**तेथें राहे योगेश्वर । निरंजन ॥ १**
**रे नवलें त्या निरंजनाचें । शिखर पाहों आकाशाचें ।**
**ऐसें पृथ्वीमध्यें कैंचें । पाहों जातां ॥ २**
**जागा सुंदर गहन । तेथें सुखावलें मन ।**
**वरी पाहतां गगन । सांटवलें ॥ ३**
**तेथें अखंड नाहीं वात । म्हणउनि जागा तो निर्वात ।**
**शीतकाळीं घुमघुमीत । वस्त्र नलगे ॥ ४**
**कृष्णा कोन्या दोहींकडे । मध्यें पर्वताचे कडे ।**
**मंडळ पाहातां चहुंकडे । समाधान ॥ ५**
**तळीं असती शेतें भातें । तया फिरताती आउतें ।**
**नानापरोचीं मार्गस्थें । येति जाति ॥ ६**
**वरती सेरढें मेंढरें । गुरेंसीं गुरें वांसरें ।**
**ठाईं ठाईं गुराखी पोरें । क्रीडा करिती ॥ ७**
**भोंवतीं डोंगराचीं थाटें । दिसती कडे आणि कपाटें ।**
**सवेंचि येताती धुकटें । झांकोळती ॥ ८**
**तळीं पाहतां आकाश । दिसे दुसरें कैलास ।**
**तेथें जावया संतोष । वाटतसे ॥ ९**
**तया खालती आहे माण । वरतें आहे तळकोंकण ।**
**कऱ्हाड दंतागिरि पट्टण । पंचक्रोशी ॥ १०**
**राया रघुनाथाचें देणें । जालें हनुमंताकारणें ।**
**देव पाहावया पारणें । डोळ्याचें ॥ ११**
**रामदासाचा विसांवा । रुद्र जाहाला अक्रांवा ।**
**भक्तजन वेगीं धांवा । दर्शनासी ॥ १२**

---

१ ‘ विवर ’ पाठांतर.

हें कसें सुंदर वर्णन आहे ! त्या घळींत आपण जातों, तें ढगांच्या वर जातों, ढग खालीं च राहतात. असें वाटतें, आपण स्वर्गांत च चाललों आहोंत, पण जेथून परत हि येतां येतें, अशा स्वर्गांत ! श्रीसमर्थांनीं केलेलें हें वर्णन वाचीत असतां, ती घळ पहावयास व तेथील स्वर्गसुख भोगण्यास आपण हि जाऊन परत येऊं, असें कोणाच्या मनांत येणार नाहीं ? भक्तजन हो, वेगीं धांवा दर्शनासी, म्हणून तुम्हा आम्हा सर्वांस श्रीसमर्थ च बोलावीत आहेत !

(५) सर्वत्र संचार करीत असतां मनांत सारखा निराळा च विचार चालला होता. महाबळेश्वराच्या डोंगरांत हिंडले, माहुलीच्या रानांत फिरले. मला शंका वाटत नाहीं, त्या संचाराच्या काळांतील त्यांच्या मनांतली खळबळ अनेक पदांत व्यक्त झालेली आहे, त्यांपैकीं च पुढील एक पद होय. त्या पदांत त्यांचें या वेळचें आत्मचरित्र च आहे.

( गिरिधरांच्या हातचीं पदपदांतरें – पद १४२ वें )

**संसारसासुरां तुवां बोळविलें ।**
**येथें बहुत दिवस कां टाकिलें रे रामा ॥**
**रात्रीदिवस तुझी वाट पाहे ।**
**मज अत्यंत संसारें गांजिलें रे रामा ॥ १**

**अंतर जाणोनि यावें झडकरी ।**
**तुझ्या वियोगें न कंठे क्षणभरी रे रामा ॥**
**तुजवांचुनी अंतीं कोण आहे ।**
**ऐसी अवस्था लागली अभ्यंतरीं रे रामा ॥ ध्रु० ॥**

**या लोकिकापासुनी मज सोडवावें ।**
**जरी तूं न येसी तरी म्यां काय करावें रे रामा ॥**
**नाहीं कोण्ही च माझे जिवलग ।**
**येथें कोणाच्या आधारें कंठावें रे रामा ॥ २**

**सुलभ जाणुनी धांव घातली रे ।**
**या लोकिकाची लाज म्यां टाकिली रे रामा ॥**
**आलों टाकुनी सर्व अभिमान ।**
**तुझ्या पाईं माझी वृत्ति गुंतली रे रामा ॥ ३**

**येकला येकट जालों रानभरी ।**
**तुजकारणें उदास सर्वापरी रे रामा ॥**
**चित्त चंचळ जालें राहवेना ।**
**भांबावलों हिंडतों वनांतरीं रे रामा ॥ ४**
**रामी रामदास तेणें आस केली ।**
**ते तां आपण होउनी पुरविली रे रामा ॥**
**दुःख संसारीचें फार जालें ।**
**येथें आम्हां संकटीं धांव घालीं रे रामा ॥ ५**

अजून चाफळास रामाची स्थापना झाली नव्हती, हें या पदावरून स्पष्ट दिसत आहे. ते रामाला सारखें आळवीत आहेत, रामा, तुजवेगळे मज कोणी जिवलग नाहीं, हें तुम्ही जाणतां, तुझ्यासाठीं मी सर्व सोडून आलों आणि तुला शोधीत रानीं वनीं भांबावल्यासारखा एकटा भटकत आहें, इत्यादि रीतीनें ते रामाची करुणा भाकीत आहेत.

( ६ ) अशा मानसिक अवस्थेंत महाराष्ट्राच्या त्या भागांत ते सारखे हिंडत होते, पहात होते, विचार करीत होते, मार्ग शोधीत होते. खालीं कोल्हापुरपर्यंतचा सारा मुलुख त्यांनीं अनेकदां पायांखालीं तुडविला. कोल्हापुरास गेले आणि चित्तास प्रसन्नता वाटली. जेथें जेथें जात, तेथील वर्णन क्वचित् करीत. काशीपासून रामेश्वरापर्यंतचीं सर्व क्षेत्रें पाहिलीं, पण कोल्हापुर पाहून त्यांचें चित्त विशेष च प्रसन्न झालें, सर्व क्षेत्रांपेक्षां हें अंबाबाईचें क्षेत्र त्यांना अधिक महत्त्वाचें वाटलें, असें त्यांनीं केलेल्या वर्णनावरून दिसतें. ह्याचीं त्यांचीं कारणें आणखी काय असतील तीं असोत, पण मला एक कारण सुचवावेंसें वाटतें. अंबाबाई, मग ती तुळजापुरची असो, प्रतापगडावरील असो, किंवा जोगाईची असो कीं कोल्हापुरची असो, तिनें रामाला वर दिला म्हणून तिचीं स्थानें श्रीसमर्थांना विशेष प्रिय वाटावीं, हें साहजिक आहे, पण कोल्हापुरचें इतकें अगत्य वाटण्याचें एक लहानसें कारण असें कीं, श्रीकल्याणमहाराजांसारख्या अनुपम निष्ठावंत शिष्याची जोड त्यांना कोल्हापुरास झाली. कोल्हापुर प्रांताचें त्यांनीं केलेलें वर्णन ऐका :

( बाडांक ६१८ वरून )

केला काशीविश्वेश्वर । स्वेतबंध रामेश्वर ।
न पाहातां कोल्हापुर । व्यर्थ होय ॥ १

पूर्वीं होता कोल्हासुर । म्हणउनि नाम कोल्हापुर ।
तेथें लक्ष्मीचा अवतार । तुम्ही पाहा ॥ २

तेथुनि पाहातां उत्तर । पुढें आहे केशापुर ।
पंचगंगेचें जें तीर । सुंदर नीर ॥ ३

वर्ते जळसेनाचें तळें । तया तळ्यांत कमळें ।
तेथुनि दिसतें पन्नाळें । सारागड ॥ ४

मारकंड्याचा डोंगर । त्याहुनि थोर रत्नागिर ।
आला हिमचळिनें केदार । भक्तालागीं ॥ ५

ऐका पुढील प्रसंग । अळतें बाहे रामलिंग ।
नरसीपुरीं देवधिंग । नांदताहे ॥ ६

जागा लक्ष्मीचा सिराळें । तेथें निघती नागकुळें ।
श्रावणमासीं मुलें बाळें । खेळविती ॥ ७

कऱ्हाड नगर सांगों काई । तेथें सुंदर तुकाई ।
कृष्णासंगम ठाईं ठाईं । देवस्थानें ॥ ८

बहुलेश्वर रुद्रेश्वर । धारेश्वर चांपेश्वर ।
तेथें महिमा अपार । रघुनाथाचा ॥ ९

चंद्रगिरीमध्यें गवि । तेथें वास करी कवि ।
त्याचा जागा तो पुरवीं । शाहापुर ॥ १०

तेथें बहुसाल देउळें । तळें रंकाळें पद्माळें ।
जळें वाहाती निर्मळें । ठाईं ठाईं ॥ ११

( ७ ) या च काळांत परशुरामक्षेत्रास हि त्यांचें जाणें पुन्हां झालें. बाहेर सर्वत्र संचार चालला होता, पण मनांत काय चाललें होतें, याची खूण जमदग्नीच्या केलेल्या प्रार्थनेच्या त्या पांच च श्लोकांवरून कोणास हि पटेल. ते जमदग्नीच्या दर्शनास दुसऱ्यांदा गेले, म्हणून ते श्लोक मी पुन्हां दुसऱ्यांदा येथें उद्धृत करीत नाहीं, बाकी केले असते तर बिघडलें नसतें. श्रीसमर्थांच्या अंतरंगाचें दर्शन घेण्याची तेवढी च संधि पुन्हां आपणांस

लाभली असती. या च ग्रन्थांत दक्षिणेकडील तीर्थाटणाच्या उल्लासांत ते दिलेले आहेत. ते वाचकांनीं पुन्हां एकवार आतां अवलोकावे, अशी विनंती करतों. त्या पंचकांत परशुरामाला उद्देशून श्रीसमर्थ बोलत आहेत, म्हणून त्यांत ब्राह्मणांना राज्य दिल्याचा उल्लेख आला आहे, बाकी भावार्थ आहे, धर्मरक्षणार्थ हिंदवी स्वराज्यस्थापनेचा. श्रीछत्रपति शिवाजीमहाराज यांचा उदय व्हावयाचा होता, अशा काळांत ही प्रार्थना केलेली आहे.

**नको रे उदासीन हें वाक्य मानी ।**

या त्यांच्या म्हणण्यांत, त्यांच्या हृदयांतील तळमळ आणि धर्मरक्षणाची कळकळ, हीं आपणांस स्पष्ट दिसत आहेत.

( ८ ) त्या काळांत ते उपासनामूर्तिध्यानांत अखंड रममाण होऊन हिंडत आणि कोठें हि रहात – झाडाखालीं, नदीकांठीं, देवळांत. भिक्षा मागावी, पानगे भाजावे, नैवेद्य स्वीकारावा. मुलांमध्यें रमावें, चिंतनांत मग्न होऊन रहावें, भजनांत गुंग व्हावें. कोठें हि असावें आणि उपाधी वाटूं लागली कीं, कोणास न कळत, एका ठिकाणाहून निघून दुसऱ्या ठिकाणीं जावें. पण ते कोठें हि गेले, तरी त्यांचें दैवी स्वरूप आणि तेजस्वी वृत्ति, हीं लोकांच्या लक्षांत येण्याला कितीसा वेळ लागणार ? जात तेथें अल्प काळांत च बाल, वृद्ध, नर, नारी असे भाविक जन त्यांच्या भोंवतीं गोळा होत. साताऱ्यापासून कोल्हापुरापर्यंतचा तो सारा भूप्रदेश किती पवित्र म्हणावा, ज्यांत तीस वर्षें तरी श्रीसमर्थांचें वास्तव्य झालें आणि ज्यांतील बहुधा गांव आणि गांव त्यांनीं आपल्या हयातींत टिपलें आणि चरणधूलीनें पावन केलें !

( ९ ) या च काळांत मसुरच्या आफळे, पोरे, बुधकर, वगैरे घराण्यांतील मंडळी, शहापुरच्या सतीबाई, त्यांचे पति कमळाजीपंत, पुत्र गोपाळ, चुलत भावाचा मुलगा भीम – जे पुढें तंजावरमठाचे अधिपति झाले, त्यांच्या गोतांतील आणि गांवांतील इतर मंडळी, वाळव्याच्या – ‘ अंबी न विसरे गुरुपदाला प्रतिज्ञा खरी ’ म्हणणाऱ्या – अंबिकाबाई, कऱ्हाडच्या आका, मिरजेच्या वेणाबाई, महाबळेश्वरचे दिवाकर आणि त्यांचे बंधु, चाफळ आणि तारळें या खोऱ्यांतील तरुण मुलें, इत्यादि मंडळी त्यांचें शिष्यत्व

पतकरून त्यांच्या जवळ राहूं लागली. कोल्हापुरास गेले असतां कल्याण आणि त्यांचे बंधु दत्तात्रेय या पट्टशिष्यांची जोडी मिळाली. वस्तुतः गांवोगांवचीं तरुण मुलें श्रीसमर्थचरणांचा आश्रय करण्याच्या हेतूनें त्यांच्याकडे आकर्षिलीं जाऊं लागलीं.

( १० ) या सर्वांना त्यांनीं मारुतीच्या उपासनेला लावलें. ठिकठिकाणीं मारुतीची स्थापना करण्याचा त्यांनीं क्रम आरंभिला. यांत त्यांचे हेतु न सांगतां हि कळण्यासारखे आहेत व ते लोकांनीं जाणले हि आहेत. त्यांनीं स्थापन केलेले अकरा मारुती प्रसिद्ध आहेत. पण जनांत अशी रूढि पडली आहे कीं, कोठें हि मारुतीचें जुनें स्थान असलें व तें कोणीं स्थापन केल्याची माहिती नसली, म्हणजे तेथील मारुती श्रीसमर्थांनीं च स्थापन केला, असा प्रवाद सुरू होतो. त्यावरून इतका च बोध होतो कीं, मारुती पाहिला म्हणजे श्रीसमर्थांची आठवण व्हावी, इतकें या दोघांचें साहचर्य लोकांना पटलें होतें. त्याप्रमाणें सिमल्यास मारुती आहे, तो श्रीसमर्थस्थापित होय, अशी लोकवार्ता आहे. तसा तो असेल हि, पण तसा जुना उल्लेख मला कोठें आढळला नाहीं. श्रीसमर्थ-स्थापित मारुती, मग तो कोठें हि असो, ओळखण्याची एक नजरेंत भरणारी खूण आहे. अर्थात् रामापुढें च मारुती असले, म्हणजे ते हात जोडून च उभे असावयाचे, पण एकटे मारुतीराय असले म्हणजे ते श्रीसमर्थस्थापित असल्यास त्यांच्या पायाखालीं राक्षस तुडविलेला असावयाचा च.

( ११ ) असे त्यांनीं स्थापन केलेले अकरा मारुती होत. श्रीसमर्थ-प्रतापांत त्यांचा उल्लेख आहे, तो असा :

**बाहोग्रामीं शक्तिग्रामीं । मसुराग्रामीं पूर्वग्रामीं ।**
**उदंबरग्रामीं शृंगग्रामीं । हनुमान स्थापिले समर्थें ॥**

**बाहोग्रामींउपग्रामीं स्थान । मानसग्रामीं पारग्रामीं हनुमान ।**
**अधिष्ठानीं महारुद्र मुख्य प्राणनाथ निधान ।**
**पूर्वपश्चिमे स्थापिले समर्थें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३–५८–५९

या च अकरा स्थलांविषयीं श्रीवेणाबाईचा एक अभंग आहे :

**चाफळामाजी दोन उंब्रजेसी येक ।**
**पारगांवीं देख चौथा तो हा ॥ १**

**पांचवा मसुरीं शहापुरीं साहवा ।**
**जाण तो सातवा शिराळ्यांत ॥ २**

**सिंगणवाडीं आठवा मनपाडळें नववा ।**
**दहावा जाणावा माजगांवीं ॥ ३**

**बाह्यांत अकरावा येणें रीति गावा ।**
**सर्व मनोभावा पुरवील ॥ ४**

**वेणी म्हणे स्वामी रामदास समर्थ ।**
**कीर्ति गगनांत नसमाये ॥ ५**

श्रीसमर्थांनीं स्थापन केलेले अकरा च मारुती होत, असा उल्लेख त्यांचे शिष्य अनंत कवि यांनीं केलेला, बाडांक ३४० तील एका श्लोकांत हि आढळतो :

**जेणें रुद्र दहा मनोहर जगीं येकागळे स्थापिले ।**
**प्रत्येकीं अकरा बिंग्रे नृपतीच्या मुद्रांकितीं अर्पिले ।**
**त्या त्या नागरिका जना नवविधा भक्तीसि लावीतसे ।**
**ऐसा सद्गुरु जो अनंतकविचा बद्धासि तारीतसे ॥**

( १२ ) या अकरा ठिकाणच्या मारुतीच्या स्थापनेच्या काळाची नोंद मंदिरांतील बाडांक ३५३ च्या अगदीं शेवटच्या पृष्ठाच्या पाठीमागें केलेली आहे. ही नोंद मागाहून केलेली वाटते, पण ती कोणीं, केव्हां आणि कशाच्या आधारावर केली, हें समजत नाहीं. ती नोंद अशी :

| | |
|---|---|
| १ शहापुर १५६६ | १ बाहे १५७३ |
| १ मसुर १५६७ | १ मनपाडळें १५७३ |
| ३ चाफळ १५७० | १ पारगांव १५७४ |
| १ उंब्रज १५७१ | १ शिराळें १५७६ |
| १ माजगांव १५७१ | —— |
| | ११ |

कोणत्या हि आधारावांचून ही नोंद केली गेली असेल, असें म्हणतां येत नाहीं. चाफळखेरीज बाकीच्या ठिकाणचे स्थापनेचे शक मला मान्य होतात. चाफळ येथील तीन मारुतींपैकीं खडीवरचे मारुती व श्रीराममंदिराच्या पाठीमागचे प्रतापमारुती यांची स्थापना १५७० त झाली असेल, हें हि मला मान्य आहे, पण मंदिरापुढचे दासमारुती मंदिराच्या उभारणी-नंतरचे असले पाहिजेत, हें उघड आहे आणि श्रीराममंदिर १५८० नंतर उभारलें गेलें असावें कीं काय, असें मानण्याकडे माझ्या मनाची प्रवृत्ति होत आहे. पुढच्या च उल्लासांत आपण आतां याचा च विचार करूं.



उल्लास बारावा

# श्रीरामसंस्थापना

[ १५८२ ]



अंतरीं कल्पना केली । येकांतीं बोलिलों बहु ।
रक्षिता देव देवांचा । त्याचा उत्साव इच्छिला ॥

आला राजा महीचा दिनकरकुळिचा ख्यात वंशावळीचा ।
आला आत्मा जगाचा मुनिजनऋषिचा प्राण त्या साधकांचा ।
आला दाता दिनाचा जप पशुपतिचा ध्यास त्या वाल्मिकाचा ।
आला सिंधु सुखाचा सुरवर म्हणती काळ हा राक्षसांचा ॥

[ ( १ ) रामसंस्थापनेचा निश्चय – ( २ ) चाफळास श्रीराममंदिर उभारल्याचा चमत्कार – ( ३ ) आत्मविश्वास निर्माण केला – ( ४ ) विजापुरदरबारांतील हिंदु मुत्सद्यांची अनुकूलता – ( ५ ) मंदिराची जागा ठरली – ( ६ ) मंदिर आपण बांधून देतों, अशी शिवाजीराजांची इच्छा व त्यावर समर्थांचें म्हणणें – ( ७ ) बांधण्याचें काम चालू असतां – ( ८ ) भिक्षेची व्यवस्था – ( ९ ) मंदिर पूर्ण होत आलें, राम केव्हां येणार ? समर्थ हांका मारीत आहेत, राघोबा उदारा ये माझ्या मंदिरा – ( १० ) राम येणार म्हणून शकुन होऊं लागले आणि समर्थांना स्वप्नसाक्षात्कार झाला – ( ११ ) साक्षात्काराप्रमाणें अंगापुरडोहांतून मूर्ति काढून चाफळास आणली – ( १२ ) अंगापुरकरांचा त्रागा – ( १३ ) स्थापनेचें विधिविधान – ( १४ ) समर्थांनीं रामापाशीं मागणें मागितलें – ( १५ ) कोठें कमी पडलें नाहीं – ( १६ ) उभारणी केव्हां झाली – ( १७ ) मंदिर जाऊन पहा – ( १८ ) श्रीसमर्थांचा मठ – ( १९ ) भक्तिपरंपरा अखंड कशी चालेल – ( २० ) उत्सवांतील मान व अधिकार – ( २१ ) बारीक सारीक कामांची योजना – ( २२ ) १६०२ तील वाद आणि उत्तरप्रत्योत्तरें – ( २३ ) समारंभाची वृद्धि तशी राज्याची अभिवृद्धि – ( २४ ) चाफळवर्णनाच्या वीस ओव्या – ( २५ ) मूर्तींचें स्थलांतर – ( २६ ) चाफळचा मठ म्हणजे एक कल्पवृक्ष च ]

( १ ) ही परिस्थिति बदलण्याला काय करावें, याचा विचार सारखा चालला होता. एकांतांत स्वतःच्या च मनाशीं व इतरांशीं हि पुष्कळ बोलणें केलें आणि शेवटीं निश्चय केला कीं, रावणाच्या बंदीशाळेंत पडलेल्या तेतीस कोटी देवांना ज्यानें मुक्त केलें, त्या श्रीरामाच्या चरित्राकडे लोकांचीं मनें वेधून घेतां येतील, तर आज जी सारी जनता हताश, निस्तेज, मृतवत् होऊन पडली आहे, तिच्यांत कांहीं चैतन्य उत्पन्न होईल. असा निश्चय होऊन, कोठें तरी श्रीरामाची स्थापना होऊन उत्सव सुरू केला पाहिजे, असें श्रीसमर्थांनीं ठरविलें.

( २ ) या कल्पनेप्रमाणें चाफळास नवीन च श्रीराममंदिर उभारून त्यांत श्रीरामाची श्रीसमर्थांनीं स्थापना केली, हें त्या काळीं त्यांच्या हातून मोठें च अचाट कृत्य झालें, यांत शंका नाहीं. ज्या काळांत मोठमोठालीं देवालयें जमीनदोस्त होत होतीं व देवांच्या मूर्ति मशिदींच्या पायऱ्यांच्या तळीं गाडल्या जात होत्या, अमुक क्षेत्रांतील मंदिरें उध्वस्त करण्यांत आलीं व मूर्ति फोडण्यांत आल्या, अशा वार्ता ज्या काळांत प्रत्यहीं कानांवर येत होत्या, अशा त्या काळांत श्रीसमर्थांच्या हातून नवीन मंदिर उभारलें गेलें,

हा जो चमत्कार घडला, त्याचें अपूर्वत्व पटण्याला त्या काळच्या परिस्थितीचें हुबेहुब चित्र मनश्चक्षूंपुढें उभें राहिलें पाहिजे. या स्थापनेचें महत्त्व त्या काळीं किती होतें व लोकांच्या मनावर त्याचा केवढा परिणाम झाला असेल, याची कल्पना, आपण मनानें त्या काळांत जाऊन पडल्याशिवाय आपणांस होणार नाहीं.

( ३ ) हा चमत्कार घडवून आणून श्रीसमर्थांनीं लोकांना धीर दिला, त्यांच्यांत आत्मविश्वास उत्पन्न केला, हजारों तरुणांचीं मनें त्यांनीं आपल्या कार्याकडे आकर्षून घेतलीं. मूर्ति बोलून चालून पाषाणाच्या होत्या, त्यांच्यांत तर श्रीसमर्थांनीं प्राणप्रतिष्ठा केली च, पण जनता हि अहल्येप्रमाणें पाषाणवत् अचेतन होऊन पडली होती, तिच्यांत हि त्यांनीं प्राणवायु भरला ! रामानें एक अहल्याशिळा मुक्त केली, तर त्यांच्या या दासानें तशा लक्षावधी शिळा उद्धरिल्या !

**समर्थाचिया सेवका वक्र पाहे ।**
**असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥**

असा त्यांनीं जगाला च आव्हानपूर्वक प्रश्न केला होता !

( ४ ) चाफळखोरें धरून कृष्णातटाकाचा तो प्रदेश त्या वेळीं आदिलशाहीच्या अमलाखालीं होता. माझी समजूत अशी आहे कीं, विजापुरदरबारांत त्या काळीं दियानतराव, शहाजी राजे वगैरे हिंदु मुत्सद्दी यांचें वजन फार होतें व त्यांच्या सहानुभूतीनें श्रीसमर्थांचें कार्य सुकर झालें असावें. चाफळास श्रीसमर्थ नुसतें मंदिर उभारून थांबले नाहींत, तर आदिलशाहीकडून मंदिरास त्यांनीं इनाम जमिनी हि मिळविल्या § होत्या.

( ५ ) चाफळगांव मांड नदीच्या कांठीं आहे. नदी तेथें च जवळच्या डोंगरांतून उगम पावून चार पांच कोसांवर कृष्णेला मिळते. मांड नदीच्या पाण्याला पावसाळ्यांत ओढ फार असते. मांड्याइतकें तिला पाणी आलें म्हणजे चालत नदी उतरून जाणें कठीण होतें, म्हणून तिचें नांव मांड

§ पहा श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, प्रथम खंड, लेखांक १७, १८; २१, २२; ३६, ३८; ५२ वगैरे.

पडलें, असें सांगतात. नदीच्या एका बाजूला गांव आहे व श्रीसमर्थांना मंदिरासाठीं जी जागा मिळाली, ती दुसऱ्या बाजूस, नदीला अगदीं लागून च आहे. ती जागा, त्या वेळीं, गांवची स्मशानभूमि होती. म्हसोबाचे लहान मोठे अनेक दगड त्या ठिकाणीं पडलेले होते. एक एक दगड उचलून समर्थांनीं त्यांस मांडनदींत मुक्ति दिली, पण त्यांत एक थोरला म्हसोबा होता, त्यानें समर्थांना विनविलें कीं, आपणांस राहूं द्यावें, आपण कोणास त्रास देणार नाहीं. त्याला समर्थांनीं राहूं दिलें, पण तेथें च नाहीं, समोर दूर अंतरावर दीपमाळेपाशीं त्याला जागा दिली व त्याचा मान ठेवण्यासाठीं दशमीच्या दिवशीं श्रीरामाचा रथ तेथपर्यंत येईल तेव्हां, त्यास दहीभात व एक नारळ दिला जाईल, असें त्यास सांगण्यांत आलें. ती प्रथा तेव्हांपासून आतांपर्यंत चालू आहे.

( ६ ) आपण मंदिर बांधून देतों, अशी इच्छा श्रीशिवाजीराजांनीं दर्शविली होती, पण समर्थ नको म्हणाले. समर्थांचें म्हणणें, मंदिराला सर्वांचा हात लागला पाहिजे, म्हणजे मंदिराविषयीं सर्वांच्या ठिकाणीं आपलेपणा उत्पन्न होईल.

**समर्थआज्ञा पुसे शिवराजा ।**
**श्रीरघुनाथदेवालय मी बांधेन वोजा ।**
**समर्थ म्हणती शिष्यसमुदाय संप्रदाय माझा ।**
**देवाल्यें करवीन अनंत हस्तें ॥**

**समर्थें देवाल्यें केलीं सामान्य हस्तें ।**
**सामान्यें मान्य केलीं समस्तें ।**
**पुढें पुढें कार्यें करितील प्रशस्तें ।**
**अनंतहस्ति समर्थ ॥**

–श्रीसमर्थप्रताप, १९–१६–१७

( ७ ) जागा उंचसखल होती व तीवर कांटेरीं झाडें, झुडपें फार वाढलेलीं होतीं. समर्थांनीं स्वतः हातीं कुऱ्हाड घेऊन झाडेंझुडपें तोडून जागा साफ,

सपाट करण्यास आरंभ केला. मंदिराची उभारणी स्वतः समर्थ आणि त्यांचे अनेक शिष्य यांनीं च केली. बरी च शिष्यमंडळी जमली होती. त्यांत सर्व प्रकारचे कारागीर होते, पाथरवट होते, गवंडी होते, सुतार होते, जरूर ते सर्व जण होते. सर्व जण लवकर उठून, आपआपले नित्य नेम सारून कामावर वेळच्या वेळीं हजर होत व आपआपल्या वांट्याचें नेमलेलें काम करीत. ती बिगार थोडी च होती, किंवा रोजमुरा घेऊन थोडें च काम करावयाचें होतें? भक्तिप्रेम हा च सर्वांचा रोजमुरा होता. त्यामुळें सर्व कामें कशीं मन लावून होत. कोणाला कष्ट वाटत च ना. कोणाचें कांहीं दुखलें, खुपलें, तर **राम** हीं दोन च अक्षरें उच्चारीत जा, म्हणजे सर्व दुखण्याखुपण्याचा परिहार होत जाईल, असा श्रीसमर्थांनीं सर्वांना प्रचीतीचा उपाय सांगून ठेवला होता. काम चालू असतां

**सुंदरनामा रघुपति रामा रे ॥**
**राम ऐसें वाचे वदतां ।**
**पावन करि तूं आम्हा रे ॥**

असा घोष वातावरणांत सारखा घुमून रहात असे.

(८) करा कल्पना त्या सर्वांच्या आनंदाची आणि भाग्याची! कोणाच्या वांट्याला तें भाग्य येणार होतें, म्हणून ज्याला त्याला वाटे आपण कामावर जाऊन कांहीं तरी सेवा करावी, दुसरें कांहीं होणार नाहीं तर निदान पाया खणावा, पाया भरावा, दगड चुना माती यांच्या टोपल्या वाहाव्या, इकडची माती तिकडे टाकावी, तिकडचे दगड इकडे आणावे. याप्रमाणें थोडी फार सेवा घडावी, म्हणून जरूरीपेक्षां जास्त च मोठा मेळावा जमा झाला होता. इतक्या सर्वांची खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवण्यासाठीं भिक्षा सुरू झाली. भिक्षेच्या कामावर हि कांहीं शिष्यांची नेमणूक झाली. त्यांना समर्थांनीं एक ताकीद देऊन ठेवली होती कीं, कोणाला हि भिक्षा घालण्याचा भार वाटेल, असें करूं नका. त्यांनीं एक तुंबा च त्या शिष्यांच्या हवालीं करून, त्या तुंब्यांत मावेल, एवढी च भिक्षा एकएकट्या-कडून घ्यावी, जास्त घेऊं नये, असें सांगून ठेवलें होतें.

( ९ ) देऊळ पूर्ण होत आलें, तशी चिंता उत्पन्न झाली, मूर्ति कोठून आणावी. कोणी म्हणत आम्ही तयार करवितों, इतर कोणी म्हणत आयती घ्यावी. श्रीसमर्थ सर्वांचें ऐकून घेत आणि एकांतांत जाऊन बसत, तेथें रामाला सारखे आळवीत, प्रार्थना करीत, हांका मारीत !

**राघोबा उदारा ये माझ्या मंदिरा ।**
**जानकीच्या वरा देवराया ॥ १**
**संसाराच्या संगें फार दुःखी जालों ।**
**म्हणोनिया आलों शरण तुज ॥ २**
**चित्त निरंतर जडलें तुझे पायीं ।**
**धाउनिया येईं रामराया ॥ ३**
**त्राहे त्राहे त्राहे वाट तुझी पाहे ।**
**येउनिया राहे हृदयामाजीं ॥ ४**
**प्रेमें स्फुंदताहे उभारूनि बाहे ।**
**वाट तुझी पाहे रामदास ॥ ५**

( १० ) याप्रमाणें स्फुंदस्फुंदून श्रीसमर्थ टाहो फोडीत असतां राम येण्याला उशीर लावतील, हें शक्य तरी कसें ? शकुन होऊं लागले.

**लवे नेत्रपातें स्फुरे आजि बाहे । दिनानाथ हा राम येणार आहे ।**
**जयाचेनि योगें सुखानंद लोटे । तया देखतां अंतरीं बाष्प दाटे ॥**

—करुणाष्टकें, १७–१

श्रीसमर्थांनीं सारखा निदिध्यास घेतला होता आणि त्यांत त्यांना स्वप्नसाक्षात्कार झाला. रामानें येऊन सांगितलें, कृष्णेच्या डोहांत, शिवनाभींत, कोणास ठाऊक नसलेली, ब्रह्मकृत आपली मूर्ति आहे, ती काढून तिची स्थापना करावी, आपण तींत संचार करूं. तसें च मारुतीनें हि प्रकट होऊन आज्ञा केली कीं, रामासमोर माझी मूर्ति स्थापन करून तींत तूं च

संचार करून रहा आणि मंदिराच्या पाठीमागें माझ्या प्रतापमूर्तीची स्थापना कर.

**देवा सन्मुखीं तूं चि भक्तोत्तमा । निर्मोन ममाकृती त्यांत राही ॥**
**सादृश्य तुझा जो असे ध्यानांश । हरिरूप हरिरूपीं करीं प्रवेश**

आणि

**येक उरला जो मम तेजांश । श्रीरामामागें स्थापिजे ॥**

माझें सर्वांना आश्वासन आहे कीं,

**सकामी निष्कामी कोणी तेथें । करितां पूजन सेवा विध्युक्त**
**प्रसन्नपणें मी पुरवीन हेत । भक्तिभाव जैसा त्यापरी ॥**

– दासविश्रामधाम, ६०-३४-३६

या सर्वाचा अर्थ असा होतो कीं, चाफळास श्रीरामाच्या समोर हात जोडून जे दासमारुती आहेत, ती मूर्ति, समर्थ जें ध्यान करीत तद्रूप असून तिच्यांत प्रत्यक्ष श्रीसमर्थांनींच च प्रवेश केला आहे व मागील प्रतापमारुती हे भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारे स्वतः हनुमंत होत ! भक्ताच्या रक्षणार्थ ब्रह्मांड पालथें घालण्याचें सामर्थ्य आपल्यांत आहे, असा आहे च त्या मूर्तीचा आविर्भाव.

( ११ ) साक्षात्काराप्रमाणें श्रीरामाची मूर्ति आणण्यास श्रीसमर्थ निघाले. ते अंगापुरास गेले, रात्रीं गजाननाच्या देवालयांत मुक्काम केला, सकाळीं उठून विष्णुपदीं, खुणेनें सांगितलेल्या जागीं त्यांनीं बुडी मारून श्रीरामाची मूर्ति बाहेर काढली आणि खांद्यावर घेऊन चाफळची वाट धरली.

( १२ ) अंगापुर गांवच्या लोकांच्या कानांवर चहुंकडून आलें कीं, आपल्या गांवच्या डोहांतून मूर्ति काढून श्रीसमर्थ घेऊन गेले. तेव्हां त्या गांवचे लोक मोठ्या ईर्ष्येनें आपली मूर्ति परत आणण्यास निघाले. ते चाफळास पोचले, पण तेथें जमलेल्या श्रीसमर्थभक्तांचा तो अपूर्व उत्साह पाहून हे आलेले लोक थोडेसे विरमले. आले होते तावातावानें बोलण्यास, पण तेथील भक्तिप्रेमाचें वातावरण पाहून त्यांच्या बोलण्यांत नम्रता आली होती. ते समर्थांना एवढें च म्हणाले, " ज्या गांवची मूर्ति त्या च गांवीं असावी."

त्यावर श्रीसमर्थ म्हणाले, "उगीच अहंकाराला कां पेटतां? मूर्ति तुमच्या गांवची कोठली? ती मुळीं होती डोहांत, तुम्हां कोणाला ठाऊक हि नव्हती, आम्हांस तरी कोठें ठाऊक होती, रामरायानें कृपा केली, म्हणून आम्हांस तरी तिचें ठावठिकाण कळलें! नेऊन ठेवूं का डोहांत जेथल्या तेथें?" आलेल्या लोकांची समजूत पटेना. ते त्रागा करूं लागले. तेव्हां समर्थ म्हणाले, "कष्टी होऊं नका, रामराय येत असतील, तर घेऊन जा आपल्या गांवीं." लोक आनंदले. मूर्ति नेण्यासाठीं त्यांनीं गाडा तयार केला आणि मूर्ति उचलूं लागले, तों ती तीळभर हि हालेना! लोक दचकले, थबकले, शरमले आणि अभिमान टाकून श्रीसमर्थांना शरण गेले. उत्सवांत निशाणकांठीचा मान श्रीसमर्थांनीं अंगापुरकरांना दिला.

(१३) मूर्तिस्थापनेविषयीं शिष्यमंडळी उतावीळ झाली. स्थापनेच्या वेळीं श्रीसमर्थांनीं विधिविधानाची फारशी अपेक्षा ठेवली नाहीं. उपाधित्याग, तीव्र तप, नैराश्यभजन, निजात्मसाध्य आणि अखंड सोहंस्मरण, हीं च पंचविध विधानें त्यांना पुरेशीं वाटलीं. मूर्तीखालीं कांहीं द्रव्य ठेवीत असतात, पण त्याची हि समर्थांना कांहीं आवश्यकता वाटली नाहीं. जगाचा उद्धार-जगदुद्धार–हा च एकमेव अर्थ त्यांनीं मूर्तीच्या-तळीं ठेवला.

(१४) मूर्तींत आगमन व्हावें म्हणून प्रार्थना केली. रामाचें आगमन झालें आणि श्रीसमर्थांनीं स्वतः यथाविधि पूजा केली. अत्यंत समाधान वाटून श्रीसमर्थांनीं मागणें मागितलें :

**राघवाचा धर्म गाजो। कीर्ति अद्भुत माजो।**
**ठाईं ठाईं देवालये। भक्तमंडळी साजो॥ ध्रु०॥**
**शक्ति आहे तों चि फावे। दोनी लोक साधावे।**
**इहलोक परलोक। शत्रु सर्व रोधावे॥ १**
**संसारींचें दुःख मोठें। हें मी कोणाला सांगों।**
**जन्म गेला तुजविण। आणिका काय मी मागों॥ २**
**मागता समर्थाचा तेणें कोणा मागावें।**
**रामेवीण कोण दाता कोणामागें लागावें॥ ३**
**रामदास म्हणे देवा आतां पुरे संसार।**
**असंख्य देणें तुझें काय देतील नर॥ ४**

( १५ ) स्थापनेचा समारंभ अपूर्व झाला. चहुंकडून हजारों लोक आले होते. चाफळ गांव माणसांनीं फुलून गेलें होतें. पांच दिवस पंक्तीमागें पंक्ति उठत होत्या. सारखीं कीर्तनें होत होतीं, लोक आनंद लुटीत होते. केव्हां च कोठें कांहीं कमी पडलें नाहीं! पडेल च कोठून? ज्यांच्या वचनांत राम गुंतून पडले होते आणि ज्यांनीं हनुमंत च मित्र जोडला होता, त्यांना कसली उणीव भासणार?

( १६ ) ही श्रीराममंदिराची उभारणी केव्हां झाली, या प्रश्नाचा विचार, गाथाचरित्रांच्या सोळाव्या उल्लासांतील 'सिंहस्थांत गंगायात्रा' या गाथेनंतर करण्याचा माझा हेतु आहे.

( १७ ) मी सर्वांची नम्रपणें प्रार्थना करीन, एकवार जाऊन पहा तें श्रीराममंदिर, जें समर्थांनीं आणि त्यांच्या निष्ठावंत शिष्यांनीं स्वतःच्या आंगमेहनतीनें उभारलें! त्या पायऱ्या, ती दीपमाळ, तीं वृंदावनें, तो पुढचा दासमारुती, आणि मागचा प्रतापमारुती, तो खडीवरचा मारुती, ती नदीकांठची भिंत, हीं सारीं स्थानें, शिष्यांच्या समवेत श्रीसमर्थांनीं निर्माण केलेलीं होत. मंदिर फार मोठें नाहीं, लहानसें च आहे. श्रीशिवाजी राजे तंजावरकडे गेले असतां तिकडील प्रचंड मंदिरें त्यांच्या पाहण्यांत आलीं होतीं. इकडे परत आल्यावर त्यांनीं समर्थांना विनंति करून पाहिली कीं, आपण हें मंदिर उकलून तिकडच्या नमुन्याप्रमाणें प्रचंड बांधूं, पण समर्थांनीं नको§ म्हटलें. गाभाऱ्याचा भाग, चौखांबी भाग आणि त्याला लागून असलेला मंडप व खालचीं भुयारें, एवढीं कामें त्या वेळचीं, पुढचा लांकडी सभामंडप हा अलीकडच्या काळांत झालेला होय.

( १८ ) श्रीसमर्थांनीं हजारों मठ स्थापन केले, पण त्यांचा स्वतःचा मठ कोणता, असें मला विचारल्यास मी तत्काळ सांगेन, चाफळचा मठ हा त्यांचा मठ होय. चाफळचा मठ, हा आद्य मठ, हा मुख्य मठ होय. सर्व समर्थभक्तांनीं तेथें लीन होऊन जावें. तेथें जाऊन श्रीसमर्थांना पहा. तेथें ते तुम्हांस पहाल तिकडे दिसतील. चाफळ ही श्रीसमर्थांची कर्मभूमि होय. येथून च त्यांनीं सर्व देशभर पसरलेल्या संप्रदायाचीं सूत्रें हालविलीं.

---

§ श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, खंड पहिला, लेखांक २६ वा.

त्यांच्या आणि श्रीशिवरायाच्या अनेक भेटी या खोऱ्यांत झाल्या. सर्व शिष्यांनीं निदान तीन वर्षांत एकदां येथें येऊन वृत्तान्त निवेदन केला पाहिजे, असा त्यांचा दंडक होता. या कर्मभूमीचें वैभव अखंड चालविणें, हें श्रीसांप्रदायिकांचें आद्य कर्तव्य होय. तेथें साक्षात् राम आहेत, हनुमंत आहेत, समर्थ आहेत. सबंध चाफळखोरें आधीं च रम्य, त्यांत आणखी श्रीसमर्थांचीं पाउलें सर्वत्र उमटलेलीं. अशा त्या खोऱ्यांत आपण जिकडे पाहूं तिकडे आपणांस श्रीसमर्थ दिसले पाहिजेत. तेथील वृक्षांनीं आणि डोंगरांनीं श्रीसमर्थांना पाहिलें होतें, ते आपणांस श्रीसमर्थांच्या गोष्टी सांगतील. इतकें तरी निदान खरें ना, चाफळास जाऊन रामापुढें, श्रीसमर्थस्वरूपी दासमारुतीपुढें आणि हनुमंतस्वरूपी महारुद्रापुढें ज्यानें लोटांगण घातलें नाहीं, तो सांप्रदायिक कसा म्हणावा ?

(१९) तो काळ कसा होता, हें आपण पाहिलें च आहे. आपण येथें अशा परिस्थितींत मंदिर उभारलें, रामाची स्थापना केली, उत्सव सुरू केला, पण या अधिष्ठानाची ही भक्तिपरंपरा अखंड कशी चालेल, याची चिंता श्रीसमर्थांना हि लागली असावी, असें दिसतें. स्थापनेच्या समारंभाच्या दिवसांत च त्यांनीं चाफळचे अधिकारी नरसिंगराउ अंबरखानी, देशमुख प्राणजी, देशकुळकर्णी नागोजीपंत, नाईकवाडी नागोजी भावे व नाणेघोलकर अशा पांच जणांना बोलावून "या अधिष्ठानाची भक्तिपरंपरा करावी, सर्व साह्यता करावी, कानुकानुनाती ( पट्टी ) यात्रेंत होऊं न द्यावी, सर्वस्वेसी साहे असावे" म्हणून त्या पांच हि जणांकडून श्रीरामाच्या पुष्पावर हात ठेवून घेतला. तेव्हां या पांच हि जणांनीं उभें राहून समर्थांची प्रार्थना केली कीं, आपण हि या अधिष्ठानाची उदासीनता न केली पाहिजे. त्यावरून "श्रीसमर्थांनीं हि श्रीरामाच्या प्रसादपुष्पावरी मान्य म्हणून हास्यवदने संतोषपूर्वक हस्त ठेविला." §

कसा हा कौतुकाचा प्रकार आहे, कसें प्रेम आहे, कसा आनंद आहे !

त्या पांच जणांचा हस्त आणि त्यावर प्रत्यक्ष श्रीसमर्थांचा हस्त, म्हणजे नुसत्या सांप्रदायिकांच्या च नव्हे, तर यच्चयावत् महाराष्ट्रीयांच्या पूर्वजांचा

---

§ पहा श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, खंड पहिला, लेखांक ५२ वा.

च हस्त होय, असा याचा अर्थ होत नाहीं काय ? तेव्हां या अधिष्ठानाची भक्तिपरंपरा सतत चालविण्याची जबाबदारी सर्व च महाराष्ट्रीयांवर आहे, हें निर्विवाद होय.

( २० ) मंदिरांत श्रीरामाच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाली, त्या च वेळीं, नऊ दिवसांच्या उत्सवांत कोणता मान किंवा अधिकार कोणाकडे असावा, हें श्रीसमर्थांनीं ठरवून दिलें होतें :

**प्रतिपदेसी मानकरी शाहापुरकर ।**
**द्वितीयेसी मानकरी वडगांवकर ।**
**तृतीये दिवशीं मानकरी महागांवकर ।**
**चतुर्थी भेडसगांवकराची ॥**

**पंचमीसी सन्मान श्रीआळयकरी ।**
**षष्ठीसी भक्तराज नृसिंहराय अधिकारी ।**
**सप्तमीसी बहुमान पारगांवकरी ।**
**अष्टमी बाहेकराची कथा ॥**

**मुख्य नवमी दिवस समर्थमहंतांचा ।**
**दशमी दिवस चाफळीं दीपाराधना रथोछहाचा ।**
**प्रतिपदेपासून प्रारंभ यात्रेचा ।**
**नित्यानंद पद्धति ॥**

—श्रीसमर्थप्रताप, २०-१० ते १२

( २१ ) इतकें च केवळ नव्हे, तर भिंती कोणीं सारवाव्या, त्यांना सफेती कोणीं द्यावी, त्यांवर चित्रें कोणीं काढावीं, स्वयंपाकगृहांत सुद्धां कोणता पदार्थ कोणत्या बाईनें करावा, हिलाल कोणीं धरावे, समया कोणीं लावाव्या, बाजार कोणीं करावा, कोठीवर कोणीं असावें, देवासमोर चोपदार कोण, देवाची पालखी उचलतांना पुढच्या बाजूचे भोई कोण व मागच्या बाजूचे कोण, चवरी कुंचे कोणीं वारावे, गंधअक्षता कोणीं लावाव्या, पंक्तींत वाढावें कोणीं, कोणीं समाचार घ्यावा, कीर्तनाची बैठक कोणीं घालावी, कोणा हि तृषार्तानें केव्हां हि पाणी मागितलें तर तें कोणीं द्यावें, इत्यादि सर्व बारीकसारीक गोष्टी हि श्रीसमर्थांनीं ठरवून टाकल्या होत्या. ज्याला जें काम नेमून दिलें असेल, तें त्यानें करावें, दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ करूं नये, अशी त्यांची सर्वांना सक्त

ताकीद होती. या सर्व योजनेवरून श्रीसमर्थांची दक्षता तर दिसून येते च पण त्यांच्या हयातींत त्यांचीं सर्व कामें कशीं व्यवस्थितपणें होत असलीं पाहिजेत, याची कल्पना करतां येते.

(२२) पण इतकें सर्व असून हि, शक १६०२ च्या उत्सवांत श्रीसमर्थ उपस्थित नव्हते, तेव्हां "कथाप्रसंगानें समुदायी लोकांत परस्परें कलह जाहला, त्यांत सिरालेकर रुसोन गेले, त्याच्या समाधानास दिवाकर गोसावी जाऊन समस्तांच्या आशयानुसार श्रीसमर्थसंनिध जावें, तेथें कित्येक कलहमूळ निवेदून पुढें सकलसमाधानें निर्व्याकुळ उत्सव-प्रसंग चाले ऐसें आज्ञापत्र करावें, ऐसा निश्चय केला. तों मध्यें **भूपति सर्वांस निमित्यक** अंतराय पडोन तो कार्यभाग राहिला. दिवाकर गोसावी हि कार्यभागप्रसंगें राजधानीस गेले. तों सिरालेकर समस्त समुदाय करून निश्चयपत्रास श्रीसमर्थसंनिध आले. तेथें पत्र प्रसंग करितां श्रीसमर्थआज्ञा जाहली कीं दिवाकर गोसावी आल्यावांचून निश्चय केला न जाय, त्याची प्रतीक्षा करावी, तो हि सीघ्र च येईल. मग समस्त हि तटस्त राहिले. राघो अनंत भूपतिपदाभिषेकार्थ श्रीसमर्थांस विनंति करावयास दिवाकर गोसावी-समेत सज्जनगडास आले. त्याचा सांनिध्य दिवाकर गोसावी व समस्त संप्रदाईकास बसवून श्रीसमर्थांनीं समस्त संदेहवचनें ऐकोन तदनरूप आज्ञा केली ते उत्तरप्रत्योत्तररूपें अंताजी गोपाल देशकुलकर्णी प्रां कुडाळ तेहीं लिहिले." ती उत्तरप्रत्योत्तरांची यादी श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, प्रथम खंड, लेखांक ४२ यांत दिलेली आहे.

(२३) मंदिर उभारून, मूर्ति स्थापून, उत्सव सुरू करून श्रीसमर्थांनीं श्रीशिवरायाला आणि त्यांच्या द्वारें महाराष्ट्राला वेळोवेळीं आज्ञा केली कीं,

**"श्री रघुनाथ देवाचा समारंभ उत्तरोत्तर वृद्धीनें पावावा तसें च राज्य हि उत्तरोत्तर अभिवृद्धीतें पावेल"**

या आज्ञेचें पालन झालें तोंवर तसा अनुभव हि आला. या आज्ञेकडे महाराष्ट्राची दृष्टि पुनरपि वळली पाहिजे. 'रक्षिता देव देवांचा' त्याच्या उपासनेला जनता लावावी, ही मुख्य कल्पना. त्यासाठीं नवीन च मंदिर

उभारणें, यांत हि नावीन्य आहे. तें कांहीं स्मारकमंदिर नव्हे. चाफळ कांहीं मूळचें क्षेत्र नव्हे, कीं प्रख्यात शहर नव्हे. असें असतां तेथें मंदिर उभारणें, उत्सव सुरू करणें, त्या उत्सवाला प्रचंड स्वरूप आणणें, त्याची पद्धति ठरविणें, रावापासून रंकापर्यंत सर्वांचें लक्ष त्याकडे वेधून घेणें, त्याच्या चढत्या वाढत्या प्रचारांत समाजाचें कल्याण आहे, अशी भावना निर्माण करणें, या सर्व गोष्टी विचारांत घेतल्या म्हणजे त्या महापुरुषाच्या मनाचा कांहींसा ठाव लागतो. महाराष्ट्रभर जसजसें रामदास्य गाजों लागलें, तसतसें श्रीशिवरायाचें रामराज्य वाढूं लागलें.

(२४) श्रीसमर्थांचें तेरा समासांचें मानसपूजा म्हणून एक लघु काव्य आहे. त्यांतील सारें वर्णन चाफळक्षेत्र, तेथील श्रीराम आणि त्यांची नित्यनैमित्यिक पूजा, यांना उद्देशून आहे, असें माझ्या मनानें घेतलें व त्याला प्रत्यंतर उद्धवसुतकृत श्रीचरित्राच्या ३५ व्या अध्यायांत अचानक मिळालेलें पाहून मला आनंद झाला. मानसपूजा प्रकरणाशिवाय प्रत्यक्ष या मंदिराचें आणि यात्रेचें वर्णन श्रीसमर्थांनीं निराळ्या वीस ओव्यांत केलेलें आहे. तें असें :

बाडांक ६१८ वरून

**भोंवता डोंगराचा फेर। मध्यें देवाचें शिखर।**
**पुढें मंडप संपूर्ण पंध्रा खण ॥ १**

**आठां खांबावरी रचना। वर त्या येकेताळिस कमाना।**
**कामकट्टाउ नयेना समाधान ॥ २**

**नाना तरु अंबे बनें। दोहींकडे वृंदावनें।**
**वृंदावनीं जगज्जीवनें वस्ति केली ॥ ३**

**पुढें उभा कपिवीर। पूर्वेकडे लंबोदर।**
**खालें दाटला दर्बार नानापरी ॥ ४**

**दमामे चौघडे वाजती। धडके भांड्याचे गाजती।**
**फौजा भक्तांच्या साजती ठाईं ठाईं ॥ ५**

**माही मोर्तबें निशाणें। मेघडंब्रें सूर्यापानें।**
**दिंड्या पताका निशाणें विंजणे कुंचे ॥ ६**

काहाळा कर्णे बुरुंग बाके । नाना ध्वनि गगन झांके ।
बहु वाद्यांचे धबके परोपरी ॥ ७

ताळ मृदांग उपांग । ब्रह्मविणे चटक्या चंग ।
तानमानें माजे रंग हरिकथेचा ॥ ८

घंटा घांट शंख भेरी । डफडीं पांवे वाजांतरीं ।
भाट गर्जती नगारी परोपरी ॥ ९

उदंड यात्रकरु आले । रंगीं हरिदास मिळाले ।
श्रोते वक्ते कथा चाले भगवंताची ॥ १०

नाना पुष्पें माळा तुरे । पाहों जातां भडस पुरे ।
रंग स्वर्गींचा उतरे ठांई ठांई ॥ ११

गंधें सुगंधें केशरें । उदंड उधळती धुशरें ।
जगदांतरें हरिहरें वस्ति केली ॥ १२

दिवट्या हिलाल चंद्रज्योति । नळे आर्डाती उठती ।
बाण हवाया झरकती गगनामध्यें ॥ १३

उदंड मनुष्यांचीं थाटें । दिसताती लखलखाटें ।
येकमेकासी बोभाटें बोलाविती ॥ १४

उदंड उजळिल्या दीपिका । नामघोष करताळिका ।
कित्तेक आईका आईका शब्द होती ॥ १५

खिरापतीची वांटणी । तेथें जाहाली दाटणी ।
पैस नाहीं राजांगणीं दाटी जाली ॥ १६

रंगमाळा नीलांजनें । तेथें वस्ति केली मनें ।
दिवस उगवतां सुमनें कोमाइलीं ॥ १७

रथ देवाचा वोढिला । यात्रकरां निरोप जाला ।
पुढें जायाचा गलबला । ठांई ठांई ॥ १८

भक्तजन म्हणती देवा । आतां लोभ आसों द्यावा ।
धन्य सुकृताचा ठेवा भक्ति तुझी ॥ १९

दास डोंगरीं राहातो । यात्रा देवाची पाहातो ।
देव भक्तासवें जातो ध्यानरूपें ॥ २०

(२५) दास डोंगरीं राहातो। म्हणजे कोठें, हें आपण पुढच्या च उल्लासांत पाहूं. श्रीसमर्थांनीं वर वर्णन केल्याप्रमाणें तेव्हांपासून आतांपर्यंत चाफळास निर्वेधपणें उत्सव होत आला आहे. त्या काळांत एक दोन वेळां च चाफळाहून मूर्ति दुसरीकडे नेण्याचा प्रसंग आला होता. एकदां स्वेच्छेनें पारगांवीं मूर्ति नेली होती व दुसऱ्यांदां वाघापुरच्या सड्यावर सुरक्षितपणासाठीं न्यावी लागली होती. त्यानंतर मात्र मूर्ति दुसरीकडे कोठें हलविण्याचा प्रसंग आला नव्हता.

(२६) श्रीसमर्थांच्या कृपाछत्राखालीं कशी आनंदाची वेळ आली होती! श्रीसमर्थांच्या आधिपत्याखालीं चाफळचा मठ म्हणजे जणूं एक कल्पवृक्ष बनला होता. त्या वृक्षाला बारमहा भक्तिज्ञानाचीं फळें येत आणि मुमुक्षु, साधक, सिद्ध त्या वृक्षावर निर्वेधपणें बसून तीं फळें चाखीत. श्रीरामाचीं आणि श्रीरामदासांचीं कीर्तिगीतें स्वछंदानें गात! पण आज काय स्थिति आहे त्या वृक्षाची? कोठें गेलीं तीं फळें आणि तीं चाखणारीं तीं पक्षीकुळें? श्रीसमर्थांचे म्हणविणारांनीं याची चिंता केली पाहिजे! मी काय सांगूं!



उल्लास तेरावा

# श्रीसमर्थांच्या घळी व मठांचें तत्कालीन स्वरूप



खनाळामध्यें जाऊन राहे । तेथें कोणी च न पाहे ।
सर्वत्रांची चिंता वाहे । सर्व काळ ॥

अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहाणें नेमक ।
सृष्टीमध्यें सकळ लोक । धुंडीत येती ॥

—श्रीदासबोध, १५-२-२३, २४

[ **१. घळी** – ( १ ) माझ्या पाहण्यांत आलेल्या – ( २ ) सज्जनगडाच्या डोंगरांतील घळ – ( ३ ) चंद्रगिरीची व चाफळची रामघळ – ( ४ ) कुबडीतीर्थ – ( ५ ) शिवतरची घळ – ( ६ ) दासबोधादि ग्रन्थांची जन्मभूमि – ( ७ ) घळीचें वर्णन – ( ८ ) चंद्रराव मोरे याचा वाडा – ( ९ ) सुंदर मठ – ( १० ) तारळखोऱ्यांतील घळ – ( ११ ) हेळवाकची घळ – ( १२ ) तिचें वर्णन – ( १३ ) समर्थांना सीतलाई झाली, हें स्वाभाविक होतें – ( १४ ) या घळी श्रीसमर्थांचें चरित्र सांगतात. **२. मठांचें तत्कालीन स्वरूप** – ( १ ) तीं विद्यापीठें होतीं – ( २ ) त्यांत लेखनक्रिया अखंड चाले – ( ३ ) अवशिष्ट संग्रह – ( ४ ) गिरिधरांची अपूर्व कल्पना – ( ५ ) पहिली पंगत – ( ६ ) दुसरी पंगत – ( ७ ) निरनिराळे रस – ( ८ ) याचा अर्थ – ( ९ ) येहेळगांवच्या मठाचें तेंच स्वरूप – ( १० ) सर्व च मठांचें स्वरूप – ( ११ ) तीं रसांचीं भांडीं आज कोठें आहेत – ( १२ ) तत्कालीन स्वरूप अंतर्दृष्टीला च दिसेल. ]

## १. घळी

( १ ) खनाळ म्हणजे कडेकपाटें, दरेदुर्कुटें म्हणजे अवघड जागा, म्हणजे डोंगरांतल्या घळी. घळी ह्या एकांतांत चिंतन करण्यासाठीं असत, मग तें चिंतन परमेश्वरप्राप्तीसाठीं असो, किंवा जगाच्या कल्याणासाठीं असो, तत्त्वचिंतानुवादासाठीं असो, कीं राजकारणाच्या तजविजांसाठीं असो. या सर्व कारणांसाठीं श्रीसमर्थ वारंवार घळींत जाऊन रहात. अशा त्यांच्या आणखी हि घळी असतील, पण मला ठाऊक झाल्या आणि माझ्या पाहण्यांत आल्या, अशा त्यांच्या पांच, सहा च घळी आहेत.

( २ ) एक, सज्जनगडच्या च डोंगरांत आहे. गडावरून उतरतांना जेथें परळीकडे जाणारी वाट फुटते, त्याच्या वरच्या बाजूला घळीकडे जाणारी फार अरुंद वाट आहे. घळीच्या जवळ तर दहा पंधरा हात वाट वीतभर च रुंदीची असेल. माती झिरपून ती हि वीतभर रुंदीची वाट आतां बंद च झाली आहे. घळ लहान, पण मजेदार आहे. दहा पांच हात बसत बसत च जावें, मग उजव्या हाताला वळून तसें च बसल्या बसल्या दोन चार हात जावें, मग तेथें कमरे इतका खड्डा असून सुंदर वर्तुळाकार, आठ दहा माणसें बसूं शकतील, अशी घळ आहे. रामाचा धांवा करीत खुशाल तेथें बसा, कोणी तुमच्या वाटेस जाणार नाहीं.

( ३ ) दुसरी घळ, चंद्रगिरीच्या डोंगरांतील होय. ती आपण मागील कृष्णातीरगमनाच्या अकराव्या उल्लासांत पाहिली च आहे. चाफळास मटांत रामाचा उत्सव चालू असतां श्रीसमर्थ ज्या डोंगरांत जाऊन रहात, तो डोंगर म्हणजे शिंगणवाडीच्या पाठीशीं असलेला होय. त्यांत त्यांची तिसरी घळ आहे. चाफळपासून हा डोंगर येईल सरासरी कोस, दीड कोस, आणि मग बरें च वर चढून गेल्यावर ती घळ नजरेस पडते. चढतांना मार्गांत च, ज्या एका उंच खडकावर श्रीसमर्थ बसले असतां वासुदेव गोसावी, दिवसा मशाली पेटवून वाद करण्यासाठीं आले होते, तो खडक लागतो व आणखी थोडें वर गेल्यावर, मध्य रात्रीच्या वेळीं विड्याचीं पानें आणण्यासाठीं मठाकडे जात असतां कल्याणांना सर्पदंश झाला, तें भैरववाडीचें ठिकाण लागतें. तेथून आणखी एक टप्पा वर चढून गेल्यावर आपण घळीपाशीं जाऊन पोंचतों. या घळींत बसून श्रीसमर्थ देवाची यात्रा पहात. रमणीय ठिकाण आहे. एकदां च सांगून टाकतों, सर्व च घळी, एकीहून एक रमणीय आहेत. कोणत्या हि घळीशीं जाऊन पोंचल्यावर श्रीसमर्थ कोण होते, कसे होते, काय करीत होते, हें आपणांस कळून येतें. या घळीला रामघळ म्हणत. ती जणूं दोनमजली आहे. बाहेरून दोन मजले दिसतात. खालच्या मजल्यांत वरच्या बाजूला, माणसाला जातां येईल एवढें भोंक पाडून वरचा मजला केलेला आहे. त्या भोंकांतून वरच्या मजल्यांत जावयाचें व तेथें खुशाल निर्भयपणें चिंतन करीत बसावयाचें. खालच्या मजल्यांत उजव्या हाताला एक विवर आहे, त्यांत थोडें सरपटत गेल्यावर चार माणसें बसूं शकतील, अशी वर्तुळाकार जागा आहे. या च घळीला उद्देशून

**समर्थें पर्वतीं केलें येक गुप्त सदन ।**
**प्रसंगें ठेवावया देवार्चन ।**
**सूर्यप्रकाश उदक सन्निध ऊर्ध्वगमन ।**
**मार्ग सोपान करूनि जावें ॥**

— श्रीसमर्थप्रताप, ७-४

श्रीसमर्थप्रतापांतील ही ओवी बहुधा असावी.

( ४ ) या घळीपासून जवळ च, जाण्यास पांच सात मिनिटें लागतील, इतक्या अंतरावर तें पवित्र **कुबडीतीर्थ** आहे. त्या तीर्थाचें

मनोहरत्व मला किंवा कोणाला च विचारूं नका, कारण तें कोणाला च संपूर्ण बरोबर सांगतां च येणार नाहीं. स्वतःच जाऊन पहा, अनुभव घ्या आणि संप्रदायाची दीक्षा घेऊन प्रसन्न चित्तानें परत या. रामघळींत कांहीं वेळ बसल्यावर तेथील मातीचे कण आपल्या वस्त्रावर बसतात व कुबडीतीर्थावर येऊन स्नान केल्यावर आपलीं वस्त्रें दुर्मुजी होऊन आपणांस आपोआप संप्रदायाची दीक्षा मिळते. आपणां सर्वांस ठाऊक आहे, श्रीशिवाजी-राजांसाठीं हें तीर्थ निर्माण झालें होतें. त्या ठिकाणीं एकदां श्रीसमर्थ बसले असतां राजे दमून आले होते व तृषाक्रांत झाले होते. त्यांच्यासाठीं श्री नें कुबडीनें एक दगड उलथविला व तेथें हें तीर्थ प्रकट झालें! अद्यापि ऐन चैत्रवैशाखांत करांगुलि एवढी गार पाण्याची संतत धार चालू आहे. धारेखालीं स्वाभाविक कुंड बनलें आहे. तेथें स्नानसंध्या करा, फराळ करा, अमृततुल्य जल प्राशन करा आणि त्या उभय अवतारी पुरुषांच्या लीला आठवीत आणि त्यांना आळवीत खुशाल बसा.

( ५ ) चौथी घळ **शिवतरची.** ही घळ तेहतीस वर्षांमागें मीं प्रथम पाहिली, तेव्हां श्री रामदासी मासिकांत तिचें वर्णन, पृथ्वीवरील स्वर्ग म्हणून च केलें होतें, इतकी ती मला सुखदायक वाटली. त्या वेळीं मी भोरकडून हिरडोशी, माझिरी, पारमाची वरून शिवतर खोऱ्यांत उतरलों होतों. दुसरी जवळची वाट महाडकडून बीरवाडी, वरंधा, पारमाची वरून आहे. दुसऱ्या खेपेला मी त्या जवळच्या च वाटेनें गेलों होतों. शक १५७६ पासून १५९८ पर्यंत पुष्कळदां श्रीसमर्थांचें राहणें या घळींत झालेलें आहे व त्यांच्या आणि श्रीशिवरायाच्या गांठी पडलेल्या आहेत. §

( ६ ) चौफेर डोंगराचा घेर असून मध्यें कुंभे शिवतर, आंबे शिवतर व कसबे शिवतर, अशीं तीन लहान लहान गांवें आहेत. कसबे शिवतरच्या पाठीमागील डोंगराचे रांगेंत च श्रीसमर्थांची ती स्वर्गतुल्य घळ आहे. ही घळ म्हणजे श्रीसमर्थकृत ग्रन्थराज दासबोधादि कित्येक ग्रन्थांची जन्मभूमि होय. श्रीसमर्थांच्या पश्चात् हि कैक वर्षें श्रीसमर्थशिष्यप्रशिष्यांचें वास्तव्य या घळींत होत असावें, असें दिसतें. कारण, श्रीसमर्थांचे उपाध्ये दिवाकर,

§ उदाहरणार्थ पहा लेखांक २६ वा, श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, खंड पहिला, यांतील.

यांचे नातु दिवाकर च नांवाचे होते, त्यांनीं या घळींत राहून शक १६६२ त ज्ञानदेवविरचित अनुभवामृताची केलेली प्रत श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत बाडांक ३३९ म्हणून पहावयास मिळते. परंतु नंतर तेव्हांपासून आतांपर्यंत या घळीची, सर्व च ऐतिहासिक महत्त्वाच्या स्थळांप्रमाणें, महाराष्ट्रानें उपेक्षा केल्यामुळें घळींत पुष्कळ च पडझड झालेली आहे.

( ७ ) घळ सुमारें सवाशें फूट लांब व पाऊणशें फूट रुंद आहे. भिंतींच्या अवशिष्ट भागांवरून असें दिसतें कीं, त्या काळीं घळींत दहा बारा निरनिराळीं दालनें पाडलेलीं असावींत. घळींत देवतार्चन ठेवण्याची जागा कोणती असावी, श्रीसमर्थ कोठें बसत असावेत, इतर शिष्यमंडळीकडे कोणतीं दालनें असावींत, याची मी नुसती कल्पना करीत गेलों. दुसरें काय करणार ? आपणांस आतां कोण सांगणार ? घळींत चर्मचक्षूंला श्रीसमर्थ कोठें दिसले नाहींत, पण अंतर्दृष्टीला मात्र त्यांचें सारें चरित्र, या ठिकाणीं, कोणाला हि दिसल्यावांचून राहणार नाहीं !

( ८ ) घळीपासून सुमारें फर्लांगावर, या च डोंगरांत, वरच्या बाजूस चंद्रराव मोरे याचा वाडा आहे. वाडा आतां अर्थात् नाहीं, पण त्याच्या पायाच्या खुणा मात्र आहेत. आज हि कसबे शिवतरमध्यें मोऱ्यांची च वस्ती आहे. चंद्रराव मोरे हें त्या काळीं एक फार मोठें प्रस्थ होतें. तो एक पुंड राजा होता. तो नांवाला च विजापुरकरांचा अंकित होता. जावळीपासून शिवतरपर्यंतचा मुलुख चंद्ररावाच्या हुकमतीखालीं होता. तत्कालीन राजकारणांत शिवतरचें महत्त्व फार होतें. ज्याच्या ताब्यांत शिवतरखोरें, तो कोंकणपट्टीचा मालक होय, असें या खोऱ्याचें भौगोलिक महत्त्व होतें. मला आतां नवल वाटत नाहीं, पण प्रथम शिवतरला गेलों, तेव्हां वाटे, अशा या अवघड खोऱ्यांत श्रीसमर्थ कां बरें मधून मधून येऊन रहात ? १५७६ ते १५८६ लेखनाचा संकल्प करून ते या खोऱ्यांत येऊन राहिले, असें एका अप्रकाशित पत्रांत म्हटलें आहे, तें लेखन चाफळास करतां आलें नसतें काय ? कोंकणपट्टी ताब्यांत घ्यावयाची तर शिवतरखोरें ताब्यांत आलें पाहिजे. तें खोरें ताब्यांत घ्यावयाचें तर चंद्रराव मोऱ्याला अनुकूल करून घेतलें पाहिजे होतें. एक

तर त्याला आपलासा तरी केला पाहिजे होता, किंवा त्याचा कांटा च उपटून टाकला पाहिजे होता !

**भिक्षामिसें लहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥**

याप्रमाणें चंद्ररावाची परीक्षा करण्यासाठीं व त्याला अनुकूल करून घेण्याच्या हेतूनें श्रीसमर्थ त्या खोऱ्यांत जाऊन राहिले असतील काय ? ह्या आपल्या प्रतिपादनास आधार काय म्हणून कोणा विरोधकानें विचारल्यास त्यास काय सांगावें ? त्यास एवढें च सांगतां येईल, बाबा रे, परिस्थिति पाहून तुला जें अनुमान सुचेल, तें च खरें मान ! राजकीय दृष्टीनें खोऱ्याचें भौगोलिक महत्त्व विचारांत घे, आणि आपल्या च मनाला विचार, अशा त्या खोऱ्यांत चंद्रराव मोऱ्याच्या वाड्याशेजारीं एका घळींत १५७६ त श्रीसमर्थ जाऊन रहातात, तें उगीच च असेल काय ? चंद्रराव मोरे बधत नाहीं, अशी परीक्षा झाल्यावर च १५७८ त श्रीशिवाजी राजे यांनीं त्याचा कांटा उपटून टाकला आणि खोऱ्यावर आपला अंमल बसविला.

( ९ ) इतर सर्व घळींपेक्षां या घळींत श्रीसमर्थांचें राहणें फार होई. ही घळ म्हणजे चाफळच्या मठाखालोखाल श्रीसमर्थांचा मठ च बनली होती. तिला **सुंदर मठ** असें नामाभिधान प्राप्त झालें होतें, इतकें तें स्थान सुंदर आहे. गिरिधर हि सांगतात —

**समर्थें चाफळअधिष्ठानीं श्रीराम संस्थापिले ।**
**मग सुंदर मठीं समर्थांचे रहवे जाले ।**
**नाना गिरिकंधरीं दासविहरे निर्मिले ।**
**नाना मठ करविले लोकोद्धारा ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ७-२

रहवे म्हणजे वास्तव्य आणि विहरे म्हणजे मोठमोठाले पाणदुरे. असो. श्रीसमर्थहृदयांत या घळीचें आपण पुन्हां दर्शन घेऊं, तेव्हां च तिचें श्रीसमर्थकृत वर्णन हि अवलोकूं.

( १० ) पांचवी घळ तारळखोऱ्यांतील कळंब्याच्या डोंगरांतील होय. चाफळखोऱ्याला लागून च उत्तरेस तारळखोरें आहे. तारळ्यापासून कळंब्याचा

डोंगर तीन कोस सहज येईल. तारळ्याहून पुढें गाडीनें जाण्याची सोय नाहीं. एक तर पायीं जावें किंवा घोड्यावर बसून जावें. डोंगराच्या पायथ्याशीं तोंडोशी खेडें आहे, तेथून डोंगर चढूं लागावें व सुमारें अर्ध्या तासांत घळींत जाऊन पोचावें. घळ ११०' लांब, २५' रुंद व ७' उंच आहे. ११०' लांबी, हें च घळीचें तोंड होय. माती ढासळूं नये म्हणून तोंडाशीं दगडांनीं कांठ बांधलेला आहे व त्याच्या मागें ८' अंतरावर दुसरा कांठ आहे. म्हणजे ११०'×८'×७' अशी ही पडवी च आहे. पडवीच्या मागें चार निरनिराळीं दालनें आहेत. पुढच्या बाजूस बरोबर मध्यावर वरून पाणी पडत असावें. या ठिकाणचें हवापाणी फार उत्तम असलें पाहिजे, असें वाटतें, कारण येथील लोकांना लहान मूल किंवा तरुण मनुष्य कसा मरतो, याची कल्पना च नाहीं, सर्वांनीं वृद्ध होऊन च मरावयाचें, असा येथील जणूं दंडक च आहे.

(११) सहावी घळ **हेळवाकची**. हिला च कोंढवळ्याची हि घळ म्हणतात. त्या काळीं शिवतरची घळ असेल विशेष सुंदर, पण आज मात्र सर्व घळींत हेळवाकच्या घळीचें सृष्टिसौंदर्य विशेष खुललेलें दिसतें. ही घळ अति निबिड अरण्यांत आहे. कऱ्हाडाहून चिपळुणास जाणारी, कोयना नदीच्या कांठाकांठानें जी सडक आहे, त्या सडकेवर पाटणच्या पलीकडे, कुंभारलीघाटाच्या तोंडाशीं हेळवाक म्हणून लहानसें गांव आहे. हेळवाकपर्यंत कोयना नदी सारखी उत्तरेकडून दक्षिणेकडे येते व हेळवाक-पासून ती पूर्ववाहिनी झाली आहे. हेळवाकच्या दक्षिणेस एक दोन लहान डोंगरांच्या पलीकडे कोंढवळें नांवाचें खेडें आहे; तेथून पुढें श्रीसज्जनगडापेक्षां हि जरा उंच डोंगर चढून गेल्यावर एक लहानशी धनगरवाडी लागते, तेथून पुढें अतिदाट अरण्यांतून च जावें लागतें. ह्या अरण्यांत अस्वलांची वस्ति फार आहे व क्वचित् वाघ हि आहेत. तेव्हां त्या अरण्यांतून जातांना निःशस्त्र एकट्यादुकट्यानें जाण्याचें अकारण धाडस न करतां कोंढवळचीं कांहीं माणसें बरोबर घेऊन च पुढें जाणें नेहमीं इष्ट असतें. मार्गांत सदरहु पशूंची गांठ पडल्यास त्यांचा समाचार घेण्यास, नेहमींच्या सरावामुळें, त्या माणसांना अवघड वाटत नाहीं व आपणांस हि अनायासें घळीचा मार्ग दाखविला जातो. तेथून सुमारें मैलभर अरण्यांतून

गेल्यावर एका डोंगराच्या दरींत वळतां च ती भव्य पण मनोरम घळ एकदम दृष्टीपुढें येते आणि आनंद होतो. घळींत आपण पोंचतों आणि श्रीसमर्थांची आठवण होते. १५९६ चा सबंध चातुर्मास श्रीसमर्थांनीं या घळींत क्रमिला. आतां मात्र हिंस्र पशूंवांचून दुसऱ्या कोणाला त्या घळीचा उपयोग राहिला नाहीं. तेव्हांपासून आतांपर्यंत दुसऱ्या कोणी पर्वा न केल्यामुळें घळींत हात हात मातीचा थर सांचला आहे व त्यांत अस्वलांचे असंख्य केस मिसळलेले आहेत.

( १२ ) घळीचें तोंड दक्षिणेस आहे. घळ तीन चार पुरुष उंचीवर असून घळींत जाण्याला मार्ग दोन्ही बाजूंनीं आहे. घळींतील दोन्ही बाजूंच्या कपारी सोडून घळीची पूर्वपश्चिम लांबी बरोबर ९८ हात आहे व दक्षिणोत्तर रुंदी कोठें १५ हात तर कोठें ३० हात आहे. मातीचा थर काढला तर घळीची उंची चारपांच हात आहे. घळीच्या पुढच्या बाजूस तीन हात रुंदीची भिंत होती, असें दिसतें. मध्यें भिंती घालून एकंदर पांच दालनें केलेलीं होतीं. पांच हि दालनांत जीं कांहीं अवशिष्ट चिन्हें दिसत आहेत, त्यावरून मीं कल्पना केली कीं, अगदीं मधल्या दालनांत देवतार्चन असावें व त्याच्या डाव्या बाजूचे पहिले दालनांत श्रीसमर्थ व पलीकडच्या दालनांत श्रीशिवाजी राजे येत असतील तेव्हां रहात असावेत व देवतार्चनाच्या उजव्या बाजूचीं दोन्हीं दालनें रघुनाथभटादि शिष्य मंडळीकडे असावींत. श्रीशिवछत्रपतींच्या दालनापुढें जो डोंगराचा भाग आहे, तेथें घोड्यांची पागा होती म्हणून दाखवितात. घळींत बसून समोर पाहिलें म्हणजे फार च मनोरम देखावा दृष्टीस पडतो. तळापासून घळ जशी तीन चार पुरुष उंचीवर आहे, तसा च घळीच्या वर आणखी सुमारें दहा पुरुष उंचीचा सारखा डोंगराचा कडा आहे व त्या कड्यावरून बरोबर घळीपुढें, देवतार्चनाच्या दालनाच्या लांबीभर वरून सारखें पाणी पडत आहे. गंगावतरणाचें स्मरण होतें. त्या पाण्याखालीं बसून मनसोक्त स्नानसंध्यादि कर्में सारून श्रीसद्गुरुचरणप्रतापचिंतनांत कांहीं काळ कंठावा.

( १३ ) ऐन उन्हाळ्यांत चैत्र वद्य १० स धाबळी पांघरून निजल्यावर हि जर थंडी वाजण्याची येथें रहात नाहीं, तर तेथें चातुर्मास च

क्रमिल्यामुळें श्रीसमर्थांना सीतलाई § झाली होती, यांत कांहीं च नवल नाहीं.

( १४ ) अशा ह्या सर्व घळी पाहिल्या म्हणजे शक १५६६ पासून तों १५९८ पर्यंतच्या काळांत श्रीसमर्थांनीं कोणता व्याप केला असला पाहिजे, याची कल्पना होते. या बत्तीस वर्षांच्या अवधींतील श्रीसमर्थचरित्राचें स्वरूप जाणावयाची ज्याला इच्छा असेल त्यानें एकवार या सर्व पवित्र घळींचें दर्शन घेतलें पाहिजे. त्या घळी त्याच्याशीं बोलतील आणि त्यास श्रीसमर्थांचें चरित्र सांगतील.

येथवर आपण श्रीसमर्थांच्या कांहीं घळी पाहिल्या, आतां आपण त्यांच्या मठांचें तत्कालीन स्वरूप कसें होतें, तें समजून घेण्याचा प्रयत्न करूं.

## २. मठांचें तत्कालीन स्वरूप

( १ ) श्रीसमर्थस्थापित मठामठांची हकिकत येथें सांगण्याचा विचार नाहीं, पण चार दोन उदाहरणें देऊन एकंदर मठांचें सामान्य स्वरूप कसें होतें, तेवढें च दर्शविण्याचा हेतु आहे. श्रीसमर्थांनीं भरतखंडभर अकराशें मठ स्थापन केले होते व सिद्धान्त असा आहे कीं, हे सारे मठ म्हणजे इतकीं विद्यापीठें – श्रीसमर्थविद्यालयें – होतीं.

( २ ) त्या काळीं छापखाने नव्हते. त्यामुळें पाहिजे असतील त्या ग्रन्थांच्या नकला करून घ्याव्या लागत. यासाठीं प्रत्येक मठांत लेखनक्रिया अखंड चालू च असे. श्रीसमर्थांचें वाङ्मय, प्रत्येक मठांत बहुधा संपूर्ण असे, पण परंपरेनें जे मठपति होत, ते आणि त्यांचे शिष्य आपआपल्या आवडीप्रमाणें इतरांचे हि ग्रन्थ लिहून काढून मठांत त्यांचा संग्रह करीत असत. सांप्रत विद्यमान असलेल्या बहुतेक मठांतील महत्त्वाचा संग्रह आज एकत्रित होऊन श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत सुरक्षित येऊन बसला आहे. त्या संग्रहाची वर्णनात्मक यादी, श्रीरामदासी संशोधन, या नांवानें, सुमारें हजार अकराशें पृष्ठांच्या दोन खंडांत प्रसिद्ध आहे.

---

§ श्रीसमर्थांचें एकमेव उपलब्ध असलेलें बावन ओळींचें हस्तलिखित पहा. श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, लेखांक पहिला.

तीवरून नुसती दृष्टि फिरविली, तरी कळून येईल कीं, या मंदिरांत श्रीसमर्थवाङ्मयाचा पूर्णावतार झाला असून, बृहन्महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या सर्व सत्पुरुषांचें कांहीं ना कांहीं वाङ्मय त्यांत आहे च. त्यांत मुळीं च नाहीं, असा शक १७४० पूर्वींचा कोणी च विख्यात ग्रन्थकार बाहेर राहिला नाहीं.

( ३ ) शिवाय एक गोष्ट लक्षांत घ्यावयाची कीं, वर्षानुवर्षें उपेक्षा होत होत, राष्ट्राच्या पडत्या काळांत मठांतून अवशिष्ट राहिलेला हा संग्रह आहे, तरी तो आज लक्षावधि रुपये मोलाचा आहे, मग हे मठ ज्या काळीं आपल्या पूर्व वैभवांत पूर्णपणें सुशोभित असतील, त्या काळीं या संग्रहाचें स्वरूप कसें असेल, याची कल्पना च केली पाहिजे.

( ४ ) संग्रहाच्या त्या तत्कालीन स्वरूपावर श्रीसमर्थप्रतापांतील दोन समास उत्कृष्ट प्रकाश पाडीत आहेत. ते दोन समास म्हणजे सोळावा आणि सतरावा समास होत. त्या दोन समासांत गिरिधरांनीं अशी अपूर्व कल्पना केली आहे कीं, श्रीसमर्थांच्या घरीं सर्व साधुसंत आणि कवि, वेदांती आणि पौराणिक, योगी आणि सिद्ध, सूत्रकार आणि भाष्यकार सर्व जण भोजनास आले आहेत आणि त्या प्रत्येकाच्या पात्रांत ज्याच्या त्याच्या आवडीचा च पदार्थ वाढण्यांत आला आहे. प्रत्येकाच्या आवडीचा पदार्थ दुसरा कोणता असणार? त्यानें केलेल्या ग्रन्थांत जो विषय असेल, जो रस असेल, तो च त्याच्या आवडीचा पदार्थ असणार.

( ५ ) श्रीसमर्थांच्या घरीं, याप्रमाणें कोण कोण मंडळी भोजनास आली होती? आमच्या

**समर्थस्वामीचें ब्रह्मांड घर । ब्रह्मांडीं व्यापक सर्वेश्वर ।**
**सर्वेश्वराचे संत अवतार । सुखस्वानंदें पातले ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १६–६

इतकी मंडळी आली कीं, त्यांच्या अनेक पंक्ती कराव्या लागल्या. त्यांपैकीं गिरिधरांनीं फक्त दोन च पंक्ती वर्णिल्या आहेत. पहिल्या पंक्तींत मुख्य श्रीमत् जगद्गुरु श्रीशंकराचार्य, श्रीधराचार्य, विद्यारण्य, मधुसूदन, रामानंद, मध्वमूर्ति, नृसिंहसरस्वती, सभ्यतीर्थस्वामी, तारकब्रह्मस्वामी, गंगाधरस्वामी,

सच्चिदानंदस्वामी, नारायणाश्रम, त्रिंबक, मुक्तेश्वर, सालया, पाठकनामा, विष्णुदासनामा, मुकुंदराज, हरिनाथ, हस्तामलक, मत्स्येंद्रनाथ, मीन, गोरक्ष, चौरंगी, गैनी, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, जालंधर, गोपीचंद, मैनावती, कानीफ, जयदेव, अनंतदेव, बोपदेव, नामदेव, सांवतामाळी, पुरंदरविठल, कूर्मदास, गोराकुंभार, रोहिदास, जनमित्रनागा, परमाभागवत, विसोबाखेचर, चांगदेव, भानुदास, येकोजनार्दन, मुग्गदासमुद्गल, मुद्गलस्वामी, गोपाळ, परमहंस, नरहरि माळो, नरहरि सोनार, परमानंदजोगा, कृष्णयाज्ञवल्की, सहजानंद, शिवनिजानंद, अच्युताश्रम, रेणुकानंदन, ढुंढिजनार्दन, दासो दिगंबर, दामाजीपंत, मुधोबा, तुळसीदास, नृसिंह, चंद्रेश्वर, गंगाधर, जनजसवंत, मीराबाई, धनाजाठ, सुरदास, सेना न्हावी, पिपातानसेन, श्रीधरस्वामी, तान्होभक्त, कान्होचोरटा, बहिरे पिसाट, नागेश, शांतलिंग, चोखामेळा, बाजीद पठाण, हुशेन लतिफ, शेख महमंद, कबीर भाई, नन्हवा फकीर, मृत्युंजय, बलखशाह, शमनामीर, बिढार योगी, इत्यादि थोर थोर मंडळी बसली आहेत आणि सर्वांचा समाचार घेत श्रीसमर्थ पंक्तींत फिरत आहेत. कोणास काय आवडतें, हें सारें श्रींना ठाऊक. त्याप्रमाणें ज्याच्या त्याच्या पानांत, आग्रहपूर्वक तो तो पदार्थ वाढवीत आहेत.

**सद्गुरु समर्थ सर्व परामर्श घेती ।**
**सर्वसाक्षी आत्माराम प्राणनाथ रसस्वाद जाणती ।**
**मुख्य रामब्रह्म आम्ररस सर्वांसी आवडती ।**
**सद्गुरुनाथ वाढविती सर्वत्रां ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १६–४५

( ६ ) याप्रमाणें पहिली पंगत उठल्यावर दुसऱ्या पंक्तीच्या तयारीला शिष्यमंडळी तत्काळ लागली. दुसऱ्या पंक्तीची मंडळी आलेली च होती. सर्व तयारी झाल्यावर दुसरी पंगत बसली. या पंक्तींत कोण कोण बसले होते ?

प्रथम विश्वनाथ पुराणिक, रंगनाथ, भगवंतपंत, रघुनाथस्वामी, आनंदमूर्ति, विठ्ठल, रंगमूर्ति, कृष्णदास जयराम, केशवराज, तुकोबा, वामन, रमावल्लभदास, निरंजन, पूर्णानंद, शिवराम, सनतिदास, तुकोबातनय

नारायण, वामननंदन देवराज, काशीराज, योगीराज, राघवरंक, कृष्णदास, मुकुंदनारायण, महादेव, मुरारि, शिवसुत, विठ्ठल, जनपंडित, गोविंद दीक्षित, पंडितराय, काकंभट, श्रीरामजोसी, हरिदास, रुक्मपंडित, यदुराज, आप्पादीक्षित, सखाभक्त, लोलिंबराज, गोसावीनंदन, रामानंद, परमानंद, बोधला, हरि नारायण, राघवचिद्धन, उद्धवचिद्धन, रामकृष्णचिद्धन, श्रीधरचिद्धन, विठ्ठलचिद्धन, चिंतामणीचिद्धन, येकनाथ, काशीनाथ, दिनशाम, निंबराज, गोविंदराज, रामकृष्णदयार्णव, नारायण, शिवराम, दादो, गोविंद, अनंत कवि, श्रीधर, गंगाधर कोनेरी, नरहरिदास, शिवदास, आत्मगोपाळ, प्राणगोपाळ, त्रिंबकनाथ, मारकीनाथ, मानपुरी, केसरीनाथ, मध्वनाथ, गणेशनाथ, गोपीनाथ, बंदेनाथ, निपटनिरंजन, इत्यादि

**समर्थ सर्वज्ञ सर्व परामृश घेती ।**
**आत्माराम सर्व हि सांभाळिती ।**
**ऐक्यभावें पंगती न्याहाळिती ।**
**भिन्नभावें कोण्ही असेचिना ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १७-३९

( ७ ) अशा या दोन पंक्तींत, ज्याला ज्याची आवड, तो च रस त्याच्या पानांत वाढला जाई. गीतारस, भागवतरस, द्वैतरस तथा अद्वैतरस, ब्रह्मानंदरस, कथामृतरस, विवेकरस, योगरस, गीतगोविंदरस, वेणुरस, नामामृतरस, विठ्ठलरस, रामरस, रामरहिमरस, कृष्णरस, हरिरस, ऐक्यरस, हरिहररस, परमानंदरस, गीतार्णवरस, भूतदयारस, नादब्रह्मरस, हरिकीर्तनामृतरस, सोहंस्मरणामृतरस, भक्तिरस, गुरुभक्तिप्रेमरस, इत्यादि रसांचीं अनंत भांडीं भरलेलीं श्रीसमर्थांच्या घरीं सिद्ध होतीं. वाढावयाला गिरिधर स्वतः होते. कोणाला काय आवडतें तें त्यांना ठाऊक. ते नेमकें त्यांच्या पात्रांत तें च नेऊन वाढीत. आणि आमच्या समर्थांनीं

**निगमकल्पतरूचें विशाळ अमृतफळ ।**
**अपार ब्रह्मरस काढिला निर्मळ ॥**

आणि तो सर्व संतसज्जनांच्या पात्रांत, आग्रह करकरून, स्वतः श्रीसमर्थांनीं वाढावा ! कोण भाग्य त्या जेवणारांचें ! !

( ८ ) या सर्व पंक्तींचा, भोजनाचा आणि निरनिराळ्या पक्वान्नांचा व रसांचा इतका च अर्थ होतो कीं, या सर्व ग्रन्थकारांचे ग्रन्थ, चाफळास मुख्य मठांत आणि गिरिधरांच्या बीड येथील मठांत होते, इतकेंच नव्हे, तर ते सर्व ग्रन्थ गिरिधरांच्या अवलोकनांत आलेले होते, एरव्हीं त्यांना प्रत्येकाच्या ग्रन्थांतील रस ओळखून तो नेमका त्या ग्रन्थकाराच्या पात्रांत वाढतां च आला नसता.

( ९ ) जें स्वरूप बीड येथील गिरिधरांच्या मठाचें, तें च येकेहाळी येथील मठाचें असलें पाहिजे, याची साक्ष येकेहाळीमठपति आत्मारामहाराज यांचा श्रीदासविश्रामधाम हा प्रचंड ग्रन्थ च देत आहे. हा ग्रन्थ म्हणजे श्रीसमर्थचरित्र होय, हें खरें, पण तें चरित्र वर्णन करीत असतां, मुकुंदराजज्ञानेश्वर यांच्या पासून तों चरित्रकाराच्या काळापर्यंत कोणा हि संताचा आणि कवीचा कांहीं संदर्भ आला, तर आत्मारामहाराजांनीं त्या पुरुषाच्या ग्रन्थांची हि थोडक्यांत ओळख करून दिलेली आहे. ते सारे ग्रन्थ त्यांच्या संग्रहीं असल्यावांचून आणि ते त्यांच्या वाचण्यांत आल्यावांचून त्या ग्रन्थांची अशी ओळख करून देणें शक्य नव्हे.

( १० ) माझ्या समजुतीप्रमाणें, जें स्वरूप गिरिधरांच्या बीड येथील मठाचें किंवा आत्मारामहाराजांच्या येकेहाळी येथील मठाचें, तसें च स्वरूप, थोड्या फार प्रमाणानें, श्रीसमर्थांच्या सर्व च मठांचें असावें आणि म्हणून च मी म्हणत असतों कीं, श्रीसमर्थांचे हजारों मठ म्हणजे इतकीं विद्यापीठें होतीं, इतकीं श्रीसमर्थविद्यालयें होतीं. महाराष्ट्राला आज एक समर्थविद्यालय चालविणें जड झालें आहे व चालविलें तर त्याचें मोठें भूषण वाटतें, तर श्रीसमर्थांनीं त्या काळीं, अशीं शब्दशः हजारों समर्थविद्यालयें स्थापिलीं आणि चालविलीं होतीं !

( ११ ) मीं वर म्हटलें च आहे कीं, नष्ट होत होत, मठांतून उरलेलीं रसांचीं तीं सारीं भांडीं आज श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत, सर्वांच्या उपयोगासाठीं म्हणून आणून ठेविलीं आहेत. तीं ओझरतीं जरी पाहिलीं, तरी तेवढ्यावरून त्या काळीं सर्व मठांचें स्वरूप कसें भव्य आणि रम्य असेल, याची कोणास हि कल्पना होईल. या संग्रहांत तंजावर येथील भीमस्वामींच्या मठांतील ३०४, तिसगांव येथील दिनकरांच्या मठांतील

१४८, बीड येथील गिरिधरांच्या मठांतील १४७, येकेहाळी येथील आत्मारामांच्या मठांतील १४१ व कल्याणस्वामींच्या डोमगांव येथील मठांतील १०७, अशीं एकूण ८४७ रसांचीं भांडीं आहेत आणि इतर सर्व ठिकाणचीं मिळून हजार बाराशें भांडीं आहेत, तीं निराळीं च. या भांड्यांचा एक चमत्कार असा पाहिला कीं, त्यांतील रस कोणी किती हि प्राशन केला, तरी श्रीसमर्थांच्या जांब येथील तुपाच्या घागरीप्रमाणें, तो मुळीं च कमी होत नाहीं, भांडीं पुन्हां भरलेलींचीं भरलेलीं !

( १२ ) असें, त्या काळीं, श्रीसमर्थांच्या सर्व मठांचें स्वरूप होतें. तें पाहिलें म्हणजे त्या सर्व मठांचे पहिले पहिले मठपति किती साक्षपी आणि कशा योग्यतेचे असले पाहिजेत याची हि कल्पना होते. आपल्या चर्मदृष्टीला, मठांचें तें तत्कालीन वैभवशाली स्वरूप आज कोठें हि पहावयास मिळणार नाहीं, पण अंतर्दृष्टीला तें गोचर होऊं शकेल. तेव्हां त्या दृष्टीनें च ते सारे महंत आणि त्यांचे मठ आणि त्या सर्वांचे आद्य कुलगुरु आणि त्यांचा आद्य मठ, यांचें अनन्य भावानें दर्शन घेऊन आपण आपल्या पुढील उद्योगास लागूं.



उ ल्हा स च व दा वा

# श्री शि व स म र्थ



बोळतां भवानी माता । महींद्र दास्य इच्छिती ।
बोलणें हें प्रचीतीचें । अन्यथा वाउगें नव्हे ॥

—स्फुट प्रकरणें, ६७–५२

कोण्ही राजदर्शनासी अनुष्ठानें करिती ।
समर्थपाईं राजराजेंद्र लागती ।
समर्थ केवळ अवतारमूर्ति ।
हनुमानरूपें सर्वेश्वरु ॥

—श्रीसमर्थप्रताप ३–६६

[ ( १ ) श्रीशिवसमर्थभेट केव्हां झाली – ( २ ) वादाची निरर्थकता – ( ३ ) माझी भूमिका – ( ४ ) महाराष्ट्राची थोर पुण्याई – ( ५ ) उभयतांची परस्परांच्या भेटीविषयीं आतुरता – श्रीसमर्थांचें पत्र – ( ६ ) वादातीत गोष्ट – ( ७ ) मऱ्हाष्टधर्म राहिला कांहीं । तुम्हाकरितां ॥ – ( ८ ) यांतून निघणारा ध्वनि – ( ९ ) मराठ्यांचा लौकिक – ( १० ) शिंगणवाडीच्या रानांत उभयतांची भेट आणि श्रीशिवरायावर श्रीसमर्थांची कृपा – ( ११ ) धर्म आणि राज्य यांची सांगड – ( १२ ) उभयतांची ताटातूट कोण करूं शकेल ? – ( १३ ) तुकाराम-महाराज काय म्हणतात – ( १४ ) वाकेनिसी टिपणाचा आधार व तो च सर्वथैव मान्य होय – ( १५ ) दशक अठरावा, समास सहावा – ( १६ ) समर्थें अफझलखानासि मारविलें – ( १७ ) खानाच्या भेटीस जाण्यापूर्वी प्रसंगीं तसें वागण्याचें ठरलें होतें – ( १८ ) ऐसे लौंद बेइमानी – ( १९ ) कण्हेरीचा मठ आणि त्यास इनाम – ( २० ) तुझा तूं वाढवी राजा – ( २१ ) पाठीराखे श्रीसमर्थ – ( २२ ) संकटनिवारण – ( २३ ) ताइतांत मारुती – ( २४ ) अकरा मुठी भिक्षा – ( २५ ) श्रीसमर्थप्रतापांत वर्णिलेले सात प्रसंग – ( २६ ) समर्थांनीं गडावर रहावयास यावें, अशी शिवरायांची इच्छा – ( २७ ) तीस श्रीसमर्थांची सशर्त मान्यता – ( २८ ) चाफळच्या उत्सवाची व्यवस्था – ( २९ ) व्यवस्थेसाठीं राजपत्रें – (३०) उत्सव करणें राज्यकारभाराचें एक अंग बनलें – (३१) धर्माधिष्ठित महाराष्ट्रराज्य – ( ३२ ) श्रीसमर्थ गडावर रहावयास जातात – ( ३३ ) संतसज्जनांना आमंत्रणें – ( ३४ ) पहिली संतपरिषद् गडावर – अध्यक्ष श्रीसमर्थ आणि स्वागताध्यक्ष श्रीशिवछत्रपति – ( ३५ ) इतर कार्यक्रम – ( ३६ ) गागा पंडितांचा अनुताप – ( ३७ ) दर्शनास येणाऱ्या माणसांची सारखी रीघ – ( ३८ ) श्रीसमर्थांच्या सोयीकडे राजांचें लक्ष – ( ३९ ) गडावरील गुप्ती – ( ४० ) राम राम म्हणण्याचा दंडक – ( ४१ ) सर्व देशभर लौकिक पसरला – ( ४२ ) गुरुदक्षिणा – ( ४३ ) राज्याची सनद – ( ४४ ) सद्गुरुचरणीं राज्यद जो जैसा जनक याज्ञवल्क्यास – ( ४५ ) दोन देह पण प्राण एक – ( ४६ ) महाराष्ट्राचें जीवन ]

( १ ) श्री छत्रपति शिवाजीमहाराज आणि श्रीसमर्थ रामदासस्वामी यांची प्रथम भेट १५९४ त झाली, तत्पूर्वी नाहीं, असा एक वाद आहे, पण त्या वादांत शिरण्याचें आपणांस कांहीं कारण दिसत नाहीं. जनक आणि याज्ञवल्क्य, श्रीराम आणि वशिष्ठ, अर्जुन आणि श्रीकृष्ण, यांच्या जेव्हां भेटी झाल्या, तेव्हां च श्रीशिवराय आणि श्रीसमर्थ यांची हि भेट झाली. त्यांची ताटातूट झाली च होती केव्हां, तर त्यांच्या भेटीचा प्रश्न उत्पन्न

व्हावा ! महाराष्ट्राच्या पुण्याईनें ईश्वरी संकेतानुसार हे दोघे ईश्वरी पुरुष एका च काळीं, एका च कार्यासाठीं अवतीर्ण झाले असल्यामुळें त्यांच्या भेटी, अवतार घेण्यापूर्वीं च, युगायुगाच्या ठायीं झाल्या होत्या. माझ्या या विधानांत इतिहास नाहीं, असें कोणास वाटेल, तर त्यास माझा इलाज नाहीं. ज्याला हे आक्षेपक इतिहास म्हणतात, तो हि आपण, त्यांच्या समजुतीसाठीं, किंचित् पाहूं हि.

( २ ) मला हा वाद निरर्थक वाटतो. तो कलुषित भावनांनीं कोणी तरी उत्पन्न केलेला आहे. मला त्यांत पडण्याची इच्छा होत नाहीं. तो घातक आहे. आत्मकल्याणेच्छु माणसांनीं असला वाद घालूं नये. त्यांत सत्यांश हि नाहीं. त्याचें उगमस्थान च मुळीं गढूळ आहे, निर्मळ नाहीं.

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥**

हें भगवंताचें अगदीं शेवटचें सांगणें आहे. त्यावर महाराष्ट्रियांनीं विश्वास ठेवून वागावें. या च वचनाची आठवण होऊन श्रीसमर्थ हि शिकवितात

**शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ।**
**शक्ति युक्ति जयें ठाईं । तेथें श्रीमंत धांवती ॥**

—स्फुट प्रकरणें, ६७–३०

धनुर्धर श्रीशिवराय, त्यांची शक्ति आणि योगेश्वर श्रीसमर्थ, यांची युक्ति, यांची युति झाली आणि महाराष्ट्राचें कल्याण झालें, हें आपण पाहिलें. मग यापासून इष्ट तो बोध घेऊन कल्याण साधावें, कां वितंड वाद करून सर्वांचें च अकल्याण करून घ्यावें, याचा सुज्ञांनीं विचार करावा.

( ३ ) श्रीशिवाजीमहाराजांमुळें श्रीसमर्थांना महत्त्व प्राप्त झालें, किंवा श्रीसमर्थांच्यामुळें श्रीशिवरायाची प्रतिष्ठा वाढली, असें मानून ज्यांना आपआपले दुराग्रह हृदयांशीं बाळगावयाचे असतील, त्यांनीं हा वाद घालीत बसावें, पण मजसारख्या ज्यांना हे दोघे हि अवतारी पुरुष वाटतात, यांच्यामुळें ते किंवा त्यांच्यामुळें हे मोठे, असें नसून, दोघे हि स्वतंत्र, स्वयंभु, श्रेष्ठ अवतारी पुरुष होत, असें ज्यांना वाटतें, त्यांनीं असल्या

निष्कारण वादांत पडूं नये, हें च उत्तम. अशांनीं फक्त निर्विकार मनानें फक्त इतिहास पहावा.

माझी भूमिका ही अशी आहे. श्रीशिवसमर्थ हीं दोघांचीं दोन निरनिराळीं नांवें खरीं, पण दोघांचा आत्मा एक च होय. त्यांचीं चरित्रें, त्यांचें वाङ्मय, त्यांच्या काळचे इतिहासग्रन्थ वाचून माझी अशी भावना झाली आहे कीं, या दोघांचे देह फक्त भिन्न, पण जीव एक च होता. रामदास हें एक नांव उच्चारल्यानें जसें दोघांचें हि स्मरण होऊन दोघे एकरूप भासतात, तद्वत् शिवसमर्थ असें नांव उच्चारतां च दोघांचें स्मरण होतें, पण दोघांचा प्राण एक च, याचा प्रत्यय येतो.

( ४ ) महाराष्ट्राची पुण्याई थोर होती, म्हणून हे दोघे हि शक्तियुक्तीचे आदर्श प्रतिनिधि पुरुष एका च काळीं महाराष्ट्रांत अवतीर्ण झाले. या दोघा पुरुषांच्या अवताराला गंगायमुनांच्या अवतरणाचा दृष्टान्त देण्यांत येत असतो, तो मला अत्यंत समर्पक वाटतो. त्या दोन्ही नद्या हिमालयांत च निरनिराळ्या ठिकाणीं उगम पावतात, तेथें कांहीं त्यांचा आपसांत संकेत ठरत नाहीं कीं, मी अशी वाहत जातें व तूं तशी वाहत जा व कालेंकरून आपण दोघी जणी प्रयागास मिळूं. दोघी हि स्वतंत्रपणें उगम पावतात, कांहीं काळ स्वतंत्र वाहत जातात आणि परिस्थितीला अनुसरून संगम पावतात. अगदीं तद्वत् शक १५६७–६८ च्या सुमारास, एका च मुलखांत, एकीकडे श्रीसमर्थांनीं मारुतीरायाची स्थापना करून व रामराज्याची द्वाही फिरवून धर्मकारणाची गुढी उभारली, तर दुसरीकडे श्रीशिवरायांनीं तोरणा किल्ला घेऊन व " हिंदवी स्वराज्य व्हावें हें श्रीरोहिडेश्वराचे मनांत फार आहे * " असें श्रीच्या मनांतील जाणून स्वतंत्रपणें राजकारणाचा ध्वज फडकाविला.

( ५ ) याप्रमाणें १५६७ पासून दोन तीन वर्षें या दोघा महापुरुषांचे उद्योग एका च प्रांतांत चालू असतां, एकमेकांची वार्ता एकमेकांच्या कानांवर जात असे. दोघे हि परस्परांच्या प्रत्यक्ष भेटीविषयीं उत्सुक झाले होते.

---

* मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड १५ वा, लेखांक २६८.

**शिवराजासी वृत्तांत कर्णोपकर्ण गेले ।**
**दर्शनासाठीं डोंगरोडोंगर लागले ।**
**समर्थदर्शन होय ना उदास जाले ।**
**राजकार्य कांहीं सुचेचिना ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३–६४

श्रीसमर्थ कोठें आहेत, याचा शोध आणण्यास त्यांनीं चहुंकडे मनुष्यें पाठविलीं. त्यांनीं श्रीसमर्थांना गांठून राजांची उत्सुकता त्यांच्या कानांवर घातली. ‡ श्रीसमर्थांनीं त्यांच्याबरोबर राजांना देण्यासाठीं उत्तरादाखल पत्र दिलें. तें पत्र प्रसिद्ध आहे, पण त्यांत कांहीं पाठांतरें आहेत. पत्र महत्त्वाचें आहे. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ३५, ८६ व ३०४ या तीन बाडांत तें पत्र उद्धृत केलेलें आहे. ३५ वरून मी तें येथें उतरून घेतों व ८६ आणि ३०४ यांतील पाठांतरें टीपांत देतों.

## लिखित

**॥ श्रीगणेशाय नमः ॥**

**निश्चयाचा महामेरु । बहुत जनासी आधारु ।**
**अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी[1] ॥ १**
**परोपकाराचिया रासी । उदंड घडती जयासी ।**
**तया गुणा महत्त्वासी । तुळणा कैंची ॥ २**
**नरपति हयेपति गजपति । गडपति भूपति जळपति ।**
**पुरंदर[2] आणि आदिशक्ति[3] । पृष्ठीभागीं ॥ ३**
**येशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।**
**पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥ ४**
**आचारसीळ विचारसीळ । दानसीळ धर्मसीळ ।**
**सर्वज्ञपणें सुसीळ । सकळां ठाईं ॥ ५**
**धीर उदार आणि[4] सुंदर । शूर क्रियेसी तत्पर ।**
**सावधपणें नृपवर । तुछ केले ॥ ६**

‡ सप्तप्रकरणात्मक बखर, आवृत्ति दुसरी, सन १८९४, पृष्ठ ४५.

(१) 'योगे' ८६; 'योगें' ३०४. (२) 'पुरंधर' ८६, ३०४. (३) 'शक्ति' ८६. (४) ८६ व ३०४ त 'आणि' नाहीं.

तीर्थें क्षेत्रें तें मोडलीं । ब्राह्मणें स्थानभ्रष्ट जालीं ।
सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ ७
देव धर्म गोब्राह्मण । करावया संरक्षण ।
हृदयस्थ जाला नारायेण । प्रेरणा केली ॥ ८
शूर पंडित पुराणिक । कवेश्वर वैदिक याज्ञिक ।
धूर्त तार्किक सभानायेक । तुमचा ठाई ॥ ९
या भूमंडळाचे ठाईं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।
मऱ्हाष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुम्हाकरितां ॥ १०
आणीक हि धर्मकृत्यें चालती । आश्रित होउनी कितेक असती ।
धन्य धन्य तुमची कीर्ति । विश्वीं विस्तारली ॥ ११
कितेक दुष्ट संव्हारिला । कितेकांसी धाक सुटला ।
कितेकांसी आश्रयो जाला । शिवकल्याण राजा ॥ १२
तुमचे देसीं वास्तव्य केलें । परंतु वर्तमान नाहीं घेतलें ।
रुणानुबंधें विस्मरण जालें । काये नेणों ॥ १३
सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ती । सांगणें काये तयांप्रती ।
धर्मस्थापनेची कीर्ति । सांभाळिली पाहिजे ॥ १४
राजकारणें उदंड दाटलें । तेणें चीत विभागलें ।
प्रसंग नस्तां लिहिलें । क्षमा केलें' पाहिजे ॥ १५

इति लिखित नाम समास ॥ १ ॥

( ६ ) या उभयतांची प्रथम भेट केव्हां झाली, कोठें झाली, नंतर भेटी केव्हां केव्हां आणि कोठें कोठें झाल्या, याविषयीं ज्यांना अजून वाद घालावयाचा असेल, त्यांना घालूं द्या. त्यांचें हि समाधान होईल, असे त्या वादांचे निर्णय लागावयाचे असतील, तेव्हां लागतील, पण एक 'गोष्ट मात्र आज हि सर्वांना वादातीत मानतां येईल, ती ही कीं, या दोघा महापुरुषांचीं अंतःकरणें एक होतीं, दोघांचें परस्परांवरील प्रेम अप्रतिम होतें, एकमेकांच्या कर्तृत्वाविषयीं उभयतांना वाटणारा आदर निस्सीम होता,

---

( ५ ) 'गंधर्व' ८६. ( ६ ) 'होउनी' ३०४. ( ७ ) तिन्ही चरणांचे शेवटीं 'ला' ऐवजीं 'ले' ३०४. ( ८ ) 'सांभाळविली' ८६. ( ९ ) 'उदंड राजकारण' ८६, ३०४. ( १० ) 'निघतां' ३०४. ( ११ ) 'कीजे' ३०४.

असें मानण्याला श्रीसमर्थांनीं श्रीशिवरायाच्या हयातींत वरील पत्रांत काढलेले उद्गार आणि त्यांच्या पश्चात् श्रीसंभाजीमहाराजांना पाठविलेल्या पत्रांत श्रीशिवरायाविषयीं प्रकट केलेलें वात्सल्य, हीं पुरे आहेत. पश्चातचे उद्गार पुढें पाहूं, सध्यां येथें हयातींतील उद्गारांचा विचार करूं.

( ७ ) वरील पत्रांतील दहावी ओवी—

**या भूमंडळाचे ठाईं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।**
**मऱ्हाष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुम्हांकरितां ॥**

या सरसहा व्यापक उद्गारांत केवढा अर्थ भरला आहे, विचार करा. सबंध भारतवर्षांत श्रीशिवछत्रपतीवांचून धर्मरक्षण करील, असा दुसरा कोणी उरला नव्हता, हा जसा उत्तानार्थ या उद्गारांतून निघतो, तद्वत् धर्मावर आलेलें संकट कसें प्राणांतिक होतें व त्या संकटाच्या निवारणाची श्रीसमर्थांना अति चिंता लागली होती, हा हि गर्भितार्थ आपल्या प्रत्ययास येत आहे.

( ८ ) ह्या ओवींतून असा ध्वनि निघत आहे, श्रीसमर्थ श्रीशिवरायाला म्हणत आहेत, 'राजा, तीर्थाटणाच्या काळांत उत्तरदक्षिण सारा देश पालथा घातला, विशेषतः उत्तरेकडे शेंकडों बलवान् क्षत्रिय राजे राज्य करीत आहेत, त्यांच्यांत कदाचित् सामर्थ्य असेल, पण धर्मरक्षणाची चाड एकांत हि असल्याचें मला दिसून आलें नाहीं, सारे दिल्लीच्या बादशहांचे मिंधे बनले आहेत, तूं एक च पुरुष मला असा दिसतोस, ज्याला धर्मरक्षणाची चिंता लागली आहे आणि तें रक्षण करण्याची ज्याच्यांत शक्ति आणि युक्ति, दोन्ही आहेत. राजा, तुझी आणि तुझ्या पदरीं असलेल्या सर्वांची धन्य आहे, मी सर्वत्र हिंडून पाहून आलों, आपल्या तीर्थक्षेत्रांची दुर्दशा आहे, त्यांच्या रक्षणाची, तुला आणि मला जी प्रेरणा होत आहे, ती हृदयस्थ नारायणाकडून च होत आहे. तुझ्या मुलखांत मी आज दोन चार वर्षें संचार करीत आहें, पण तुझ्या लक्षांत आलें नाहीं, फार काय सांगूं, सर्वांनीं मिळून धर्मस्थापनेची कीर्ति सांभाळिली पाहिजे, माझें चित्त मात्र प्रस्तुतची स्थिति पाहून भंग पावत आहे.'

( ९ ) श्रीशिवाजीमहाराज म्हणजे यच्चयावत् मराठे होत. श्रीशिवाजी-महाराज म्हणजे अखिल महाराष्ट्र. त्या वेळच्या महाराष्ट्राचे महाराज

प्रतिनिधि होते. सारा देश हिंडून श्रीसमर्थांची खात्री झाली कीं, तशा संकटकाळीं धर्माचें रक्षण कोणाकडून होईल, तर तें महाराष्ट्राकडून च. मराठ्यांच्याविषयीं त्या काळीं एकंदर देशांत काय मत होतें, तें मनुसीनें नमूद केलेलें आहे. " मराठे हे अत्यंत शूर आणि धाडशी आहेत, असा त्यांचा सर्व देशभर लौकिक आहे, " असें मनुसी लिहितो आणि तो च प्रत्यय श्रीसमर्थांना हि आला होता; आणि म्हणून च त्यांना महाराजांविषयीं इतका विश्वास वाटला.

( १० ) श्रीसमर्थांच्या शोधार्थ पाठविलेल्या माणसांनीं वरील लिखित, म्हणजे पत्र, आणून देतां च राजांचें चित्त उत्कंठेनें अति उतावीळ झालें. मी आपल्या दर्शनास येत आहें, म्हणून त्यांनीं श्रीसमर्थांकडे पत्र रवाना केलें, पण त्यांना धीर निघाला नाहीं, ते तत्काळ निघाले च. त्यांचें पत्र आणि स्वत: श्रीशिवराय बरोबर च श्रीसमर्थचरणांपाशीं येऊन पोचले. पोचले तें पवित्र ठिकाण, चाफळास श्रीराममंदिराच्या मागच्या बाजूस, डोंगराच्या पायथ्याशीं असलेलें शिंगणवाडीचें रान होय. तेथें श्रीसमर्थ बागेंत एका झाडाखालीं बसले होते, जवळ कल्याण होते आणि कांहीं लेखन चाललें होतें. जासुदानें राजांचें पत्र आणून दिलें मात्र, तों च पाठोपाठ राजे हि येऊन पोचले. श्रीसमर्थ दृष्टीस पडतां च राजांनीं हात जोडले, त्यांचा कंठ भरून आला, त्यांनीं दंडवत घातला आणि श्रीरघुपति तुमची मनकामना पूर्ण करील, असा श्रीसमर्थांनीं अभयवर दिला. महाराजांचे नेत्र प्रेमाश्रूंनीं भरून आले.

श्रीसमर्थांची श्रीशिवरायावर पूर्ण कृपा झाली. त्यांनीं समर्थांना अकरा हजार होन अर्पण केले. श्रीसमर्थांनीं त्यांची वृष्टि ब्राह्मणांवर केली. तेव्हांपासून आतांपर्यंत तें ठिकाण परंपरेनें दाखविण्यांत येत आहे. नंतर हि कैक वर्षें त्या रानांत एकाद्यास एकादा होन दैववशात् सांपडत असे.

( ११ ) याप्रमाणें या दोघा अवतारी पुरुषांचीं धर्मकारण आणि राजकारण अशीं दोन्हीं कार्यें कांहीं काळ स्वतंत्रपणें चालल्यावर, प्रयागास गंगायमुनेप्रमाणें, चाफळखोऱ्यांत शिंगणवाडीच्या रानांत त्यांचा लवकर च संगम झाला आणि नंतर मग, ज्याप्रमाणें गंगायमुनेचा संयुक्त प्रवाह आजपर्यंत जगाला पावन करीत आला व पुढें अखंड पावन करीत राहणार,

त्या च प्रमाणें या दोघा कर्मयोग्यांच्या भेटीनंतर धर्मकारण आणि राजकारण यांचा जो एकत्र प्रवाह सुरू झाला, त्यानें नंतर सुमारें दीडशें वर्षें महाराष्ट्रास सुखाचे आणि वैभवाचे दिवस दाखविले आणि त्यावर च महाराष्ट्राची दृष्टि अखंड खिळून राहिली आहे. त्यांच्या भेटीनंतर महाराष्ट्राचें वैभव सारखें वाढत च गेलें. महाराष्ट्रराज्याला श्रीसमर्थांचा आशीर्वाद च § होता कीं, ज्या प्रमाणांत चाफळच्या श्रीरामाचा महोत्सव उत्तरोत्तर वृद्धीते पावविला जाईल, त्या च प्रमाणांत महाराष्ट्रराज्य हि अभिवृद्धीते पावेल. आणि तसें च अक्षरशः घडत गेलें. श्रीरामाच्या चढत्या वाढत्या वैभवाबरोबर श्रीशिवरायाचें राज्य हि वृद्धिंगत होत गेलें आणि जसजसा राज्याचा विस्तार होत गेला, तसतशीं देवाचा महोत्सव हि चढत्या वाढत्या प्रमाणावर साजरा करण्याचीं साधनें उपलब्ध होत गेलीं. चाफळच्या श्रीरामाचा महोत्सव आणि श्रीशिवरायाचें महाराष्ट्रराज्य यांचा उत्कर्ष परस्परावलंबी होता. श्रीसमर्थांचा तसा आशीर्वाद होता आणि राजांचा तसा अनुभव होता.

**कैलासवासी शिवगणनाम्नें । क्षत्रियकुळावतंसें सप्रेमें ।**
**मंत्रियानुमतें सेवेसी संभ्रमें । रुद्रसंख्या ग्रामें समर्पिलीं ॥**

**जव जव शिवराज्यवर्धमानें । तव तव रामभजनासी ग्रामप्रदानें ।**
**राजा ब्रह्म राम अनुसंधानें । राजश्रिया विराजत ॥**

—श्रीसमर्थप्रताप, २०–४, ५

(१२) असा या दोघा ईश्वरी पुरुषांचा ऐतिहासिक संबंध असतां त्यांची ताटातूट कोण करूं शकेल व तसा कोणी विकारवशतेमुळें प्रयत्न केल्यास त्यांत त्यास यश कसें यावें ? त्यांची असली ताटातूट करण्याची बुद्धि पूर्वींच्या कोणा हि चरित्रकारास झाली नाहीं. हे चरित्रकार श्रीसांप्रदायिक असल्यामुळें आपल्या गुरूची प्रतिष्ठा वाढविण्यासाठीं समर्थ आणि शिवाजीमहाराज यांचा संबंध ते प्रथमपासून दाखवितात व जेथें तेथें आणतात, असा आक्षेप घेण्यांत येतो, पण त्याला माझें उत्तर असें आहे कीं, १६०३ पासून १७४० पर्यंत आणि कांहीं नंतर हि, मिळून जे दहा

§ श्रीरामदासी मालेंतील नववा भाग, श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, लेखांक २६, ४३, ८० इत्यादि व श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला पहिला सुमनहार, पुष्प २१ वें पहा.

वीस चरित्रकार झाले, त्यांनीं काय आपसांत संगनमत केलें होतें ? कोणाला च सत्यकथनाची चाड नव्हती होय ? प्रख्यात संतचरित्रकार महीपति हे तर श्रीसंप्रदायाबाहेरचे होते ना ? मग ते हि, महाराजांचा संबंध अगदीं आरंभापासून च होता, असें आपल्या संतविजयांत कां म्हणतात व जेथें तेथें आणि जेव्हां तेव्हां महाराजांना पुढें कां करतात ? तात्पर्य, या दोघा पुरुषांचा तसा च ऋणानुबंध होता, असें या सर्व चारित्रकारांच्या निवेदनावरून व इतर अनेक सबळ प्रमाणांवरून मी मानतों. त्यांपैकीं कांहीं थोडीं प्रमाणें पुढें यदृच्छेनें कदाचित् प्रकट होतील हि.

(१३) श्रीतुकाराममहाराजांचा निर्याणकाळ १५७१ फाल्गुन वद्य २ होय. तत्पूर्वी त्यांची भेट घेण्याची इच्छा श्रीशिवाजी राजांनीं दर्शविली असतां तुकारामांनीं राजांना जें सहा अभंगांचें पत्र पाठविलें, त्यांतील सर्वच्या सर्व अभंग किंवा कांहीं अभंग आपल्या आवडत्या कल्पनेला नडतात, म्हणून च केवळ, कित्येक जण ते अभंग प्रक्षिप्त मानतात, हें योग्य म्हणतां येईल काय ? मंदिरांतील बाडांक १२४४ यांत ते सहाचे सहा अभंग आढळतात. मल्हार रामरावकृत श्रीशिवछत्रपतिमहाराजांचें जें सप्तप्रकरणात्मक चरित्र प्रसिद्ध आहे, त्यांत हि ते अभंग आहेत च. तुकाराममहाराजांनीं निःसंदिग्धपणें राजांना लिहिलें आहे कीं,

**सद्गुरु श्रीराम-दासाचें भूषण । तेथें घाली मन । चळूं नको ॥ ९**

* * *

**आत्मारामीं मन । ठेउनियां राहे । रामदास पाहे । आपण चि ॥ १०**

* * *

**राया छत्रपती । ऐकावें वचन । रामदासीं ध्यान । लावीं वेगीं ॥ १**
**रामदासस्वामी । सोयरा सज्जन । त्यासी तन मन । अर्पी बापा ॥ २**
**मारुती अवतार । स्वामी प्रगटला । उपदेश केला । तुजलागी ॥ ३**

* * *

**धरूं नको आस । आमुची भूपाळा । रामदासीं डोळा । लावीं आतां ॥ ८**

* * *

**शरण असावें । रामदासालागीं । नमन साष्टांगीं । घाली त्यासी ॥ १४**

यावरून श्रीशिवरायावर श्रीसमर्थांची कृपा १५७१ च्या फाल्गुनापूर्वी च झाली, हें उघड आहे.

( १४ ) श्रीसमर्थांच्या निर्याणानंतर तीन चार दिवसांत च लिहिलें गेलेल्या वाकेनिसी स्मरणटिपणांत श्रीशिवाजीराजांना झालेल्या अनुग्रहाचा शक, महिना, मिति व वार हीं दिलीं आहेत, तीं १५७१ वैशाख शुद्ध ९ गुरुवार अशीं आहेत. पण थोडा चमत्कार असा, रामदासगुणार्णव या ग्रन्थांत शक दिलेला नसून ज्येष्ठमास, शुक्लपक्ष नवमी, मंदवासर हीं दिलेलीं आहेत. गुणार्णवकारांनीं ज्येष्ठ महिना व मंदवासर, हीं कोठून घेतलीं, तें कळण्याला मार्ग नाहीं. १५७० च्या ज्येष्ठ शु. ९ ला शनिवार होता व संभव आहे कीं, ही मिति राजांच्या एकाद्या भेटीची असावी. आपण वाकेनिसी टिपणाच्या आधारें १५७१ वैशाख शु. ९ गुरुवार, हा च महाराजांच्या अनुग्रहाचा दिवस होय, असें धरून चालावें.

( १५ ) अफझुलखानाचा वध १५८१ च्या मार्गशीर्ष शु. ७ स झाला, हें ध्यानांत असूं द्यावें. शिवाजीराजाला जिवंत पकडून तरी आणीन, किंवा यमसदनास तरी पाठवीन, असा विजापुरदरबारांत विडा उचलून सरदार निघाल्याची बातमी श्रीसमर्थ आणि श्रीशिवराय यांना लागतां च, श्रीशिवराय श्रीसमर्थांच्या भेटीस आले. त्यांच्यांत इतर संकेत काय ठरला असेल, तो जगाला कोठून कळणार, पण त्या भेटींत समर्थांनीं राजांना ज्या सूचना केल्या, जें धोरण सांगितलें, जें आश्वासन दिलें, तें सर्व ग्रन्थराज दासबोधांतील अठराव्या दशकाच्या सहाव्या समासांत नमूद आहे. या क्षणीं वाचकांच्या हाताशीं ग्रन्थराज दासबोध असेल, नसेल आणि या वेळीं तो समास दृष्टीपुढें असणें अगत्याचें आहे, म्हणून तो समास येथें मी मुद्दाम उद्धृत करतों. वाचकांनीं कृपा करून गय करावी.

**॥ श्रीरामसमर्थ ॥**

**नाना वस्त्रें नाना भूषणें । येणें शरीर शृंघारणें ।**
**विवेकें विचारें राजकारणें । अंतर शृंघारिजे ॥ १**

**शरीर सुंदर सतेज । वस्त्रें भूषणें केलें सज्ज ।**
**अंतरीं नस्तां चातुर्यबीज । कदापि शोभा न पवे ॥ २**

तुंड हेकाड कठोरवचनी । अखंड तोले साभिमानी ।
न्याय नीति अंतःकर्णी । घेणार नाहीं ॥ ३

तऱ्हे सीघ्रकोपी सदा । कदापि न धरी मर्यादा ।
राजकारणसंवादा । मिळों चि नेणे ॥ ४

ऐसे लौंद बेइमानी । कदापि सत्य नाहीं वचनीं ।
पापी अपस्मार जनीं । राक्षेस जाणावे ॥ ५

समयासारिखा समयो येना । नेम सहसा चालेना ।
नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥ ६

अति सर्वत्र वर्जावें । प्रसंग पाहोन चालावें ।
हटनिग्रहीं न पडावें । विवेकी पुरुषें ॥ ७

बहुत चि करितां हट । तेथें येऊन पडिले तट ।
कोणीयेकाचा शेवट । जाला पाहिजे ॥ ८

बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजाभोवानी ।
परंतु विचार पाहोनी । कार्य करणें ॥ ९

अखंड चि सावधाना । बहुत काये करावी सूचना ।
परंतु कांहीं येक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥ १०

समर्थापासीं बहुत जन । राहिला पाहिजे साभिमान ।
निश्चळ करूनियां मन । लोक असती ॥ ११

म्लेच दुर्जन उदंड । बहुतां दिसाचें माजलें बंड ।
याकारणें अखंड । सावधान असावें ॥ १२

सकळकर्ता तो ईश्वरु । तेणें केला आंगिकारु ।
तया पुरुषाचा विचारु । विरुळा जाणे ॥ १३

न्याय नीति विवेक विचार । नाना प्रसंगप्रकार ।
परीक्षिणें परांतर । देणें ईश्वराचें ॥ १४

माहायेत्न सावधपणें । समई धारिष्ट धरणें ।
अद्भुत चि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥ १५

येश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणासी नाहीं सीमा ।
नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ १६

**देव ब्राह्मण आचार विचार । कितेक जनासी आधार ।**
**सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ १७**

**येहलोक परलोक पाहाणें । अखंड सावधपणें राहाणें ।**
**बहुत जनाचें साहाणें । देणें ईश्वराचें ॥ १८**

**देवाचा कैपक्ष घेणें । ब्राह्मणाची चिंता वाहाण ।**
**बहु जनासी पाळणें । देणें ईश्वराचें ॥ १९**

**धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।**
**जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ २०**

**उत्तम गुणाचा ग्राहिक । तर्क तीक्ष्ण विवेक ।**
**धर्मवासना पुण्यश्लोक । देणें ईश्वराचें ॥ २१**

**सकळ गुणांमधें सार । तजविजा विवेक विचार ।**
**जेणें पाविजे पैलपार । अरत्रपरत्रींचा ॥ २२**

**उत्तमपुरुषनिरूपणनाम समास**

किती महत्त्वाचा समास आहे! कोणी हि सांगेल कीं, हा समास लिहिणारा पुरुष इहपरलोकींचा कोणी तरी मोठा अधिकारी असला पाहिजे, इहलोकींचा थोर मुत्सद्दी – राजकारणी पुरुष – आणि परलोकींचा ईश्वरनिष्ठ ब्रह्मसाक्षात्कारी असला पाहिजे. मी प्रांजलपणें मान्य करतों कीं, या समासाचें आणि त्यांतील प्रत्येक ओवीचें संपूर्ण मर्म माझ्या लक्षांत आलेलें नाहीं, पण हा समास ज्यांच्या मुखांतून प्रकट झाला ते श्रीसमर्थ व तो ज्यांच्या साठीं झाला ते श्रीशिवराय, या उभयतांशिवाय तें संपूर्ण मर्म तिसरा कोण आपणांस उलगडून सांगूं शकेल !

( १६ ) श्रीसमर्थांनीं कोणता सल्ला दिला असेल, याविषयीं हा समास वाचून आपण जो तर्क करूं, त्याला गिरिधरांच्या श्रीसमर्थप्रतापांत पुष्टि आढळते. क्रमांक ६३१ आणि ६३२ अशा श्रीसमर्थप्रतापाच्या दोन प्रति या मंदिरांत आहेत. ६३१ ही पोथी आहे व ६३२ हें शिवलेलें वाड आहे. अठराव्या समासांतील ३६ वी ओवी पोथींत आहे, ती अशी :

**समर्थें अकारपुर्वक यवनासि मारविलें । मग चांफळक्षेत्र उभें केलें ।**
**श्रीतुळजामाउलिसि संस्थापिलें । जाउलिपर्वतिं प्रतापगडिं ॥**

यांत कांहीं खोडाखोड नाहीं. बाडांत मात्र खोडाखोड करून या ओवीला वरीलप्रमाणें स्वरूप दिलें आहे. म्हणजे बाड ही मूळ प्रत व तिच्यांत खोडाखोड केल्यानंतर तिच्यावरून पोथी लिहिली गेली असें ठरतें. बाडांतील खोडाखोड फार महत्त्वाची आहे. खोडाखोड करण्यापूर्वी

'अफझलखा' होतें, त्यांत 'फ' चा 'क' केला व 'झ' चा नुसता काना केला व 'लखा' वर अगदीं बारिक कागद डकवून त्यावर 'र' लिहून समासांत 'पुर्वकयव' लिहिलें आहे, व जेथें मूळ

**अफझलखानासि मारविलें**

होतें, त्याचें

**अ 'कारपुर्वकयव 'नासि मारविलें ।**

केलें आहे. ‡

यापासून हि अर्थबोध तो च होतो, पण तो संदिग्ध केला आहे. अकारपूर्वकयवन म्हणजे, ज्या यवनाच्या नांवाचें पहिलें अक्षर अ आहे, अशा यवनास म्हणजे अफझलखानास. पण मूळचीं अक्षरें तशीं स्पष्ट असतां, ही खोडाखोड करून अशी संदिग्धता, त्या काळीं, कां आणावी लागली, कोण जाणे !

(१७) या स्पष्ट ओवीच्या संदर्भानें आतां पुन्हां १८×६ कृपा करून वाचा, म्हणजे अफझलखानाच्या भेटीस जाण्यापूर्वी श्रीशिवरायाला श्रीसमर्थांनीं किती आणि कसा सावधानतेचा इषारा दिला असला पाहिजे, याचा जो तुम्ही पूर्वी मनांत नुसता तर्क केला असेल, त्याला आतां उघड निश्चयाचें स्वरूप प्राप्त होईल. हें सारें खानाच्या पूर्व चरित्राला अनुसरून च घडलें.

(१८) **ऐसे लौंद बेइमानी । कदापि सत्य नाहीं वचनीं ।** असें सरसकट विधान करण्याला श्रीसमर्थांच्या पुढें शंभर उदाहरणें असतील, पण खुद्द अफझलखानाचा बेइमानीपणा तर महाराष्ट्रांत सर्वतोमुखी

---

‡ ही गोष्ट मंदिराच्या एका वार्षिक समारंभाच्या वेळीं श्री. तात्यासाहेब करंदीकर यांनीं टांचण वाचून प्रथम उजेडांत आणली.

झालेला होता. रणदुल्लाखानानें आपल्या हाताखालीं अफझलखान व शहाजीराजे यांना घेऊन इ. स. १६३८ ते १६४० कर्नाटकांत दक्षिणेकडे अनेक स्वाऱ्या केल्या. त्या वेळीं दक्षिणेंत अनेक ठिकाणीं लहान लहान हिंदु संस्थानें होतीं. तेथील राजांना नायक म्हणत. त्या नायकांत जूट नव्हती. नसावयाची च. तेव्हां कांहीं लढून व कांहीं विश्वासघात करून तीं संस्थानें जिंकण्याचा रणदुल्लाखानानें सपाटा चालविला. त्यांत बंगलुरजवळचा शिरें येथील किल्ला हस्तगत करण्याचें काम अफझलखानावर सोंपविण्यांत आलें होतें. किल्ला मजबूत होता, सहज हस्तगत होण्यासारखा नव्हता. तेव्हां अफझलखानानें तेथील नायकास अभिवचन देऊन तडजोडीसाठीं बोलाविलें आणि तो येतां च विश्वासघात करून त्यास ठार§ केलें. अशा लौकिकाचा हा सरदार शिवाजीराजावर चालून आला असतां व त्यानें विश्वास दाखवून आपसांत बोलणीं करण्यास राजांना बोलाविलें असतां

**अखंड चि सावधाना । बहुत काये करावी सूचना ।**
**परंतु कांहीं येक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥**

अशी श्रीसमर्थांनीं सूचना देऊन, या च खानानें शिरें येथील नायकाची काय वाट लावली, ती विचारांत घेऊन काय अनुमान काढावयाचें, तें समासांत नुसतें सूचित केलें आहे, पण प्रत्यक्ष भेटींत श्रीशिवरायाला जें सांगावयाचें, तें स्वच्छ च सांगितलें असणार.

(१९) एक लहानसें च, पण चुप करणारें प्रमाण असें आहे कीं, श्रीसमर्थशिष्य कण्हेरीमठपति श्रीवासुदेव महंत यांना श्रीशिवाजीमहाराजांनीं शके १५९३ च्या अधिक वैशाखाच्या वद्य १२ स पुष्पवाटिकेस व बाग करावयास दोन ठिकाणीं मिळून अकरा बिघे जमीन इनाम करून दिली होती. त्या इनामाचा उल्लेख करून श्री राजा शंभु छत्रपति यांनीं १६०२ च्या कार्तिक शु. ७ स नवीन सनद करून‡ दिली. श्रीसमर्थांच्या एका शिष्याला १५९३ त श्रीशिवराय सनद करून देतात, पण १५९४

§ श्रीसमर्थ-सदन-प्रकाशन, मराठी रियासत, शहाजी राजे भोसले, १९३५ पृष्ठ ६४.

‡ श्रीसांप्रदायिक विविध विषय, द्वितीय खंड, विषयांक ९० वा पहा.

पर्यंत श्रीसमर्थांना भेटत सुद्धां नाहींत, हें कोणीं खरें मानावें ? १५९३ त श्रीशिवराय वासुदेव महंतांना इनाम करून देतात, इतकें च नव्हे, तर तत्पूर्वी च समर्थांच्या सांगण्यावरून त्यांना त्यांनीं कण्हेरीस मठ हि करून दिला होता. §

( २० ) श्रीशिवाजीराजांवर श्रीसमर्थांचा किती जीव होता, हें दर्शविणारें जें एक प्रमाण उपलब्ध आहे, तेवढें पुरें आहे. शंभर गोष्टी मागूं नका, शंभरांतली एक गोष्ट काय मागावयाची असेल, तेवढी च मागा, असें जणूं देवीनें म्हटल्यावरून श्रीसमर्थांनीं जें एक च मागणें मागितलें, तें काय दर्शवितें ? छत्तिसावें स्फुट प्रकरण सबंध च श्रीसमर्थचरित्रपर आहे, तें आपण श्रीसमर्थांच्या कवितेच्या पहिल्या खंडांत पहा. त्याचा शेवट करतांना श्रीसमर्थ देवीजवळ एक च मागणें मागतात—

**येक चि मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।**
**तुझा तूं वाढवी राजा । सीघ्र आम्हा चि देखतां ॥ १७**
**दुष्ट संव्हारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ।**
**परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवी ॥ १८**
**देवाचीं राहिलीं सत्वें । तूं सत्व पाहसी किती ।**
**भक्तांसीं वाढवी वेगीं । इच्छा पूर्ण परोपरीं ॥ १९**
**रामदास म्हणे माझें । सर्व आतुर बोलणें ।**
**क्षमावें तुळजे माते । इच्छा पूर्ण चि ते करी ॥ २०**

( २१ ) इतका श्रीसमर्थांचा जीव श्रीशिवरायाकडे लागला होता. भक्तांचा प्रतिपाळ करणें हें श्रीसमर्थांचें ब्रीद च होतें. राजांना हि त्याचा प्रत्यय अनेकदां आला होता. श्रीसमर्थांसारखा ईश्वरी कृपेला पात्र झालेला पुरुष आपल्या पाठीशीं आहे, याचा श्रीशिवछत्रपतींना केवढा आधार वाटत असला पाहिजे. श्रीदासविश्रामधामांत एक प्रसंग वर्णिला आहे.

( २२ ) एकदां आपलें सैन्य मागें टाकून, श्रीसमर्थांच्या भेटीसाठीं म्हणून, राजे फार पुढें निघून गेले आणि श्रीसमर्थांपुढें दाखल होऊन उभे राहिले, तों त्यांना एकटे पाहून शत्रूच्या सैन्यांतील एक तुकडी त्यांच्या लागावर चालून आली. एकाएकीं आलेला हा प्रसंग पाहून किंचित् चिंता

§ पहा भक्तमंजरीमाला, अध्याय १० वा.

चाटून, आपण असें च निघून जाऊन आपल्या सैन्याला मिळावें, तर वैरी, न जाणों, श्रीसमर्थांवर धांवतील, असा संकोच उत्पन्न होऊन राजे संशयांत पडले असतां

**तंव हास्य आलें करुणाकरा ।**
**म्हणतिलें कां रे भीतोसी वीरा ।**
**श्रीरामकर्ता भाऊनि सामोरा ।**
**होई, होणार होईल तें ॥**

—दासविश्रामधाम, १०५–१२४

राजांनीं निर्भयपणें घोडा फिरविला, राजे एकटे नसून अमूप सैन्यासह आहेत, असें वैऱ्यांना भासून, भयभीत होऊन, त्यांनीं पळ काढला आणि श्रीराजे हरिखत श्रीसद्गुरूपाशीं परतले ! आपल्या भक्तांवर आलेलीं अशीं किती तरी अरिष्टें श्रीसमर्थांनीं निवारिलीं !

( २३ ) केव्हां केव्हां युद्धप्रसंगीं धैर्य खचूं पहातें, तरी अशा वेळीं काय करावें, असा प्रश्न, सैनिकांपैकीं कांहीं प्रमुखांनीं काढला असतां श्रीसमर्थांनीं राजांना आणि त्या सर्वांना सुचविलें कीं,

**लघूसी परी मूर्ति हे हाटकाची ।**
**करावी तथा मारुती नाटकाची ।**
**असावी सदा ताइतामाजि दंडीं ।**
**समरंगणीं पाठि दीजे उदंडी ॥**

( २४ ) श्रीसमर्थांचा शब्द झेलून धरण्यास राजे सदा तत्पर असत. सद्गुरूंच्या आज्ञांचें पालन करणें, हें च आपल्या सामर्थ्याचें रहस्य होय, असें त्यांना वाटे. एकदां समर्थांनीं राजाकडे अकरा मुठी भिक्षा मागण्यास एका शिष्याला पाठविलें. समर्थांनीं आपली ही कांहीं परीक्षा मांडली आहे, असें राजांना वाटलें. तेव्हां त्यांनीं, वज्रदेही दिसे जैसा पर्वत, अशा भव्यरूप हनुमंताची अकरा खंडींची एक मुष्टि कल्पून ११ × ११ = १२१ खंडींची कोठी पाठविली. ही गोष्ट सांगून श्रीसमर्थप्रतापकार म्हणतात—

**समर्थआज्ञा राजा मानी मोठी ।**
**शिवराज तेणें बळावला ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ८–४

श्रीरामदासी ग्रंथमालेंतील भाग नववा, श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, यांतील लेखांक १४ यांत या गोष्टीला प्रत्यंतर हि मिळतें.

(२५) श्रीसमर्थप्रताप या अत्यंत विश्वसनीय श्रीसमर्थचरित्रांत श्रीशिवरायासंबंधानें, याशिवाय आणखी जे कांहीं प्रसंग नमूद आहेत, ते आपण हि थोडे पाहिले पाहिजेत—

(**मरीचि**) पराशरपर्वत म्हणजे, मला वाटतें पन्हाळगड होय. तेथील एक अपूर्व प्रसंग गिरिधरांनीं सांगितला आहे. तो त्यांच्या च शब्दांत वाचलेला बरा—

**पराशरपर्वतीं विचित्र वर्तलें ।**
**समर्थासी शिवराजें भावें विनविलें ।**
**स्वामी प्रवर्षगिरिवरि येक रात्रीं राहिलें ।**
**पाहिजे आतां गुरुदेवें ॥ ५०**

**शिवराजा राजाब्रह्मरामआज्ञा आजि नाहीं ।**
**स्वामी राजाब्रह्मराम तुम्ही च मी पाहीं ।**
**हनुमानस्वामी तुम्ही लीलाविग्रहदेही ।**
**अनुमान कांहीं असेचिना ॥ ५१**

**निकें म्हणोनि सोमतीर्थीं केलें संध्यावंदन ।**
**पुढें अमात्यसदनीं जालें कथानुकीर्तन ।**
**कथासमाप्तीं समर्थें केलें उड्डाण ।**
**पर्वतावरूनि स्वानंदें ॥ ५२**

**शिवगणासी परम विस्मय जालें ।**
**हनुमानस्वामी प्रत्यया आले ।**
**अष्ट प्रधान समाधान पावले ।**
**लाधलें निधान जगदोद्धारा ॥ ५३**

(अत्रि) **शिवराजें शिवतरीं चमत्कार देखिलें ।**
**करतळस्फोटक स्मरणें तात्काळ शमले ।**
**स्वप्नीं समर्थ प्रसाद देऊनि गेले ।**
**महा नदी उतरूनिया ॥ ६५**

—श्रीसमर्थप्रताप, ३–५० ते ५३ व ६५

या प्रसंगाचा उलगडा सांप्रदायिक कागदपत्रांतील लेखांक २६ वरून चांगला होत आहे. श्रीशिवाजीराजे कर्नाटकच्या स्वारीहून परत आल्यावर श्रीसमर्थांना भेटावयास सज्जनगडीं गेले असतां, पूर्वीच्या एका प्रसंगाची हकिकत राजांनीं स्वतः सांगितली ती अशी कीं, आपण बीरवाडीस होतों, श्रीसमर्थ शिवतरीं होते, दरम्यान काळनदी होती व तिला पूर आला होता, तेव्हां समर्थांनीं " मधें माहानदी माहापूर आणि अकस्मात रात्रीं पलंगापासीं येऊन चमत्काररूपें दर्शन दिल्हें, कितेक चित्तीं होते ते चि आसीर्वाद दिल्हे...."

(**अंगिरस**) एका कौलिकानें म्हणजे मांत्रिकानें समर्थांना एका गुहेंत नेऊन अकरा दिवस त्यांना गुहेंत च फिरविलें, परंतु परम भाग्यानें श्रीसमर्थ त्या कौलिकाच्या मंत्रांतून निसटले. त्या कौलिकास तोफेच्या तोंडीं देण्याचा राजांनीं हुकुम केला. समर्थांनीं त्यास सोडविलें :

**समर्थ येकदां कौळिकवचनें गुहांतरीं प्रवेशले ।**
**हस्तकडगें देऊनि कौळिक मागें फिरविले ।**
**शिवराजें कौळिक भांड्यामुखीं बांधविले ।**
**समर्थ धांवण्या धांविले अक्रा दिवसें ॥**

**अक्रा दिवस समर्थ गुहांतरीं फिरले ।**
**परम भाग्यें पुन्हां देखिले ।**
**समर्थाविणें लोक आंधळे होते जाले ।**
**संसारतमामाझारी ॥**

**आनंद जाला कृष्णातीरीं ।**
**घोष दाटला जयजयकारीं ।**
**समाचार गेले रायेरी ।**
**शिवराज दाटला स्वानंदें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३–७८ ते ८०

(**पुलस्त्य**) समर्थांच्या वेळीं चाफळास परांजी देशमुख होते. ते आपल्या ओळखीचे झाले आहेत. चाफळास श्रीरामाची स्थापना झाल्यावर त्या अधिष्ठानास साह्यता करण्याविषयीं ज्या पांच जणांनीं श्रीच्या पुष्पावर हात ठेवून अभिवचन दिलें होतें, त्या पांचांत परांजी, म्हणजे च प्राणजी देशमुख हे एक होते. त्यांनीं श्रीसमर्थस्थळीं हि कर बसविला आणि

मागणी केली, ही वार्ता राजांच्या कानांवर जातां च त्यांनीं परांजीस कडक शासन करण्याचा हुकुम दिला. समर्थांनीं मध्यस्थी करून त्यास सोडविलें. तेथून मग पुढें प्राणजी देशमुख हे श्रीराममंदिराचे एक निष्ठावंत सेवक बनले.

**समर्थस्थळीं चाफळीं ग्रामस्थीं कर मागितला ।**
**शिवराजें ऐकतां जीवघात आरंभिला ।**
**प्राणजीचा प्राण रक्षूनि समर्थें अभयंकर दिधला ।**
**सेवाभाग्य दिधलें चिरकाळें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १९–१५

( **पुलह** ) त्या च प्रमाणें एक वर्षीं सज्जनगडावरील समर्थांचा आश्रम थोडा गळाला, तर किल्ल्यावरील अधिकाऱ्याला कडक शासन करण्यास राजे प्रवृत्त झाले असतां श्रीसमर्थांनीं त्यास वांचविलें. चाफळचा मठ आणि गडावरील आश्रम प्रतिवर्षीं शाकारण्याचें काम राजांनीं देऊन ठेवलेल्या कायमच्या हुकमाप्रमाणें § होत असे.

**सज्जनगडीं समर्थआश्रम किंचित पर्जन्यीं गळाला ।**
**शिवराजें दुर्गाधिपत्यासी पर्वतपात आरंभिला ।**
**समर्थें सेवेसी सेवक मागोनि घेतला ।**
**स्वामी क्षमासिंधु दीनबंधु ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ८–१३

( **ऋतु** ) श्रीशिवरायांनीं एकदां पत्र पाठवून समर्थांच्या पलंगाचें माप आणवून त्याप्रमाणें नवीन पलंग तयार करवून तो श्रीसमर्थांकडे पाठविला होता. श्रीसमर्थांनीं तो वापरण्यांत घेतला व त्यावर निजूं लागले. पलंग स्वीकारल्याचें ऐकून राजांना आनंद झाला. म्हणून मग शय्या तयार करवून स्वतः घेऊन आले. राजे येत आहेत म्हणून हेरांनीं समाचार जाणविला. तेव्हां पारपत्याधिकारी यांनीं श्रीसमर्थांना विनंति केली कीं, राजे येत आहेत, तरी त्यांना संतोष व्हावा म्हणून आपण उत्तम वस्त्रें, भूषणें धारण करावीं. राजांना संतोष वाटेल. समर्थांनीं पारपत्याधिकारी यांची विनंति मान्य करून उत्तम हुर्मुजी भगवा साज केला. राजे आले, त्यांनीं

§ श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, लेखांक ७१ पहा.

एक मुहूर्त साष्टांग नमस्कार घातला. उठोन प्रेमानें श्रीसमर्थांकडे पहात राहिले. श्रीसमर्थांच्या सहवासाचा सतत लाभ घडणाऱ्या कल्याणादि शिष्यमंडळींना पाहून राजांना फार आनंद झाला, त्या सर्वांची त्यांना धन्यता वाटली. त्या वेळीं प्रतापकार गिरिधर स्वतः गडावर च होते. ते लिहितात—

**संत महंत निवांत सभेसी देखिले ।**
**सिद्ध साधक पुण्यश्लोक भले ।**
**निस्पृह ग्रंथलेखक देखतां नृपें माथे डोलविले ।**
**देवसभा जेथें कुरवंडिली ॥**

**शिवराजा म्हणे माझें परम भाग्य साम्राज्य ।**
**स्वराज्यीं केवळ राजा ब्रह्म रामराज्य ।**
**अनंत जीवगण शिवगण पावले सायोज्य ।**
**स्वर्गस्थ देवगण उद्धरिले ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ८–३१,३२

( **वशिष्ठ** ) पुढील दोन ओव्यांत गिरिधरांनीं जो प्रसंग वर्णिला आहे, तो अपूर्व होय. दुसऱ्या कोणा हि चरित्रकारानें त्याचा उल्लेख केलेला नाहीं.

**समर्थ भविष्य न सांगोनि सांगती ।**
**दक्षणेसी युद्धें दुर्धर दिसती ।**
**अकराअकरीं तरवारा मागों धाडिती ।**
**शिवराजयासी सत्वर ॥**

**शिवराजें चिन्ह जाणितलें ।**
**दक्षणेसी परचक्र सत्य आलें ।**
**समर्थें सर्व पराभविलें ।**
**स्वयें निजशस्त्रें घेउनियां ॥**

—श्रीसमर्थप्रताप २०-६१, ६२

( २६ ) श्रीशिवरायांच्या मनांत वारंवार यावें कीं, श्रीसद्गुरु परळी किल्ल्यावर रहावयास येतील, तर आपली नित्य दर्शनाची सोय होणार आहे. त्यांना विश्वास वाटे कीं, आपण त्यांना तशी विनंति केल्यास ते नाहीं म्हणणार नाहींत. गुरुशिष्यांच्या संबंधांत असा एक न्याय आहे कीं,

आपल्या गुरूनें अमूक गोष्ट करावी, अशी उत्कट इच्छा निष्ठावंत शिष्याला झाली आणि ती त्यानें श्रीगुरुचरणांजवळ विदित केली, म्हणजे गुरु शिष्याच्या प्रेमाला वश होऊन त्याच्या मनासारखें वागण्यास तयार होतात. मजसारखा दुर्बल, अल्पज्ञ, भिकारी हि स्वानुभवानें अशी साक्ष देईल, मग सद्गुरु आपलें ऐकतील च, असें शिवरायासारख्या सच्छिष्याच्या मनानें घ्यावें, यांत काय नवल आहे? आपली विनंति श्रीसमर्थ मान्य करणार, ते गडावर रहावयास येणार, आपली नित्य दर्शनाची सोय होणार, या नुसत्या विचारानें त्यांचें चित्त प्रफुल्लित झालें आणि श्रीसमर्थांना विचारण्यापूर्वीं च गडावर त्यांच्या राहण्याची सर्व सोय करण्याच्या तयारीला हि ते लागले! श्रीसमर्थ नाहीं म्हणतील, अशी नुसती शंका हि त्यांच्या मनाला शिवली नाहीं! त्यांना वाटलें, आपल्या मनाचा उल्हास, हें च श्रीसमर्थांच्या अनुमतीचें पूर्व चिन्ह होय!

(२७) श्रीसमर्थांना तशी विनंति करण्यास महाराज चाफळास गेले. श्रीचरणीं त्यांनीं आपली इच्छा नम्रपणें निवेदन केली. श्रीसमर्थांनीं एकदम हो किंवा नाहीं न म्हणतां क्षणभर विचार केला. चाफळ सोडावयाचें तर येथील व्यवस्था कशी लावावी! त्यांनीं छत्रपतींना आज्ञा केली कीं, येथील श्रीरामाच्या नित्य पूजेचा आणि वार्षिक उत्सवाचा अंगीकार आपण करावा. ती गोष्ट श्रीछत्रपतींनीं तत्काळ मान्य केली. कालेंकरून जावळीच्या सुभेदारास नित्याच्या खर्चासाठीं व दत्ताजी त्रिमल यास वार्षिक उत्सवाच्या बेगमीसाठीं महाराजांचीं आज्ञापत्रें गेलीं. माझ्या दृष्टीनें ही घटना फार महत्त्वाची घडली. या घटनेचा अर्थ असा होतो कीं, चाफळचें श्रीरामसंस्थान हें महाराष्ट्रराज्यकारभाराचें एक अंग बनलें. श्रीशिवराय, श्रीसंभाजीमहाराज, श्रीराजाराममहाराज, श्रीशाहुमहाराज, इत्यादि छत्रपतींचीं एतद्विषयीं आज्ञापत्रें पाहिलीं म्हणजे चाफळच्या श्रीरामाचा उत्सव करणें व तें देवस्थान चालविणें, हें एक मराठ्यांच्या राजकारणाचें च अंग म्हणून अखेरपर्यंत मानण्यांत आलें, असें दिसतें.

(२८) दत्ताजी त्रिमल हे महाराजांचे वाकनीस असून पुढें त्यांना मंत्रीपद प्राप्त झालें होतें. त्यांनीं महाराजांच्या आज्ञेवरून प्रतिवर्षाच्या उत्सवाची व्यवस्था लावली, ती अशी:

लेखांक १९ ] १५९९ भाद्रपद § व. २ [ अस्सल-मोडी

श्री

श्रीरघुनाथदेउ

राजमान्य राजश्री वेकाजी रुद्र सुभेदार व कारकून
माहालानिहाये ता कोले गोसावी यासी

सेवक दताजी त्रिमल नमस्कार सुहूर सन समान सबैन अलफ कसबे चाफल येथे श्री याचे देवालय आहे तेथे रामनवमीस यात्रेचा मोहोछाव राजश्री स्वामी करीत असताती त्यावरी राजश्री छत्रपती स्वामी श्री देवाचे भेटीस आले होते ते समई स्वामीन राजश्री राजयास आज्ञा केली की देवाचा नित्य उछाव व यात्रा उछाव करावा ऐसी आज्ञा केली आज्ञेप्रमाणें राजश्रीने मान्य करून नित्य उछाव यास खर्च लागतो त्याची बेगमी जाउलीचे सुभेवरी करून दिल्ही आणी रामनवमीचा उछाव चालवा तेविसी आम्हास आज्ञा केली की तुम्ही या प्राती राहाता येथील रामनवमीचा मोहोछा तुम्ही करणे त्यास जो खर्च लागेल तो दीवाणातून लावणे ऐसे सागीतले त्यास आजी ता साल गुदस्ता जैसे तैसे चालिले हाली रामनवमीच्या मोहोछायाची मोईन साल मजकुरी येणे प्रमाणे करून दिल्ही असे तरी तुम्ही आपल्या सुभ्यापैकी ते दिवसी खर्च करणे बीा जाबीता तपसीलवार

| नख्त बेरीज | कैली माहाल मापे | वजन टकबदी |
|---|---|---|
| नाणे होनु | ८३ गहु | ८१८५ तुप |
| ११ | ८३॥- तादुल | ८२॥- गुल |
| पाा खुर्दा टके | | |
| १५० | | |
| कापड मोठे व बारीक | ८१ दाली | -।१ तेल |
| व नरमिना सनगे | ८८३ मीठ | ८४॥ गुलाल |
| १४ | -।३ नाचणे | ८॥- बुका |
| विडीयाची पाने | ८२ दाल हरभरेची | ८१ खोबरे |
| ११००० | | ८१ खारीक |
| | -॥२॥३ | ८८२॥ उद |
| | | ८॥- सुपारी |
| | | ८२ काथ |
| | | -॥३८९॥- |

§ हा व पुढील तीन लेखांक, श्रीसमर्थसंप्रदायाचीं कागदपत्रें, भाग पहिला, यांतील होत.

येकून अकरा होन व दीडसे टका खुर्दा व कैली साडेसतरा मण तीन पाईली व वजनी आठरा मण साडेनवसेर व जामा चौदा सनगे व अकरा हजार पाने रास देवीले असे येणेप्रमाणें साल दरसाल खर्च करणे आणी हुजरातीचे बाजे खर्च खर्च लिहिणे सदरहु खर्चकरीता तेथे राजश्री साहेबी येक कारकून ठेविला असे त्याचे विद्यमाने व स्वामीचे शीश असतील त्याचे गुजारतीने खर्च करणे समयाचे समयास कोठे अतर पडो नेदणे व ते स्थली समयानसार जटाधारी जोगी येऊन पीडा करिताती तरी ती पीडा होऊ नेदणे व साल दरसाल जागाजागाची सीहासने येत असताती तैसी च येउनु यात्रासमारंभ चाले ऐसे करणे येविसी बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा या कागदाची तालीक घेउनु असल परतून देणे दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणे लिहिले प्रमाणे आवीछीन चालवणे तुम्ही खासा तेथे जाउनु यात्रेचे सौरक्षण बरेपणी करणे ही यात्रा कौलाची आहे या खेरीज दसमीचे दिवसी येकसे येकवीस ब्राह्मण भोजन येथोग्त बरवी सामग्री देउनु श्रीद्वारी समाराधना करवीत जाणे प्रतीब्राह्मणासी दक्षणा टकसाली चार रुके देणे येणे प्रमाणे वारसीक यात्रा करीत जाणे रा छ १५. माहे रजबु पा हुजूर




पौ छ १३ सौवाल

ही व्यवस्था मोरो त्रिमल पंत प्रधान यांनीं एक आज्ञापत्र काढून दृढ केली, तें आज्ञापत्र असे—

लेखांक २९ ] १५९९ कार्तिक शुद्ध १२ [ अस्सल—मोडी

श्रीशंकर

अखंडीत ळक्ष्मी अळंकृत राजमान्य राजश्री वेकाजी
रुद्र सुबेदार व कारकून सुबा ताा कोल गोसावी यासी

सेवक मोरो त्रीमल प्रधान नमस्कार विनती सुहुर सन समान सबैन अळफ कसबे चाफळ येथे श्री याचे देवालय आहे तेथे रामनवमीस यात्रेचा

मोहछाव राजश्री स्वामी करीत असताती त्याउपरी राजश्री छत्रपती स्वामीने ही मोहछाव प्रतिवर्षी रामनवमीस होत आहे तैसा च करीत जाणे म्हणौन राजश्री दताजीपंतास अज्ञा केली अज्ञेवरून तुह्मास राजश्री दताजी-पंतानी अज्ञा करून सवीस्तर पत्र ळीहीळे आहे ते तुह्मी मनास अणौन पत्रप्रमाणे येक काडीचे अंतर पडो ने दीता रामनवमीचा मोहछाव समारंभ बरवे प्रकारे करीत जाणे तुम्ही खासा चाफळास येऊन ८।१० दिवस राहून यात्रा भरऊन मोहछाव करीत जाणे रामनवमीच्या मोहछावास दिवाणातून खर्च करावयाचा मोईन करून दिधली आहे ते राजश्री दताजीपंताचे सनदेप्रमाणे खर्च करून मोहछाव करणे सर्वथा अंतर काडी इतके पडो नेदणे विशेष ळिहीणे तर तुम्ही सुज्ञ असा छ १० रमजान या पत्राची तालीक घेऊन असल परतोन देणे अज्ञा प्रमाण




शुध

पौ छ १३ सौवाल

( २९ ) नित्याच्या व्यवस्थेसाठीं श्रीशिवरायांच्या आज्ञेवरून १५९७ च्या वर्षप्रतिपदेस निघालेलीं आज्ञापत्रें उपलब्ध नाहींत, पण त्या आज्ञापत्रांचा उल्लेख करून व त्यांना अनुसरून च श्रीसंभाजीमहाराजांनीं काढलेलीं आज्ञापत्रें प्रसिद्ध आहेत. चाफळास श्रीसमर्थांची शिष्यमंडळी असत, शिवाय अतिथि अभ्यागत येत, त्या सर्वांच्या योगक्षेमासाठीं एक आज्ञापत्र निघालें व देवाच्या नित्य पूजानैवेद्यासाठीं व सेवकांसाठीं निराळें आज्ञापत्र, अशीं दोन्हीं आज्ञापत्रें एका च मितीस निघालीं, तीं दोन्हीं क्रमशः येथें उद्धृत करतों.

लेखांक ३४ ]		१६०२ कार्तिक शु. ६		[ अस्सल – मोडी

श्री

राजश्री रामदास गोसावी

स्वस्ती श्री राज्याभिषेक शक ७ रौद्रनाम संवत्सर कार्तीक शुध षष्टी इंदुवासर क्षेत्रियेकुळावतंश श्रीराजा शंभु छत्रपति यांणी राजश्री काशी रंगनाथ देशाधिकारी व देशळेखक प्रांत जाउली यांशी आज्ञा केली ऐसी जे श्री गोसांवी यास अतीत अभ्यागत आदीकरून नीत्यनीमीत्य चालीलें पाहीजे ह्मणौन पेशजी तीर्थस्वरूप राजश्री कैलासवाशी स्वा ( मी ) ने छ २९ जील्हेज सन § खमस सबैनामध्ये येणेप्रमाणे मोईन केली बी ता

एषा श्री शिवरा
जेंद्र मुख्यामात्यस्य
सत्यधृक् ॥ मुद्रा मोरे
श्वरस्यास्तां भद्रा स
द्रागदायिनी

खासा समुदायास प्रत्यहीं सामग्री
वजन टक बदी मण ɕ१॥ ७॥ बी ता
ɕ-॥५ तांदुल बारीक सडीक
ɕ-॥० कणीक
ɕ।- दाली
ɕɕ५ तूप
ɕɕ२॥ मीठ
ɕ१॥ ७॥

कीता कीरकोली

| | | |
|---|---|---|
| पान सुपारी व कात व पाने | | तमाखु दरमाह वजन |
| पाने विडीयाची | वजन टक बदी | ɕɕ३ |
| शुमार ५०० | ɕɕ॥० सुपारी | तेल दीपास दरोज |
| | ɕɕɕ४॥ कात | वजन |
| | ɕɕ॥४॥० | ɕɕ१॥ |

दरोज प्रमाणे
ह्मैस दुभत्यास १

एकूण वजन टकबदी दरोज प्रमाणें ɕ१॥ ९॥ ४॥ येक मण साडेयेकूणतीस

§ म्हणजे शक १५९७ चैत्र शुद्ध १.

सेर साडेच्यार टाक व दरमाहे तीन सेर व पाने दरोज पांचसे व दुभती ह्मैस येक रास येणें प्रमाणे पेशजी ता। साल गुदस्तां चालीळे आहे हाली येणे प्रमाणे पेस्तर साल दरसाल चालवीत जाणे ह्मैस दुभत्यास देणे ते ह्मैस जोवरी दुभेल तोवरी असो देणे ते उडालियाउपर (ज) मा करून दुसरी ह्मैस दुभत्यास देत जाणे व तेल पेशजी नंदादीपास ह्मणौन सदरहु दीड सेर पावत आळे आहे यैशीयास ते तेल नंदादीपास नव्हे सदरहु दीड सेर तेल गोसावीयांकडे समुदायास देत जाणे फाटी व गवत पेशजी सुभेमजकुरी पावत होते हाली सातारांच्या सुभापैकी देवीळे असे या कारणे हाली गवत व फाटी तुह्मी नेदणे प्रतीवर्षी हुजूरचे सनदेचा उजूर न करणे ये च सनदेची तालीक लिहून घेउनु असल सनद गोसावीयाकडे देणे आण लिहीळे प्रमाणे प्रत्यही सामग्रीचे लग पडो नेदणे व श्रीकडे सेवेसी येक हरकारा हुजरून पहील्यापासून दील्हा आहे त्यास वेतन तागाईत साल गुदस्ता सुभे मजकूर पैकी पावत होते हाली ही हरकारा श्री कडे देविला असे त्यास वेतन पहिल्याप्रमाणे दरमाहे होन ५॥ २८ प्रमाणें ई॥ अवल सालापासून पेस्तर साल दरसाल देत जाणे आणी धर्मादाउ ह्मणौन खर्च लिहीत जाणे वेतन देणे ते नीवल पाववीत जाणे लेखनालंकार




पौ छ २४ मास मार्गसीर्ष वद्य ११ — रुजु सुरु

नीवीस

तेरीख ४ — माहे सौवाल

सौवाल सन इहिदे समानैन

चारसुद — सुरु सुद

छ २९ जीलकाद — बार

लेखांक ३५ ] १६०२ कार्तिक शु. ६ [ अस्सल — मोडी

श्री

श्रीरघुनाथदेव राजश्री रामदास गोसावी

स्वस्ती श्री राज्याभिशेक शक ७ रौद्र सवछर कार्तिक शस्टी इदुवासरे क्षत्रियेकुलावतंस श्री राजा शभु छत्रपति याणी राजश्री कासी रंगनाथ देशाधिकारी व देशलेखक प्रांत जाउली यांस आज्ञा केली ऐसी जे राजश्री गोसावी यांस श्री देव वास्तव्ये कसबे चांफल यास प्रतीही पूजेनिमित्य व नवेदास व देवाच्या सेवकास मोईन बाा सनद राजश्री कैलासवासी स्वामी छ २९ जील्हेज सन § खमस सबैन येकूण मोईन

एषा श्री शिवरा
जेंद्र मुख्यामात्यस्य
सत्यधृक् ॥ मुद्रा मोरे
श्वरस्यास्तां भद्रा स
द्रागदायिनी

| | |
|---|---|
| मुशाहिरे देवाच्या सेवकास | देवाच्या नवेदास प्रतीही |
| दर माहे होनु पातशाही | सामग्री वजनी टकवंदी |
| ३८· पारपत्यगार १ | ८८६।· तादुलबारीक सडीक |
| ४ पुराणिक २ दर २ | ८८६।· कणीक |
| ५ हरिदास ४ दर १।० | ८८२॥· दाली |
| ७ वाजंत्री ७ दर १ येक | ८८१।· तुप |
| ४ पुजारे २ बीताा | ८८·॥९ तुप रुाा मीठ |
| श्रीरघुनाथ श्रीहणुमतास | ८।६।॥९ |
| १ १ | दीपास तेल श्रीहणुमतास प्रतीही |
| १ माली १ येक | वजन टक ८८।॥· |
| १ झाडी फडी करावयास | देवाच्या पंचामृतास व परिमल |
| १ येक | द्रव्याकारणें दरोज नख्त खुर्दा |
| २५ | टका १८· |

येकूण दरमाहे होनु पातशाही पंचवीस व दरोज मोईन वजन टकवंदी साडे सतरा सेर नव टांक व नख्त खुर्दा टका येक रास येणे प्रमाणे पेशजीपासून तागाईत साल गुदस्ता पावत आले आहे हाली ही पेशजी मोईन प्रमाणे साल मजकुरी ईाा अवल सालापासून देविले असे साल दरसाल देत जाणे प्रतिवरसी

§ म्हणजे शक १५९७ वर्षप्रतिपदा.

ताजे सनदेचा उजूर करीत नव जाणे तालीक लेहोन घेऊन असल पत्र वेदमूर्ति राजश्री दिवाकर गोसावी यापासी फिराउन देणे व देवांच्या सेवकास मुशाहिरा देणे तो नीवल देत जाणे लेखनालंकार




रुजु सुरु
निवीस

पौ छ २४ मास मार्गसीर्ष वद्य ११

तेरीख ४ माहे सौवाल

सौवाल सन इहिदे समानैन सुरु सुद बार

बार सुद

छ २९ जीलकाद

(३०) स्वतःच्या निर्याणापूर्वीं बरोबर एक च महिना आधीं श्रीसमर्थांनीं केलेल्या ज्या अकरा सूचना लेखांक ४३ त नमूद आहेत, त्यांतील सहावें वचन येणेंप्रमाणें —

**" प्रमादि § संवत्सरीं सींगणवाडीचे मठीं राजश्रींनीं श्री च्या सर्व कार्याचा आईकार केला त्याप्रमाणें त्यांनीं नित्य उत्सव व यात्रा-समारंभ उत्तम चालविला पुढें इमारतीचें हि स्मरण द्यावें हे त्यांनी मान्य केल्यावरि आपण सज्जनगडीं सुखें वास्तव्य केले ॥ ६ ॥ "**

(३१) श्रीसमर्थ आणि श्रीशिवराय यांनीं महाराष्ट्रराज्य हें कसें धर्माधिष्ठित केलें होतें, याचा उत्कृष्ट बोध वरील घटनेवरून होत आहे. हें महाराष्ट्रराज्य म्हणजे देवाब्राह्मणांचें राज्य होय, असे उद्गार, पुढचे सर्व राजे आणि मुत्सद्दी काढीत, त्यांचा पाया हा असा या दोघा अवतारी पुरुषांनीं घातला होता. श्रीसमर्थांचें एक वचन च आहे कीं, " श्रीकार्यासी

§ प्रमादी संवत्सर म्हणजे १५९५.

अति तत्पर ऐशा पुरुषाच्या योगें धर्मवृद्धी आहे धर्मवृद्धीनें राज्यवृद्धी आहे." ‡ असो.

( ३२ ) याप्रमाणें श्रीशिवरायांनीं श्रीरामाच्या नित्यनैमित्यिक पूजेचा आणि उत्सवाचा अंगीकार केला आणि श्रीसमर्थ श्रीसज्जनगडीं जाण्यास तयार झाले. श्रीसमर्थांनीं येण्याचें मान्य केलें आणि श्रीसमर्थसदन सज्ज करण्याचा महाराजांनीं हुकुम केला. सदन सर्वथैव तयार झालें आणि थोडे शिष्य बरोबर घेऊन श्रीसमर्थ गडावर रहावयास गेले. ते गडावर श्रीशिवरायांसाठीं रहावयास गेले व रायांनीं त्यांस आणलें, असें तंजावर-मठपति भीमस्वामी हि सांगतात :

**राजा शिवछत्रपति । समर्थासी अति प्रीति ।**
**सज्जनगडीं तेहीं वस्ति । करविली ॥**

–दोन जुनीं चरित्रें

आणि प्रतापकार हि म्हणतात :

**विवेकें चि शिवराजें समर्थासी विनविले ।**
**सैह्याद्रिशिखरीं राहावें गुरुदेवें ॥**
**पूर्विंऋषीचें आहे गुप्त स्थान । येथें समर्थें करावें अधिष्ठान ।**
**जेथें श्रीचरण लागती परिपूर्ण । तेथें पुण्यपावन भूमंडळ ॥**

—समर्थप्रताप, ८–१०, ११

( ३३ ) श्रीसमर्थ शक १५९८ त गडावर रहावयास आले आणि त्या च वर्षीं त्यांनीं श्रीशिवरायाला आज्ञा केली कीं, ठिकठिकाणच्या संतसज्जनांना आणि साधु पुरुषांना गडावर येण्याविषयीं विनंतिपत्रें पाठवावीं व तशी आवश्यकता वाटल्यास, माझ्या सांगण्यावरून आमंत्रण करीत आहे, असें हि त्यांना कळवावें. या आज्ञेप्रमाणें राजांचीं पत्रें चहुंकडे गेलीं. श्रीसमर्थांच्या भेटीस येण्याची उत्सुकता सर्वांना होती च, तशांत खुद्द राजे यांचेकडून आमंत्रण आलेलें, तेव्हां ज्यांना येणें शक्य होतें, असे सारे सत्पुरुष गडावर जमले. कोण कोण आले होते, त्यांची नांवनिशीवार यादी उपलब्ध नाहीं, पण प्रख्यात असे सर्व सत्पुरुष आपआपल्या

‡ श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, लेखांक ४३ तील वचन ११ वें.

अनुयायांसह आले होते. हा सुखसोहळा पाहण्यासाठीं इतर हि हजारों लोक गोळा झाले होते. गागा पंडित सुद्धां उपस्थित होते. त्यांना पेंच च पडला होता, न जावें तर राजांना काय वाटेल व जावें तर तेथें जमणारे लोक आपला मान कितपत ठेवतील, कोण जाणे, अशी त्यांना शंका उत्पन्न झाली होती. पण ते आले होते.

( ३४ ) महाराष्ट्रांत भरलेली ही पहिली संतपरिषद् होय. तिला यच्चयावत् सर्व संतसज्जनांचा मेळा जमला होता, इतकें च नव्हे, तर तींत सर्व राजकारणी पुरुष हि उपस्थित होते, हें विशेष होय. स्वागतमंडळाचे जणूं अध्यक्ष च स्वतः श्रीशिवछत्रपतिमहाराज च होते. तेथें मग काय कमी पडणार ! देशस्थिति सर्वांच्या डोळ्यांपुढें होती. धर्मावर आलेल्या संकटाचें सर्वांना भान होतें. परिषदेंत ठराव काय काय झाले आणि त्यांत मुख्य ठराव कोणता होता, याचा कोणी लिहून ठेवलेला दाखला सांपडल्यावांचून आम्हांस कल्पनेनें हि जाणतां येणार नाहीं, इतके कां आम्ही मूढ बनलों आहोंत ? श्रीसमर्थांच्या प्रमुखत्वाखालीं सर्वांनीं मिळून तत्कालीन परिस्थितीचा विचार करून, धर्मरक्षणार्थ साधनांची योजना, एकदिलानें केली च असली पाहिजे. या परिस्थितीचा शेवट झाला पाहिजे, धर्माचें रक्षण केलें पाहिजे, सर्वांना सुख लागलें पाहिजे, सर्वांनीं राजाचें अभीष्ट चिंतिलें पाहिजे, तात्पर्य, भारतवर्षांत पुनरपि रामराज्याची स्थापना झाली पाहिजे, असा एक च एक अलिखित मुख्य ठराव त्या परिषदेंत एकमुखानें होऊन व तो सर्वांनीं आपल्या हृत्पटलावर कोरून ठेवून, मग च त्या परिषदेचें विसर्जन करण्यांत आलें असलें पाहिजे.

( ३५ ) इतर हि अनेक कार्यक्रम झाले. या संधीचा फायदा घेऊन श्रीशिवाजीराजांनीं केलेला आपला लक्षभोजनाचा संकल्प सिद्धीस नेला. लक्षभोजन झालें आणि प्रत्येकास एक एक रुपया दक्षिणा मिळाली. सर्वांचीं कीर्तनें झालीं. कोण कोणाचीं नांवें सांगूं ? वामन, रंगनाथ, जयराम, निंबराज, वेणु, आक्का, कल्याण, उद्धव, आण्णाप्पा, वासुदेव, माधव, मल्हारि, इत्यादिकांचीं कीर्तनें झालीं, पण कौतुकाची गोष्ट अशी कीं, श्रीसमर्थांची आज्ञा झाली आणि स्वागताध्यक्षांनीं हि कीर्तन केलें. त्यांचें पाठांतर होतें च आणि ते एकांतांत भजन हि करीत असत. तें च भजन

त्यांनीं या प्रसंगीं, समर्थांच्या आज्ञेवरून लोकांतांत केलें. शेवटचें कीर्तन श्रीसमर्थांचें झालें. असा हा अपूर्व सोहळा परळीच्या किल्ल्यावर एक महिना चालला होता. तेव्हांपासून त्या किल्ल्याचें नांव सज्जनगड पडलें.

**सह्याद्रीगिरिचा विभाग विलसे मंदारशृंगापरी ।**
**नामें सज्जन जो नृपें वसविला श्रीऊर्वशीचे तिरीं ।**
**साकेताधिपति कपी भगवती हे देव ज्याचे शिरीं ।**
**तेथें जागृत रामदास विलसे जो या जना उद्धरी ॥**

( ३६ ) ही परिषद् किती प्रभावी झाली असली पाहिजे, याची कल्पना, गागा पंडिताच्या विचारसरणींत जी क्रांति घडून आली, तिजवरून आपणांस होऊं शकेल. सोहळा चालू असतां एके दिवशीं दुपारच्या वेळीं जे ते विश्रांति घेत असलेले पाहून गागांनीं श्रीसमर्थांची एकांतांत भेट घेतली व आपणांस झालेला अनुताप व्यक्त केला. हात जोडून ते म्हणाले :

**जी देवदेवा विद्यामदानें ।**
**नाडलों भवीं या जालों दीन ।**
**निंदास्मरणाचें फळोन पुण्य ।**
**पदप्राप्तीसी पावलों ॥**

**जळों ते शाहणीवजाणीवमस्ती ।**
**कामा न ये कीं संतती संपत्ती ।**
**आतां पतिताला कृपामूर्ति ।**
**अन्याय न पाहतां तारावें ॥**

**जय जयाजी श्रीरामदासा ।**
**भयनिवारका भक्तजनकोवसा ।**
**दूर करूनि दुराशापाशा ।**
**निर्विकारदशा पावविशी ॥**

—दासविश्रामधाम, १२–५६ ते ५८

पंडिताचा शुद्ध भाव पाहून श्रीसमर्थांनीं त्याजवर कृपा केली आणि संस्कृत भाषेचे पूर्ण अभिमानी गागापंडित प्राकृत भाषेंतील ग्रन्थराज दासबोध नित्य वाचूं लागले. निंदेपासून आरंभ करून शेवटीं ते श्रीसमर्थांचे

स्तुतिपाठक बनले, इतके कीं, त्यांनीं संस्कृतांत श्रीसमर्थांवर स्तवनपर श्लोकाष्टकें हि रचलीं.

( ३७ ) येथून पुढें श्रीसमर्थांचें गडावर च कायमचें राहणें झालें. फक्त दरवर्षी श्रीरामनवमीच्या उत्सवापुरते श्रीक्षेत्र चाफळास जात. ते हि शक १६०२ च्या उत्सवाला गेले च नव्हते. गडावर शिष्य आणि सेवेकरी मिळून सुमारें पंचवीस मंडळी असत. शिवाय दर्शनास मंडळी नेहमीं येत च. इतर सर्व किल्ल्यांप्रमाणें या हि किल्ल्यांवर येण्याजाण्याला पूर्वी प्रतिबंध असे, तो समर्थ राहूं लागल्यापासून काढून टाकण्यांत आला होता. त्यामुळें बारा हि महिने गडावर श्रीसमर्थांच्या दर्शनास येणाऱ्या माणसांची सारखी रीघ लागे. या सर्वांच्या योगक्षेमाची तरतूद राजे यांनीं च केलेली होती. किल्ल्याच्या दरवाजापाशीं कोणी एक प्रतापी साधु रहात असे. त्याची श्रीसमर्थांवर फार मर्जी असे. पण तो कोण होता, कांहीं वार्ता नाहीं. ( पहा समर्थप्रताप, ८, १४ – १६ )

( ३८ ) श्रीसमर्थांची कोणती हि गैरसोय होऊं नये, किंवा त्यांना कसला हि त्रास पोचूं नये, म्हणून श्रीशिवरायांनीं अगदीं बारिकसारिक गोष्टीकडे सुद्धां स्वतः लक्ष पुरवून तरतूद करून ठेवली होती. बारिक-सारिक म्हणजे किती पण बारिकसारिक, याची आपणांस कल्पना हि होणार नाहीं! गडावर पाऊस फार पडतो व हिंवाळा हि खूप जाणवतो, म्हणून श्रीसमर्थांच्या सन्निध शेगडी ठेवण्यांत यावी व तिला प्रत्यहीं पांच शेर कोळसे पुरविले जावेत, असे साताराच्या देशाधिकाऱ्यांना राजांचे हुकुम असत. ‡ इतक्या बारकाईनें श्रीसमर्थांच्या सुखसोयींकडे राजांचें लक्ष होतें. हीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे म्हणावेंसें वाटतें कीं, दिवसाच्या चोवीस तासांपैकीं क्षणभर सुद्धां श्रीसमर्थांची मूर्ति श्रीशिवरायांच्या हृदयांतून ढळत नसावी! याला म्हणतात निदिध्यास!

( ३९ ) गडावर शेजघरांत जी गुप्ती आहे, ती श्रीशिवछत्रपतींनीं श्रीसमर्थांना अर्पण केली होती. ती छत्रपतींनीं एका सौदागरापासून ३६० होन देऊन विकत घेतली होती. सर्वांनीं त्या शस्त्राची तारीफ च

‡ उदाहरणार्थ पहा, श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, लेखांक ३९ वा.

केली, पण एका गणिकानें वर्तविलें कीं, हें शस्त्र अमोल्य खरें, पण घातक आहे, तें राजाजवळ नसावें, तें सज्जनापाशीं च असल्यास हितावह होणार आहे. म्हणून राजांनीं ती असिलता गडावर जाऊन श्रीसमर्थांना अर्पण केली. समर्थांनीं ती उभ्यानें कांखेंत धरण्याच्या कुबडींत ठेवली. आज हि ती गुप्तीची कुबडी गडावर शेजघरांत पहावयास मिळते. या कुबडीवरून च मी श्रीसमर्थांच्या उंचीचा अदमास केला आहे. श्रीसमर्थांची उंची पांच फूट नऊ इंच असावी, असें मला या कुबडीवरून वाटतें, आणि या अंदाजावरून च जांबेची मूर्ति निम्यानें योजिली, ती दोन फूट साडे दहा इंच आहे.

( ४० ) श्रीसमर्थ एकदां राजांना म्हणाले, " राजा, तूं आम्हांस ' महाराज ' म्हणतोस, पण जो कोणी आम्हांस नमस्कार करतो, त्यास आम्ही ' जय राम ' म्हणत असतों. तूं हि यापुढें एक कर, सर्वांनीं आपसांत ' राम राम ' म्हणत जावें, अशी सर्वांना मर्यादा घालून दे, म्हणजे अनायासें

**उभय पक्षीं घडेल स्मरण ।**
**ते भजनप्रभावें होतील पावन ॥ "**

राजांना ही आज्ञा मानवली व तेव्हांपासून परस्परांना ' राम राम ' करण्याचा दंडक चालू झाला, तो अद्यापि चालू आहे व सतत चालू राहील.

( ४१ ) धर्मरक्षक म्हणून या गुरुशिष्यांच्या जोडीचा लौकिक त्या काळीं सर्व भरतखंडभर पसरला होता. त्यामुळें दूरदूरचे लोक, श्रीसमर्थांचें दर्शन घ्यावें व कांहीं राजाश्रय हि मिळाला तर पहावें, अशा दुहेरी हेतूनें सारखे येत. श्रीसमर्थांना हि बसल्या जागीं, सर्व देशभर काय चाललें आहे, तें कळत असे, प्रसंगानुसार चर्चा हि होत असे आणि श्रीसमर्थ आपला अनुभव सांगून सर्वांना उपदेश करीत. कोठून कोठून लोक येत, मनांत काय काय योजून येत आणि काय काय पाहून आणि घेऊन जात, याचें थोडक्यांत वर्णन आढळतें, तें असें--

**मिळाले असती कोकणस्थ ।**
**कर्णाट देशीचे साबडे गृहस्थ ।**
**सिंधुतीरवासी बोलके पंडित ।**
**हिंदुस्थ कास्मीर मारवाडीचे ॥**

बहुदेशीचे गृहस्थ भले ।
निस्पृहापासीं कैसे मिळाले ।
म्हणाल श्रोतेनो तरि असती पातले ।
अर्जोन राजाला धन मेळऊं ॥

छपन देशीचे विद्यावंत ।
धनवंताकडे येती धांवत ।
मा जगद्गुरु तो राजगुरूतें ।
कां विनवोन आश्रय न करिती ॥

सत्य हो मारुतीअवतार दास ।
साक्षात्कार ज्याला अयोध्याधीश ।
क्रिया जयाची केवळ विशेष ।
मानिती सत्पुरुष जयासी ॥

वैराग्यराजा विरक्त निस्पृही ।
अग्रगणु हा ज्ञानविषईं ।
न वानवे ज्याची भक्तिनवाई ।
सगुण निर्गुण पूर्णकाम ॥

चालती विधीनें शास्त्रमर्यादा ।
बोलणें जयाचें उत्तम सदा ।
स्फुरल्या हि येथें प्रश्न येखादा ।
विहित हो स्वामीला पुसावा ॥

—दासविश्रामधाम, ६९–१७,१८,२० ते २३

( ४२ ) श्रीशिवराय श्रीसमर्थांच्या पाशीं वारंवार गोष्ट काढीत कीं, गुरुदक्षिणा म्हणून आपणांस कांहीं मुलुख द्यावा, अशी इच्छा आहे. त्यावर मग श्रीसमर्थ एकदा म्हणाले, “ठीक, जो मुलुख तुमच्या सत्तेखालीं असून त्यावरील राज्य सुरळीत चाललें आहे, त्यांतलें मला कांहीं नको, पण जेथें अजून तुमची सत्ता जाऊन पोंचली नाहीं, दुस्तर नद्या आणि उत्तुंग पर्वत यांचा अडथळा होत असेल, अशा मुलखांत आम्हांस द्यावयाची असेल, ती भूमि दे, म्हणजे तेथें आम्ही स्नानसंध्या करीत निवांतपणें राहूं.” राजांनीं विचार केला आणि सनद लिहिली—

**त्रयदिशा समुद्रवलयांकित ।**
**अटक नदीपासून भारत ।**
**आपुलें परावें न म्हणे किंचित् ।**
**राज्य समस्त रोखीं असे ॥**

– दासविश्रामधाम, २८–६६

अशी सनद लिहून ती श्रीसमर्थचरणीं ठेवली. ती वाचून श्रीसमर्थ हंसून म्हणाले, " राजा, तूं मला भोळा दिसतोस. अरे, तुला अटकेनें अटक करावी ? माझें राज्य ऐक

**श्रीरामें दिधलें ऐसें देणें । स्वराज्य आमुचें हें त्रयभुवन ॥**

तेव्हां, त्रिभुवनावर सत्ता चालविण्याची महत्त्वाकांक्षा असूं दे. महाराष्ट्र-राज्य करावें जिकडे तिकडे ! "

गुरुशिष्यांत झालेला विनोद तर यांत आहे च, पण धोरण हि दिसून येत आहे.

( ४३ ) शिवाजीमहाराजांच्या मनांत वारंवार त्यागाच्या ऊर्मि उठत. श्रीसमर्थांच्या कडे पाहून त्यांना प्रश्न पडे, यांचें हें त्रिभुवनाचें राज्य बरें, कां माझें हें चिमुकलें च राज्य बरें ? रामाच्या कृपेमुळें यांना ब्रह्मांड ठेंगणें वाटतें आणि मी हें एवढें टीचभर राज्य मिळवून चिंता करीत बसलों आहें. याप्रमाणें त्यांचें स्वाराज्य आणि आपलें स्वराज्य यांची तुलना वारंवार मनांत येऊन त्यांना वाटे, द्यावें हें सर्व सोडून आणि रहावें सदा श्रीसमर्थांच्या संगतींत. उरमोडी नदीच्या कांठीं पर्णकुटी बांधून श्रीसमर्थ कल्याणादि शिष्यांसह एकदां राहिले असतां, त्या सर्वांची दिनचर्या पाहून राजांचें मन असें च त्या वेळीं उत्कंठित झालें होतें. कर्नाटकच्या स्वारीवर गेले असतां, वेलुरपाशीं असा च वैराग्यवृत्तीनें त्यांच्यावर अंमल बसविला होता. तेव्हां तेथें प्रकट होऊन श्रीसमर्थांनीं त्यांना क्षात्रधर्म सांगितला. त्या च प्रसंगाचा उल्लेख प्रतापकारांनीं

**पुढें करनाटक हस्तगत केलें ।**
**समर्थध्यान तेथें आठवलें ।**
**अभिजितीं येळरीं दर्शन दिधलें ।**
**कृष्णातीरीं तेव्हां समर्थ ॥**

– समर्थप्रताप, ३–७२

या ओवींत केलेला दिसतो. अशा च वृत्तीचा पगडा मनावर बसून त्यांनीं राज्याची सनद श्रीसमर्थांच्या झोळींत टाकली. त्या वेळीं श्रीसमर्थ म्हणाले असतील, " ठीक, राजा, हें राज्य आतां आमचें झालें, तें आतां नीतिन्यायानें चालविण्यासाठीं व वाढविण्यासाठीं आम्ही तुझ्या हवालीं करतों, तें सांभाळ आणि त्याचा विस्तार कर. "

( ४४ ) या गुरुशिष्यांच्या जोडीकडे, त्यांच्या परस्परांविषयींच्या प्रेमळ भावनांकडे पाहून वशिष्ठ आणि राम यांचा दृष्टान्त एकाद्यास सुचेल, पण महाराष्ट्रकविवर्य मोरोपंत यांनीं श्रीसमर्थस्तवनपर केलेल्या आर्यांत

**शिवराजास ज्ञानद जो जैसा याज्ञवल्क्य जनकास ।**
**तरले भवार्णवीं बहु दृढतर ज्याची धरूनि जन कास ॥**

हा जो याज्ञवल्क्य आणि जनक यांचा दृष्टान्त योजिला आहे, तो च अधिक समर्पक आहे. बृहदारण्यकावरून असें दिसतें कीं, याज्ञवल्क्यांनीं जनकाला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करून जेव्हां अभय केलें, तेव्हां जनकानें याज्ञवल्क्यास नमस्कार करून ' हें माझें राज्य आणि हा माझा देह ' असें म्हणून, दोन्ही याज्ञवल्क्यचरणीं अर्पण केलीं :

**याज्ञवल्क्य यो नो भगवन्नभयं वेदयसे नमस्तेऽस्त्विमे विदेहा अयमहमस्मि ॥ ४–२–४**

अगदीं तद्वत् आमच्या श्रीशिवरायानें आपलें राज्य आणि आपला देह, अशीं दोन्ही श्रीसमर्थचरणीं अर्पिलीं. म्हणून मला मोरोपंतांनीं दिलेला दृष्टान्त सर्वथैव लागू पडतो, असें वाटतें.

**शिवराजास ज्ञानद जो जैसा याज्ञवल्क्य जनकास ॥**

असे श्रीसमर्थ होते, तर

**सद्गुरुचरणीं राज्यद जो जैसा जनक याज्ञवल्क्यास ॥**

असे श्रीशिवराय होते, असें म्हणतां येईल ! ते जनक च होते, यांत काय संशय आहे ?

( ४५ ) महाराष्ट्रजनकाच्या अवतारसमाप्तीचा काळ जवळ येत चालला. तो श्रीसमर्थांच्या लक्षांत हि आला. तो त्यांनीं औपरोधिक§ शब्दांनीं ध्वनित

§ श्रीसमर्थप्रताप, २० – ६३.

हि केला. श्रीसमर्थांचें शेवटचें दर्शन घेऊन व गाहिंवरून त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून आणि त्यांचा अखेरचा निरोप घेऊन श्रीशिवराय रायगडास गेले. तेथें त्यांनीं १६०२ च्या चैत्र शुद्ध १५ स आपला देह ठेवला. श्रीसमर्थांचें मन उदास झालें. श्रीशिवरायासाठीं च त्यांचा अवतार होता. तें आपलें अवतारकार्य संपलें, असें त्यांच्या मनानें घेतलें. त्यांना जनसंपर्क नकोसा झाला. दिवसाचे दिवस त्यांनीं एकांतांत जाऊन बसावें, कोणास दर्शन देऊं नये. त्यांनीं बोलणें सोडलें, अन्न वर्ज केलें. त्यांना सर्व कांहीं नकोसें झालें. जवळ होतें, नव्हतें, तें सर्व देऊन टाकूं लागले.

( ४६ ) इतके हे दोन आत्मे एकरूप होते ! या उभयतांचें पुण्य-स्मरण हें च महाराष्ट्राचें जीवन होय ! या माझ्या सिद्धान्ताची शंभरदां पुनरुक्ति करावी लागली, तरी तो दोष पतकरून मी महाराष्ट्रास जीव तोडून पुन्ह:पुन्हां सांगत च राहीन कीं, श्रीशिवसमर्थांचें स्मरण हें च आपलें जीवन होय, त्यांचें विस्मरण म्हणजे मरण च. तें मरण, देवा, महाराष्ट्रास येऊं देऊं नको !



उल्लास पंधरावा

# श्रीसमर्थपंचायतन



श्रीरामदास जयराम रंगनाथ ।
आनंदमूर्ति केशव सनाथ ।
ऐसें हें पंचायतन समर्थ ।
रामदासस्वामींचें ॥

ते दिसताती वेगळाले ।
परी ते स्वरूपीं मिळाले ।
अवघे मिळोनि येक चि जाले ।
निर्विकार वस्तु ॥

[ ( १ ) तत्कालीन सत्पुरुष समर्थांना गुरुस्थानीं मानीत – ( २ ) विशेष संबंध म्हणून पंचायतन – ( ३ ) परस्परांचें अकृत्रिम प्रेम – ( ४ ) बाकीच्या चौघांची तोंडओळख – ( ५ ) दुसरे **जयराम** – त्यांचें बाळपण – ( ६ ) त्यांचे सद्गुरु कृष्णाप्पा, त्यांचे शांतलिंग – ( ७ ) कृष्णाप्पांचें न्हाव्याच्या मुलीशीं चुकून लग्न झालें – ( ८ ) कृष्णाप्पांची पुण्यतिथी – जयरामावर श्रीसमर्थांचें प्रेम – ( ९ ) बद्रिकाश्रमीं गोपाळ शिष्य जोडला – ( १० ) काशीस कीर्तन करीत असतां जयरामांच्या खांद्यावर श्रीकृष्णाची बालमूर्ति – ( ११ ) त्यांचे ग्रंथ – ( १२ ) त्यांची अवतारसमाप्ति – ( १३ ) तिसरे **रंगनाथ** – त्यांचा बाणा आणि राजयोग – ( १४ ) त्यांचा जम आणि त्यांनीं केलेलें योगसाधन – ( १५ ) गुरुपरंपरा – ( १६ ) त्यांचें निगडीस वास्तव्य – ( १७ ) त्यांचीं पदपदांतरें, पंचकें, अष्टकें – ( १८ ) श्रीसमर्थांवर त्यांचें पद – ( १९ ) या पदाचें महत्त्व – ( २० ) त्याची विशिष्ट रचना – ( २१ ) अद्वैतचर्चा – ( २२ ) भागानगराहून घोड्यावर सकाळीं निघाले, सायंकाळीं वडगांवीं पोचले – ( २३ ) निर्याण – ( २४ ) चौथे **आनंदमूर्ति** – त्यांचे वडील, मातुःश्री, सद्गुरु रघुनाथ – ( २५ ) वसगडे, तेथून संकेश्वर, तेथून पुन्हां वसगडे – ( २६ ) रघुनाथांचा तनुत्याग, वृंदावन डोले – ( २७ ) गुरूच्या पायांतील चर्मी जोड्याची पूजा गुप्तपणें करीत – ( २८ ) निर्याण – ( २९ ) पांचवे **केशवस्वामी** – बाळपण – ( ३० ) जयदेवाचा अवतार – ( ३१ ) त्यांच्या कांहीं आख्यायिका – ( ३२ ) समर्थांवर त्यांचीं पदें – ( ३३ ) समर्थांच्या भेटीची तळमळ, पत्रव्यवहार – ( ३४ ) गडावर जाण्यास पत्नीसह केशव निघाले, मार्गांत बाळ भेटला – ( ३५ ) वर पोचले, पण जीव गळून गेला होता – ( ३६ ) त्यांच्यांत जीव आला, समर्थांनीं त्यास चकित केलें – ( ३७ ) निर्याण आणि पदपदांतरें – ( ३८ ) **उपसंहार** ]

( १ ) श्रीसमर्थांच्या काळांत आपल्या महाराष्ट्रांत अनेक सत्पुरुष उदयास आले होते. त्या बहुतेकांचा श्रीसमर्थांशीं संबंध आला होता. श्रीसमर्थांपासून प्रत्यक्ष अनुग्रह घेतला नसला, तरी बहुतेक जण श्रीसमर्थांना गुरुस्थानीं मानीत. तसा त्यांचा अधिकार हि होता. श्रीसमर्थांविषयीं वाटणारा प्रेमादर पुष्कळांनीं श्रीसमर्थस्तवनपर श्लोक, अभंग, पदें रचून व्यक्त हि केलेला आहे.

**हुर्मुजी रंगाचा उंच मोतीदाणा । रामदासी बाणा या रंगाचा ॥**

हा तुकाराममहाराजांचा अभंग, कांहीं कारणानें कोणी नाकारोत, पण प्रसिद्ध आहे.

**शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें । वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचें ।**
**कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा । नमस्कार माझा तया रामदासा ॥**

हा सर्वतोमुखी झालेला श्लोक वामनपंडितांचा आहे.

( २ ) याप्रमाणें तत्कालीन बहुतेकांशीं जरी श्रीसमर्थांचा संबंध जडला होता, तरी त्या सर्वांत वडगांवचे जयराम, निगडीचे रंगनाथ, ब्रह्मनाळचे आनंदमूर्ति व भागानगरचे केशव, या चौघांचा विशेष घरोबा होता. या पांच जणांचें पंचायतन म्हणून च ओळखलें जाऊं लागलें. केशव जरा, जरा कां वरे च, लांब पडत, पण बाकीचे चौघे, आधीं ठरवून, एकमेकांकडे भेटीगांठीसाठीं वारंवार जात. असे हे चौघे अधिकारी पुरुष एकत्र जमले, म्हणजे त्यांच्यांत चर्चेला कोणते विषय निघत असतील, काय काय संवाद होत असतील, कोण आनंद उचंबळून येत असेल, याची कल्पना करावी ! एक प्रसंग बखरींत वर्णिला आहे, त्यावरून कल्पना करतां येईल. एकदां चौघे एकत्र सुखानें बसले असतां, श्रीसमर्थांनीं सहज च एक चरण म्हटला

**मुक्तासि कांहीं तनुभाव नाहीं ।**

तों लागली च बाकीच्या तिघांनीं एक एक चरण रचून श्लोक पुरा केला. तो पुरा झालेला सबंध श्लोक असा—

**स म र्थ – मुक्तासि कांहीं तनुभाव नाहीं ।**
**ज य रा म – असोनि देही परि तो विदेही ।**
**रं ग ना थ – प्रारब्धकर्मास्तव देहि जाले ।**
**आनंदमूर्ति – वायूसवें पादप जेवि डोले ॥**

चौघे एकत्र जमले म्हणजे कशी मौज येत असेल ! हा एक प्रसंग कोणी लिहून ठेवला, म्हणून आपणांस कळला तरी ! असे शेंकडों सुखसंवाद त्यांच्यांत झाले असतील !

( ३ ) या पांचांत श्रीसमर्थ हे वयानें वडील आणि कर्तृत्वानें श्रेष्ठ होता. ते बाकीच्या चौघांना चिरंजीव म्हणत आणि ते चौघे श्रीसमर्थांना तीर्थस्वरूप म्हणून संबोधीत. सर्वांची उपासना एक च नव्हती, असें असून हि, या पांच हि जणांचें परस्परांवरील प्रेम इतकें अकृत्रिम होतें कीं, कोणत्या हि काळीं, निरनिराळ्या दिशांनीं काम करणाऱ्या कार्यकर्त्या पुरुषांनी त्यापासून बोध घ्यावा.

( ४ ) श्रीसमर्थचरित्रांत बाकीच्या चौघांची निदान थोडक्यांत ओळख करून दिल्याशिवाय चरित्राला पूर्तता येणार नाहीं. नुसती तोंडओळख तरी करून घेतली पाहिजे. पंचायतनांतील प्रमुख श्रीसमर्थ, त्यांचें चरित्र आपण येथवर पहात आलों, तें शेवटपर्यंत पाहूं हि. मध्यंतरीं येथें बाकीच्या चौघांची ओळख करून घेऊन पुढें जाऊं.

## ( दुसरे ) जयराम

( ५ ) नवल वाटतें, हीं सारीं देशलेखकांचीं म्हणजे कुळकर्ण्यांचीं मुलें होतीं. जयरामांचे वडील कात्राबाज मांडवगण येथील कुळकर्णी होते. त्यांचें नांव भिकाजीपंत आणि मातु:श्रींचें नांव कृष्णाबाई. हे ऋग्वेदी ब्राह्मण. जयरामांचा जन्म कृष्णाष्टमीला झाला, पण शक कोणता होता, तो विदित नाहीं. जयराम पांच वर्षांचे असतां च वडील निवर्तले, तेव्हां मातु:श्री जयरामाला घेऊन पंढरपुरीं गेल्या. जयरामांचा व्रतबंध पंढरपुरास च झाला. नंतर मातु:श्री हि इहलोक सोडून गेल्या. जयराम पोरके झाले. पंढरपुर सोडून ते प्रथम सप्तशृंगास व तेथून अंबा जोगाईस गेले. तेथें श्रीसमर्थांच्या प्रमाणें च त्यांना दत्ताचें दर्शन झालें. दत्तांनीं त्यांना वडगांवीं जाण्याची आज्ञा केली.

( ६ ) वडगांवीं जाण्यास कां सांगितलें ? तेथें काय होतें ? तेथें त्यांचा भाग्योदय व्हावयाचा होता. तेथें त्यांच्या मोक्षदात्या सद्गुरूचें वास्तव्य होतें. त्यांचे सद्गुरु श्रीकृष्ण ऊर्फ कृष्णाप्पा. कृष्णाप्पांचें चरित्र मोठें अलौकिक आहे. श्रीसमर्थचरित्रांत प्रसिद्ध असलेल्या बाहुक्षेत्रीं यजुर्वेदी ग्रामलेखकाच्या पोटीं कृष्णस्वामींनीं जन्म घेतला. बाळपणापासून च त्यांच्या अंगीं पूर्ण वैराग्य बाणलें होतें. ते भ्रमण करीत असतां महादेव-क्षेत्रीं शांतलिंग नामें गुरूची त्यांच्यावर कृपा झाली. ती प्रचलित असलेली अद्भुत हकिकत अशी आहे कीं, शांतलिंगांनीं काशीच्या एका ब्राह्मणा-कडून दोनशें रुपये कर्जाऊ घेऊन त्यास यात्रेचें पुण्य गहाण मांडून दिलें होतें. शांतलिंगांचा अवतारसमाप्तीचा दिवस प्राप्त झाला. कर्जांत राहून कसें जावें ? तें गहाणखत सोडवून आणलें पाहिजे व तें हि आजचें आज ! कोण सोडवून आणणार, असा शांतलिंगांनीं शिष्यांपुढें प्रश्न टाकला ! कृष्णाप्पा तयार झाले. महादेवक्षेत्रीं असलेल्या विस्तीर्ण तळ्याच्या

ईशान्येस ईश्वरदैवत असल्याचें कृष्णाप्पांना ठाऊक होतें. तेथें बुडी मारून काशीस मनकर्णिकेच्या घाटीं ते प्रकटले. गहाणाचे पैसे देऊन त्यांनीं गहाणपत्र सोडवून घेतलें आणि गेले तसे च परत येऊन सायंकाळच्या आंत, गहाण सोडवून आणल्याची पावती शांतलिंगांच्या पुढें सादर केली. मोठें च अद्भुत. शांतलिंगांची कृष्णाप्पावर पूर्ण कृपा झाली. त्यांनीं नंतर [illegible]क्षेत्रीं समाधी घेतली. कांहीं दिवसांनीं कृष्णाप्पा आपल्या गांवीं [illegible]क्षेत्रीं गेले व तेथून अन्य कारणानें त्यांचें वडगांवीं जाणें झालें, तें तेथें च कायमचें राहणें घडलें.

( ७ ) तेथें अजाणपणें एका न्हाव्याच्या मुलीशीं विवाह करण्याचा त्यांना योग आला. कोठल्याशा यात्रेंत एका न्हाव्याची मुलगी चुकली होती, तिची दया येऊन एका ब्राह्मणानें ब्राह्मणाची मुलगी समजून तिचा सांभाळ केला. त्या मुलीसह त्या ब्राह्मणाचें येणें दैवयोगानें वडगांवीं झालें आणि वडगांवच्या ब्राह्मणांनीं त्या मुलीचें लग्न कृष्णाप्पाशीं लावून दिलें. योगायोग असा होता, कांहीं काळानें त्या मुलीच्या बापाचें येणें वडगांवीं झालें. त्यानें आपल्या मुलीस ओळखलें आणि मात प्रकट झाली कीं, जिच्याशीं कृष्णाप्पांचें लग्न झालें, ती ब्राह्मणाची मुलगी नसून एका न्हाव्याची आहे. कृष्णाप्पांना ब्राह्मणांनीं बहिष्कृत केलें.

( ८ ) पैठणास ज्या श्रीखंड्यानें एकनाथांच्या घरीं कावडीनें पाणी भरलें आणि गंध उगाळलें, ते च हे कृष्णाप्पा होत व जयराम हे एकनाथ होत. जयराम हे नाथांचा च अवतार होते. या कारणानें दत्तांनीं जयरामास वडगांवीं जाण्याची आज्ञा केली आणि जयराम वडगांवीं आले. तेथें त्यांना कृष्णाप्पांचें दर्शन झालें आणि त्यांचा अनुग्रह झाला. जयराम कृतार्थ झाले. कालांतरानें एका माघ शु. १५ स कृष्णाप्पांचा काळ झाला आणि प्रतिवर्षी त्या मितीस जयरामांनीं वडगांवीं मोठ्या प्रमाणावर गुरूच्या पुण्यतिथीचा उत्सव चालू केला. त्या उत्सवासाठीं श्रीसमर्थ, रंगनाथ, आनंदमूर्ति यांचें वडगांवीं येणें घडे. त्या उत्सवांत रथ निघावा, अशी इच्छा होऊन समर्थांनीं भेंड्याचा रथ तयार करून दिला होता. या च उत्सवांत एके वर्षीं, आनंदमूर्तींची विलक्षण गुरुभक्ति जगाच्या निदर्शनास आली होती. ती रम्य कथा पुढें त्यांच्या त्रोटक चरित्रांत निवेदन करूं.

जयरामांवर श्रीसमर्थांचें फार प्रेम असे. जयरामांवर जेव्हां कांहीं संकटें येत, तेव्हां प्रत्येक वेळीं जाऊन श्रीसमर्थ त्या संकटांचें निवारण करीत. §

( ९ ) जयरामांनीं उत्तरेकडील बद्रिकाश्रमापर्यंतच्या यात्रा केल्या होत्या. ठिकठिकाणीं त्यांनीं कीर्तनें करावींत. श्रीसमर्थांचे जसे कल्याण, तसे यांचे गोपाळ. हे गोपाळ त्यांनीं बद्रिकाश्रमींच जोडले.

( १० ) काशीस मुक्काम असतां, एक कृष्णाष्टमी त्यांना तेथें पडली. तेथें अष्टमीचें त्यांनीं कीर्तन केलें. कीर्तनाला कोणी अनंत नांवाचे एक भटजी आले होते, त्यांना कीर्तन चालू असतां जयरामांच्या खांद्यावर एक बालक दिसे. भटजींना वाटलें, कोणा श्रीमंताची खुशामत करण्यासाठीं त्याच्या मुलाला यांनीं खांद्यावर घेतलें असावें. पण कथा करीत असतां असें करणें बरें नव्हे, असें वाटून कथा संपल्यावर इतर श्रोत्यांच्या जवळ भटजींनीं ही गोष्ट काढली व हें बरें नव्हे असें आपण सर्व जण मिळून जयरामांना सुचवूं, असें ते म्हणाले. पण इतर कोणाला च बुवांच्या खांद्यावर मूल दिसलें च नव्हतें, तेव्हां ते बुवांना काय म्हणणार ? तेव्हां अनंतभटजीच्या हृदयांत प्रकाश पडला कीं, तें कोणा श्रीमंताचें मूल नसून प्रत्यक्ष श्रीकृष्णाची बालमूर्ति होती ! भटजी पस्तावले आणि त्यांनीं जयरामांचे पाय धरले.

( ११ ) जयरामांची अशी गोष्ट सांगतात कीं, ते गाढमूढ निद्रेंत असले, तरी त्यांच्या हातांतली स्मरणी नीट फिरत च असे. ते अति थोर, अधिकारी पुरुष होते. त्यांच्या वडगांव येथील मठांत त्यांनीं केलेले ( १ ) रुक्मिणी-हरण, ( २ ) अभंगात्मक भागवत दशम स्कंद, ( ३ ) सीतास्वयंवर, ( ४ ) अपरोक्षानुभव, असे चार मोठे ग्रन्थ व ( १ ) ज्ञानीभक्तसंवाद आणि ( २ ) शांतीपंचीकरण, अशीं दोन प्रकरणें, असे लहान मोठे सहा ग्रन्थ, सुमारें चाळीस वर्षांमागें माझ्या पाहण्यांत आले होते, पण त्यांपैकीं कोणता च ग्रन्थ प्रकाशित झालेला नाहीं. मला आश्चर्य वाटतें.

( १२ ) श्रीसमर्थांच्या हयातींत च १५९४ भाद्रपद वद्य ११ स जयरामांनीं आपला अवतार संपविला. त्यांची आणि त्यांच्या गुरूंची, अशा

---

§ श्रीसमर्थप्रताप, १९, ७५ – ७६.

समाधी वडगांवीं आहेत. मी त्यांना आज येथून च ' देहेवीण लोटांगणी ' जातों !

## ( तिसरे ) **रंगनाथ**

( १३ ) ह्यांचा बाणा शिपायाचा असे. ते नेहमीं घोड्यावर असत. ते राजयोगी होते. झिडकारलें तरी वैभव त्यांच्या पाठीमागें लागे. त्यांच्या चरित्रांत अशा कथा अनेक आहेत. सर्वस्वाचा त्याग करून ते जंगलांत जाऊन बसले असतां एक शिष्य शेजारच्या गांवांत पीठ मागण्यास जातो, तों त्याच्या मागें दुसरा एकादा श्रीमान शिष्य, राहुटी, पालख्या, मेवा, मिठाई वगैरे घेऊन यांचा शोध करीत येतो, त्यांना जंगलांत गांठतो, राहुट्या उभारतो, पूजा आरंभितो, तों पहिला शिष्य भिक्षेचें पीठ घेऊन येतो आणि पहातो, तों इकडे हा असा थाट होऊन राहिलेला असतो ! रंगनाथस्वामींचा हा असा योग होता.

( १४ ) यांच्या वडिलांचें नांव बोपाजीपंत व मातुःश्रींचें नांव बयाबाई. हे यजुर्वेदी ब्राह्मण, माण नदीच्या कांठचे नाझरे गांवचे कुळकर्णी. या दंपतीच्या पोटीं यादवराव, रंगनाथ व विठ्ठलराव ऊर्फ आत्यास्वामी, अशा तीन पुत्रांनीं अनुक्रमें १५३१, १५३४ व १५३८ या सालीं जन्म घेतले. रंगनाथस्वामी ब्रह्मचारी होते. त्यांनीं हि उत्तरेकडील सर्व यात्रा केल्या होत्या, बद्रिकाश्रमीं जाऊन योगसाधन केलें होतें.

( १५ ) कल्याणीचे पूर्णानंद हे सहजानंदांचे शिष्य होते. रंगनाथांचे वडील बोपाजीपंत यांनीं पूर्णानंदापासून संन्यासदीक्षा घेतली, तेव्हां त्यांचें निजानंद नांव ठेवण्यांत आलें. त्यांचा च अनुग्रह रंगनाथांना. निजानंदांनीं १५६४ त मार्गशीर्ष व. ३० स कऱ्हाडास जित जलसमाधि घेतली.

( १६ ) रंगनाथस्वामींनीं नाझऱ्यास राहण्याचें सोडून देऊन तीर्थयात्रा करण्याचें आरंभिलें. मार्गांत निगडी गांवाजवळ एका ओढ्याच्या कांठीं घोड्याचा खूर दगडांत रुतला, म्हणून हे खालीं उतरले व येथें च रहावें, ही आपणांस सूचना आहे, असें मानून ते निगडीस च राहूं लागले.

( १७ ) त्यांनीं हजारों पदें व श्लोकबद्ध पंचकें आणि अष्टकें रचलीं होतीं, पण त्यांपैकीं फार च थोडीं, म्हणजे सुमारें सातआठशें च चाळीस

पंचेचाळीस वर्षांमागें छापून निघालीं होतीं. तें हि पुस्तक आतां दुर्मिळ असून त्याची पुन्हां आवृत्ति निघाली नाहीं. मला मोह होतो, पण मी तो आवरतों आणि त्यांचें एक हि पद नमुन्यासाठीं म्हणून उद्धृत करीत नाहीं. इतकें च म्हणतों कीं, श्रीसमर्थांच्या पदपदांतरांशिवाय इतकीं ठसठशीत, मर्मभेदक, थेट अंतःकरणाला जाऊन भिडणारीं आणि बोधप्रद पदें माझ्या वाचण्यांत दुसऱ्या कोणाचीं आलेलीं नाहींत.

(१८) श्रीसमर्थांवर त्यांचा फार लोभ असे. ते समर्थांना वारंवार भेटावयास येत. त्यांचें श्रीसमर्थांवर एक पद आहे, त्यांत ते म्हणतात—

**राजाधिराज अवतरला हा या जगदोद्धारा ।**

यावरून, श्रीसमर्थांच्या सामर्थ्याविषयीं त्यांना काय वाटे, तें कळून येतें. एक हि पद उद्धृत करीत नाहीं, असें इतक्यांत च म्हणून गेलों, पण हें पद आपल्या कानांवर घातल्यावांचून राहवत नाहीं, कारण तें श्रीसमर्थांवर च असून सर्वांच्या पाठांत असावें, असें मला वाटतें :

**रामदास चतुराक्षरि मंत्र जप वारंवार ।**
**दुस्तरतर भवसागरतारक सच्चित्सुखसार ॥ ध्रु०**

**रामदास द्वय अभिन्न नामें गोडी शर्करा ।**
**राहाटे परिमळ भुवनीं हातीं घेतां कर्पूरा ।**
**राजति वर्तुळशा त्यापरि तें जीवन कीं गारा ।**
**राजाधिराज अवतरला हा या जगदोद्धारा ॥ १**

**मनुष्यरूपें विलसे परि हा परिपूर्ण काम ।**
**मकराकृति कुंडलें पहातां स्वतःसिद्ध हेम ।**
**मंडण संतसभेचें साधक जनासि विश्राम ।**
**मस्तकमणि हा शतकोटींचें बीज श्रीराम ॥ २**

**दास तो उदास सेवुनि परमामृतकंदा ।**
**दाता स्वात्मसुखाचा निरसुनि विषयाचा धंदा ।**
**दानवकुळ षड्वैरी मर्दुनि तारित मतिमंदा ।**
**दारा द्रव्य त्यजुनी सत्वर सद्भावें वंदा ॥ ३**

**सद्गुरुराज विराजत करुनी सज्जनगिरिवास ।**
**सर्वस्वेंशीं शरण रिघावें धरूनियां कास ।**
**सत्य सनातन श्रीगुरु समर्थ मुनिमानसहंस ।**
**सहज पूर्ण निज रंग रंगला तारक विश्वास ॥ ४**

( १९ ) या पदाचें विशेष महत्त्व असें कीं, रंगनाथस्वामी हे श्रीसमर्थांच्या बरोबरीचे असून ते श्रीसमर्थांना किती मानतात, तें पहा.

( २० ) या पदाची विशिष्ट रचना वाचकांच्या लक्षांत तेव्हां च येईल. त्याचीं कडवीं चार असून रा म दा स हीं अक्षरें क्रमशः चारी कडव्यांचीं आद्याक्षरें आहेत, इतकेंच नव्हे, तर त्या त्या कडव्यांतील अक्षरानें प्रत्येक चरणाचा जसा आरंभ, तसा च शेवट हि केला आहे. शेवटच्या चरणांत सहज, पूर्ण, निज, असे सहज शब्द ओघांत योजून आपले परात्पर गुरु, परम गुरु आणि आत्मगुरु यांचें स्मरण साधलें आहे.

( २१ ) तुम्हांआम्हांस हि बोध घेण्यासारखा एकाददुसरा प्रसंग सांगून आपण आनंदमूर्तींच्या भेटीस जाऊं. एक प्रसंग असा : कल्याणांना अद्वैतचर्चेपेक्षां सगुणचरित्रें फार आवडत. त्यांना वाटे, सगुणचरित्र-श्रवणांत जी गोडी असते, तिच्या पुढें अद्वैतचर्चेची काय एवढी प्रतिष्ठा आहे ! ही आपली आवड त्यांनीं एकदा रंगनाथांना सांगून आधाराला वचन हि दिलें—

**अद्वैतचर्चा कंटाळवाणी । सांडूनि वर्णा कोदंडपाणी ॥**

पण यावर लागली च रंगनाथांनीं ठांसून सांगितलें कीं,

**अद्वैतचर्चा जंव हे कळेना । तों पूर्ण रामीं मन हें वळेना ॥**

असे उद्बोधक संवाद हजारों झाले असतील, पण ते सारे आपणांस कळावे, एवढें आपलें भाग्य कोठें आहे ?

( २२ ) रंगनाथ हे घोड्यावर बसण्यांत फार पटाईत असत. माघ शुद्ध १५ च्या एका उत्सवाला वडगांवीं येण्याचें त्यांनीं जयरामांजवळ कबूल केलें होतें. पण त्याची त्यांना विस्मृति झाली होती. ते त्या पौर्णिमेला भागानगरास होते. आज पौर्णिमा, हें सकाळीं त्यांच्या ध्यानांत आलें आणि जयरामांना दिलेल्या शब्दाचें त्यांना स्मरण झालें. स्मरण झालें मात्र

आणि त्यांनीं घोडा सज्ज करविला आणि स्वार होऊन भागानगराहून निघाले, ते सायंकाळीं वडगांवीं पोचले. सर्वांनीं त्यांच्या धाडसाचें कौतुक केलें. मार्गांत रामोश्यांनीं हि गांठलें होतें, पण यांच्या पराक्रमापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं.

( २३ ) असे हे पराक्रमी, धाडसी, थोर, अधिकारी राजयोगी होते. १६०६ मार्गशीर्ष व. १० रविवार रोजीं त्यांनीं देह ठेवला. त्यांची समाधी निगडी येथें च आहे. हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, इत्यादि लोकप्रिय ग्रन्थांचे कर्ते श्रीधर, हे रंगनाथांचे पुतणे होत.

## ( चौथे ) आनंदमूर्ति

( २४ ) हे मूळचे राहणारे आगळगांवचे. त्यांच्या वडिलांचें नांव ब्रह्मदेव भट व आईचें सावित्री. यांचें गोत्र वशिष्ठ आणि शाखा आश्वलायन. आनंदमूर्तींचे गुरु रघुनाथ, हे नाशिकचे राहणारे असून यजुर्वेदी माध्यंदिनी शाखेचे होते. त्यांचें गोत्र विश्वामित्र. साक्षात्कारी सत्पुरुष होते. त्यांनीं काशीहून चोवीस वेळां कावडीनें गंगोदक नेऊन रामेश्वरास अभिषेक केला होता व तितक्या च वेळां रामेश्वराहून सेतु आणून गंगेंत टाकला होता. तेविसाव्या कावडीच्या वेळीं अकल्पित रीतीनें आनंदमूर्तींस त्यांचें दर्शन घडलें, तेव्हां चोविसावी कावड नेल्यानंतर आपण तुझ्या आगळगांवीं येऊन वास्तव्य करूं, असा त्यांनीं आनंदमूर्तींस शब्द दिला होता. त्याप्रमाणें ते आले आणि आनंदमूर्तींवर त्यांची कृपा झाली.

( २५ ) आपल्या मुलानें एकाद्या बुवाच्या नादीं लागावें, हें आनंद-मूर्तींच्या वडिलांना आवडलें नाहीं. आनंदमूर्ति विवाहित होते आणि त्या वेळीं त्यांची स्त्री नुकती च प्रसूत झालेली होती. तशा स्थितींत हि वडिलांनीं मुलास आणि नूतन बालकासह स्नुषेस घराबाहेर काढून दिलें. तेव्हांपासून आनंदमूर्ति पत्नीसह गुरूच्या च संगतींत राहूं लागले. गुरु आणि सहकुटुंब शिष्य आगळगांवाहून वसगडे गांवीं रहावयास गेले. तेथून एके दिवशीं शिष्यास न कळवितां च गुरु चालते झाले, ते गेले संकेश्वरास. तेव्हां स्त्रीला आणि बालकाला वसगडे येथें च ठेवून गुरूच्या शोधार्थ आनंद-मूर्ति एकटे च निघाले, ते शोध घेत घेत त्यांनीं संकेश्वर गांठलें. गुरु

भेटतां च त्यांच्या चरणीं मस्तक ठेवलें. शिष्याची निष्ठा पाहून गुरूस आनंद झाला, गहिंवरून त्यांनीं आनंदमूर्तीस आलिंगन दिलें. पुन्हा उभयता वसगडे गांवीं आले. आनंदमूर्तींची स्त्री नूतन बालकासह मार्गप्रतीक्षा करीत च होती. आनंद झाला.

( २६ ) असा कांहीं काळ आनंदांत गेल्यावर रघुनाथस्वामींनीं योगपीठ सिद्ध केलें आणि जड तनूचा त्याग करून परब्रह्मीं ज्योति मिळविली. आनंदमूर्तींनीं उत्तरविधान करून ब्रह्मनाळ येथें वृंदावन स्थापिलें आणि आपण, स्त्री आणि मुलगा, अशीं त्या वृंदावनाची सेवा करीत राहिले. आनंदमूर्तींचें गुरुभक्तिप्रेम काय असेल तें खरें, पण त्यांच्या प्रेमामुळें रामनवमीच्या दिवशीं वृंदावनाची पूजा होत असतां, तें वृंदावन डोलत असे.

( २७ ) त्यांचें गुरुभक्तिप्रेम काय असेल तें त्यांचें त्यांना ठाऊक, असें मीं इतक्यांत ध्वनित केलें खरें, पण नंतर लवकर च तें जगास हि कळून येण्याचा योग आला. तो असा कीं, आनंदमूर्ति आपल्या संबळींत गुरूच्या पायांतील प्रत्यक्ष चर्मी जोडा ठेवून गुप्तपणें प्रत्यहीं त्याची पूजा करीत असत ! ही त्यांची गुप्त पूजा प्रकट होण्याचा अचानक प्रसंग आला, तो असा. वडगांवीं आपल्या गुरूच्या पुण्यतिथीला येण्याविषयीं जयरामांनीं सर्वांना आमंत्रण केलें होतें. त्याप्रमाणें श्रीसमर्थादि सर्व संत उपस्थित झाले होते. आनंदमूर्ति हि गेले होते. संबळी मठांत ठेवून आनंदमूर्ति स्नानास गेले. इकडे पहिली पंगत बसण्याची वेळ आली, तेव्हां मंडळीस उठण्यास सांगितलें असतां, एक गृहस्थ म्हणाले, “ भगवद्गीतेचा एक अध्याय तरी वाचल्यावांचून मी भोजन करीत नसतों, मी माझी पोथी आणण्यास विसरलों आहें, कोणाची तरी द्या, अध्याय वाचून येतों च. ” तेव्हां जयराम म्हणाले, “ आनंदमूर्ति स्नानास गेले आहेत, त्यांच्या संबळींत पोथी असेल, ती घेऊन वाचा आणि त्वरित चला. ” त्याप्रमाणें त्या गृहस्थानें संबळी उघडली, गीता हातीं घेतली – गीता होती च कोठें, जोड्याची गीता झाली होती. एक अध्याय वाचला मात्र आणि गृहस्थास समाधी च लागली ! मंडळी जमा झाली. जयरामांनीं गृहस्थाच्या नेत्रांस पाणी लावलें, गृहस्थ सावध झाला आणि म्हणाला :

**गीता वाचितां । येकायेकीं हो अवस्था ।**
**माझी मी च आत्मा आईता । नाहीं वार्ता दुजयाची ॥**

**गीता नव्हे ती हि अक्षर । प्रत्यक्ष दिसतसे जानकीवर ।**
**अनुग्रह जाहला साचार । काय विचार सांगूं तो ॥**

**उमस खाऊं नेदी क्षण । अवघे व्यापिलें चैतन्य ।**
**आतां कैचे गीतापठण । जाहलें मन उन्मन तें ॥**

–भ. मं. मा., २३, १०४–१०६

हें त्याचें बोलणें ऐकून सर्व जण आश्चर्य करीत आहेत, तों इतक्यांत स्नानाहून आनंदमूर्ति आले, आपली संबळी उघडलेली त्यांना दिसली, खजिल झाले, खालीं मान घालून, हात जोडून, जमलेल्या मंडळीस म्हणाले, “ मला क्षमा करा, माझा अपराध पोटांत घाला, मी मूढ आहें.

**पादरक्षा श्रीस्वामीच्या । पूजन करितों नित्य साचा ॥**
**भ्रष्ट असे मी ठाईंचा । स्पर्श चर्माचा नित्य मज ॥ १०९ ”**

मंडळींना कांहीं च बोध होईना. मग कळलें, आपल्या गुरूच्या पायांतील जोडा संबळींत ठेवून त्याची आनंदमूर्ति नित्य पूजा करीत, आणि या प्रसंगीं त्या जोड्याची गीता झाली होती ! हें कळून आलें आणि आनंदमूर्तींची ही गुरुभक्ति पाहून, सर्वांचे नेत्र भरून आले, धन्य, धन्य ही गुरुभक्ति, असे सर्वांनीं उद्गार काढले, वैदिक आणि पंडित होते, ते हि बोलूं लागले कीं, आम्ही संतांना व्यर्थ नांवें ठेवतों, त्यांची लीला अगम्य होय ! बाकी, आतां कल्पना करा, हा प्रकार पाहून त्या दिवशीं, त्या ठिकाणीं, गांवभर लोकांत आनंदाचा सागर कसा उचंबळला असेल ! ज्याच्या त्याच्या तोंडीं आनंदमूर्तींच्या अपूर्व गुरुभक्तीचा च विषय झाला असेल ! आनंदमूर्तींनीं गुरुभक्तीची परिसीमा गांठली ! केव्हां हि काय, अशा प्रसंगीं मी लिहूं फार थोडें शकतों, सर्व कांहीं वाचकांच्या कल्पनाशक्तीवर च सोंपवीत असतों.

( २८ ) या निस्सीम गुरुभक्तानें आपल्या पश्चात् वृंदावनाची जोपासना आपला पुत्र कृष्ण याजवर सोंपवून आपण शक १६१८ च्या वैकुंठ-चतुर्दशीस वैकुंठवास स्वीकारला. यांचें स्वतंत्र हस्तलिखित चरित्र असून त्याची प्रत मंदिरांतील क्रमांक ६२७ च्या जागीं आहे. त्यासोबत मठांतील

पांच पन्नास अस्सल सनदापत्रांच्या हि नकला आहेत. प्रसिद्ध व्हावयाच्या असतील, तेव्हां होतील.

## ( पांचवे ) केशवस्वामी

( २९ ) हे ऋग्वेदी ब्राह्मण, राहणार कल्याणीचे. मुंबईजवळचें आपलें गजबजलेलें कल्याण नव्हे, हें तिकडे च एक, लातुरच्या दक्षिणेस, इतिहासप्रसिद्ध, असें गांव आहे. त्या गांवीं श्रीसमर्थांचा मठ होता व आहे. केशवस्वामींचे वडील त्या गांवचे देशलेखक, म्हणजे कुळकर्णी होते. त्यांचें नांव आत्मारामपंत आणि त्यांच्या पत्नीचें, म्हणजे केशवांच्या मातु:श्रींचें नांव गंगा होतें. आश्चर्याची गोष्ट अशी, वयाच्या आयशियाव्या वर्षी गंगाबाईंना हे केशव पुत्र झाले. वयाच्या पांच वर्षांपर्यंत केशव बोलूं लागले नव्हते. मुलगा मुका आहे कीं काय, अशी शंका येऊं लागली होती. त्या सुमारास श्रीशंकराचार्यांचें आगमन कल्याणीस झालें आणि त्यांच्या प्रसादानें मुलास वाचा आली, केशव बोलूं लागले. बोलूं लागले तें भगवन्नाम च उच्चारूं लागले.

( ३० ) कालांतरानें त्यांचा विवाह झाला आणि ते जसे भगवन्नाम-स्मरणांत रंगून जात, तसे च विषयोपभोगांत हि मग्न होऊन रहात. भगवन्नामकीर्तन आणि विषयोपभोग, या परस्परविरुद्ध वृत्ति खऱ्या, पण त्या त्यांच्या ठिकाणीं एकवटल्या होत्या, हें हि खरें. त्यांना लवकरच कवित्वाची स्फूर्ति झाली आणि अध्यात्मपर, पण त्यांना शृंगारिक रूप देऊन, ते पदें रचूं लागले. या त्यांच्या गुणांमुळें च त्यांना बहुधा गीतगोविंद काव्याचे कर्ते जयदेव यांचा अवतार मानूं लागले असावेत.

( ३१ ) भगवंतानें आपल्या गळ्यांतला हार यांच्या गळ्यांत घालावा, तेव्हां यांनीं संकीर्तन थांबवावें, असा यांचा लौकिक होता. यांच्या उत्कट प्रार्थनेमुळें भिंतीवरील कृष्णाच्या चित्रानें तोंड फिरवून राधिकेनें दिलेल्या विड्याचा स्वीकार केला व भिंतीवरून प्रत्यक्ष मुखरस गळाला, हें पाहून यवनाधिकाऱ्यांनीं हि आपली खात्री करून घेतली. यांच्या एका कीर्तनांत सुंठेच्या ऐवजीं चुकून बचनागाच्या कांड्या कुटून प्रसाद वांटण्यांत आला, पण कोणास च त्या विषाची बाधा न होतां देवानें तें सर्व विष आपणाकडे

घेतलें आणि त्यायोगें देवाची मूर्ति मात्र काळी पडली. अशा यांच्या अनेक आख्यायिका प्रचलित आहेत.

( ३२ ) कल्याणीहून केशवस्वामी भागानगरास गेले व तेथें च मठ करून राहूं लागले. तेथें त्यांचा संप्रदाय बरा च वाढला. त्यांच्या मठांत समर्थ, रंगनाथ, जयराम यांचें जाणें झालें होतें. श्रीसमर्थांविषयीं त्यांना विलक्षण प्रेमादर वाटे. ते आपल्या शिष्यांना श्रीसमर्थांच्या वारंवार गोष्टी सांगत. श्रीसमर्थांवर त्यांनीं केलेलें एक पद ते आपल्या समुदायापुढें अनेक वेळां स्वतः म्हणून दाखवीत. तें पद असें :

**ब्रह्मसुखसंपदा भोगिताती सर्वदां ।**
**द्वैतभाव तो कदां नाठवे चि मानसीं ॥ १**

**ऐसियाचे पायीं रे लीन होउनि राही रे ।**
**मग तुज नाहीं रे जन्ममरण कांहीं रे ॥ ध्रु०**

**शांति ज्याची वनिता भक्ति ज्याची दुहिता ।**
**बोध पुत्र तत्त्वता त्रिभुवनीं विजयी ॥ २**

**काळांत हि मारिला लोकांत हि तारिला ।**
**भेदांत निवारिला केशव म्हणे आमुचा ॥ ३**

केशव म्हणे आमुचा, तो आमुचा कोण ? दुसरा कोण ? ते च सांगतात

**रामदास माउली ॥ ध्रु० ॥**

**सच्चित्सुखघन वरद प्रतापी । शांतीची साउली ॥ १**

**अनन्य जे नर शरण रिघाले । तयालागिं पावली ॥ २**

**केशविं केशव निजसुख सेवी । आठवितां चि धांवली ॥ ३**

( ३३ ) श्रीसमर्थांची वारंवार भेट व्हावी, असें त्यांना फार वाटे, पण तें शक्य नव्हतें. पंचायतनांतील बाकीच्या चौघांच्या वास्तव्याचीं ठिकाणें जवळ जवळ होतीं, त्यामुळें त्यांच्या भेटी वारंवार होत, पण भागानगर दूर पडलें. केशवांची श्रीसमर्थदर्शनाची तळमळ मात्र सारखी वाढत च चालली. त्यांनीं म्हणावें—

**निजात्मानंदडोहीं । ते बुडोन गेले पाहीं ॥ १**

**तनुत्याग होतां त्याची । मग सगुणभेट कैंची ॥ ध्रु०**

**जीत चि ब्रह्म जाले । अहंभाव वाटुनि प्याले ॥ २**

**केशव म्हणे डोळां । ते पाहावे वेळोवेळां ॥ ३**

पण कोठून वेळोवेळां पाहणें घडणार? स्वत: मनांत येतां च उठून चाफळास जाणें केशवांना शक्य नव्हतें. ते फार अशक्त झाले होते. तेव्हां शेवटीं त्यांनीं पत्र देऊन एका शिष्याला श्रीसमर्थांकडे पाठविलें. तें पत्र—

**ॐ नमोजी सच्चिदानंदा । पदत्रयस्वरूपसिद्धा ।**
**बीजतरुअरविंदा । स्वयें आमोदा परिमळसी ॥ १**

**तया स्वादामृताची चाखवटी । तूं चि रुची तुझे पोटीं ।**
**निरखूनिया दीजे भेटी । स्वानंददृष्टीं अवलोकन ॥ २**

**श्रीरामदासा परमसखया । स्वानंदकंदा गुरुवर्या ।**
**केशवें विज्ञप्ति ल्याहावया । हें चि कारण ॥ ३**

केशवांच्या शिष्यानें हें पत्र श्रीसमर्थांना आणून दिलें. समर्थांनीं लागली च उत्तर लिहून त्या शिष्याच्या हवालीं केलें—

**पदातीत वाक्यार्थ शोधी समाधी ।**
**क्षयातीत जो निर्विकल्पावबोधी ।**
**जया उगमीं जन्म नाहीं जिवासी ।**
**मिळे दास त्या संगमीं केशवासी ॥**

तथापि श्रीसमर्थांनीं त्या शिष्याबरोबर केशवांना तोंडी निरोप सांगितला, म्हणाले, “ सांगा केशवांना कीं, तुम्ही एकवार इकडे आलें पाहिजे. ”

( ३४ ) शिष्यानें परत जाऊन केशवस्वामींना पत्र दिलें व तोंडी निरोप होता, तो हि सांगितला. पत्र वाचून व निरोप ऐकून भेटीस जाण्याचा केशवांनीं संकल्प केला. त्यांनीं निघण्याला फार दिवस लावले नाहींत. सज्जनगडीं श्रीसमर्थांच्या भेटीस जाण्यास ते कुटुंबासह निघाले च. केशवस्वामी फार अशक्त झाले होते. त्यांना गांजा ओढण्याची संवय जडली

होती. त्यांच्या अशक्तपणामुळें प्रवासांत सर्व दगदग त्यांच्या पत्नीला च करावी लागे. मार्गांत मुक्काम करीत करीत दोघे चालले. बरोबर घेतलेल्या सामानाचें गांठोडें पत्नीनें डोक्यावर घ्यावें. मुक्काम होई तेथें स्नान करावें, अन्न शिजवावें, नवऱ्याला घालावें, आपण सेवावें, उष्टें खरकटें काढावें, दरम्यान यांची गुडगुडी हि भरून द्यावी आणि डोक्यावर सामानाचें ओझें घेऊन पुढच्या मुक्कामाला लागावें. अजून पुष्कळ च पल्ला गांठावयाचा होता, तों त्या हि थकल्या. तेव्हां एक धष्टपुष्ट ब्राह्मण तरुण आला आणि म्हणाला, "मला हि सज्जनगडाला च जावयाचें आहे, मी तुमच्या बरोबर येतों, मी तुमचें सामान डोक्यावर घेत जाईन." देव च पावला, असें त्या उभयतांना वाटलें. त्यांना मूलबाळ नव्हतें. त्या तरुणाविषयीं त्यांना अपत्यप्रेम वाटूं लागलें. सज्जनगड आतां फार लांब राहिला नव्हता, तों बाई हि अति थकल्या, त्यांना चालवेना हि. तेव्हां तो तरुण लडिवाळपणें मातुःश्रीस म्हणाला, "मी सामानाचें गांठोडें एका खांद्यावर घेईन, दुसऱ्या खांद्यावर तुम्ही बसा." बाईंनीं नाकारलें, त्या संकोचल्या, पण चालणें तर होईना, तेव्हां केशवांनीं पत्नीस म्हटलें, "कांहीं हरकत नाहीं, बसावें त्याच्या खांद्यावर, आपलें बाळ च आहे तो." बाई त्याच्या खांद्यावर बसूं लागल्या आणि पुढचा प्रवास सुखकर झाला. गडाच्या पायथ्यापाशीं ते पोंचले आणि "आपणांस आतां दुसरीकडे काम आहे," असें केशवांना सांगून तो तरुण निघून गेला. बाळ गेला असें पाहून बाई अन्नाचा घास घेईनात. "बाळाला बोलवा तेव्हां जेवीन," म्हणाल्या. केशवांच्या ध्यानांत आलें. त्यांचे नेत्र भरून आले ! ते पत्नीस म्हणाले, "गे आपला बाळ कसला, तो अंजनीचा बाळ होता, तो आतां आपणांस वर, गडावर च, श्रीरामदासांच्या च रूपांत भेटेल ! ! "

( ३५ ) उभयतां हळु हळु गड चढून वर गेलीं. सर्वांच्या भेटी झाल्या, सर्वांना आनंद झाला. गडावर पुष्कळ च मंडळी जमली होती, ठिकठिकाणचे साधु संत आले होते. स्वतः श्रीसमर्थ, पारपत्याधिकारी, इतर शिष्य मंडळी, श्रीशिवराय, सर्व पाहुण्यांची सोय लावीत होते, आदरातिथ्य करीत होते. आज आतां केशवस्वामी थकून आले आहेत, तेव्हां आज नको, पण उद्यां त्यांचें कीर्तन ऐकावयास मिळालें पाहिजे, असा सर्वांचा आग्रह पडला. दुसरा दिवस उजाडला आणि केशवस्वामी

फिकिरींत पडले. त्यांच्यांत उत्साह मुळीं च राहिला नव्हता, त्यांचा जीव गळाला होता. त्यांना गांज्याची संवय होती आणि वर आल्यापासून तो मिळाला नव्हता. त्यांना ठाऊक, श्रीसमर्थांना आवडणार नाहीं !

( ३६ ) पण, त्यांची संवय श्रीसमर्थ जाणत होते. केशव श्रीसमर्थांच्या भेटीस गेले, आणि

**तो योगी जनाचा जाणता मानस ।**
**संतसाधुजनांचा मित्र रामदास ।**
**( केशव ) येतां येकांतीं भेटावयास ।**
**चुट्टा भरिलेला वोपिलें ॥**

– दासविश्रामधाम, ९३–२८

केशव चकित होऊन म्हणाले, " गुरुवर्या, काय हें ! " समर्थ म्हणाले, " काय करणार, तुमचें यावांचून चालत च नाहीं, आणि तुमचें कीर्तन तर झालें पाहिजे, लोक उत्सुकतेनें त्याची वाट पहात आहेत. " केशव लज्जित होऊन म्हणाले, " आपल्या हातचा हा प्रसाद स्वीकारून प्रतिज्ञा करतों कीं, पुन्हां या पदार्थाचें नांव काढणार नाहीं. " नंतर केशवांचें कीर्तन झालें आणि नंतर, धन्य धन्य, हा एक च शब्द कांहीं काळ सर्वांच्या तोंडून ऐकूं येत राहिला.

( ३७ ) केशवांनीं आपला अवतार १६०४ च्या पौषांत १३ स संपविला. त्यांची समाधि हैद्राबादेस नदीच्या कांठीं दुर्लक्षित, अशा स्थितींत आहे. यांचीं पदपदांतरें अमूप आहेत, पण फार च थोडीं छापून निघालीं आहेत, या मंदिरांतच अजून त्यांचीं किती तरी पदें प्रकाशनाची वाट पहात आहेत !

## उपसंहार

( ३८ ) या पंचायतनाच्या चरित्राचा विचार केला, म्हणजे एक समान गुण या पांच हि जणांत असल्याचें दिसून येतें. तो समान गुण म्हणजे त्या सर्वांची विलक्षण गुरुभक्ति होय. हा यांच्यांतील गुण पाहिला, म्हणजे मला असें वाटूं लागतें कीं, गुरुभक्तीपुढें इतर सर्व साधनें फिकीं, [illegible] काळजी घ्यावयाची असते, ती फक्त गुरु शोधण्याची.

श्रीसद्गुरूचीं लक्षणें श्रीसमर्थांनीं श्रीमत् दासबोधांत विस्तारानें व मनाच्या श्लोकांपैकीं एका १८३ व्या श्लोकांत संक्षेपानें सांगितलीं आहेत. त्या लक्षणांनीं युक्त असे सद्गुरु भेटून जो एकदां त्यांची कांस धरतो, तो त्या गुरुभक्तीच्या बळावर शेवटास पोंचतो च, तो कृतार्थ होतो, त्याच्या जन्माचें सार्थक होतें, तो जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटतो. आनंदमूर्तींची गुरुभक्ति पाहिलीत ना ! तिला दुसरी तोड नाहीं. कोणाला तिचें कौतुक वाटणार नाहीं !

**गुरुक्षेत्रींचे धोंडे पशु पक्षी श्वान । सर्व हि पूज्यमान गुरुदासा ॥**

असें म्हणतात, तें शब्दशः खरें आहे. असल्या प्रकारावर विश्वास ठेवणारास चालू युग कदाचित् वेड्यांत काढील, पण मला वाटतें, असले वेडे कमी कमी होत चालले, म्हणजे वाईट दिवस येत जातात व कोणी च वेडा उरला नाहीं, म्हणजे धर्माचें हि वाटोळें होत असावें ! या पंचायतनाच्या चरणीं सर्व वेड्यांच्या वतीनें माझा अनन्य प्रणिपात !



उ ल्ला स सो ळा वा

# श्रीसमर्थांचीं गाथाचरित्रें



समर्थदेवें जें जें केलें । तें कोण्ही नसेल ऐकिलें देखिलें ।
भक्ति ज्ञान वैराग्य गाजलें । न भूतो न भविष्यति ॥ १

समर्थें प्रताप अद्भुत केले । समर्थें नाना पंथ शोधिले ।
समर्थें नाना लोक बोधिले । आणि वेधिले तैसे चि ॥ २

अनंत समर्थांचीं प्रतापचरित्रें ।
अलपस्वलप सांगिजेतीं वक्त्रें ।
गुरुसंप्रदायीं गुरुदेवस्तोत्रें ।
श्रवण असावीं सद्भाविका ॥ ३

[ ( श्री ) चमत्कारांचे प्रकार – ( गु ) विश्वास ठेवला च पाहिजे – ( रु ) त्याचें कारण – ( रा ) आपली योग्यता नसेल – ( म ) श्रीसमर्थांची होती – ( दा ) त्यांचा सर्वांत मोठा चमत्कार – ( स ) गोष्टींचें वर्गीकरण न करतां – ( १ ) श्रीसमर्थांना सिद्धींची अनुकूलता – ( २ ) श्रीसमर्थ वाटेल तेव्हां आणि वाटेल तेथें गुप्त आणि प्रकट होत – ( ३ ) जागच्या जागीं अंतर्धान पावत – ( ४ ) एका च वेळीं अनेक ठिकाणीं प्रकट होत – ( ५ ) वरुणगांवीं एका च वेळीं अक्रा घरीं भोजनास गेले – ( ६ ) मारुतीसारिखें उड्डाण हि करीत – ( ७ ) सात दिवस वाळूंत पुरलेले समाधिस्थ होऊन जिवंत राहिले – ( ८ ) अन्नसामुग्री वाटेल तेव्हां व वाटेल तेथें काढीत – ( ९ ) अभिनवाच्या कोटी – ( १० ) करंजगांवीं गांवजेवण – ( ११ ) इच्छेचा दाता भगवान – ( १२ ) शाक्तांनीं मारलेलीं हरिणें – ( १३ ) मृत ब्राह्मणास प्राणदान – ( १४ ) समर्थांच्या अंगावर कडा कोसळला – ( १५ ) सौदागर – ( १६ ) जन्मवांझ गायीनें दूध दिलें – ( १७ ) कल्याणांचें उच्छिष्ट – खलबत्ता – ( १८ ) मलयगंधर्वाचे तीन जन्म – घोडा, रेडा, अंत्यज – ( १९ ) अंबाजीचें कल्याण नांव कसें पडलें – ( २० ) कल्याणांची दुसरी परीक्षा – ( २१ ) दाळगपु – ( २२ ) कल्याणांनीं चोरांना वठणीवर आणलें – ( २३ ) मस्त हत्तीची रग जिरविली – ( २४ ) कल्याणांच्या खांद्यावर श्रीसमर्थ – ( २५ ) शिष्यांच्या निष्ठेची श्रीसमर्थांनीं परीक्षा आरंभिली – कल्याणांकडे गुरुत्व वोपिलें – ( २६ ) शहापुरच्या सतीबाई – ( २७ ) श्रीवेणुबाई – ( २८ ) एकदां वेणाबाईनीं श्रीसमर्थांना कुंठित केलें – ( २९ ) पूर्णानंदाची गोष्ट – ( ३० ) शिवाजी राजे प्रसंगीं कीर्तन करीत – ( ३१ ) उपदेशी निरनिराळ्या अधिकाराचे – ( ३२ ) एक महार शिष्य – (३३) भट्टजी नामा सुशील ब्राह्मण (३४) रामराव मोहिते – (३५) करारी जीवन्मुक्त भक्ताची गोष्ट – ( ३६ ) वृद्ध प्रेमळशेटीची कथा – ( ३७ ) श्रीसमर्थांनीं एका ब्राह्मणास मारुतीदर्शन करविलें – ( ३८ ) आणाजी बाबा – ( ३९ ) दादाजी आणि त्यांच्या पत्नी यांची श्रीगुरुचरणीं अपूर्व निष्ठा – ( ४० ) बाबाजीच्या एकशें एक मोहरा – भोजनें व एक प्रत्यंतर – ( ४१ ) गोटे दक्षिणा दिली – ( ४२ ) बुडणारें जहाज तारलें – ( ४३ ) मंत्रांत फरक – ( ४४ ) मंत्रांत कमी जास्ती ( ४५ ) मंत्र परत केला – ( ४६ ) श्रीसमर्थ आणि रंगनाथ यांची भेट – ( ४७ ) जयरामांच्या वडगांवीं रथोत्सव – ( ४८ ) समर्थांना बोलावण्यास वडगांवीं खटावकर आले – ( ४९ ) जयराम तीन दिवस विहिरीच्या पाण्यांत तळाशीं – ( ५० ) करवीरकर शंकराचार्यांवरील संकटाचें निवारण – ( ५१ ) जयरामांचें संकटनिवारण – ( ५२ ) पाटगांवचे मौनीबाबा – ( ५३ ) सांप्रत कोणी विदेही आहेत काय ? – ( ५४ ) श्रीतुकाराम-रामदास भेट – ( ५५ ) तुकाराम-रामदास संबंध – ( ५६ ) अमात्यांचें घराणें – ( ५७ ) राज्यकारभारां-

तील लोकांना श्रीसमर्थ सहसा अनुग्रह देत नसत –( ५८ ) शमनामीर पीर – ( ५९ ) दशावतारी एकदां श्रीसमर्थांच्या दर्शनास आले होते –( ६० ) आकाशांतून फुलें पाडणारा हरिदास –( ६१ ) एक स्त्रीलंपट कपटी गृहस्थ –( ६२ ) एका ब्राह्मणास संसार सोडण्याची झालेली इच्छा –( ६३ ) जाळगेवाडीचा कुणबी –( ६४ ) त्यांच्याकडे कोणी हि येवो, ते सर्वांचें समाधान करीत –( ६५ ) एकदा एक गायक जयपत्र मिळविण्याच्या आशेनें आला –( ६६ ) सर्वांचें च ते विश्रांतिस्थान झाले होते –( ६७ ) श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाची रचना –( ६८ ) दासगीता तथा पंचाध्यायी –( ६९ ) लिहून देण्याचा कंटाळा नसे – –( ७० ) कर्मकांडाहून ज्ञानकांड श्रेष्ठ –( ७१ ) तो राजा केव्हां होणार ? – ( ७२ ) प्राकृत ग्रंथांचें पुढें काय होणार ? ( ७३ ) मद्यपाननिषेध –( ७४ ) एक मायाळू म्हातारी बाई –( ७५ ) खिरीची वासना –( ७६ ) हुरड्यासाठीं कणसें तोडलीं –( ७७ ) पिशाचवृत्ति –( ७८ ) संकटकाळीं शिष्यांसाठीं धांवून जात – ( ७९ ) पलंगावर कां न निजत –( ८० ) वासनेचें रूप आणि तिचा परिहार– ( ८१ ) अन्यायाची चीड आणि धर्माच्या लोपाची असह्यता –( ८२ ) कफाची व्यथा –( ८३ ) बहुधा एकांतांत भोजन करीत –( ८४ ) प्रतापगडावरील देवीच्या नथेंतील मोतीं –( ८५ ) एकदां न जेवतां च वनांत निघून गेले –( ८६ ) रंगनाथांचा थाट आणि श्रीसमर्थांचा विनोद –( ८७ ) विलासाबरोबर च त्यागवृत्ति – एका रंकाच्या जीवासाठीं –( ८८ ) वैदिकी ब्राह्मणांच्या तऱ्हा –( ८९ ) विवाहमंडपीं अधोदृष्टि –( ९० ) निस्पृहतेचें सुख –( ९१ ) सेवाप्रेम –( ९२ ) गडावर असतां एक वर्षी दुष्काळ पडला –( ९३ ) गडावरील अग्निकुंडांतील विभूति –( ९४ ) पुढें पुढें मग श्रीसमर्थांच्या लहानपणच्या गोष्टी लोक सांगूं लागले –( ९५ ) विशिष्ट अभंगाचें स्मरण –( ९६ ) निनामपाडळी जळाली –( ९७ ) उंब्रजेचा जटिल –( ९८ ) शाहीरांचें गर्वहरण –( ९९ ) बाहेगांवचा मारुती –( १०० ) श्रीशिवरायानुग्रहाची कथा –( १०१ ) शिंगणवाडीचें रान –( १०२ ) शिंगणवाडीचा मारुती आणि श्रीराममंदिराची जागा –( १०३ ) श्रीसमर्थांचा मिरवीत राजगृहप्रवेश –( १०४ ) मराठे सरदारांचा परिपाठ –( १०५ ) स्वारशिपायी यांना विजयाचा मंत्र –( १०६ ) सिंहस्थांत गंगायात्रा –( १०७ ) श्रीसमर्थांचें [illegible] तिसऱ्यांदा जाणें –( १०८ ) हा सिंहस्थ कोणत्या शकांतला ? –( १०९ ) [illegible] नदीच्या तटीं पर्णकुटी –( ११० ) सारंगपुरचा मारुती –( १११ ) विठ्ठल रामरूप झाले –( ११२ ) पंढरीस राम आणि चाफळास श्रीसमर्थांच्या ध्यानांत विठ्ठल –( ११३ ) छिद्रान्वेषी कोंडोपंत ब्राह्मण –( ११४ ) मुसलमान पादशहांच्या भेटी –( ११५ ) देहकष्ट निवारण्याचा उपाय –( ११६ ) श्रेष्ठांचें निर्याण –( ११७ ) श्रीवेणाबाईंचें निर्याण –( ११८ ) श्रीसमर्थ जाण्याच्या

गोष्टी बोलूं लागले–( ११९ ) श्रीशिवछत्रपति यांच्या निर्याणानंतर–( १२० ) गाथाचरित्रें संपलीं नाहींत, तीं अनंत आहेत ]

( श्री ) विशेषतः श्रीदासविश्रामधाम आणि श्रीसमर्थप्रताप या दोन ग्रन्थांत आणि साधल्यास इतर हि श्रीसमर्थचरित्रग्रन्थांत श्रीसमर्थांविषयीं ज्या गोष्टी सांगण्यांत आल्या आहेत, त्यांपैकीं बऱ्याचशा गोष्टी या उल्लासांत एकत्र करण्याचा माझा हेतु आहे. त्यांत बरा च भरणा चमत्कारांच्या गोष्टींचा असणार, हें उघड आहे. ते चमत्कार हि अनेक प्रकारचे आहेत. मृत प्राणी जिवंत करणें, डोहांत किंवा विहिरींत अनेक दिवस राहून बाहेर येणें, कैक दिवस जमिनींत पुरलें जाऊन जिवंत राहणें, लघु रूप धारण करून छिद्रांतून निघून जाणें, वाटेल तेथें अकस्मात प्रकट होणें व गुप्त हि होणें, पाण्यावरून चालणें, हवेंतून जाणें, एका च वेळीं अनेक ठिकाणीं असणें, वाटेल तेथें वाटेल तितकें अन्न काढणें, शंभरांना पुरणारें अन्न हजारोंना पुरवून पुन्हां उरवणें, इत्यादि अनेक प्रकारच्या गोष्टी आढळतात.

( गु ) अशा गोष्टींवर आज विश्वास ठेवावा तरी कठीण आणि न ठेवावा तरी कठीण च, निदान मजसारख्याला. मजसारख्याला कां कठीण ? तर मला तत्काळ श्रीदासबोधाच्या पहिल्या दशकांतील दहावा समास आठवतो. श्रीसमर्थ हि असल्या गोष्टीवर विश्वास ठेवतात, तेथें आपण न ठेवूं तर फसूं.

**येक महानुभाव विख्यात । येक भक्त जाले ख्यात ।**
**येक सिद्ध अकस्मात । गगन वोळगती ॥**

**येक तेजीं तेज चि जाले । येक जळीं मिळोन गेले ।**
**येक ते दिसत चि अदृश्य जाले । वायोस्वरूपीं ॥**

–श्रीदासबोध, १–१०–६, ७

खरें म्हणजे, हा त्यांच्या विश्वासाचा प्रश्न च नव्हे ! त्यांच्या स्वतःच्या च लीला अशा प्रकारच्या होत्या ! ज्यांना अनुभव नाहीं, त्या तुम्हाआम्हांला प्रश्न पडला आहे, अशा गोष्टींवर विश्वास ठेवावा, कां न ठेवावा. त्यांच्या पुढें हा प्रश्न नव्हता. ते केवळ विश्वासानें नव्हे, तर प्रचीतीनें सांगतात–

**येक येक चि बहुधा होती । येक देखत चि निघोनि जाती ।**
**येक बैसले असतां चि भ्रमती । नाना स्थानीं समुद्रीं ॥ ८**

अशा गोष्टी त्यांच्या हातून च घडलेल्या, त्यांच्या चरित्रांत नमूद आहेत. अशा सामर्थ्याचे सिद्ध लक्षावधी होऊन गेले, असें ते म्हणतात आणि मानतात. तेथें आम्हांसारख्या अननुभवी मूढांनीं अविश्वास दाखविला, तरी त्या गोष्टी खोट्या थोड्या च होणार आहेत ?

( रु ) आम्ही खरोखर च मूढ आहोंत. एका स्फुट प्रकरणांत श्रीसमर्थ, माझ्या समजुतीनें, आत्मचरित्र च सांगत असतां, ईश्वरी पुरुषाच्या असल्या सामर्थ्यावर विश्वास न ठेवणाऱ्या आम्हासारख्यांना मूढांत च काढीत आहेत. अनन्य भक्ताच्या ठिकाणीं असलें सामर्थ्य संभवतें. बोलणें सोपें आहे, पण ' अनन्य भक्ताच्या ठिकाणीं असलें सामर्थ्य संभवतें ' ह्या वाक्याचा अर्थ मजसारख्याच्या मनांत उतरणें कठीण आहे. ' अनन्य ' म्हणजे तरी काय, हें हि मला पूर्णत्वानें कोठें समजतें? अनन्य म्हणजे काय, तें समजावें, म्हणून तरी, तें स्फुट प्रकरण येथें उद्धृत करणें इष्ट होय.

**भक्ताचा देव लोभाळु । भक्ताचे मनीचें करी ।**
**हारद्र जिवींचे जाणे । राजा त्रीलोक्यनाथ कीं ॥ १**

**भक्तासी त्याविणें नाहीं । त्यास हि भक्त दुल्लभु ।**
**विदेशी येक ते दोघे । वेगळे नव्हती कदा ॥ २**

**सांपडे भक्त जो जैसा । तैसा तो होतसे तया ।**
**सर्व हि आपणापासीं । मनासी पुसणें बरें ॥ ३**

**देव तो दयाळु मोठा । अन्याय क्षमणें बहु ।**
**भक्ताचा साभिमानी तो । बुद्धिदाता परोपरी ॥ ४**

**कोण रे चालवी ऐसें । नुन्य तें पुरतें करी ।**
**उभा चि पाठीसी देवो । जेव्हां तेव्हां क्षणक्षणा ॥ ५**

**साहेब जाहला मोठा । कोण वेळेसी पावतो ।**
**धणी ते लालची मोठे । चोरटे सेवकु जनीं ॥ ६**

**विश्वास येकमेकाचा । कदापी न घडे जनीं ।**
**जपती येकमेकाला । परस्परें चि घातकी ॥ ७**

मारिती वीष देताती । स्वामी सेवक ते पहा ।
आडोन चालते सृष्टी । विपट पडिलें सदा ॥ ८

देवासी तुळणा कैची । पाहों जातां भूमंडळीं ।
भक्त होईल देवाचा । संसार सर्व सांडुनी ॥ ९

त्यास वोढेल हे सृष्टी । येदर्थीं संशय नसे ।
प्रत्यय वाक्य नेमाचें । कीतेक जाणते जनीं ॥ १०

भक्ताला काय उणें रे । देव त्रीलोक्य वर्तवी ।
तो देव आपुला जाला । वैभवा कोण पूसतें ॥ ११

टाकितां लावितो मागें । देव दाता चि जाहला ।
घ्यावें तें कोण तें किती । त्रीलोक्य भरलें असे ॥ १२

आपण सर्व देवाचा । देवाचें आपणाकडे ।
किती घ्यावें किती न्यावें । भोगावें कोण तें किती ॥ १३

दाता अनंत भुजांचा । भडसा पुरवीतसे ।
पुरे पुरे पुरे आतां । देव देतां विटेचिना ॥ १४

भक्त तो घेइना कांहीं । देवें त्रीलोक्य दीधलें ।
सर्व हि सांडिलें दोघीं । येकमेकासी लाविती ॥ १५

ऐसी हे प्रीति दोघांची । चढती वाढती सदा ।
दोघे हि तापसी योगी । वियोगी नव्हती कदा ॥ १६

भक्तानें अंतरीं देवो । जाणोनि धरिला बळें ।
देव हि विसंभेना कीं । सोडीना भक्तवत्सळु ॥ १७

भक्ताचें नुन्य सोसीना । नुन्य तें पुरतें करी ।
भक्ताचा भारवाही तो । ब्रीदें चि चालिलीं असे ॥ १८

अभावें भर्वसा नाहीं । मूढाला निश्चय नसे ।
दया हे थोर देवाची । भक्ताला वज्रपंजरु ॥ १९

रामदास म्हणे माझा । राम स्वामी दयानिधी ।
सोडिले बंद देवाचे । तो हा त्रयलोक्यनायकु ॥ २०

विचार केला तर किती महत्त्वाचें हें स्फुट प्रकरण आहे. हें नुसतें एक प्रकरण वाचून आणि समजून घेऊन एकाद्या भक्ताला श्रीसमर्थांचा साक्षात्कार होईल ! हें स्फुट उगीच नुसतें वाचून पुढें जाणें बरें नव्हे.

या स्फुटांत श्रीसमर्थांनीं केलेल्या प्रत्येक विधानाचा अर्थ मनांत आणला पाहिजे. प्रत्येक विधानांत श्रीसमर्थांचें चरित्र आहे आणि त्यांच्या सामर्थ्याची किल्ली आहे. तुम्ही च ती किल्ली शोधून काढा, तुम्हांस ती सांपडेल. ती किल्ली हातीं आली म्हणजे चमत्काराच्या गोष्टींचा चमत्कार नाहींसा होऊन त्या गोष्टी स्वाभाविक वाटूं लागतील.

(रा) आपण साधनें केलीं नाहींत, देवाच्या कृपेसाठीं देह झिजविला नाहीं, कष्ट केले नाहींत, आशा ममता सोडली नाहीं, देवाला आपलासा करून घेतलें नाहीं, आणि आपणांत तें सामर्थ्य नाहीं व दुसऱ्या कोणांत तें असल्याचें आपणांस आढळून येत नाहीं, म्हणून च केवळ या गोष्टी खोट्या मानणें योग्य होईल काय? सुज्ञांनीं ठरवावें आणि काय बोध घ्यावयाचा असेल तो घ्यावा.

(म) श्रीसमर्थांपुरतें पाहिलें तर, त्यांच्यांत हें सामर्थ्य होतें, अशी साक्ष श्रीशिवराय, श्रीगिरिधर, श्रीमेरुस्वामी इत्यादि त्यांचे अंतेवासी देत आहेत. त्यांना सिद्धी अनुकूल होत्या, असें श्रीदासविश्रामधामकर्ते हि सांगत आहेत :

**अगस्तीची जे अघटित करणी । जे सिद्धी दाविली वासिष्ठांनीं ।**
**संतसिद्धयोगीश्रीदत्तमुनी । गोरक्षादि केलें जें वश्य ॥**

**जें विदित आहे इंदुधरासी । जो समग्र संग्रहो मारुतीपासीं ।**
**जे सत्ता वागविती विधिहरिऋषी । ते समर्थांपासीं सिद्ध असे ॥**

—श्रीदासविश्रामधाम, १०८, ५७-५८

कड्या, कुलुपें लावून दरवाजे बंद असतां येथें कसे आलांत, म्हणून देवीनें विचारिलें असतां, याचा च उलगडा करून श्रीसमर्थ सांगतात :

**स्थूळ तनूच्या जाल्या अतितु । आडवे न होती जड पदार्थु ।**
**संकल्पाची कायसी मातु । लिंगदेहासी वोलांडितां ॥**

**कारणशून्यासी वोलांडितां । नुरे चि भय ते अंधारवार्ता ।**
**तुर्याउन्मनी जिरोन घेतां । कांहीं बाधकता न बाधी ॥**

**समरसोन स्वरूपीं राहतां सदा । आडळेना अडवेना अष्टधा ।**
**अधिकारी जाला जो तुमचिया पदा । तुम्हाजवळी येईना काय तो ॥**

**नसे मुक्ताला बद्धमुक्तभ्रम । योगाचेनि पालटे स्थूळ जड कर्म ।**
**सिद्धीचेनि होये नवलाव परम । भक्त मुक्त सूक्ष्म नभाहुनी ॥**

–श्रीदासविश्रामधाम, १०८, ६१-६४

( दा ) तथापि मी या चमत्कारांना विशेष महत्त्व देत नाहीं. त्यांनीं एकादी मेलेली घार जिवंत केली असेल, नसेल, एकादें प्रेत उठविलें असेल, नसेल, पण आपणांस हें ठाऊक झालें आहे कीं, त्यांनीं मेलेलें सबंध राष्ट्र जिवंत केलें! मग कोणता चमत्कार मोठा मानावा? मेलेलें राष्ट्र जिवंत केलें, हा एक च चमत्कार त्यांच्याविषयीं प्रेमादर वाटण्याला पुरेसा आहे. ह्या एका चमत्कारापुढें इतर चमत्कारांची प्रतिष्ठा नाहीं. म्हणतात, त्रेतायुगांत होऊन गेलेल्या रामानें समुद्रांत दगड तारले. आपणांस तें ठाऊक नाहीं, पण आपणांस हें ठाऊक आहे कीं, अवघ्या तीनशें वर्षांमागें होऊन गेलेल्या त्यांच्या एका भक्तानें लक्षावधि शिष्योपशिष्यांना भवसागरांतून तारून नेलें; असो.

( स ) चमत्काराशिवाय मग बाकीच्या पुष्कळ गोष्टी ' संभवनीय ' या सदराखालीं येऊं शकतील, अशा आहेत. कित्येक गोष्टींत तर केवळ इतिहास च आहे, म्हणजे घडलेल्या गोष्टींचें कथन आहे. कांहीं गोष्टी केवळ श्रीसमर्थांच्या व्यक्तिविषयक असतील, कांहींत शिष्यांचा संबंध असेल, तर कित्येकांत इतर बरोबरीच्या सत्पुरुषांचा संबंध असेल. मी सर्व च गोष्टी सांगूं शकेन, अशी मात्र माझी कल्पना नाहीं, तसा माझा विचार हि नाहीं. तेव्हां आतां या गोष्टींचें निरनिराळ्या सदरांखालीं वर्गीकरण न करितां, जशा हाताशीं येतील, किंवा सुचतील, तशा त्या क्रमशः सांगत जातों.

## ( १ ) श्रीसमर्थांना सिद्धींची अनुकूलता

श्रीसमर्थांच्या चरित्रांत अनेक कथा अशा आहेत कीं, त्यांवरून त्यांना सिद्धी अनुकूल होत्या, असें मानावें लागतें. मनांत येईल तेव्हां वाटेल तेथें प्रकट होणें, जागच्या जागीं गुप्त होणें, धुणींत वस्त्र जाळून हि तें पुन्हां जसेंच्या तसें असणें, तसेंच थोडें अन्न पुष्कळांना पुरून उरणें, थोडा दिलेला सिधा पुष्कळ दिवस पुरणें, रानावनांत, डोंगरांत एकादा

मोठा दगड उचलावा आणि त्याच्या खालीं वाडा दिसावा, त्यांत सर्व स्वयंपाक तयार असावा व पाट, पानें, रांगोळ्या वगैरे पंगतीची सर्व सिद्धता असावी, हें एरव्हीं घडणें शक्य नव्हे. एक दिवस एकाद्या दगडाखालीं असला देखावा दिसावा, तर दुसऱ्या दिवशीं त्या दगडाखालीं कांहीं च नसून निराळ्या च दगडाखालीं तो सारा थाट प्रत्ययास यावा ! एकदां कल्याण आणि जयरामस्वामी यांना आपल्या कांहीं अनुष्ठानाची सांगता करावयाची होती, तर श्रीसमर्थांच्या कृपेनें कृष्णातटाकीं ब्राह्मणांचें तीन हजार पात्र झालें होतें, तें हि असें च सिद्धीच्या जोरावर. माहुलीच्या रानांत व इतरत्र असे प्रसंग घडल्याचीं वर्णनें त्यांच्या सर्व चरित्रग्रंथांत आढळतात. श्रीशिवाजीराजे हि कित्येकदां ससैन्य येऊन श्रीसमर्थांना भेटून व भोजन करून गेल्याचीं वर्णनें आहेत.

या संबंधांत मला आतां Foreign Biographies of Shivaji या ग्रंथाचें व त्या ग्रन्थाधारें लिहिलें गेलेलें, श्रीरामदासी ग्रंथमालेंतील एकूणतिसावा मणि – **श्रीरामदासीचीं ऐतिहासिक टिपणें** – यांतील तिसरें टिपण, यांचें स्मरण होतें. तें टिपण लिहिलें त्या वेळीं, गार्डानें रामजी म्हणून ज्यांचा उल्लेख केला आहे, ते रामजी म्हणजे रामदास च होत, असें मी निश्चयानें म्हणूं शकलों नव्हतों. पण आतां, विशेषतः उद्धवसुत-कृत चरित्रांतील अध्याय १४ वा, महीपतिकृत संतविजयांतील अध्याय ५ वा, श्रीदासविश्रामधामांतील मान ३२ वें आणि श्रीसमर्थप्रतापांतील समास १४ वा, यांतील श्रीसमर्थांनीं घातलेल्या सहस्रावधि ब्राह्मणभोजनांचीं वर्णनें पाहातां मला यत्किंचित् हि शंका उरली नाहीं कीं, रामजी म्हणून ज्या महापुरुषाचें वर्णन गार्डानें त्या काळीं, म्हणजे श्रीसमर्थांच्या पश्चात् चौदा पंधरा वर्षांच्या आंत च केलें, ते श्रीसमर्थ रामदास स्वामी च होत, दुसरे कोणी नव्हत. गार्डानें केलेलें हें वर्णन, पुढें अशा एकाद्या भोजनाची गोष्ट सांगतांना, त्या गोष्टीच्या अनुरोधानें, आपण आठवण ठेवून उद्धृत करूं.

## (२) श्रीसमर्थ वाटेल तेव्हां आणि वाटेल तेथें गुप्त आणि प्रकट होत

श्रीसमर्थ मनांत येईल तेव्हां व इच्छा होईल तेथें गुप्त आणि प्रकट होत, अशा अनेक गोष्टी त्यांच्या चरित्रांत नमूद आहेत. हें सामर्थ्य त्यांच्या

ठिकाणीं कोठून आलें? त्याची हकिकत श्रीदासविश्रामधामकर्ते यांनीं सांगितली आहे. ती सांगतांना त्यांनीं मुद्दाम बजाविलें आहे कीं, आपण ही तुम्हांस एकादी काल्पनिक गोष्ट सांगत नसून इतिहास, म्हणजे घडलेली गोष्ट सांगत आहों, तेव्हां तो इतिहास ऐका :

**जंव तीर्थयात्रा गेले फिरत । पातले बद्‌रीवना समर्थ ।**
**पालटोनि वेष पाराशरसुत । दावीत भय तेथें भेटले ॥**
**दचक न धरी च रुद्रावतारी । मानोनि विस्मयो तोषले अंतरीं ।**
**पाठीसी धावतां शंकराचारीं । जैसें आदरें पूजिलें ॥**
**देखोनि सद्दढता नानापरी । जाले सद्भक्ता बहु साहकारी ।**
**तेवि साकारें भेटूनि झडकरी । वोपिलें आदरें वरासी ॥**
**जैसा नारदा नाहीं अटक । स्वतंत्र जैसे श्रीदत्त गोरख ।**
**तेवि तुम्हा हि इच्छासारिखें । गमन गुप्त प्रगट घडेल ॥**
**आणि इछिलें तें लाभेल बळ । समयीं पाहिजे विद्या स्फुरेल ।**
**पाहतां कृपेनें त्यास हि सफळ । होईल मनींचें आर्त जें ॥**
**वेदांत पडिलासे अहंकारीं । भेदपंथ तो नाना विकारी ।**
**तरि तुम्ही स्थापावें जगदांतरीं । निजज्ञान केवळ भजनेंसीं ॥**
**ऐकोनि यापरी तोषले दास । सवें चि गुप्तले श्रीवेदव्यास ।**
**स्मरत श्रीरामा भक्त उल्हासें । परतले यात्रा संपादित ॥**

—श्रीदासविश्रामधाम, २९, २०–२६

याप्रमाणें तीर्थाटणाच्या काळांत बदरीवनांत श्रीवेदव्यासांनीं श्रीसमर्थांना वर दिला होता कीं, तुम्ही म्हणाल तेव्हां आणि तेथें तुम्हांस नारद, श्रीदत्त आणि गोरख यांच्याप्रमाणें गुप्त आणि प्रकट होतां येईल, इतकें च नव्हे तर, प्रसंगीं जरूर तेवढें बळ तुम्हांस प्राप्त होईल, आवश्यक ती विद्या तुम्हांस स्फुरेल आणि तुम्ही ज्यावर कृपा कराल त्याचे हि मनोरथ पूर्ण होतील.

## ( ३ ) जागच्या जागीं अंतर्धान पावत

श्रीसमर्थ जागच्या जागीं अंतर्धान पावत, दुसरीकडे प्रकट होत आणि पुन्हां पूर्व स्थळीं च येत, अशा प्रकारच्या अनेक गोष्टी त्यांच्या चरित्रांत आढळतात.

चाफळास श्रीराममंदिराचें काम चालू असतां अशी च एक गोष्ट घडली.

मुसलगोसावी यांना एका ब्राह्मणानें भोजनाचें आमंत्रण दिलें होतें आणि ते त्याच्याकडे गेले होते. तो ब्राह्मण शाक्त होता, हें त्यांना ठाऊक नव्हतें. पाटावर बसले आणि पाहतात तों पानांत त्यांना विचित्र पदार्थ दिसले. संकट ओढवलें ! त्या शाक्ताचा दंडक असा होता कीं, कोणीं त्या मद्यादि पदार्थांचा अपमान केला, तर त्याचा प्राण घ्यावयाचा. मुसळगोसावी त्या ब्राह्मणासारख्या दोघा तिघांना भारी होते, पण असला अत्याचार करण्याची श्रीसमर्थांनीं त्यांना मनाई केली होती. त्यांनीं श्रीसमर्थांचा धांवा मांडला ! इकडचें हातचें काम टाकून श्रीसमर्थ तिकडे प्रकट झाले. त्यांनीं मुसळगोसावियास तर त्या संकटांतून सोडविलें च, पण त्या शाक्तास हि ताळ्यावर आणलें. पुन्हां अंतर्धान पावून जागच्या जागीं चाफळास प्रकट झाले. ( श्रीदासविश्रामधाम, ५८, ११० ते १२९ )

## ( ४ ) एका च वेळीं अनेक ठिकाणीं प्रकट होत

( १ ) श्रीसमर्थांनीं अकरा ठिकाणीं स्थापन केलेले मारुती प्रसिद्ध च आहेत. त्याशिवाय टांकळीचा मारुती आणि सारंगपुरचा मारुती हिशेबांत धरले, तर तेरा होतात. एका हनुमंतजयंतीला या तेरा हि गांवीं श्रीसमर्थ उपस्थित होते. नंतर त्या सर्व ठिकाणच्या मंडळींच्या गांठी पडून त्यांच्यांत वाद चाले. आपल्याकडे च श्रीसमर्थ आले असतां इतर कांहीं तरी च बोलत आहेत, असें मानून प्रत्येकानें इतरांना खोटे म्हणावें. श्रीशिवाजी-महाराजांनीं शोध आणविला, तर सर्व ठिकाणांहून बातमी आली कीं, आपल्या गांवीं त्या हनुमंतजयंतीला होते, हें सत्य आहे. महाराजांनीं मनाचा धडा करून श्रीसमर्थांना च विचारलें, तर

**रामदास म्हणती श्रीरघुनंदन ।**
**साह्य तरी चिंतिलें होतसे ॥**

—श्रीदासविश्रामधाम, ६४, ४६

( २ ) असा च दुसरा एक प्रसंग वर्णिलेला आढळतो. कार्तिक महिना होता. दिवाळीचा सण होता. एका च दिवशीं पांच सहा ठिकाणीं त्यांचें आगमन झालें होतें. आक्का, वेणू, बहिणाई, आतूबाई आणि गिरिबाई,

अशा त्यांच्या पांच कन्या प्रसिद्ध आहेत. प्रत्येकीच्या मनांत आलें, आज दिवाळीच्या निमित्तानें आपणांस कांहीं श्रीसद्गुरुरायाची सेवा घडावी. श्रीसमर्थांनीं त्यांचे मनोरथ पूर्ण केले. चाफळास आक्कांनीं आरती केली, कण्हेरीस आतूबाईनें नाहविलें, मिरजेस वेणूबाईकडे फराळ झाला आणि जेवण झालें शिउरास बहिणाईकडे. त्या जेवणांतली हि एक गोष्ट आहे. दोडक्याची भाजी केलेली होती, ती कडू झाली होती, पण श्रीसमर्थांनीं ती तशी च खाल्ली. खाल्ली असें पाहून, त्यांना आवडली असें वाटून बहिणाईनें आणखी आणून वाढली. ती हि खाल्ली. मागाहून बहिणाई जेवावयास बसल्या आणि खाऊन पहातात तों भाजी अति कडू लागली. अरे रे, त्यांना वाईट वाटलें, त्यांनीं विचारलें, "महाराज, कां हो खाल्लीत?" समर्थ म्हणाले, "देवाला नैवेद्य दाखविला होता, म्हणून!" असो. आणि गिरिबाईकडे विडा खाऊन विश्रांति घेण्याला पुन्हां चाफळास परत.

**दत्तात्रय जैसे फिरफिरोन। माहुरास येती करूं शयन।**
**किंवा करोन भूपर्यटण। नारद येतसे ब्रह्मभुवनीं॥**

—श्रीदासविश्रामधाम, ६९, ९८

तद्वत् श्रीसमर्थांचें चरित्र होतें. श्रीरामकृपा.

## (५) वरुणगांवीं एका च वेळीं अक्रा घरीं भोजनास गेले!

एकदां श्रीसमर्थ वरुणगांवीं गेले असतां गांवच्या लोकांत

**आतां आमंत्रणें सांगों आम्ही तुम्ही। प्रीतिभांडणें सकळांचीं॥**

—श्रीसमर्थप्रताप, १४, २९

अशीं भांडणें लागलीं. श्रीसमर्थांनीं अक्रा घरचीं आमंत्रणें स्वीकारलीं, पण एकाचें दुसऱ्यास कळूं दिलें नाहीं. अक्रा हि घरीं तयारी सुरू झाली व मागें, पुढें सर्वांचीं बोलावणीं आलीं. व्हा पुढें, मी आलों च, असें म्हणून सर्वांना वाटे लावून आपण स्वतः एका गरीब, भोळ्या भाविकाकडे गेले व तेथील आंबट ताकभात जेवीत बसले, तों

**इकडे घरोघरीं अक्रा ठाईं गेले। श्रीहनुमानस्वामी समर्थ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १४, ३२

ज्याला त्याला वाटलें श्रीसमर्थ आपल्या च घरीं आले!

## ( ६ ) मारुतीसारिखें उड्डाण हि करीत

याचे हि अनेक प्रसंग चरित्रांत वर्णिलेले आहेत. एक प्रसंग श्रीसमर्थ-प्रतापकार गिरिधर यांनीं सांगितला आहे. एकदां पन्हाळगडावर श्रीशिवराजे असतां श्रीसमर्थ तेथें गेले होते. त्यांना राजांनीं आग्रह करून आणखी एक दिवस जास्त ठेवून घेतलें होतें. त्या आग्रहाची भाषा हि आपणांस कौतुकावह च वाटेल. आणखी एक दिवस राहून आज हि रात्रीं कीर्तन व्हावें, अशी इच्छा राजांनीं दर्शविली. समर्थ म्हणाले, "रामाची आज्ञा नाहीं." त्यावर राजे म्हणाले, "मी तर राम आपणांस च समजतों, राम आणखी निराळे कोणते?" समर्थांनीं राहण्याचें मान्य केलें.

**निकें म्हणोनि सोमतीर्थीं केलें संध्यावंदन ।**
**पुढें अमात्यसदनीं जालें कथानुकीर्तन ।**
**कथासमाप्तीं समर्थें केलें उड्डाण ।**
**पर्वतावरूनि स्वानंदें ॥**

**शिवगणासी परम विस्मय जालें ।**
**हनुमानस्वामी प्रत्यया आले ।**
**अष्ट प्रधान समाधान पावले ।**
**लाधलें निधान जगदोद्धारा ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३, ५२–५३

या प्रसंगाचा उल्लेख मागील श्रीशिवसमर्थोल्लासांत आलेला च आहे.

## ( ७ ) सात दिवस वाळूंत पुरलेले समाधिस्थ होऊन जिवंत राहिले

ही कथा गिरिधर, मेरुस्वामी, महीपति, उद्धवसुत, आत्माराम इत्यादि बहुधा सर्व च चरित्रकारांनीं थोड्या फार फरकानें सांगितली आहे. ती कथा अशी:

आकाशांत उडणारे पक्षी आणि अरण्यांत संचार करणारे पशु हे हि समर्थांना वश असत, त्यांना हि समर्थांचा लळा लागे, मग गांवोगांवच्या मुलांना आणि तरुणांना समर्थांच्या संगतीची गोडी वाटावी, यांत काय नवल आहे? समर्थांना हि तरुण मुलें फार आवडत. त्यांनीं च एका श्लोकांत

याचें कारण हि सांगितलेलें आहे. मी तो श्लोक पूर्वीं हि उद्धृत केला असेल व पुढें हि अनेकदां करीत राहीन. कांहीं बिघडत नाहीं.

**वयें थोर ते चोर, भावार्थ नाहीं। विकल्पें बुडाले अहंभावडोहीं।**
**अहंता नसे हो तया लेंकुरांसीं। म्हणोनी बहू आवडी रामदासीं॥**

ते मुलांत खेळत. त्यांना मुलांचे सर्व खेळ येत. एकदां माहुलीस कृष्णेच्या वाळवंटांत मुलांच्या बरोबर विटीदांडूचा खेळ खेळत असतां समर्थांना कपाळावर जोरानें विटी लागली, खोक पडली, दुखूं लागलें, म्हणून प्राणाचा अवरोध करून समर्थ समाधिस्थ होऊन पडले. मुलांना वाटलें, त्यांचा प्राण गेला. मुलें फिकीरींत पडलीं. ठरविलें त्यांनीं कीं प्रेत वाळूंत पुरावें व शपथा घेतल्या कीं, गांवांत कोणीं हि कोणाला सांगूं नये. तथापि हा सारा प्रकार एका वाटसरूनें पाहिला होता.

राजे आणि शिष्य मंडळी शोधांत होती. त्यांना कुणकुण लागली. गांवकरी लोकांच्या हि कानांवर गोष्ट गेली. राजगुरु, तेव्हां गांवच्या लोकांना हि प्रश्न पडला, उघडकीस गोष्ट आली तर कसें होईल. सात दिवस गुजरले होते. कोणीं सुचविलें, प्रेत उकरून काढून जाळून टाकावें किंवा डोहांत मगरींच्या भक्ष्यस्थानीं द्यावें. त्याप्रमाणें गांवकरी उकरावयास गेले. भीत भीत, हळू हळू, वाळू उकरूं लागले, त्यासरसे

**किंकाळ्या आरोळ्या भुभुःकार देत।**
**उठोन पळाले योगिराज॥**

— श्रीदासविश्रामधाम, ३०, ७०

लोक संशयांत पडले, हें काय झालें, भूत संचरून प्रेत च पळालें कीं काय! सर्व जण क्लेशी झाले, समर्थांना करुणा आली आणि दुसऱ्या दिवशीं संगमावर स्नानार्थ येऊन त्यांनीं सर्वांचें समाधान केलें.

या चरित्राचा उल्लेख समर्थप्रतापकारांनीं हि केलेला आहे :

**समर्थासी महारुद्रें कौतुक दाविलें।**
**रुद्रसंख्या अर्भकीं वाळुवंटीं पुरिलें।**
**समर्थें योगधारण तेव्हां प्रगटिलें।**
**कृष्णापूर गेले आंगावरूनि॥**

मग अश्वारूढ ब्रह्मचारी ।
समाधी उच्चाटण करिती भारी ।
आनंद जाला कृष्णातीरीं ।
जयजयकारीं नभ पूर्ण ॥

शिवराजासी वृत्तांत कर्णोपकर्ण गेले ।
दर्शनासाठीं डोंगरोडोंगर लागले ।
समर्थदर्शन होय ना उदास जाले ।
राजकार्य कांहीं सुचेचिना ॥

— श्रीसमर्थप्रताप, ३, ६२–६४

## ( ८ ) अन्नसामुग्री वाटेल तेव्हां व वाटेल तेथें काढीत

असें गिरिधर सांगतात, त्यावर भरंवसा न ठेवावा तरी कसा ? वैशाख-मासाचा उष्णकाळ होता, ऐन दुपारीं एका गांवच्या बाहेर शिष्यांसह श्रीसमर्थांचा तळ पडला आणि शिष्य भिक्षेसाठीं गांवाकडे चालले. दुपारच्या प्रहरीं शिष्यांना उन्हाचा ताप होणार, असें पाहून श्रीसमर्थांचें हृदय कळवळलें. त्यांनीं शिष्यांना परत बोलाविलें, "नका रे जाऊं उन्हाचें, येथें च भिक्षा करूं":

समर्थ म्हणती माझीं लेकुरें भुकेलीं ।
निस्पृह उदास भिक्षेसी चालिलीं ।
करुणासिंधुनि वळोनि आणिलीं ।
या रे पर्वतीं च भिक्षा करा रे ॥

आणि मग

समर्थें पर्वतपाषाण उलथविले ।
सिद्ध सामे सिधे काढिले ।
भोजनपदार्थमात्र पर्वतें दिधले ।
सामर्थ्यकौतुक प्रभूचें ॥

— श्रीसमर्थप्रताप, १८, ६४–६५

पाट मांडून, रांगोळ्या काढून, पानें ठेवून, सर्व वाढणें होऊन, उदबत्त्या लावून, सर्व तयारी होऊन आयतें जाऊन पाटावर बसावयाचें ! अशा कथा महीपतिसुद्धां सर्व चरित्रकार सांगतात. सिद्धी अनुकूल असल्या पाहिजेत.

## ( ९ ) अभिनवाच्या कोटी

गिरिधराप्रमाणें च मेरुस्वामी हि लहानपणीं श्रीसमर्थांच्या सहवासांत होते. त्यांनीं आपल्या रामसोहळ्याच्या प्रथम रुद्राच्या नवमोल्लासांत चमत्काराच्या कांहीं गोष्टी एकत्र सांगितल्या आहेत. त्या अशा :

किती वेळा रुद्रचमत्कार । समर्थमहिमा अगोचर ।
जावळीपासीं वसलें पार । तेथें हि ऐसें चि केलें ॥ ७९

एकांतीं देवगृहा आंत । दृष्टीसी न पडतां भोजन करित ।
स्थिति न कळतां भाविक तेथें । वनिता वाढावयास गेली ॥ ८०

तवं तो प्रत्यक्ष कपिस्वरूपें । दोहीं हातें जेवितां तोषरूपें ।
जाला भयंकर तेणें सकंपें । सळोनि पडली ते ॥ ८१

अग्निस्वरूपी तपोरूप । सूर्य विख्यातीचा प्रताप ।
विज्ञानस्वरूपी आपेआप । सुखाब्धी चि आंगें ॥ ८२

सिद्धि तिष्ठत असती पुढें । परि पाहे चि ना तयाकडे ।
सगुणसाक्षात्कारें चि रोकडें । चालिलें सामर्थ्य ॥ ८३

लीला पळत असतां पुढें । पाणजंजाळ चहुंकडे ।
धांवे सरिसा चि पवाडे । सरितेवरूनि त्या ॥ ८४

असतां विशाळमंडपा आंत । पर्जन्य लागला अत्यद्भुत ।
मंडप कोसळला तेथें । तैसे चि राहिले ॥ ८५

कितीयेक दिवसांनीं । आले समर्थांचे शुद्धीलागूनि ।
चिरे काढितां तत्क्षणीं । उठोनि पळाले ॥ ८६

महापुरांत उडी टाकिली । काया तेथें बुडोनि गेली ।
कितीयेक दिवस राहिली । वाळुमध्यें ॥ ८७

जळ वोहटलियावरी । शोधितां नदीपात्रांतरीं ।
वाळु काढितां चि वज्रशरीरी । निघोनि चालिले ॥ ८८

लीला नदीतीरीं कौतूहल । धनुर्धरदीक्षेनें तात्काळ ।
चिमणी विंधुनी पडितां चि तळमळ । करूनि प्राण सोडिला ॥ ८९

हांसों लागले द्विज सकळ । म्हणती हा संतमहिमा केवळ ।
महादयेचें हृदय सीतळ । प्रत्यक्ष पाहा ॥ ९०

**तो मृत पक्षी घेऊनि हातीं । म्हणती काय जालीस जगज्जोती ।**
**करें कुर्वाळितां सप्रतीती । पक्षी उडोनि गेला ॥ ९१**

**तेव्हां आश्चर्य वाटलें तया । सद्भावें लागती समर्थांच्या पायां ।**
**म्हणती अविश्वासी आम्ही सदया । समर्था नुपेक्षी ॥ ९२**

**ऐशा अभिनवाच्या कोटी । विस्तारल्या सर्व सृष्टीं ।**
**तें समर्थचरित्र श्रवणपुटीं । घ्यावें अत्यादरें ॥ ९३**

अशा अद्भुत चमत्काराच्या गोष्टी श्रीसमर्थांच्या हातून अनेक घडल्या. हें जें त्यांच्या ठिकाणीं सामर्थ्य होतें, त्याचें कारण नुसत्या सिद्धींची अनुकूलता नसून सगुणसाक्षात्कार म्हणजे प्रत्यक्ष प्रभु श्रीरामचंद्र आणि त्यांचे सेवक हनुमंत यांची कृपा होय, असें वरील ८३ व्या ओवींत मेरुस्वामी सुचवीत आहेत.

## ( १० ) करंजगांवीं गांवजेवण

एकदां श्रीसमर्थ करंजगांवीं गेले असतां त्यांनीं सर्व गांवकऱ्यांना तुम्ही आज मजकडे भोजनास या, म्हणून आमंत्रणें दिलीं आणि आपण गेले निघून अरण्यांत. तिसऱ्या प्रहरीं परत आले. गांवकरी भोजनासाठीं जमूं लागले. अकराशें पात्र झालें.

**लाहान थोर दुबळीं पाबळीं । गांवजेवण सकळ सकळीं ।**
**अन्नें पुरवलीं आळमाळीं । केली चहूपाळी पंचामृतें ॥**

**कामधेनु भिक्षाभोजन । तृप्त जाले संतसज्जन ।**
**जिकडे तिकडे तृप्त संपूर्ण । सद्गुरुसमर्थपंगाति ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १४, १५–१६

एकंदर समारंभ आटोपतो तों तिन्हीसांजा व्हावयाची वेळ आली. आज रात्रीं येथें कथाकीर्तन व्हावयाचें, सर्व जण या, असें सांगून पुन्हां अरण्यांत निघून गेले. मग मध्यरात्रीं कथेच्या जागीं नेमके प्रकट झाले. अशा तऱ्हेनें एक मास श्रीसमर्थांनीं करंजगांवीं क्रमिला. ही हकिकत वेणाबाईनीं गिरिधरांना सांगितली, ती गिरिधरांनीं प्रतापांत लिहिली.

अशा तऱ्हेचीं भोजनें माहुली, शहापुर इत्यादि अनेक ठिकाणीं झाल्याचा दाखला सांपडतो. या दंतकथा नव्हत, घडलेल्या गोष्टी आहेत.

## ( ११ ) इच्छेचा दाता भगवान

एकदां श्रीसमर्थ अरण्यांत बसले असतां कांहीं मंडळी त्यांच्या दर्शनास आली होती. तेव्हां बोलण्याच्या ओघांत श्रीसमर्थ सहज म्हणाले, "इच्छेचा दाता भगवान." तेव्हां मंडळींतील एक जण मूर्खपणानें म्हणाला, "इच्छेचा दाता भगवान असेल, तर मला आतां घृतकेळ्यांची इच्छा झाली आहे, तर देईल भगवान घृतकेळीं?" आश्चर्य असें, पाव घडी लोटली नाहीं, तों कोल्हापुरप्रांतींचीं घृतकेळीं घेऊन एक जण श्रीसमर्थदर्शनास आला! श्रीसमर्थांनीं तीं केळीं त्यास दिलीं आणि म्हणाले, "मूर्खा, काय सेवा केली होतीस, तर देवाला हे कष्ट दिलेस!" (श्रीसमर्थप्रताप, ७, ८)

## ( १२ ) शाक्तांनीं मारलेलीं हरिणें

त्या काळीं श्रीरामजन्माच्या उत्सवासाठीं चाफळास गांवोगांवचे लोक येत व ठिकठिकाणीं त्यांचे तळ पडत. भोजनाला उशीर होई, म्हणून मठांतून सर्वांना सकाळीं फराळाचें सामान जाई. एका उत्सवाला कांहीं शाक्त आले होते. फराळाचें सामान येण्याला थोडा उशीर झाला, तेव्हां तें येतें कां नाहीं, असें वाटून त्यांनीं दोन हरिणें मारलीं आणि नंतर त्यांना कांहीं शिजवावयाचें असेल. रंगनाथस्वामींना हें समजतां च ते त्या शाक्तांकडे गेले आणि म्हणाले, "हें तुम्हीं काय केलें? हरिणें कां मारलीं?" शाक्त म्हणाले, "फराळाचें आलें नाहीं, मग काय करणार?" स्वामी म्हणाले, "तुम्ही श्रीसमर्थांना कोण समजतां, हें तुम्हीं बरें केलें नाहीं." इतक्यांत मठांतून फराळाचें हि आलें व निरोप आला कीं मारलेलीं हरिणें पाठवा. शाक्त फिकीरींत पडले. रंगनाथस्वामी म्हणाले, "समर्थांचा शब्द मानला पाहिजे." मृत हरिणें पाठविलीं गेलीं आणि तीं जिवंत होऊन बागडत परत आलीं. (श्रीदासविश्रामधाम, ६३, ३१–४१)

## ( १३ ) मृत ब्राह्मणास प्राणदान

एकदा चाफळास एक दुखणाईत ब्राह्मण पत्नीसह उत्सवास आला होता. तो दशमीच्या रात्रीं दोन घटका रात्र झाली असतां मरण पावला. उत्सवाला विप्रसमुदाय जमला होता च. त्यांनीं समर्थांचें सत्त्व पहावें म्हणून,

आपल्या स्वाभाविक मनोवृत्तीला अनुसरून, एक कपटरचना केली. त्यांनीं बाईला सल्ला दिला, "पारपत्याधिकाऱ्याकडे जा आणि सांग, आपला पति उपाशी आहे, रुसून निजला आहे, कोणाचें च ऐकत नाहीं, पण, न जाणों, समर्थ च त्यास बोलावणें धाडतील, तर कदाचित् ऐकेल हि." अधिकाऱ्यानें समर्थांना कळविलें. समर्थ म्हणाले, "अरेरे, असें झालें कां ? मठांत प्रसाद आहे, त्या ब्राह्मणास बोलावून आणवा व जेवूं घाला." शिष्य बोलवावयास गेले,

**दुरोन म्हणती हे ब्राह्मणदेवता ।**
**भोजनासी बाहिलें समर्थदाता ।**
**अनुमान कांहीं न धरितां आतां ।**
**उशीर न लावितां चलावें ॥**

**दासाभिमानी श्रीरघुनंदन ।**
**देवाधिदेवाचें अघटित करणें ।**
**खडबडोनिया उठिला ब्राह्मण ।**
**कराया भोजन चालिला ॥**

**दुखण ना बाहण चालिला निर्भय ।**
**भार्यासह कृत्रिमा वाटलें आश्चर्य ।**

—श्रीदासविश्रामधाम, १०४, ८२–८४

कां वाटणार नाहीं ! श्रीसमर्थांच्या भक्तितपाचें हें फळ होय. राम त्यांचे ऋणी झाले होते. त्यांचा शब्द रामाला खरा करावा लागे.

सांगावयास च नको, उभयतां पतिपत्नी श्रीसमर्थांचे उपदेशी झाले.

याप्रमाणें, कोणी मृत झालेले श्रीसमर्थकृपेनें जिवंत झाले, कोणाचें कपाळीं लिहिलेलें मरण टळलें, अशा गोष्टी, त्यांच्या चरित्रांत अनेक घडलेल्या आहेत.

## ( १४ ) समर्थांच्या अंगावर कडा कोसळला

शहापुरनजीकच्या डोंगरांत गुहा करण्याचें मनांत आणून जयरामांना बरोबर घेऊन श्रीसमर्थ तिकडे गेले. खोदण्यासाठीं कुदळखोरें वगैरे सामान घेतलें. खोदण्याचें काम सुरू केलें. जयराम शरीरानें स्थूल होते.

ते तेव्हांच दमत. समर्थ त्यांस खिजवीत. समर्थ स्वतः खोदीत असतां त्यांच्या अंगावर कडा कोसळला व ते त्या खालीं सांपडले. जयरामांचा कांहीं च प्रयत्न चालेना. बेशुद्ध होऊन पडे तों त्यांनीं विलाप केला, प्राण देण्यास जयराम सिद्ध झाले, तों आकाशवाणी झाली, " अरे, समर्थ शहापुरास मारुतीच्या देवालयांत सुरक्षित असतां प्राण कां देतोस ?" जयराम तत्काळ तिकडे धांवत गेले. पाहिले, भेटले, आनंदले, आश्चर्य करीत राहिले.

## ( १५ ) सौदागर

पिशाचवृत्ति धारण केली होती. एकदां पिशाचवृत्तीनें रानावनांत, वस्तींत हिंडत असतां, सपाटून वादळ सुटलें, जोराचा पाऊस आला, हे भिजले, काकडूं लागले, धर्मशाळेसारखा एक आश्रम होता, त्यांत शिरले. रात्रीची वेळ होती. त्या आश्रमांत एक सौदागर उतरला होता व त्याचा पसारा सर्वत्र पडला होता. हा पिसाट आलेला पाहून सौदागरानें त्याला ढकलून दिलें तों, तेथें एक नाल पडली होती, तिला यांचा पाय लागून तिचें सोनें झालें होतें. तशा च पावसांत हे गेले अरण्यांत व एका झाडाखालीं आश्रयार्थ राहून रात्र काढली. उजाडल्यावर सौदागर उठून पाहतो, तों तेथें पडलेल्या नालेच्या तुकड्याचें सोनें झालेलें त्याच्या नजरेस पडलें. सौदागर विरमला ! तो पिसाट नव्हे, ईश्वरी पुरुष असला पाहिजे ! त्याच्या शोधार्थ सौदागर निघाला, भेटला, क्षमा मागता झाला, त्यावर पिसाटाची कृपा झाली.

पुढें या च सौदागराचें मालानें भरलेलें जहाज समुद्रांत बुडत असतां त्यानें समर्थांचा धांवा केला, तेव्हां समर्थांनीं जाऊन तें जहाज कडेला सुरक्षित लावलें. ( श्रीदासविश्रामधाम, १९, २३–४१ )

## ( १६ ) जन्मवांझ गायीनें दूध दिलें

त्या च पिशाचवृत्तीनें हिंडत असतां दोन दोन चार चार दिवस उपवास पडत. त्यांत एकदां एका गांवीं एका बाईनें नुसतें लाह्यांचें पीठ दिलें, पण कालवावयाला दूध किंवा ताक कांहीं मिळालें नव्हतें. पीठ घेऊन दुसऱ्या गांवीं गेले, तों रात्र झाली. कोठें जावें आणि कोणाकडे मागावें, असा

प्रश्न पडला. एका घरीं गेले, तों तेथें सर्व बाया च होत्या. रात्रभर उतरूं देता कां, म्हणून त्यांना विचारलें. बायांना प्रश्न पडला. नाना तर्क निघाले. पण शेवटीं त्यांना दया येऊन त्यांनीं यांना उतरूं दिलें. दाराशीं गाय पाहून यांनीं त्यांच्या पाशीं दूध मागितलें. " दूध नाहीं, गाय आहे पण ती वांझ आहे, " असें बायांनीं सांगितलें. "हरकत नाहीं, तरी गाय दूध देईल," असें हे म्हणाले. खरा च पिसाट आहे, असें बायांना वाटून त्या म्हणाल्या, " जा, काढा दूध आणि घ्या. " हे गोठ्यांत गेले, गायीवरून हात फिरविला, " आई दूध दे गे " म्हणाले आणि ध्यानांत मग्न होऊन दूध काढावयास बसले.

**गोवरी फिरवितां स्वपद्महस्त ।**
**वांज चि जाली सुरभिवत ।**
**स्तना दासांनीं लावितां हात ।**
**धारा वाजल्या पात्रांतरीं ॥**

—दासविश्रामधाम, १९, ७४

धारांचा आवाज ऐकून, हा बावळा गोठ्यांत काय करीत आहे, तें पहावयास बाया गेल्या. त्यांच्या नजरेस काय पडलें ? आंगणांत जिकडे तिकडे दुधाचे ओघळ चालले होते आणि समर्थ

**स्तब्ध चि असती थिरोनि हात ।**
**स्वभावें गोस्तनीं पय असे स्रवत ।**
**पात्र भरोनि आंगणीं वाहत ।**
**विंदान जैसें विदुरघरीं ॥**

—दासविश्रामधाम, १९, ७८

## ( १७ ) कल्याणांचें उच्छिष्ट–खलबत्ता

एकदां कीर्तनांत श्रीसमर्थ म्हणाले, "आम्ही रांधतों तें कल्याण खातो आणि आम्हांस उच्छिष्ट देतो, तेव्हां कोठें कीर्तनाला रंग चढतो."

मूर्खांनीं या म्हणण्याचा केवळ शब्दार्थ घेतला आणि समर्थ कल्याणांचें उष्टें खातात, अशी ते निंदा करूं लागले ! शिष्याचें उष्टें खाणारा बुवा, अशी निंदा होऊं लागली ! निंदेला काय, ती लवकर पसरते, सर्वतोमुखीं होते आणि आवरावयाला कठीण जाते.

पण, समर्थांच्या म्हणण्याचा भावार्थ असा: आम्ही कविता करतों, ती कल्याण मुखोद्गत करतो आणि मग आम्हांस वेळेवर सुचवितो. त्यायोगें आम्हांस आनंद होतो आणि कीर्तनांत रंग माजतो (दासविश्रामधाम, ३७, ३७–४३)

या च उच्छिष्टाच्या अनुरोधानें खलबत्त्याची गोष्ट कल्याणस्वामीसंबंधानें म्हणून दासविश्रामधामांत सांगितली आहे. पण इतर चरित्रग्रन्थांत ती भोळारामांसंबंधानें सांगण्यांत आलेली आहे. भोळाराम विडा खलबत्त्यांत न कुटतां स्वतः चावून वारीक करून समर्थांना देतात, अशी चुगली कोणीं शिवाजीराजांस सांगितली, ती त्यांनीं समर्थांच्या कानांवर घातली. तेव्हां समर्थांनीं राजे यांना म्हटलें कीं, "भोळारामांकडे जाऊन खलबत्त्यासह विडा मागितला आहे, असें सांगून खलबत्ता च घेऊन या." राजांनीं जाऊन भोळारामांजवळ खलबत्ता मागितला. "देऊं च कां खलबत्ता?" असें म्हणून भोळारामांनीं सुरीनें स्वतःची मान कापून ती राजांच्या हातांत दिली! राजे चकित झाले! तो खलबत्ता घेऊन राजे समर्थांकडे गेले. समर्थ म्हणाले, "सांगा राजे, या खलबत्त्यांत कुटलेला विडा खावा कां खाऊं नये! जा, नेऊन ठेवा खलबत्ता जेथच्या तेथें." राजांनीं त्याप्रमाणें नेऊन ठेवला, पण हात हालला आणि खलबत्ता किंचित् वाकडा ठेवला गेला! तेव्हांपासून भोळारामांची मान किंचित् वाकडी झाली.

गोष्टीचें तात्पर्य इतकें च कीं, गुरुसेवेपुढें प्राणाची हि पर्वा नसावी.

## (१८) मलयगंधर्वाचे तीन जन्म

### घोडा, रेडा, अंत्यज

श्रीसमर्थांचा एक निस्पृह शिष्य फिरत फिरत व क्षेत्रें पहात पहात काशीस गेला व तेथें च वास्तव्य करून राहिला. त्याचा नित्य क्रम म्हणजे मनकर्णिकेवर जाऊन स्नान करावें, हुर्मुजी छाटी परिधान करावी, घाटावर बसून ग्रन्थराज दासबोधाचें पारायण करावें, कोरडी भिक्षा मागून आणावी, पानगे भाजावे, देवाला नैवेद्य दाखवावा, तो प्रसाद म्हणून ग्रहण करावा आणि नामस्मरणांत अखंड रत होऊन असावें.

एके दिवशीं याप्रमाणें घाटावर त्याचा कार्यक्रम चालू असतां काशींतील एका पंडिताची त्याचेकडे नजर गेली. हें वस्त्र कसलें, ग्रन्थ कोणता आहे, त्यांत काय आहे, तुझा गुरु कोण, तो कोठें असतो, इत्यादि प्रश्न पंडितानें त्या शिष्यास केले. श्रमतमहारक असें हें वरदी वस्त्र आहे, तें माझ्या गुरूनें मला दिलें आहे, हा ग्रन्थ त्यांनीं च केलेला आहे

**भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें ।**
**समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥**

ग्रन्थ आहे आणि

**गुरु समर्थ माझा दासमहाराज ।**
**कृष्णातटाकीं भक्तिमोक्षध्वज ।**
**लाऊन सज्मेळीं नांदती ॥**
**जग ताराया जालेति सगुण ।**
**कैचें गुरूला नामस्थानमान ।**
**ज्याचेनि दर्शनें भाषणें स्मरणें ।**
**बहु जन पावन होताती ॥**

—श्रीदासविश्रामधाम, ७५, ३४–३५

हें सारें ऐकून पंडिताला कोप चढला, "ठाऊक आहे," म्हणाला, "तुझा गुरु, त्या देशाचा अडाणी राजा त्याला भाळला आहे आणि त्यानें त्या देशांत मोठें सोंग मचविलें आहे. आणि ग्रंथ दे पाहूं, त्यांत काय आहे पाहूं दे." ग्रंथ हातीं घेतला तर, "हें प्राकृत कवन आहे आणि त्यांत हें चौदा ब्रह्मांचें व्याख्यान कोठून काढलें, हीं चौदा ब्रह्में कोठून आणलीं, त्यांना कांहीं श्रुतीचा आधार !" असें म्हणून पंडितानें तिरस्कारानें ग्रन्थ शिष्याच्या अंगावर टाकला आणि म्हणाला, "फेकून दे तुझें तें वस्त्र आणि तुझा हा कपोलकल्पित प्राकृत ग्रन्थ !"

पंडितानें मनाशीं विचार केला, वाद करीत करीत आणि जयपत्र घेत घेत आपण जावें त्या देशापर्यंत, याच्या गुरूला वादांत जिंकावें, राजाचें मन वळवावें आणि विपुल धन मिळवावें. विचार केला आणि दिवसा मशाली लावून पंडित निघाला आणि मार्गांत जयपत्र घेत घेत चालला.

इकडे या च वेळीं, पंढरींत हा च वाद निघाला. हरबा नांवाचा एक समर्थशिष्य वाळवंटींत दासबोध वाचीत बसला होता. त्यास हि पंढरीच्या

पंडितांनीं हटकलें आणि कोठलीं आणलीं आहेत हीं चतुर्दश ब्रह्में म्हणून त्या शिष्याची निर्भर्त्सना चालविली.

हें जाणून श्रीसमर्थ पंढरीस जावयास निघाले. इकडे काशीचा पंडित चाफळास येऊन पोंचला. श्रीसमर्थ तेथें नाहींत, असें समजलें, तेव्हां "आपणांस भिऊन पळाले," असें म्हणाला. राजाकडे गेला, गागास भेटला, आपल्या येण्याचा हेतु कळविला. गागास साहजिक च मोठा आनंद झाला. "आपणांस दुसऱ्या कोणाशीं वाद करावयाचा नाहीं, चौदा ब्रह्मांचें निरूपण करणाराशीं च फक्त वाद करावयाचा आहे," असें पंडित म्हणाला. मनाची पूर्ण खात्री होती, तरी राजे किंचित् सचिंत झाले. गागाला आनंद वाटावा, हें जसें साहजिक, तसें च राजांना चिंता वाटावी, हें हि साहजिक च होतें.

समर्थ पंढरीस गेले होते. काशीच्या पंडिताला आणि गागाला बरोबर घेऊन निवडक सैन्यासह राजे हि पंढरीस जावयास निघाले. पोंचले सर्व पंढरीस. पंढरीचे पंडित हि उत्सुक होते च. या वादाची वार्ता चहुंकडे पसरली होती. त्यामुळें चहुंकडचे अनुकूल प्रतिकूल वृत्तीचे अनेक लोक पंढरीस गोळा झाले होते. समर्थांनीं राजास आज्ञा केली, "सर्वांचा मान राखा, सर्वांचा संतोष ठेवा, कोणास कांहीं कमी पडूं देऊं नका."

दुपारचीं सर्वांचीं भोजनें झालीं, कांहीं वेळ विश्रांति घेऊन श्रीसमर्थ सभेंत येऊन बसले आणि पंडितादि सर्वांना सांगून पाठविलें कीं, थोडा वेळ मंडळींनीं यावें, दासबोध श्रवण करूं. काशीकर पंडित व पंढरीचे पंडित, आपले गागा पंडित तोऱ्यातोऱ्यानें येऊन बसले. इतर हि विद्यावान् मंडळी बहुत जमली. समर्थांनीं वेणाबाईस वाचण्याची आज्ञा केली. तिनें समर्थचरणीं मस्तक ठेवून ग्रन्थ सोडला आणि कोणता समास काढूं म्हणून विचारलें. आधीं च ग्रन्थ प्राकृत, त्यांत तो एक स्त्री वाचणार आणि आम्ही ऐकणार! नशीब आमचें! असें पंडितांना वाटलें. तथापि, ठीक, "बाई, ज्यांत चौदा ब्रह्मांचा अन्वय आला आहे, तो समास वाच," असें म्हणाले. सातव्या दशकाचा तिसरा समास वाचण्याची समर्थांनीं आज्ञा केली. पंडितांनीं एक च गिल्ला केला कीं, "याला कोठल्या श्रुतिस्मृतींचा

आधार आहे तो आधीं सांगा आणि मग वाचा." समर्थ म्हणाले, "एका सद्गुरुकृपेवांचून आम्ही दुसरें कांहीं च जाणत नाहीं,

**पाहिलें नसतां संस्कृतीं। रीग नाहीं मऱ्हाष्ट ग्रन्थीं।**
**हृदयीं वसल्या कृपामूर्ती। सद्गुरुस्वामी॥**
**आतां नलगे संस्कृत। अथवा ग्रंथ प्राकृत।**
**माझा स्वामी कृपेसहित। हृदयीं वसे॥**

— श्रीदासबोध, ५, ६, ३३–३४

तो याला आधार!" पंडित म्हणतात, "रघुनाथजीचें वरदान घेतलें म्हणतां, तर सर्वज्ञत्व आंगीं बाणलेलें असावें, कांहीं सिद्धि अनुकूल असाव्या." "राम काय करील तें खरें," असें म्हणून समर्थांनीं कल्याणास आज्ञा केली, "तो तिकडे डोक्यावर मोळी घेऊन एक जण चालला आहे, त्याला बोलाव इकडे." अंत्यज आला, सर्वांना नवल वाटलें, समर्थांनीं हें काय विंदान मांडलें, न कळे. समर्थांनीं त्यास विचारलें, "कोण रे तूं?" "मी संभ्या महार, मूळचा कऱ्हाडचा, आईबाप कोणी नाहींत, पोट भरण्यासाठीं पंढरीस आलों आहें." "एक रेघ ओढून त्याला रेघेच्या अलीकडे बोलाव," असें समर्थ कल्याणास म्हणाले. कल्याणानें रेघ ओढली, तो अलीकडे आला. "आतां कोण रे तूं?" विचारतांच, "मी शूद्र आहें" म्हणाला. आणखी अलीकडे रेघ ओढली आणि तो त्या रेघेच्या आंत येऊन म्हणाला, "मी क्षत्रिय आहें." आणखी रेघ ओढली, तिच्या आंत येऊन "आपण ब्राह्मण आहोंत," म्हणाला. "ब्राह्मण आहेस, तर सांग चौदा ब्रह्मांचें निरूपण." तें त्यानें तंतोतंत ग्रन्थराज दासबोधांतल्याप्रमाणें केलें. आणखी रेघ ओढून त्यास अलीकडे येण्यास सांगितलें. तो आला आणि "आतां तूं कोण आहेस?" असें त्यास विचारतां च "मी गंधर्व आहें," म्हणाला. "तुझी काय हकिकत आहे, ती सांग," अशी त्यास समर्थांनीं आज्ञा केली.

तो म्हणाला, "माझें नांव मलयगंधर्व, सदा विलास भोगणें, हा माझा छंद. एकदां मी धुंद होऊन स्त्रियांसहित सरोवरांत नाना प्रकारें जलक्रीडा करीत असतां नारद आले, त्यांनीं मला पाहिलें, मीं त्यांना पाहिलें, पण मी

माझ्या धुंदींत च क्रीडेंत दंग होऊन राहिलों. लज्जित तर झालों नाहीं च, पण घोड्याप्रमाणें खिदळत राहिलों, एकाद्या मस्त रेड्याप्रमाणें घुरकोन त्यांच्याकडे पहात च राहिलों आणि अंत्यजाप्रमाणें शुद्धीवर न येतां कामविलासांत गर्क होऊन राहिलों! मुनिवर्य कोपले आणि त्यांनीं मला शाप दिला कीं, तुला घोडा, रेडा आणि महार, असे तीन जन्म प्राप्त होतील. शाप ऐकून मी किंचित् शुद्धीवर येऊन मुनींपुढें आडवा पडलों आणि सुचलें तसें बोललों कीं, मुनिवर्य, आपलें दर्शन घडलें म्हणजे प्राणी मुक्त होतात, मग माझी अशी गति कां? तेव्हां दया येऊन मुनि म्हणाले, शेवटच्या जन्मीं तुला रामदास भेटतील, ते तुला परमार्थ सांगतील आणि जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडवितील. महाराज, तें सारें प्रत्ययास आलें. दोन जन्म घेऊन या तिसऱ्या जन्मीं आपलें दर्शन घडलें."

"पूर्वींचे दोन जन्म कोठें घेतले होतेस?"

"पहिला घोड्याचा जन्म, अंबा जोगाईच्या जयत्पाळ राजाच्या पदरीं झाला होता. त्यांतून महायोगी मुकुंदराज यांनीं मुक्त केलें. दुसरा जन्म रेड्याचा, पैठणास आला होता. त्यांतून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं सोडविलें. प्रस्तुतचा माझा तिसरा जन्म होय. या जन्मीं आपल्या चरणांचें दर्शन झालें. नारदांनीं दिलेला शाप, शाप नव्हता, वर होता, असें मी आतां मानतों. नाहीं तर आपलें दर्शन कोठून घडतें? आपल्या नुसत्या पाहण्यानें माझा देह पालटून मी सर्वज्ञ झालों, त्या आपला महिमा काय सांगावा!"

**असतां येकांतीं तुम्ही च मारुती।**
**अवतारा आणिलें भाळोन रघुपती।**
**बाळपणीं जाल्या बहु करामती।**
**आराधितां भीम तुष्टला कीं॥ ९**

**पलायन केलें टाकूनि लग्न।**
**दउळीं जाली देवी प्रसन्न।**
**आकांतीं पावला पवननंदन।**
**श्रीरघुनंदन तुष्टला॥ १०**

**अकरा अब्दवरी रामगुहांत।**
**राहोन गेला कीं यात्रा करित।**

हिमनगाजवळी श्रमला बहुत ।
पडिला मूर्छित हिम लागुनी ॥ ११

स्मरतां संरक्षूं पावला वनारि ।
आंग झांकिलें कीं हुर्मुजी वस्त्रीं ।
ब्रह्मांड सर्व हि दाऊनि नेत्रीं ।
कृष्णातटीं राहावया धाडिलें ॥ १२

तंव स्वामीराज म्हणती भला गा सुमती ।
भगवी हुर्मुजी वस्त्रा निंदिती ।
कोठूनि कैसेनि जाली प्राप्ति ।
विदित असेल तरी सांग ॥ १३

जी देवा दयाळा ब्रह्मयानीं ।
वोपिलें कृपेनें वशिष्ठालागुनी ।
काववस्त्राची नव्हे हे बानी ।
संन्यासी होऊनि भूषावें ॥ १४

गृहस्था योग्य हें पूजित वस्त्र ।
परमार्थदाय दुःखशोकहर ।
वनासी निघाला जंव भूजावर ।
निभाया गुरूनें वोपिलें ॥ १५

सिंहासनीं बैसतेवेळीं ।
प्रसादवस्त्र हें श्रीवनमाळीं ।
मारुतीस वोपिलें तो तुम्हास बळी ।
वरदानयुक्त वोपिलें कीं ॥ १६

नूतन वस्त्र हें मनमान्यनिर्मित ।
म्हणतील मतस्थी विप्रादि पंडित ।
आणि म्हणतील दावावें वचन संमत ।
लीळा अघटित न जाणती ते ॥ १७

छत्तीसथिगली कंथाधारी ।
पुढती भेटला कीं दत्त कांतारीं ।
तें च वसन झोळी वोपिलें करीं ।
सिद्धानीं कुबडी दिधली कीं ॥ १८

नारदें दिधली पादुकाआज्ञा ।
व्यासदेव वदले तारावें जना ।
वर दे गोरक्षु समभावना ।
सर्वा भूतीं उपजेल ॥ १९

ज्ञानेश्वर भेटला प्रत्यक्ष तुम्हांतें ।
आतिथ्य करविलें श्री येकनाथें ।
विशाळ करावें म्हणतिला ग्रंथ ।
श्रीमुकुंदराजें सन्मानुनी ॥ २०

दासोपंत भला विद्यावंत ।
आपण केला जो दाविला ग्रंथ ।
जोगाईनें नेऊनि तुम्हांतें ।
दर्शन मातेचें करविलें ॥ २१

पूर्व पश्चिम उत्तर दक्षिण ।
यात्रा सर्व हि संपादून ।
येतां बहु जालें नवलविंदाण ।
विस्तार न वानवे समर्था ॥ २२

केलें बहुतांनीं बहुत आदरें ।
भजन करित असतां अहोरात्र ।
कृष्णातटाकीं धाडितां इंद्रें ।
गर्व मोहिनीचा हरिला कीं ॥ २३

हा पंढरीश जाला अयोध्यानाथ ।
प्रल्हादवरदा उपजली प्रीत ।
विंदाण दाविलें म्हाळसाकांतें ।
भाळले गणनाथ भैरव ॥ २४

पवनपुत्राची प्रीति उत्कट ।
तेणें केली कीं स्थापना मठ ।
श्रीरामस्थापनेचें नवल मोठें ।
संतसाधूसी मानविलें ॥ २५

बहुतां तारिलें भक्तीस्तव ।
वर वोपितां जिवंत जालें शव ।

मुख्य तुम्हांसी प्रसन्न राघव ।
उपासना वाढली चहुंकडे ॥ २६

विवरीं होता तो राक्षस तरला ।
गवी वोपुनी तो व्याघ्र गेला ।
देखतील ऐकतील अगाध लीळा ।
गातील भक्तांनीं सविस्तर ॥ २७

प्रकट गुप्त ते अगाध चर्या ।
अशक्य सर्व हि वानावया ।
वंदन घडतां चि तुमचे पाया ।
जगदंबिका होय प्रसन्न ॥ २८

प्रत्यक्ष होताती नाना चरित्रें ।
जगदोन्मुखी गायकी पवित्र ।
होतील पुण्यात्मे श्रवणमात्रें ।
गुप्त होतां हि असाल ॥ २९

वरद्ग्रंथश्रवण घडे जया ।
सारब्रह्म खूण कळे तया ।
आज्ञा काय आतां श्रीगुरुराया ।
कराया पुढारीं वर्तणूक ॥ ३०

— श्रीदासविश्रामधाम ७८, ९–३०

अशी गंधर्वानें आज्ञा विचारतां च श्रीसमर्थ म्हणाले, " तूं आतां आपल्या निजधामीं जाऊन सुखानें रहा. " अशी समर्थांची आज्ञा होतां च गंधर्वासाठीं विमान आलें, तें सर्वांनीं पाहून जयजयकार केला. समर्थांना नमस्कार करून गंधर्व विमानांत बसला आणि विमान गेलें. सर्व जण आश्चर्य करीत राहिले, पंडितांचा गर्व गळाला, त्यांचा अहंकार ढांसळला आणि त्यांच्या सकट सर्वांनीं समर्थांना दंडवत् नमस्कार घातले.

गंधर्वानें चौदा ब्रह्मांचें निरूपण केलें खरें, पण आधार सांगितला नव्हता. तो प्रश्न शिल्लक च राहिला होता. तेव्हां स्वतः समर्थ गागा पंडितास म्हणाले, " आपण वेदशास्त्रज्ञ आहांत, तेव्हां आपल्या आढळांत

शब्दौमित्येकाक्षरं च खंमयं सर्वतोमुखम् ।
चैतन्यं च सत्ता एव साक्षं सगुणमेव च ॥ १

**निर्गुणं च वाचकं च अनुभवं च रुद्रकम् ।**
**आनंदं च तदाकारं अनिर्वाच्यं चतुर्दश ॥ २**

हे श्लोक आलेले असतील च." असें म्हणून ते श्लोक ज्या ग्रन्थांत होते, तो ग्रंथ समर्थांनीं गागांच्या हातांत दिला आणि सांगितलें कीं, "साक्षात्कारी पुरुष जें कवन करितात, त्यानें श्रुतीला सार्थकता येते, कारण त्या कवनांत सत्पुरुषांचा प्रत्ययअनुभव असतो. त्याला आधार धुंडावयास कशास पाहिजे ?"

**जया अंतरीं भगवंत । अचल राहिला निवांत ।**
**तो स्वभावें जें बोलत । तें ब्रह्मनिरूपण ॥**

— श्रीदासबोध

काशीकर पंडिताला पूर्ण पश्चात्ताप झाला. तो म्हणाला, "मी दिवसा मशाल पेटवून जाऊं लागलों, तेव्हां लोक माझी निंदा करीत कीं, हा दिवांध झाला. मजसारख्या दिवाभीताचें दर्शन सर्वजण अशुभ मानूं लागले, कोणी हि सत्पुरुष मजजवळ येईना व स्वानुभव सांगेना. आत्मज्ञानाविषयीं मी खरा अंध होतों, माझे आतां डोळे उघडले आणि आपल्या चरणांचें दर्शन घडलें, आतां समर्थांनीं मजवर कृपा केली पाहिजे." तेव्हां समर्थांनीं

**वोपूनि हुर्मुजी प्रसादवसनें ।**
**मोक्षपुरा जावें म्हणतिलें त्वरेनें ।**
**त्या भोळ्या शिष्याचें समाधान ।**
**करूनि द्यावें पां तें वस्त्र ॥**

**दासबोधाचा क्रमयुक्त अर्थ ।**
**इच्छितां वोपिला वर त्या समर्थें ।**
**अक्षा पारायणीं ग्रंथगर्भातें ।**
**जाणोन रमशील तन्मयीं ॥**

**मग मनश्लोकाची वोपितां वही ।**
**सर्वार्थ बिंबला तात्काळ हृदयीं ।**
**आतां कळिकाळा गणित नाहीं ।**
**म्हणोनि पाया लागला ॥**

— श्रीदासविश्रामधाम, ७८, ६५–६७

ह्या च आदेश आपणांस हि आहे, असें मानून त्या चरणांचें सतत स्मरण ठेवून आपण हि ग्रन्थराजाच्या अशा पारायणांचा संकल्प केला § पाहिजे.

## ( १९ ) अंबाजीचें कल्याण नांव कसें पडलें ?

याविषयीं अनेक कथा प्रचलित आहेत. परंतु सर्वांचा भावार्थ एक च कीं, श्रीसमर्थांची सेवा करतांना किंवा त्यांच्या आज्ञेचें पालन करतांना अंबाजीनें आपल्या जीवाकडे पाहिलें नाहीं. त्यामुळें आपण कोणती हि एक कथा स्वीकारली तरी चालेल. मसुरास असो किंवा चाफळास असो, कोठें तरी प्रदक्षिणेच्या वाटेंत झाडाची फांदी आडवी आली असतां ती तोडण्याची श्रीसमर्थांची अंबाजीस आज्ञा झाली. त्याप्रमाणें अंबाजीनें ती फांदी तोडली, पण स्वतः त्यासरसा खालीं पडला, मग कोणी म्हणतात त्याप्रमाणें पाल्यांत पडले असोत, किंवा पाण्यांत पडले असोत. समर्थांच्या कृपेनें कांहीं अपाय झाला नाहीं. समर्थांनीं विचारिलें, " ठीक, कल्याण आहे ना ? " यांनीं उत्तर दिलें " कल्याण आहे. " तेव्हांपासून अंबाजींचें नांव कल्याण पडलें. इतकें खरें कीं

**कल्याणशिष्या ऐसा निस्सीम भक्त ।**
**न भूतो न भविष्यति ॥**

## ( २० ) कल्याणांची दुसरी परीक्षा

गुर्वाज्ञेनें अग्राकडे बसून मुळाकडे फांदी तोडून खालीं पडले तेव्हां च कल्याणांच्या गुरुनिष्ठेची पहिली परीक्षा झाली. एका श्रावणांत उरमोडीच्या तटीं पर्णकुटी करून समर्थ राहिले असतां दुसऱ्या परीक्षेंत कल्याण उत्तीर्ण झाले. श्रावण महिना तो, पावसाची जोराची सारखी झड लागली होती, उरमोडी तुडुंब भरून चालली होती. काळोखी रात्र, मध्य रात्रींचा सुमार होता.

---

§ ही मलयगंधर्वाच्या तीन जन्मांची कथा बहुतेक चरित्रकारांनीं सांगितली आहे. बखरींत हि ती आहे. तींत निमित्त आणि स्थळ हीं फक्त भिन्न आहेत. तींत या कथेला निमित्त, सदाशिवशास्त्री देव येवलेकर झाले असून स्थळ, रामघळीच्या च डोंगरांत घळीकडे जातांना वाटेंत जो एक मोठा थोरला हत्तीएवढा दगड लागतो, तें म्हटलें आहे.

विडा घेण्याची समर्थांना इच्छा झाली. बटव्यांत पाहतात, तों पान नाहीं. "कोणी जागे आहांत कां रे," म्हणून समर्थांनीं विचारिलें. "हो, जागे आहोंत," अशीं सर्वांनीं उत्तरें दिलीं. "अरे, बटव्यांत विड्याचें पान नाहीं," असें समर्थ म्हणाले. "कोणी मठांत जाऊन पानें आणतो का?" असें विचारण्याचा त्यांचा भावार्थ होता. कोणी च उत्तर देईना. ज्यानें त्यानें मनांत आणलें, कोणी तरी दुसरा जाईल च. कोणी जागचे हलले नाहींत, जागच्या जागीं च थंडीनें कांकडून बसले. पण कल्याण थोडे च स्वस्थ बसणार? तत्काळ उठले, चालूं लागले, नदी ओलांडली, मठांत पोंचले, पानें घेतलीं, पुन्हां नदीच्या गार पाण्यांतून आले, सर्पांनीं वेटाळून घेतलें होतें, पर्णकुटी गांठली, "हीं घ्या पानें," असें म्हणून भिरकावलीं व खालीं पडले! 'हा असें कधीं बोलणारा आणि करणारा नव्हे,' असें वाटून समर्थ जवळ जातात आणि पाहतात तों कल्याणास सर्पांनीं वेटाळून घेतलेलें होतें! एक एक सर्प उपटून टाकून समर्थांनीं कल्याणाकडे पाहिलें!

**आणोनि विभूती सर्वांगातें।**
**लाऊनि मर्दिलें आपुल्या हातें।**
**धन्य कल्याणजी सभाग्यवंत।**
**कुर्वाळूनि पाठी थापटिलें॥**

**अमृतकराचा स्पर्श होतां।**
**अमृतदृष्टीची सुधा द्रवतां।**
**अमृतवाक्याचें कवच लेवितां।**
**अमर चि जाला अक्षयी॥**

**जाला सावधु उघडोनि नेत्र।**
**सन्मुखी देखिले उभे गुरुवर।**
**घाबिरोनि घातला नमस्कार।**
**स्तवी सद्गदें कर जोडुनी॥**

—दासविश्रामधाम, ३३, ८५–८७

असला च प्रसंग धामकारांनीं च पुन्हां पुढें ६७ व्या प्रकरणांत वर्णिला आहे, पण तो चाफळजवळच्या रामघळींत समर्थ असतां आषाढ-मासीं घडल्याचें म्हटलें आहे. इतर चरित्रकार असला प्रसंग एकदां च

आणि तो हि रामघळींत च घडल्याचें सांगतात. त्या: डोंगरांत तें स्थान आज हि दाखविण्यांत येतें. तेथील भैरवाला श्रीसमर्थांनीं नवस: करून म्हटलें :

**अहो भैरव तुमचे क्षेत्रीं ।**
**वस्तीस राहिलों सहपरिवारीं ।**
**विदित नाहीं कीं काय अंतरीं ।**
**कां आडविला कांतारीं मम बाळ ॥**

**भैरीससाणा गारोडिया ।**
**उतार करी विखा धांवोनियां ।**
**विश्रांति मज बहु याचेनि सखया ।**
**सेवक न देखों ऐसा दुजा ॥**

**परतवी झडकरी याचे प्राण ।**
**वाटवीन शर्करा अकरा मण ।**
**नैवेद्य हि होईल यात्रा भरोन ।**
**आतां अनुमान करूं नको ॥**

—दासविश्रामधाम, ६७, १२२–१२४

आणि नंतर तो नवस हि श्रीसमर्थांनीं फेडला. मी हि ही गोष्ट रामघळींत श्रीसमर्थ असतांना एक्या रात्रीं घडली, असें च मानतों. कोणी कोणी ही गोष्ट पालीच्या पलीकडच्या डोंगरांत घडल्याचें हि सांगतात. तात्पर्य इतकें च, असला प्रसंग कल्याणावर एकदा आला होता खरा, मग तो कोणत्याहि ठिकाणीं आलेला असो.

याप्रमाणें कल्याणांची ही दुसरी परीक्षा झाली. आतां फक्त शेवटची एक च उरली.

**गुरुदेवें भैरवासी येके दिवशीं संदेश केला ।**
**निस्पृह कल्याण अजगरें स्पर्शिला ।**
**तात्काळ अतित निर्विष जाला ।**
**क्षत्रपाळ सन्मानिला समर्थें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ७, २८

## ( २१ ) दाळगपु

श्रीसमर्थशिष्यांत कल्याण हे अति बलवान् होते. मठांतील शक्तीचीं कामें बहुधा त्यांच्या वांट्याला येत. मोठाले दोन हंडे भरून खाद्यन उरमोडीचें पाणी आणणें, किंवा एकादें झाड च उपटून चोरांच्या पाठीमागें लागणें, असलीं कामें करतांना ते आढळावयाचे. त्यांच्याकडे पाहून एकदां शिवाजीराजांच्या हि मनांत, कौतुकानें पण आलें कीं, हा कसा दाळगपु आहे, धोतरें धुण्यापलीकडे हा कांहीं जाणतो किंवा नाहीं, कोण जाणे! श्रीसमर्थांनीं हें जाणून, एकदां शिवाजीराजे उपस्थित असतां, सर्व शिष्यांची परीक्षा मांडली. समर्थ म्हणाले, "तुम्ही सर्व जण नित्य ग्रन्थ वाचतां आणि ऐकतां, मग सांगा, जाणीव ही येकदेशी आहे कां सर्वगत आहे." कोणास सांगतां येईना. मग कल्याणाकडे पाहून स्वामींनीं विचारलें, "तूं सांग तुझा अनुभव काय आहे तो." कल्याण म्हणाले,

**जी स्वामी समर्था बोलवेना ।**
**यद्यपि बोल कीं स्वयें चि आज्ञा ।**
**अंतरिक्षस्थानीं वसे तल्लीना ।**
**जाणीव तुर्या स्वरूपाकृति ॥**

**येकदेसी ते प्रथमीं खरें ।**
**गुरुकृपें घडतां स्वरूपाकार ।**
**सर्वगत होय तदाकार ।**
**वरी बोल बोलला न उरे चि ॥**

—श्रीदासविश्रामधाम, ३३, १११–११२

राजे मनांतल्या मनांत चपापले. समर्थांनीं नंतर प्रत्यक्ष दाळगपु च शब्दाची चर्चा मांडली, तेव्हां राजांना शंका राहिली नाहीं कीं, ही सारी परीक्षा, कल्याणांची योग्यता आपल्या प्रत्ययास आणून देण्यासाठीं होती. तेथून पुढें,

**तधीपासूनि कल्याणा परम । भावी नृपांनीं सद्गुरुसम ।**
**सर्वत्रामनीं कल्याण नाम । निजसौख्यधाम वाटलें ॥**

— श्रीदासविश्रामधाम, ३३, १२२

असे कल्याणस्वामी होते. ते जसे बळवान् होते, तसे च बुद्धिमान् हि होते. नुसते दाळगपु नव्हते.

## ( २२ ) चोरांना कल्याणांनीं वठणीवर आणलें

चाफळमठाचें वैभव प्रतिवर्षीं सारखें वाढत चाललें होतें. उत्सवाचे दिवस जसजसे जवळ येत, तसतशी सामानाची कोठी भरली जाई. हजारो यात्रा लोटावयाची व इतक्यांचें अन्नसंतर्पण व्हावयाचें. सर्व च कांहीं लागावयाचें. शिष्यमंडळी चौफेर हिंडून, भिक्षा आणून कोठी भरून काढीत. हें पाहून चोरांचे हि डोळे दिपत. सामान किती आलें, काय काय आलें व तें कोठें ठेवलें, हें एका वर्षीं चोरांचा मुख्य नायक हेरून गेला होता. त्याच्या हाताखालीं एक टोळी च होती. उत्सवांत गर्दी फार होणार, तेव्हां साधणें कठीण, उत्सवाला अवकाश आहे, तों च डल्ला मारला पाहिजे, असा विचार करून एका रात्रीं चोरांची टोळी चालून आली. तेव्हां श्रीसमर्थ मठाच्या पुढील उघड्या जागीं पहुडले होते व कल्याण पाय चेपीत बसले होते. त्यांना चोरांची चाहुल लागली. खांद्यावर निंबारा टाकून व हातांत चोबा घेऊन कल्याण चोरांवर चालून गेले. एकएकाला ठार करूं, कां नुसतें घायाळ, असें जातांना विचारलें व जरूर तेवढा च प्रतिकार कर, जास्त नको, असें उत्तर आलें. कल्याणांच्या अंगांत जणूं हनुमंताचें बळ संचरलें. एकएका चोराला ठोकून खालीं पाडलें व उजाडे तों ते तसे च विव्हळत राहिले. उजाडल्यावर समर्थांनीं पाहिलें, उपचार केले, चोर पस्तावले, शरण आले. उत्सवांत तृणकाष्ठ पुरवीत जा व रखवाली करीत जा, अशी त्यांना आज्ञा झाली.

**गुरुदेवदर्शनीं तस्कर विरक्त जाले ।**
**तस्करविद्या टाकूनि ब्रह्मविद्येवरी आले ।**
**समर्थापुढें माल आणूनि रिचविले ।**
**समर्थें वाटिले ब्राह्मणा ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ८, ६

## ( २३ ) मस्त हत्तीची रग जिरविली

### कल्याणांच्या बळाची आणखी एक गोष्ट

चाफळच्या यात्रेंत एक वर्षीं एक मातलेला हत्ती सुटला आणि यात्रेकरूंत शिरला. जिकडे तिकडे गोंधळ, आरडाओरड, धांवपळ सुरू झाली. माहुताचें हि कांहीं चालेना. तेव्हां समर्थांनीं कल्याणाकडे पाहिलें. कल्याण धांवले, त्यांनीं हत्तीची सोंड च धरून, ती ओढून व गंडस्थळावर मुष्टिघात करून त्याची मस्ती जिरविली आणि मग हत्ती

**उगा चि राहिला बांधिल्या ठांईं ।**
**चोज आश्चर्य करिती सर्व हि ।**
**बळवान् ऐसा तो कल्याणगोसावी ।**
**सद्गुरुवरदें जालासे ॥**

—दासविश्रामधाम, ८५, ११०

## ( २४ ) कल्याणांच्या खांद्यावर श्रीसमर्थ

( १ ) कल्याण अति बलवान् पुरुष होते. त्यांच्या प्रतिमेकडे पाहून हि तशी कोणाची हि खात्री होईल. त्यांच्या शक्तीच्या अनेक गोष्टी सांगण्यांत येतात. एकदां एका श्रावण महिन्यांत, पावसाची विशेष च झड लागली असतां पाटणहून कोंढवळ्याच्या घळीस श्रीसमर्थांना, कांहीं शिष्यमंडळी बरोबर घेऊन, जावयाचें होतें. वाटेंत कोयना नदी आडवी होती. तिला महापूर आला होता. तेव्हां श्रीसमर्थ कल्याणास म्हणाले, "तूं च आतां आमची नौका होऊन सर्वांना पैलथडीस पोंचीव आणि शेवटीं मला हि घेऊन जा." त्याप्रमाणें कल्याणांनीं एकएकाला खांद्यावर घेऊन स्वतः पोहत जाऊन परतीरास नेऊन सोडावें, परत यावें, दुसऱ्यास न्यावें. याप्रमाणें सर्वांना पोंचविलें आणि

**मग स्कंदासनीं बैसऊन स्वामीतें ।**
**चालिला जैसा पायवाटपंथ ।**
**पुसती ते माता उत्तर देत ।**
**कवनस्मरण धरोन ल्याहावया ॥**

—दासविश्रामधाम, ७९, ५०

( २ ) थोड्या दिवसांनीं परत येतांना काय झालें? समर्थांच्या मनांत आलें, आपण पोहत जाणार. त्याप्रमाणें ते पाण्यांत उतरले, पोहत चालले, अर्ध्या पात्रांत आले आणि एका भोवऱ्यांत सांपडले. भोवरा फोडून निघणें त्यांना अशक्य नव्हतें, पण नेहमीं शिष्यांच्या निष्ठेची परीक्षा पाहावयाची. भोवऱ्यांत सांपडले आणि मोठ्यानें हांक दिली, "कल्याणा धांव." 'कल्याणा धांव' ही गुरुराजवाणी श्रवणीं पडतांच कल्याण निघाले आणि

**मग स्वामीरायाला घट्ट धरोन ।**
**बुडोन निघाला भोंवरा फोडून ।**
**ऐलाडतीरीं घालूनि आसन ।**
**बैसवोन नमन पैं केलें ॥**

—दासविश्रामधाम, ७९, १०६

पाटणगांवचे लोक जमले. त्यांनीं नवल केलें. त्यांना समर्थ म्हणतात, "आज माझ्या प्राणसख्यानें मला जीवदान दिलें."

धन्य धन्य आहे या गुरुशिष्यांची! असतील साधनें पुष्कळ, पण त्यांत अमोघ असें साधन, गुरुभक्ति होय, हें च खरें!

## ( २५ ) शिष्यांच्या निष्ठेची परीक्षा आरंभिली

### कल्याणांकडे गुरुत्व वोपिलें

**समर्थदेवें वृत्ति पालटिली । शिष्यसमुदायाची परीक्षा मांडिली ।**
**अखंड उग्रवृत्ति तरवार पर्जिली । श्रीपदस्पर्शनीं जीव खंडणें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ७, १५

अनेकदां परीक्षा पाहून पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झालेल्या सर्व शिष्यांना समर्थांनीं महंती करण्यास पाठविलें होतें, त्यांपैकीं फक्त कल्याणांना जवळ ठेवून घेतलें होतें. भोजनभाऊ शिष्यांची गडावर गर्दी झाली होती. त्यांच्या निष्ठेची परीक्षा पाहण्याचें समर्थांनीं मनांत आणलें. अशा वेळीं कल्याण येथें नको, म्हणून त्यांस म्हणाले, "हे कवनांचे कागदपूर्जे सांचले आहेत, ते घेऊन चाफळास जा, त्यांचा उतारा कर आणि मग ये." त्याप्रमाणें कल्याणांना चाफळास रवाना केलें. मग समर्थांनीं इतरांची परीक्षा मांडली.

अति उग्र रूप धारण केलें. मारुतीला लावावयासाठीं आणलेला शेंदूर आपल्याच अंगाला माखून घेतला, जणूं प्रत्यक्ष हनुमान बनले. कपाळावर कुंकूं फासलें, जणूं जगदंबा प्रकटली. शिवाजीराजांना कोणा सौदागरानें असिलता म्हणजे तरवार दिली होती, ती राजांनीं समर्थांना अर्पण केली होती, ती तरवार हातीं घेतली आणि आरोळ्या देत व भुभुःकार करीत बाहेर पडले ! नेत्र गरगर फिरवूं लागले, म्हणाले, "या आतां पुढें, जो येईल त्यास छाटतों, ठार करतों." हें सर्व पाहून व ऐकून, जमलेल्या भोजनभाऊंपैकीं बहुतेक पळाले, कांहीं लपून बसले, थोडे मूर्च्छित होऊन पडले. अशी सर्वांची वासलात झाली. पुढें येण्याचें धैर्य कोणास च झालें नाहीं. लोकांच्या अनेक कल्पना सुरू झाल्या, त्यांना ताळ ना तंत्र. भ्रम झाला, असें सर्वांच्या मनानें घेतलें. सर्वांना हळहळ वाटली. सर्वांना च कल्याणांची आठवण झाली. त्यांना बोलावून आणण्यासाठीं दोघे चौघे चाफळास गेले. तेथें जाऊन त्यांनीं कल्याणांना समर्थांची अवस्था विदित केली. कल्याण त्यांना म्हणाले, "अरे, तुम्ही मजपर्यंत न येतां तसें च श्रीसमर्थांच्या चरणांवर जाऊन पडतां आणि कामास येतां, तर तुमच्या देहाचें सार्थक झालें असतें. हें लेखन संपल्याशिवाय न येण्याची मला आज्ञा आहे. त्या आज्ञेच्या बाहेर मला जातां येत नाहीं. श्रीसमर्थांच्या अनेक लीलांपैकीं मी ही एक लीला मानतों. त्यांच्या सेवेंत देह अर्पण झाला, तर मी स्वतःस कृतार्थ समजेन. तुम्ही परत जा गडावर, मी लेखन संपवून पाठोपाठ येतों च."

ते दोघे चौघे परतले आणि लेखन पूर्ण करून दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं कल्याण गडावर आले, ते नीट श्रीसमर्थांच्या च कडे चालले. ते कसे चालले ? निर्भयपणें चालले. ज्याप्रमाणें

**राजयापासीं पातला स्वबाळ । वाघीणसंव करु पिली खेळ ।**
**त्रिंबका भेटीं आला गणपाळ । ब्रह्म ये जैसा हरीपासी ॥**

—दासविश्रामधाम, १०६, १३९

त्याप्रमाणें कल्याणस्वामी आले ते थेट गुरुमाउलीला भेटावयास गेले. कल्याण येत आहेसें पाहून, समर्थ मनांत आनंदले. लोक मात्र, कल्याणांचें काय होणार, हें दुरून पाहात राहिले. श्रीसमर्थ नजरेस पडतां च कल्याणांनीं साष्टांग नमस्कार घातला. समर्थांनीं त्यांना मारण्याचा आविर्भाव

आणला. शस्त्र उचलून चौताळले. धोंडे फेकून मारले, पण ते कसे, एक हि न लागावा असे. कल्याणाची शेंडी धरून त्यास उताणा पाडलें आणि मानेवर तरवार धरली. लपून पहाणारांस वाटलें, कल्याणांचा घात झाला. मानेवर तरवार धरलेली पाहून कल्याण म्हणाले, "महाराज, एका च घावांत चरणीं ठाव द्यावा." कल्याणांची निष्ठा पाहून समर्थ गहिंवरले, प्रसन्न झाले, म्हणाले, "कल्याणा, तूं मला जिंकलेंस. तुला काय देऊं? मजजवळ तुला देण्याला दुसरें आहे च काय, जें आहे तें च तुला देतों.

**द्यावया न दिसती कांहीं पदार्थ। तुजकडे आतां वोपिलें गुरुत्व॥"**

—दासविश्रामधाम, १०६, १५२

असें म्हणून वस्त्रें व इतर वस्तु द्यावयाच्या त्या देऊन, आपल्या डोक्यावर पागोटें बांधून तें कल्याणांच्या मस्तकीं ठेवलें, आपल्या गळ्यांतील पुष्पहार त्यांच्या गळ्यांत घातला, आपल्या हातांतील जपमाळ त्यांचे हातीं दिली आणि परंपरा चालीव, वाढीव, असा आशीर्वाद दिला. नंतर कोणी त्यांच्याकडे अनुग्रहार्थ आला, तर आतां गुरुत्व कल्याणाकडे आहे, असें सांगून त्यास कल्याणाकडे धाडीत.

कल्याणांची योग्यता केवढी मोठी होती! कल्याण हें विशेषनाम राहिलें नसून पट्ट शिष्य या अर्थीं सामान्य नाम झालें आहे!

नंतर श्रीसमर्थांच्या आज्ञेवरून च कल्याण महंती करावयास गेले, शिवाजीराजांचा हि अंतकाळ समीप आला, हें समर्थांनीं जाणलें आणि त्यांच्या ठिकाणीं उदासीनता आली.

## (२६) शहापुरच्या सतीबाई

हें शहापुर गांव मसुरपासून एका कोसावर आहे. सतीबाईचे पति कमळाकर तेथील ग्रामाधिकारी होते. त्या गांवीं श्रीसमर्थ नेहमीं भिक्षेला जात व श्रीरामाचा जयघोष करीत. कमळाकरपंताच्या घरांतील बायकांना तो घोष अशुभ वाटे. त्यांची कल्पना, श्रीराम जयराम इत्यादि उच्चार शेवटीं उचलतांना करावयाचा असतो आणि हा बुवा आमच्या भरल्या घरापुढें असा काय प्रत्यहीं उच्चार करतो, असें वाटून त्या बायांनीं एकदां

श्रीसमर्थांना स्पष्ट च म्हटलें कीं, "आमच्या दारीं येऊन असें म्हणत जाऊं नका." पुढें एके दिवशीं नित्यक्रमाप्रमाणें समर्थ त्या घरीं गेले असतां सर्व बाया चिंतातुर होऊन बसलेल्या दिसल्या. "काय झालें?" म्हणून यांनीं विचारलें, तेव्हां त्यांना कळलें कीं, हिशेबांत कांहीं चुकी झाल्याच्या संशयावरून घरधन्याला बादशहाच्या हुकुमानें कऱ्हाडास का विजापुरास धरून नेलें, तेव्हां काय होतें, काय नाहीं, या काळजींत सर्वजण पडले होते. समर्थ म्हणाले, "काळजी करूं नका, आजपासून अकराव्या दिवशीं तुमचे घरधनी श्रीरामाच्या कृपेनें सुखरूप परत येतील, मग तर तुम्ही, श्रीरामाचा जयजयकार दुसऱ्यानें केलेला ऐकत जाल ना आणि स्वतः हि करीत जाल ना?" समर्थ गेले, बादशहाच्या अधिकाऱ्याला सर्व हिशेब समजावून सांगून चुकता केला, अधिकारी खुश झाला, त्यानें उलट कमळाकरपंत आणि समर्थ यांचा सन्मान केला आणि त्यांना जाण्याची परवानगी दिली. दोघे परतले. मार्गांत कमळाकरपंतांनीं विचारलें, "आपण कोण व आपणांस हिशेब चुकता करण्यास कोणीं पाठविलें?" उभयतां गांवाच्या वेशीपाशीं आले. तसे श्रीसमर्थ निसटले आणि पंत घरीं जाण्याच्या आनंदांत च मग्न होते, ते घरीं पोचले. तो दिवस अकरावा होता. घरांतील सर्वांना आनंद झाला. आनंदाचा भर किंचित् ओसरल्यावर पंतांनीं बायांना विचारिलें, "तुम्हीं कोणास पाठविलें होतें? त्या पुरुषानें येऊन सर्व हिशेब चुकता करून मला सोडवून आणलें." बाया म्हणाल्या, "आम्हीं कोणास पाठविलें नव्हतें, पण नित्य रामनामाचा गजर करणारा जो बुवा येत असे, तो त्या दिवशीं आला असतां त्यानें आम्हांस चिंतातुर पाहून कारण विचारिलें आणि आम्हीं त्यास सांगितलें होतें. तेव्हां तो म्हणाला, आजपासून अकराव्या दिवशीं तुमचे घरधनी येतील, मग तर तुम्ही रामनाम घेत जाल ना?"

झालें, पंत एकदम शुद्धीवर आले. सर्वांना त्या बुवाच्या दर्शनाची उत्कंठा लागली. पंत म्हणाले, "वेशीपर्यंत कीं हो तो बुवा मजबरोबर होता, मी माझ्या आनंदांत घराकडे आलों आणि तो बुवा कोठें गेला!" त्याचें दर्शन घडल्यावांचून अन्नपाणी न घेण्याचा पंतांनीं आणि त्या बायांनीं संकल्प केला.

कशास गोष्ट लांबवूं ? आपण सर्वजण कल्पना करूं शकतों कीं, समर्थांचा शोध लागला, त्यांचें दर्शन झालें, पंतांचा आणि बायांचा संकल्प पुरा झाला. नंतर तेवढें च घर नव्हे, तर सारा गांव आणि गांवांचीं गांवें श्रीसमर्थांच्या भजनीं लागलीं.

तंजावरमठाचे भीमस्वामी या च गांवचे, सतीबाईच्या नात्यांतले च होत.

## (२७) श्रीवेणुबाई

यांचें माहेर कोल्हापुरास. तेथील देशपांडे यांची त्या कन्या होत. दिल्या होत्या मिरजेस. अल्पवयांत च त्यांचा पति निवर्तला होता. एकदां मिरजेंत यांच्या घरापुढें जाऊन समर्थांनीं दूध मागितलें. सासुबाई आंत होत्या, त्यांनीं घरांतून च सांगितलें कीं, "दूध नाहीं, आहे तें मारुतीसाठीं ठेविलें आहे." मारुती आणखी दुसरे कोण ? दूध मागावयाला कोण आले होते ?

**नवस जयाचा तोचि आला स्वयें ।**

"त्यांतील च थोडेंसें द्यावें" असें वेणुबाई म्हणाल्या. सासुबाई म्हणाल्या, "दे." तें घेऊन वेणुबाई येतात, तों समर्थ दुसरीकडे गेले हि होते. पुढें कांहीं दिवसांनीं असे च एकदां श्रीसमर्थ भिक्षेस आले असतां वेणुबाई आंगणांत वृंदावनापाशीं भागवतग्रन्थ वाचीत बसल्या होत्या. "मुली, कोणता ग्रन्थ वाचतेस ?" म्हणून समर्थांनीं विचारिलें. "भागवतग्रन्थ आहे" असें वेणुबाईनीं उत्तर दिलें. "त्यांत काय सांगितलें आहे ? त्याचा कांहीं प्रत्यय येतो का ?" "मला एवढें ज्ञान कोठचें ? भक्तिभावानें ग्रन्थ वाचावा, एवढें च मला ठाऊक." त्यावर

**नमूं वागेश्वरी शारदा सुंदरी । श्रोता प्रश्न करी वक्तयासी ॥**

असें म्हणून वेणुबाईनीं पंचवीस प्रश्न विचारिले आणि

**नमूं वेदमाता नमूं त्या अनंता । प्रश्न सांगों आतां श्रोतयाचे ॥**

असें म्हणून श्रीसमर्थांनीं त्या पंचवीस प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. हे प्रश्नोत्तरांचे दोन्ही अभंग, श्रीरामदासी मालेंतील तिसरा भाग – श्रीरामदासांची कविता – या ग्रन्थांत आले आहेत. भिक्षा घेऊन श्रीसमर्थ चालते झाले, पण

त्यांची ती दिव्य मूर्ति पाहून व उपदेश श्रवण करून वेणुबाईंनीं श्रीसमर्थचरणीं मनानें लोटांगण घातलें.

अशा सत्पुरुषाचा सहवास घडून जन्माचें सार्थक व्हावें, असें त्यांच्या मनानें घेतलें.

**तैसी मूर्ति दृष्टी पडो । तैशा पाईं वृत्ति जडो ॥ १**
**ब्रह्मचारी सूत्र शिखा । पाईं शोभती पादुका ॥ २**
**कटीं अडबंद कौपीन । कंठीं तुळसीमणिभूषण ॥ ३**
**दिव्य मुख दिव्य नेत्र । भाळीं आवाळु सुंदर ॥ ४**
**रामदास दिव्य नाम । सखा ज्याचा आतमाराम ॥ ५**

असा श्रीगुरुचरणांचा श्रीवेणुबाईंना सारखा निदिध्यास लागला.

याप्रमाणें सद्गुरुकृपेसाठीं तळमळणाऱ्या वेणुबाई थोड्या दिवसांनीं माहेरीं कोल्हापुरास गेल्या, तेव्हां तेथें श्रीसद्गुरुसमर्थांची स्वारी शिष्य-समुदायासह आलेली असून त्यांचीं कीर्तनें चालू होतीं. वेणुबाई नित्य नियमानें कीर्तनश्रवणास जाऊं लागल्या. श्रीछत्रपति शिवाजीमहाराजां-सारख्यांना ज्या चरणांचें वेड लागलें, त्या च चरणांना वेणुबाई अनन्यभावानें शरण गेल्या. श्रीसमर्थांनीं त्यांच्यावर कृपा केली. वेणुबाईंचें पूर्व पुण्य उदयास येऊन त्या ' रामनामें मुद्रांकित ' होऊन कृतार्थ झाल्या. त्यांची ही परमार्थवृत्ति त्यांच्या सासुसासऱ्यांना आणि आईबापांना सर्वस्वीं आवडली, असें मात्र नव्हे. जननिंदेला हि कांहीं ताळ राहिला नाहीं. लोकांचीं अनन्वित बोलणीं ऐकून आईबापांना दुःख होई. " मुली, हा राघवाचा पंथ सोड, " असें त्यांनीं सांगून पाहिलें, पण वेणुबाईंचें सर्वांना एकच उत्तर :

**रामनामेंविण मज कंठेना ॥ ध्रु०**

**कोणी वंदिती कोणी निंदिती । वास मी त्यांची पाहिना ॥ १**
**हृदयीं धरिले सद्गुरुचरणा । प्राणांतीं हि विसंबेना ॥ २**
**वेणीचें निजधन राम चि जीवन । होणार तें कां सुखें होइना ॥ ३**

अखंड सहवास होऊन निरंतर श्रीचरणसेवा घडावी, अशी त्यांनीं श्रीसमर्थांची प्रार्थना केली. अजून वेळ आली नाहीं, असें सांगून श्रीसमर्थ

पर्यटणास निघून गेले. वेणाबाई तेथें च माहेरीं राहिल्या. जननिंदेला जोर येत चालला. ती निंदा आईबापांना दुःसह होई. यापेक्षां ‘ कारटी मरती तरी बरें होतें ’ असें त्यांना वाटे. जननिंदा कानांवर येऊन आदळत च होती. अखेरीस आईबापांनीं वेणुबाईंना विष दिलें आणि उठविलें कीं सर्प चावून मेली. विष भिनत चाललें आणि वेणाबाईंनीं धांवा मांडला. श्रीसमर्थ अचानक प्रकट होऊन त्यांनीं वेणाबाईंच्या अंगावरून छडी उतरली आणि वेणाबाई मुखानें राम राम वदत उठोन बसल्या आणि

**पुढें देखोनि श्रीमोक्षपाणी ।**
**स्तवी सद्गदें नमनमोनि ॥**

**नयनीं स्त्रवतसे प्रेमांबुधारा ।**
**विदेहकाया कांपे थरथरा ।**
**दया उपजली श्रीकरुणाकरा ।**
**सावध करोनि बैसविलें ॥**

—श्रीदासविश्रामधाम, ३१, ९९–१००

आईबाप हि पस्तावले, निंदक हि ओशाळून स्तवूं लागले आणि श्रीवेणुबाई श्रीसमर्थसेवेंत अखंड राहूं लागल्या. धन्य धन्य वेणाबाईंची. त्यांच्या चरणीं आमचा अखंड दंडवत. त्या तुम्हा आम्हांस म्हणतात :

**आमुच्या वाटे नका जाऊं । नये ते वाटे तुम्हां लावूं ॥ १**
**आम्ही पारिखे पारिखे । नहों लोकिकासारिखे ॥ ध्रु०**
**अशी स्थिति जाली मोठी । पोटीं ब्रह्मांडाच्या कोटी ॥ २**
**वेणीस्वामी आत्माराम । हें चि आमुचें परंधाम ॥ ३**

**गुरुवाक्यप्रेमनौका । मायासागर तरलों देखा ॥ १**
**आम्ही स्वामीचे अंकित । रामनामें मुद्रांकित ॥ ध्रु०**
**अहं ब्रह्म उपदेशिलें । अहं गेलें ब्रह्म ठेलें ॥ २**
**आली अनुभवाची खूण । खूण केली रामार्पण ॥ ३**
**वेणीस्वामी अवघा जाला । विज्ञानासी अंत आला ॥ ४**

**देह माझें मन माझें । सर्व नेलें गुरुराजें ॥ १**
**आम्ही गुरुनाथपंथी । ज्ञानमुद्रा दिधली हातीं ॥ ध्रु०**

**कर्णीं चढली नाममुद्रा । मुखीं अगोचरी मुद्रा ॥ २**
**कान फाडुनि जोगी जालों । संतदर्शनासी आलों ॥ ३**
**वेणीस्वामीचें दर्शन । मायासंकेतनिर्शन ॥ ४**

वेणाबाई किती श्रेष्ठ प्रतीच्या विदुषी होत्या, हें वरील तीन पदांवरून हि व्यक्त होत आहे. त्यांचें ओवीबद्ध **श्रीसीतास्वयंवर** काव्य प्रसिद्ध आहे. त्यांचे **कौलाचे** आणि **श्रीरामगुहसंवादाचे** श्लोक अपूर्व आहेत. शिवाय अनेक भक्तिपर पदें आहेत.

## (२८) एकदां वेणाबाईनीं श्रीसमर्थांना कुंठित केलें.

मी असा शब्दप्रयोग करावा कां करूं नये, याची मला क्षणभर शंका वाटली. पण हरकत नाहीं, असें उत्तर आलें, कारण श्रीसमर्थांचे शिष्य त्यांच्याशीं लडिवाळपणानें बोलत आणि श्रीसमर्थ हि अनेकदां शिष्यांच्या निष्ठेचें कौतुक च करीत. त्यामुळें एका प्रसंगीं वेणाबाईनीं श्रीसमर्थांना समर्थांच्या च शब्दांत उत्तर देऊन कुंठित केलें, याचें श्रीसमर्थांना कौतुक च वाटलें असलें पाहिजे.

तो प्रसंग असा. वेणाबाईच्या मठांत श्रीसमर्थ एकदां गेले होते. त्यांनीं एक तांब्याभर सांडपाणी मागितलें. स्नान झाल्यानंतर देवाच्या पूजेसाठीं पाणी भरून जो तांब्या ठेवला होता, तो च काशीराज मुलानें उठून आणून दिला. समर्थ म्हणाले, “ काय हें, देवासाठीं ठेवलेलें पाणी बाहेर सांडावयास आणून देतां, तुम्ही सारे च सर्वब्रह्मी झालेले दिसतां, कर्माची आणि उपासनेची कांहीं च मर्यादा राखीत नाहीं, असें दिसतें ! ”

यावर वेणाबाई म्हणाल्या, “ महाराज, यांत कोठें चुकलें ? देवाच्या पूजेसाठीं ठेवलेलें सुस्नातिक अग्रोदक गुरुदेवाच्या च कार्याला लागत आहे ना ? आपण च आम्हांस शिकविलें आहे, **जैसा देव तैसा गुरु** । किंबहुना देवाहून हि सद्गुरूचें सामर्थ्य अधिक होय, असा निवाडा आपण च ग्रन्थराजांत केलेला आहे. ” यावर समर्थ कांहीं बोलले नाहींत. त्या सर्वांच्या गुरुनिष्ठेचें त्यांनीं मनांत मात्र कौतुक च केलें असलें पाहिजे.

— श्रीसमर्थप्रताप, १९, ३९–४४

## ( २९ ) पूर्णानंदाची गोष्ट

श्रीसमर्थ एका गांवीं गेले असतां एका बाईला वाटलें, पाळण्यांतील आपल्या बाळावरून यांनीं आपला हात फिरविला, तर बाळाचें कल्याण होईल. तिनें समर्थांना तशी विनंती केली. समर्थ म्हणाले, "बाई, आम्ही सर्वसंगपरित्याग केलेले विरक्त, निस्पृही, तेव्हां आमच्या संसर्गानें तुमचा बाळ हि तसा च निघेल." तथापि त्या बाईनें आग्रह केला च. तेव्हां समर्थांनीं पाळण्याजवळ जाऊन बालकाला विचारिलें, "प्रपंच करणार का परमार्थ ? तुला प्रपंच हवा का परमार्थ ?" प्रपंचाचें नांव काढलें म्हणजे बालकानें रडावें, परमार्थाचें घेतां च हंसावें.

समर्थ गेले. बाळ वाढत चालला, पण बोलणें नाहीं, चालणें नाहीं, कोणती च शुद्धी नाहीं, जणूं दुसरा हस्तामलक च !

श्रीसमर्थ कालांतरानें पुन्हां त्या गांवीं आले. त्यांनीं बालकाची स्थिति पाहिली आणि झडपणीचे सहा अभंग म्हटले. बाळ शुद्धीवर आला आणि सर्वांना आश्चर्य वाटलें. वयाचीं बारा वर्षें झाल्यावर तो श्रीसमर्थांकडे गेला. त्याची नेहमीं आनंदी वृत्ति असे, म्हणून समर्थांनीं त्याचें नांव पूर्णानंद ठेविलें. ( दासविश्रामधाम, २१ )

## ( ३० ) शिवाजीराजे प्रसंगीं कीर्तन करीत.

गडावर अनेक लोक येऊं लागले. लहान थोर न म्हणतां श्रीसमर्थ सर्वांचीं कीर्तनें करवीत. गडावरील मंडळींच्या मनांत एकदां आलें कीं, श्रीशिवाजीराजे एकांतांत प्रेमळ भजन करीत असतात, मग त्यांना लोकांत कीर्तन करण्यास काय हरकत असावी? लोकांचा मनोदय जाणून समर्थांनीं सुचविलें आणि श्रीशिवराय कथारंगणीं उभे ठाकले. कीर्तन करण्यास राजे उभे राहिलेले पाहून सर्वजण चकित झाले आणि राजे उभे असतां आपण बसावें कसें, या विचारानें सरदारादि मंडळी उभी राहिली. "येथें आपण सर्वजण सारखे आहोंत, तेव्हां सर्वांनीं बसून च ऐकावें," असें राजे म्हणाले आणि सर्व मंडळी बसली आणि श्रीशिवराय

**सद्गुरुरायाचे आठवोन चरण । ससांग करोनि मंगळाचरण ।**
**नाचतु संप्रेमें करीत भजन । टाळीस्मरणगजर होतसे ॥**

**युक्त बहु जाणे अर्थ सांगाया । धुरीण चि कीं स्वरयुक्त गावया ।**
**लाघवी असे नटनाट्य कराया । रंग भरवाया जाणतु ॥**
**भक्तिवैराग्यभजनप्रशंसा । ज्ञानध्यानाचें कळवून रहस्य ।**
**साधुसंतांचा महिमा विशेष । श्रीरामप्रताप वर्णिला ॥**

— दासविश्रामधाम, १००, ९५–९७

आणि म्हणाले, "रावणाला त्याच्या हितचिंतकांनीं परोपरीनें सांगून पाहिलें, खुद्द त्याच्या सहचरीनें डोळ्यांना पाणी आणून नीतीच्या गोष्टी सांगितल्या, परंतु,

**शिकविलें नाइके चि दैत्य मातला रे ।**
**रामदासदातारें सूड घेतला रे ॥**

## ( ३१ ) उपदेशी – निरनिराळ्या अधिकाराचे

गडावर रहावयास गेल्यावर, उपदेश करण्याच्या धोरणांत श्रीसमर्थांनीं बरा च फरक केला. चाफळास असतां, अधिकारावांचून कोणास हि ते उपदेश देत नसत. समर्थांना जें कार्य करावयाचें होतें, तें केवळ च पारमार्थिक नव्हतें. त्यामुळें, ज्यांना आपले म्हणवून विश्वासांत घ्यावयाचें, त्यांचा अधिकार कसोशीनें पहावा लागे. पण पुढें तितकी आवश्यकता राहिली नाहीं.

इतरांचे हि उपदेशी गडावर दर्शनास येऊं लागले. श्रीसमर्थांची दिनचर्या, आचारविचार, शिस्त, प्रभाव पाहून त्यांच्याविषयीं इतरांमध्यें स्वाभाविक आदर उत्पन्न होऊन ते मनोमनीं श्रीसमर्थांना गुरुस्थानीं च लेखीत.

कित्येक निगुरे असे असत कीं, ते श्रीसमर्थांपर्यंत जाऊन उपदेश मागण्यास लाजत. ते हि आपल्या च मनानें त्यांना गुरु मानून त्यांच्या कृपेचा ध्यास घेत. त्यांना वाटे, समर्थांनीं च आमचें मनोगत ओळखून व निष्ठा पाहून आपल्यावर कृपा करावी.

अशा तऱ्हेच्या लोकांना श्रीसमर्थांचे शिष्य मानावें कां मानूं नये? मानावें, तर प्रत्यक्ष उपदेश झालेला नसतो व न मानावें, तर श्रीसमर्थ-चरणीं त्यांचें चित्त दृढ जडलेलें असतें.

तेव्हां, अशा सर्वांच्या योग्यतेचा फारसा विचार न करतां, त्यांची केवळ निष्ठा पाहून श्रीसमर्थ सर्वांना सरसकट उपदेश देऊं लागले. त्यांना वाटे, अशांच्या प्राक्तनांत असेल तेवढें तरी साधन त्यांच्याकडून घडेल; उपदेश वाया जाणार नाहीं.

## ( ३२ ) एक महार शिष्य

कृष्णाकांठीं एका गांवीं एक महार श्रीसमर्थांना शरण आला.

**म्हणे मी दुरात्मा जात्या अधम । शिवितां न ये कीं गुरुपादपद्म ।**
**सार्थक कैसेनि होईल जन्म । चिंतोनि अनुतापें विव्हळला ॥**

— दासविश्रामधाम, १९, ९४

श्रीसमर्थ म्हणाले,

**येथें यातीसी नाहीं कारण । तराया श्रद्धा भाव प्रमाण ।**

महारानें दंडवत घातला आणि त्यास मंत्रोपदेश करून

**समर्थ गेले माहुलीसी ॥**

आणि इकडे एके दिवशीं तो महार शिष्य पाणी आणावयास गेला असतां डोहांत पडला आणि बुडाला. लोकांची निंदा सुरू झाली. कांहीं दिवस लोटल्यावर श्रीसमर्थ त्या च गांवीं आले असतां त्या महाराच्या म्हातारीनें त्यांना पाहिलें आणि

**खुणोन निबरीनें केला सलाम । म्हणे मशा जी तुमचा गुलाम ।**
**कृष्णेंत बुडाला म्हणोनि अधम । लोक तव पदा निंदिती ॥**

— दासविश्रामधाम, १९, ९८

श्रीसमर्थ म्हणाले, " मशा जेथें बुडाला म्हणून सांगतात, तेथें जाऊन त्याला हांक मारा, तो येईल ! " त्याप्रमाणें हांक मारतां च घागरीसहित मशा बाहेर आला आणि त्यानें

**घालोनि गुरुराया दंडवत ।**
**देउळीं होतों हा कथिला वृत्तांत ॥**

— दासविश्रामधाम, १९, १०१

## ( ३३ ) भट्टजी नामा सुशील ब्राह्मण

त्या ब्राह्मणानें श्रीसमर्थांचें चरित्र पाहिलें होतें. त्यानें मनांत आणलें, यांचे पाय धरावे. श्रीसमर्थ एकदां वनाकडे चालले असतां हा पाठोपाठ जाऊं लागला. श्रीसमर्थ जातां जातां एका जागीं बसले आणि यानें दंडवत घातला आणि "कृपा करा," म्हणून विनंती केली. श्रीसमर्थ म्हणाले, "उद्यां ये." ब्राह्मण आनंदला, घरीं गेला आणि दुसऱ्या दिवशीं निघाला. काल होते, तेथें श्रीसमर्थ आज नव्हते. ब्राह्मण शोधूं लागला.

**तंव पैलीकडे टेकडीवरी । वृक्षाखालें पाषाणावरी ।**
**निजले दिसती दास भवारी । दोन वाघ असती पायातळीं ॥**

— दासविश्रामधाम, १८, ५९

वाघांना पाहून ब्राह्मण दचकला, थबकला, विचारांत पडला. आतां परतावें तरी हे वाघ खाणार च, तेव्हां जावें, धिटाईनें जावें, गुरुसन्निध वावरणारे आपले सखे बंधु च होत. हा जवळ जातां च प्राण घेण्याच्या आविर्भावानें वाघ आरडून उठले, तों च ब्राह्मणानें श्रीसमर्थांचे पाय धरले. श्रीसमर्थ उठले, वाघ गुप्त झाले, ब्राह्मण परीक्षेंत उतरला. पुढें काय झालें, तें न सांगतां च कळतें. ( दासविश्रामधाम, १८, ५०–७३ )

या च ब्राह्मणाचा पुढें राजयोगांत हि संबंध येणार आहे. आठवण ठेवली पाहिजे.

दिवाकरभटांना अनुग्रह झाल्याची कथा जवळ जवळ अशी च आहे. ( दासविश्रामधाम, ४५ )

## ( ३४ ) रामराव मोहिते

रामराव मोहिते नांवाचा, लष्करांतील एक शूर मराठा शिपाई, श्रीसमर्थांचा अनुग्रहित होता. त्यास समर्थांनीं एकदां सहज सांगितलें होतें कीं,

**अरे संतसाधूची निंदा कोणी । करितां शिक्षावें त्याला दमोनि ।**
**पैशुन्य भल्याचें न पडावें कानीं । किंवा उठोनि जाइजे ॥**

— दासविश्रामधाम, ६८, ४२

एकदां भाद्रपद महिना होता. त्या शिपायाच्या मुख्य सरदाराकडे महालय होता. रामराव भोजनास गेला होता. तेथें सर्व निगुरी जमले होते. रामरावाकडे पाहून त्यांनीं संतसाधूंची निंदा चालविली. त्या निंदेंतून श्रीसमर्थ हि सुटले नाहींत. ती निंदा ऐकून रामराव लाल झाला. पंक्तींतून उठतां येईना, हाताशीं एकादें शस्त्र हि नव्हतें, शिवाय ते लोक पुष्कळ होते. रामराव जागच्या जागीं जळफळला. आंचवोन घरीं गेला. चिंतातुर झाला. काय करावें, गुरूच्या आज्ञेचें उल्लंघन झालें, निंदा ऐकत तसा च बसलों, प्राण कां दिला नाहीं ! आतां शस्त्र घेऊन जातों, उघड जातों, चोरून कशास जाऊं, त्या निंदकांना हटकतों आणि ठार करतों.

रामरावानें त्यांना तसा निरोप पाठविला. ते लोक हि फिकीरींत पडले. त्यांना हि प्रश्न पडला. रामराव राजाच्या मर्जींतला आणि राजा तर समर्थांचा जणूं किंकर. तथापि त्यांनीं हि आपलीं शस्त्रें सावरिलीं.

श्रीसमर्थांचा धांवा करून त्या लोकांवर चालून जाण्यास रामराव सज्ज झाला, तों

**इकडे ( रामघळींत ) गुरुराज असतां आसनीं ।**
**धांवा शब्द तो पडला कानीं ।**
**उठोन चालिले गुप्तोन काननीं ।**
**प्रगटले भक्तासन्मुखीं ॥**

— दासविश्रामधाम, ६८, ५४

एकाएकीं सद्गुरु सन्मुख पाहून रामराव दचकला. त्यानें सद्गुरूंच्या पायांवर मस्तक ठेविलें. रामराव वृत्तान्त सांगूं लागला. समर्थांनीं त्यास आश्वासिलें, "तुझ्याकडे बोल नाहीं, बघ काय होतें तें."

सरदार व त्याचे लोक पस्तावून स्वामींकडे आले. स्वामींनीं त्यांना विचारिलें, "निंदा करून काय मिळालें ?" काय उत्तर देणार ! अश्रूंनीं उत्तर दिलें. त्यांना हि समर्थांनीं अभय देऊन आश्वासिलें. रामरावाला गांमाला म्हणून त्यास मुल्याच्या हवालीं केला. सर्वांचा सलोखा झाला. आणि श्रीसमर्थ आले तसे गेले आणि रामघळींत प्रकट झाले.

## ( ३५ ) करारी जीवन्मुक्त भक्ताची गोष्ट

एकदां श्रीसमर्थ घोर अरण्यांत असतां जीवन्मुक्त नांवाचा एक करारी भक्त त्यांच्या दर्शनास आला. समर्थांनीं त्यावर बर्छी फेकली ती अशी कीं, त्याच्या कानांवरून बर्छी तिकडे भूमींत जाऊन रुतली आणि इकडे जीवन्मुक्त श्रीसमर्थांच्या पायांवर पडला. तत्काळ जीवन्मुक्तास श्रीसमर्थांनीं पोटाशीं धरलें आणि काय वर्तमान आहे म्हणून विचारिलें. तो म्हणाला, "देवा, रायगडास गेलों होतों, तुमच्या कृपेमुळें शंभर होन मिळाले, ते आईला देण्यासाठीं घरीं घेऊन जातों." नंतर श्रीसमर्थांनीं एक पाषाण उलथिला, सर्व सामान काढलें आणि स्वयंपाक करविला. तितक्यांत दुसरीकडून सात ब्राह्मण येऊन थडकले. समर्थांनीं मारुतीची पूजा केली, सर्वांचीं भोजनें झालीं, सात होन सात ब्राह्मणांना दक्षिणा दिली, बाकीचे आईला देण्यासाठीं जीवन्मुक्ताजवळ ठेवले आणि

**मग समर्थें मोठें कौतुक दर्शन दाखविलें ।**
**बर्छीपाणीनें सीघ्र उड्डाण केलें ।**
**नेणों हनुमानकिराण गगनांत गेलें ।**
**विस्मय समाधि लागली जीवन्मुक्ता ॥**

— श्रीसमर्थप्रताप, १५, ३७

अस्तमानाला जीवन्मुक्त चाफळास येऊन पोचले, त्यांनीं वरील हकिकत सर्वांना सांगितली आणि गिरिधरांनीं ती श्रीसमर्थप्रतापांत जशीच्या तशी लिहिली.

## ( ३६ ) वृद्ध प्रेमळशेटीची कथा

हे प्रेमळशेटी कोण होते, तें श्रीसमर्थांशिवाय कोणास च कळलें नाहीं. दरवर्षी गृहस्थ

**परम वृद्ध मुखांत नाहीं येक दांत ।**
**सर्व सामग्री बांधोनी आणिताहे पोत्यांत ।**
**सज्जनगड चढे चहुं प्रहरांत ।**
**दुर्मुजी वस्त्र निशाण लाऊनियां ॥**

— श्रीसमर्थप्रताप, १५, ४०

याप्रमाणें येऊन, आणलेलें साहित्य वेणाबाईच्या हवालीं करून, श्रीसमर्थांना नैवेद्य करवीत असे.

**ऐसा अकरा वर्षें नैवेद्य निवेदन केला ।**
**मग प्रेमळशेटी सज्जनगडीं गुप्त जाला ।**
**सदाशिव प्रेमळशेटी कोणा न कळला ।**
**समर्थसद्गुरुवांचूनियां ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १५, ४७

## ( ३७ ) श्रीसमर्थांनीं एका ब्राह्मणास मारुतिदर्शन कसें करविलें ?

ही सगुणसाक्षात्काराची गोष्ट मेरुस्वामींनीं आपल्या रामसोहळ्यांत सांगितली आहे. श्रीसमर्थ एकदां पर्वताच्या शिखरावर स्वछंदानें बसले असतां, व्यवसायामुळें रंजीस येऊन जीव नकोसा झालेला एक ब्राह्मण तेथें आला व कोणीं हटकलें तरी त्यास न जुमानतां तडक श्रीसमर्थांच्या जवळ जाऊन त्यांच्या चरणांवर पडला, कांहीं केल्या उठेना. तो समर्थांना म्हणाला, " माझें अभीष्ट पुरविण्याचें आश्वासन द्याल तर च मी देह ठेवीन. लोक सांगतात आणि मी ऐकतों कीं, आपणांस श्रीमारुतीचें प्रत्यक्ष दर्शन होत असतें, तर मला तें दर्शन घडवा, घडवाल तर च मी प्राण ठेवीन, नाहीं तर जीव देईन, अशी मीं प्रतिज्ञा केली आहे. " ब्राह्मणाची प्रतिज्ञा ऐकून श्रीसमर्थांचें हृदय द्रवलें, ते म्हणाले, " ठीक आहे, मी सांगतों तें ऐक, मी तुला एक गृहस्थ दाखवीन, त्याचे पाय धर, सोडूं नकोस, म्हणजे तुला मारुतिरायाचें साक्षात् दर्शन घडेल. "

भोजनाची पंगत बसली होती. त्या ब्राह्मणाला बरोबर घेऊन श्रीसमर्थ पंक्तींतून चालले. पंक्तींत एक अन्नार्थी, अति वृद्ध ब्राह्मण बसला होता. तो इतका वृद्ध होता कीं, चालतांना त्याचा झोक जाई. फुंकाऱ्यासरसा जमिनीवर पडेल, इतका तो कृश होता. त्या वृद्धाकडे बोट दाखवून श्रीसमर्थ ब्राह्मणास म्हणाले, " भोजन होऊन या वृद्धानें हात धुतले कीं, तूं त्याचे पाय घट्ट धर, सोडूं नकोस, भिऊं नकोस, तुला मारुतिरायाचें दर्शन घडेल. "

ब्राह्मणानें त्याप्रमाणें केलें. " हें काय, माझे पाय सोड, " अशी त्या वृद्धानें काकुळती केली. ब्राह्मण पाय सोडीना. लोक गोळा झाले. त्यांनीं सांगून पाहिलें. ब्राह्मण ऐकेना. मग

**रात्रीचें काळोखें भरलें । लोक वोसरोनि गेले ।**
**अतिवृद्धानें झिंजाडिलें । तया ब्राह्मणासी ॥**
**पाहे तो पिंगळाक्ष भयंकर । दीर्घलांगूल करी गुर्गुर ।**
**धांवोनि धरिला द्विजवर । गुर्गुरीत रोषें ॥**
**इतुकें होतां चि तत्क्षणीं । समर्थ गेले पर्वतवनीं ।**
**भीम म्हणे ब्राह्मणालागूनि । छळिलें माझ्या सख्यासी ॥**

—रामसोहळा, १, ९, ७५–७७

असें बोलून, वृद्धाचें रूप धारण केलेल्या मारुतीनें ब्राह्मणाच्या मस्तकीं अभयकर ठेवून, श्रीसमर्थांना शरण जाण्याची त्यास आज्ञा केली.

## ( ३८ ) अण्णाजी बाबा

एकदां मठांत वसंतपूजेचा समारंभ झाला. समर्थांनीं आज्ञा केली होती कीं, आधीं इतर सर्वांची पूजा होऊं द्या, शेवटीं आपली. आण्णाजी बाबांच्या लक्षांत ती आज्ञा न राहिल्यामुळें ते समर्थांच्या पुढें पूजेला बसले. समर्थांनीं आपली पूजा होऊं दिली व आण्णाजी नमन करून जाऊं लागले, तों त्यांचा हात धरून त्यांना खालीं बसविलें व आपण त्यांची पूजा केली आणि आपल्या कंठींचा हार त्यांच्या गळ्यांत घातला. आण्णाजी बाबा आनंदले. दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळ झाला, स्नानाला मंडळी निघाली, आण्णाजी बाबा स्नान करीनात, मुसमुसत राहिले. कोणीं जाऊन समर्थांना कळविलें. समर्थांनीं त्यांस बोलावून विचारिलें, " कां रे बाबा, काय झालें ? " आण्णाजी म्हणतात, " आपण ही माझी केलेली पूजा पाण्यानें वाहून जाईल, म्हणून वाईट वाटतें. " समर्थ म्हणाले, " तसें होणार नाहीं, उलट तुझा कीर्तिपरिमळ सर्वत्र पसरेल. "

**ऐकोनि ऐसा सद्गुरुवर । तुष्टोन केला नमस्कार ।**
**हरुषानंदीं जाला निर्भर । दुसरे दिवसीं गुरुरायें ॥**
**मेखळा शाटी दासबोध । कांठी झोळी निशाण बिरुद ।**
**वोपूनि धाडितां गेला आनंदें । महंतीविभव साधावया ॥**

—दासविश्रामधाम, ६६, ४२–४३

हे च नीलंगेमठाचे अधिपति आण्णाजी बाबा होत.

## ( ३९ ) दादाजी आणि त्यांच्या पत्नी यांची श्रीगुरुचरणीं अपूर्व निष्ठा

चाफळास स्वतःच्या अंगमेहनतीनें मंदिर उभारावयाचें श्रीसमर्थांनीं ठरविलें आणि किती तरी शिष्य मेहनत करण्यास चहूंकडून गोळा झाले. इतक्यांचा खर्च भागवावयाचा, म्हणून गांवोगांवीं जाऊन भिक्षा आणण्याच्या कामावर कित्येकांची नेमणूक झाली. शिवाय इतरत्र राहणाऱ्या कांहीं शिष्यांकडे मदत मागण्यासाठीं श्रीसमर्थ कोणाकोणास पाठवीत असत. त्याप्रमाणें साताऱ्यास कोणी दादाजी म्हणून त्यांचे एक शिष्य होते, त्यांच्याकडे त्यांनीं एकदां कल्याणांना पाठविलें.

दादाजी हे शिवाजीराजांच्या नोकरींत होते, पण ते श्रीसमर्थांचे अनुग्रहित आहेत, हें राजांना ठाऊक नव्हतें. ते सात्विक वृत्तीचे, सरळमार्गी गृहस्थ होते. पण अशांचा च अकारण द्वेष करणारे पुष्कळ असतात, असा जगाचा नियम दिसतो, त्याप्रमाणें त्यांचा द्वेष करणाऱ्या त्यांच्या वैऱ्यांनीं त्यांच्यावर कांहीं तोहमत आणल्यामुळें ते या वेळीं अटकेंत पडले होते. नेमकें जणूं अशा वेळीं त्यांच्यापाशीं साहाय्य मागण्यासाठीं श्रीसमर्थांनीं कल्याणांना पाठविलें. कल्याण साताऱ्यास पोंचले, तेव्हां त्यांना कळलें कीं, दादाजी अटकेंत आहेत. तेथें जाऊन कल्याणांनीं त्यांची भेट घेऊन नुसतें म्हटलें कीं, "समर्थांनीं मला तुमच्याकडे पाठविलें आहे," तों च

**तो नमोन पुसे जी दीनरक्षका। मम स्मरण आलें कीं श्रीमोक्षदायका।**
**केव्हां धणीवरी पाहेन सखा। म्हणोनि प्रेमानें उलंडला॥**

**अश्रुपाताचा चालिला लोट। न सांवरे प्रेमा दाटला कंठ।**
**ध्यानीं रत जाला अंतर्निष्ठ। देहावरी न ये चि॥**

— दासविश्रामधाम, ५१, ५६–५७

दादाजींचें हें गुरुप्रेम पाहून कल्याण हि चकित झाले. अशा गुरुभक्ताच्या चरणीं मस्तक ठेवावें, असें त्यांच्या मनांत आलें. कल्याण हळू च म्हणाले, "खर्चास्तव कांहीं द्रव्य पाहिजे म्हणून मला श्रीगुरुरायांनीं आपणांकडे पाठविलें आहे. पण तुमची ही अशी स्थिति आहे." दादाजी भानावर आले होते, त्यांनीं कल्याणांचे शब्द ऐकले, ते कल्याणांस म्हणाले, "कृपा करून

मजसाठीं एवढें करा, माझ्या घरापर्यंत जा, घरांत माझी पत्नी असेल, तिला हा श्रीसमर्थांचा निरोप सांगा आणि ती जें कांहीं देईल तें घेऊन जा." कल्याण त्या साध्वीकडे गेले आणि म्हणाले, "मंदिराच्या कामासाठीं कांहीं द्रव्याची मदत मागण्यासाठीं मला श्रीसमर्थांनीं दादाजींच्याकडे पाठविल्यावरून आलों होतों, ते तर असे अटकेंत आहेत, तथापि त्यांना भेटलों, त्यांनीं मला श्रीसमर्थांचा निरोप आपणांस कळविण्याचें सांगितल्या-वरून आपणांकडे आलों आहें." समर्थांचा निरोप आणि पतीची आज्ञा ऐकून ती स्त्री आनंदली, पण द्यावयाला होतें च काय घरांत! "थांबा, बसा, देतें" असें कल्याणांस म्हणून ती साध्वी आंत गेली, अंगावर सोन्याचांदीचें जें किडुकमिडुक होतें, तें उतरून त्याची पुरचुंडी केली आणि ती कल्याणांच्या पुढें ठेवून म्हणाली, "घेऊन जा ही आणि श्रीचरणीं अर्पण करा." ती पुरचुंडी घेऊन कल्याण चाफळास जाण्यास निघाले.

या च सुमारास श्रीशिवरायांचें तीर्थ संपलें होतें. त्यांचा तर कडक नियम होता कीं, श्रीगुरुपादोदक तीर्थ घेतल्यावांचून अन्नग्रहण करावयाचें नाहीं. तशांत श्रीसमर्थांची आज्ञा होती कीं, "आम्हीं बोलाविल्यावांचून कांहीं काळ येऊं नये." तेव्हां काय करावें, असा प्रश्न पडला. कोणीं सुचविलें कीं, "फडांतील कारकून दादाजी यांच्या संग्रहीं तीर्थ असतें, तें घेण्यास हरकत नसेल तर, तें आणवून घ्यावें." दादाजी कोण, कोठें आहेत, विचारतां कळलें कीं, ते अटकेंत आहेत. गुरुबंधु आणि अटकेंत, हें ऐकून राजे कष्टी झाले. तत्काळ हुकूम झाला आणि दादाजींना आणण्यास माणसें रवाना झालीं. दादाजींना बाहेर काढलें, तर त्यांनीं थेट चाफळचा च रस्ता धरला. त्यांनीं शपथ घेतली होती कीं, श्रीसमर्थदर्शनावांचून अन्नपान करावयाचें नाहीं. त्यांच्या पत्नीला हें वृत्त कळलें, तर ती हि घरून निघून चाफळच्या च वाटेला लागली.

पुरचुंडी श्रीसमर्थांपुढें ठेवून कल्याण हकिकत सांगत आहेत, तों च दादाजी येऊन पोंचले आणि त्यांच्या पाठोपाठ त्यांची स्त्री हि येऊन दाखल झाली. राजांना हि येण्याविषयीं संदेश गेला होता. ते हि या च वेळीं आले. आपलें सर्वस्व अर्पण करणाऱ्या त्या पतिव्रतेची आणि दादाजींची ही निष्ठा पाहून राजे आणि इतर सर्व शिष्यमंडळी यांच्या भावना कशा

उद्दीपित झाल्या असतील आणि त्या सर्वांना त्या दंपत्याविषयीं किती कौतुक वाटलें असेल, याची कल्पना, नेत्र सजल न होतां, करूं शकाल काय, असें मी वाचकांस विचारतों.

## ( ४० ) बाबाजीच्या एकशें एक मोहरा

### भोजनें व एक प्रत्यंतर

श्रीएकनाथमहाराजांचे नातू बाबाजीपंत कर्नाटकांत उद्योगधंदा करून धन मिळविण्यासाठीं गेले होते. एकशें एक मोहोरांची माया मिळवून परत येत असतां, मार्गांत श्रीसमर्थांचें दर्शन घ्यावें, या हेतूनें ते चाफळास आले. समर्थांचा लौकिक त्यांच्या कानांवर आलेला होता. समर्थ त्या वेळीं कल्याणासह कृष्णातटाकीं एका जाळींत रहात असल्याचें कळल्यावरून बाबाजी तिकडे गेले. त्या च सुमारास तळघाटदेशीं कोणा श्रीमंताच्या लग्नाला गेलेले शंभर ब्राह्मण त्या च मार्गानें परत चालले होते. त्यांच्या हि कानांवर समर्थांचें नांव गेलेलें होतें. समर्थ म्हणवितात, तेव्हां पहावें काय सामर्थ्य त्यांच्यांत आहे, असें ब्राह्मणांच्या हि मनांत आलें. सर्व जण समर्थांच्या दर्शनास गेले. निरोप घेत असतां, समर्थ म्हणाले, “ दुपारची वेळ आहे, भोजन केल्यावांचून जाऊं नका, कृष्णेवरून स्नानें वगैरे करून येतां तों इकडे भोजनाची सर्व तयारी होईल.” ब्राह्मण आश्चर्य च करीत राहिले. त्यांना वाटलें, हीं दोन च माणसें आणि आम्ही शंभर ब्राह्मण, शिवाय गडीमाणसें आणि या इतक्यांना हे भोजन कोठून घालणार! पाहूं या चमत्कार, असा विचार करून ब्राह्मण बाबाजीसह कृष्णेवर स्नानास गेले.

श्रीरामकांता जगज्जननी सीतामाई म्हातारीचें रूप घेऊन स्वयंपाकास आल्या होत्या. मग स्वयंपाकास काय उशीर आणि कमी तरी काय !

ब्राह्मण स्नानसंध्यादि उरकून येतात, तों इकडे सर्व सिद्धता झाली होती. सोन्यारुप्याचीं फुलें जडविलेले एकशें एक पाट हारीनें मांडले होते. केळीचीं पानें होतीं, रांगोळ्या घातल्या होत्या, प्रत्येक पात्रापुढें पांच पांच चांदीच्या वाट्या, वाढणें झालें होतें, उदबत्त्या लावल्या होत्या, ब्राह्मण येऊन बसले, केशरी गंध आणि कस्तुरी अक्षता हीं लावण्यांत आलीं आणि हर हर महादेव गर्जना झाली. सीतामाईच्या हातचा तो स्वयंपाक ! ब्राह्मण

एकमेकांना म्हणूं लागले, " असें भोजन जन्मांत कोठें मिळालें नव्हतें, यांत आणखी दक्षणा मिळेल तर विशेष च म्हणावयाचें." समर्थांनीं बाबाजीच्या च मोहोरा घेऊन शंभर ब्राह्मणांना एक एक मोहोर व उरलेली एकशें एकावी बाबाजीला दक्षणा दिली. सर्वांचें भोजन झालें, सर्वांना विडे दिले, गडीमाणसें जेवलीं, घोड्यांचा दाणा चारा झाला. रात्रौ समर्थांचें कीर्तन झालें. सर्व जण संतुष्ट झाले.

दुसरा दिवस उजाडला. बाबाजीसह सर्व ब्राह्मण जाण्यास सिद्ध झाले, पण मोहोरांची गोष्ट समर्थ हि काढीनात आणि बाबाजीला हि काढवेना. बाबाजी कष्टी मनानें मार्गस्थ झाले. गांवीं पोचले. वडील आणि मातु:श्री यांनीं स्वागत केलें. तथापि बाबाजी बोलेनात, कष्टी होऊन बसले, तेव्हां वडील म्हणाले, " कां रे बाबा असा कष्टी? एकशें एक मोहोरा काय थोड्या झाल्या?" बाबाजी विचारतात, " कुठल्या एकशें एक मोहोरा?" " अरे, आतां च तुझा तो माणूस आला होता, त्यानें सांगितलें, ' बाबाजी पाठोपाठ येत च आहेत, त्यांनीं आपणाजवळ सांभाळण्यासाठीं मोहोरा दिल्या होत्या, त्या घ्या.' मीं त्यास ' थांब ' म्हटलें, पण ' मला आणखी कामें आहेत,' असें म्हणून व मोहोरा देऊन तो गेला." बाबाजी तरकले, सद्गदित होऊन विचारतात, " तो माणूस कसा होता?" वडील म्हणतात, " काय सांगूं?

**साजिरी मूर्ति ते देखिल्यापासूनि । जडोन ठेली असे रे नयनीं ।**
**न बैसतां प्रार्थितां हि आंगणीं । उभ्यां उभ्यां ममतेनें बोलिले ॥**

पायीं पादुका होत्या, हातांत छडी होती, हुर्मुजी वस्त्रें परिधान केलेलीं होतीं." हें ऐकून बाबाजींच्या मनाची काय अवस्था झाली असेल!

अशा गोष्टी, तीन चार ठिकाणच्या, श्रीसमर्थचरित्रांत वर्णिलेल्या आढळतात. रामघळींत, तारळखोऱ्यांत, माहुलीच्या रानांत, कुठल्या तरी डोंगरांत, कृष्णेच्या आणि कोयनेच्या कांठीं, ब्राह्मणांना, पांथस्थांना, शिवाजी राजांना, त्यांच्या सैनिकांना श्रीसमर्थांनीं अशा प्रकारें भोजनें घातलीं होतीं. त्या भोजनांचीं वर्णनें वाचलीं म्हणजे, बंगाल्यांतील श्री. सुरेन्द्रनाथ सेन यांनीं '**परकीयांनीं लिहिलेलीं शिवाजीचीं चरित्रें**' म्हणून जो बहुमोल ग्रन्थ इंग्रजींत प्रसिद्ध केला आहे, त्यांतील कॉस्मे ड

गार्डा या लेखकानें इ. स. १६९५ त लिहिलेल्या श्रीशिवचरित्रांत ज्या **रामजी** नांवाच्या महंताचें व त्याच्या व्यापक संस्थेचें वर्णन आहे, ते रामजी म्हणजे

**श्रीरामजी जयरामजी जयजयरामजी ।**
**तारक तुजविण न दिसे दुसरा पूर्ण करी मनकाम जी ॥**

असें भजन करणारे रामदास च होत व त्यांची संस्था म्हणजे त्यांच्या मठांचा आणि संप्रदायाचा व्याप होय, याविषयीं शंका रहात नाहीं. शाइस्तेखान पुरंदरभागांत आल्याचें वर्णन करीत असतां गार्डानें, मध्यें च थोडेंसें विषयांतर करून रामजी नांवाच्या एका सत्पुरुषाची माहिती दिली आहे. ती अशी :

## **शिवाजी** आणि **रामजी**

" या भागांत एक फार प्रचंड संस्था आहे तिचा उल्लेख या ठिकाणीं जरूर केला पाहिजे. संस्थेचा अधिकार विस्तृत भूभागावर चालत असून संस्थेचे अधिपति एक ब्राह्मण थोर गृहस्थ आहेत. बाहेर अनेक लढाया चालू असल्या तरी या संस्थेंत कोणा हि सैनिकानें केव्हां हि जावें आणि शांततासौख्य भोगावें. सैनिक मुसलमान असो अगर हिंदु आणि हिंदूंपैकीं कोणत्या हि जातीचा असो, त्यास तेथें मुक्तद्वार असतें. बाहेरचे सारे विरोध या ठिकाणीं मावळतात, असा या संस्थेचा अधिकार आहे; आणि म्हणून च ही संस्था साऱ्या हिंदुस्थानचा दवाखाना होऊन बसली आहे. जो कोणी त्या संस्थेंत जातो, मग तो कोणी हि असो, त्यास तेथें अन्न आणि राहण्यास जागा हीं सुखानें मिळतात. त्यानें तेथें वाटेल तितके दिवस रहावें. या मठपतींचें म्हणणें च असें आहे कीं, परमेश्वर कित्येकांना संपत्ति देतो ती इतरांच्या सुखसोयीसाठीं दिलेली असते. आणि आपली सर्व दौलत रंजल्यागांजल्यासाठीं आहे, अशा भावनेनें च मठपति वागत असतात. ही त्यांची वृत्ति असामान्य असल्यामुळें सर्व देशभर त्यांच्या विषयीं अत्यंत आदरभाव आहे. या भागांतून वारंवार लष्कर जातें, त्या सर्वांना, जगांत हा एक च अवतारी पुरुष आहे, असें वाटतें. या भागांत अनेक जाती आहेत व एकाच्या हातचें दुसऱ्याला चालत नाहीं, म्हणून मठांत सर्व जातींचे आचारी ठेवले आहेत. मठपतीनें

आपले जणूं हेर सर्वत्र विखरलेले आहेत कीं, मठाला डावलून कोणीं जाऊं च नये. शिवाजी राजे प्रथम जेव्हां या भागांतून गेले, तेव्हां ते मठांत आले नव्हते, म्हणून महंतानें त्यांच्याकडे सर्व प्रकारची शिधासामुग्री पाठवून त्यांचें आदरातिथ्य केलें होतें. त्याबरोबर महाराजांस निरोप हि पाठविला होता कीं, 'आपल्या आदरातिथ्यांतून, राव असो रंक असो, कोणी च सुटत नाहीं, तरी शिधासामुग्रीचा स्वीकार व्हावा, आपण सर्व च जण गरीब आहोंत, म्यां तरी हें कोठून आणलें आहे, आम्ही काय कुणाचें खातों, तो राम आम्हांला देतो, तें माझ्या एकट्यासाठीं नसून सर्वांसाठीं असतें.' या महंताचें नांव रामजी आहे. त्याजवर ईश्वराची पूर्ण कृपा आहे. त्याचा दानधर्म वाया जाणार § नाहीं."

अशी मनोरंजक हकिकत मध्यें च सांगून "असो, आतां आपण पुन्हां आपल्या विषयाकडे वळूं" असें म्हणून गार्डानें शाइस्तेखानाची हकिकत पुढें चालविली आहे. मला आनंद असा वाटतो, गार्डानें हें विषयांतर जणूं आपल्या साठीं च करून ठेवलें होतें ! या त्याच्या उताऱ्यांत वर्णन केल्याप्रमाणें श्रीसमर्थचरित्रांत शब्दशः गोष्टी घडलेल्या पाहून मला तिळमात्र शंका उरली नाहीं कीं, गार्डाच्या कानांवर श्रीसमर्थांचें चरित्र गेलें होतें व या उताऱ्यांत तो तें च वर्णन करून सांगत आहे. श्रीसमर्थ आणि श्रीशिवराय यांच्या परस्परसंबंधाच्या बाबतींत हें एक प्रत्यंतर आपणांस अकल्पित मिळत आहे.

## ( ४१ ) गोटे दक्षिणा दिली

एकदां कांहीं पर्वकाळ आला असतां, कोणास न कळवितां श्रीसमर्थ स्नानार्थ माहुलीस गेले होते. राजाचे गुरु, तेव्हां बरी च दक्षिणा मिळेल, या आशेनें संकल्प सांगण्यास ब्राह्मण त्यांच्याकडे धांवत गेले. "करा आचमन" म्हणाले. संकल्पाच्या पलीकडे गेलेल्या समर्थांना संकल्पाची काय आवश्यकता होती ? पण ब्राह्मण्याचा अभिमान आणि कर्माचरणाची आवड असल्यामुळें ब्राह्मणांनीं सांगितलें तसें तसें सर्व कांहीं त्यांनीं केलें.

---

§ पहा Foreign Biographies of Shivaji, Pp. 60–61 व रामदासी मालेंतील एकुणतिसावा भाग – श्रीरामदासीचीं ऐतिहासिक टिपणें – टिपण तिसरें.

नंतर स्नान केलें. संकल्प सांगितला होता त्या ब्राह्मणानें व त्याच्या बरोबर इतर हि ब्राह्मणांनीं दक्षिणा मागितली. यांच्या जवळ देण्याला काय होतें ? तेव्हां त्यांनीं कृष्णामाईचें स्तवन मांडलें, "बाई, मी तुझ्या उदरा आलों आहें, माझ्या सर्व तृष्णांचें तूं निरसन केलें आहेस, मला कांहीं नको, पण हे ब्राह्मण दुरून आशेनें आले आहेत, त्यांचा संतोष होईल, असें कांहीं कर." अशी कृष्णेची प्रार्थना करून, बुड्या मारून, हाताला लागतील तसे गोटे, पावशेर, अच्छेर, सव्वा शेर, अधिकउणे दोन दोन शेर वजनाचे गोटे काढले आणि एक एक गोटा एक एका ब्राह्मणाला दिला. समर्थांसारख्यांनीं ही काय आपली अशी चेष्टा करावी, असें वाटून जे अभाविक ब्राह्मण होते, त्यांनीं ते गोटे रानांत भिरकावून फेकून दिले, पण त्यांत जे थोडे भाविक होते, त्यांनीं विचार केला कीं, या गोट्यांना श्रीसमर्थांचा हात लागला आहे, त्यांचा हात म्हणजे परिस च, शिवाय त्यांनीं दक्षिणा म्हणून हे गोटे आपणांस दिले आहेत, तेव्हां आपण हे घरीं नेऊन देवांत ठेवून त्यांची नित्य पूजा करूं. त्यांनीं त्याप्रमाणें केलें. दुसऱ्या दिवशीं ते पाहतात तों गोट्यांचें सोनें झालें होतें. ज्यांनीं गोटे फेकून दिले होते, त्यांना हें कळलें. ते धांवत कृष्णेवर, फेकून दिलेले गोटे आणण्यास गेले. ते आधीं च गुराख्यांच्या पोरांनीं लांबविले होते. हे त्या पोरांशीं भांडूं लागले. तीं पोरें थोडीं च यांना दाद देणार ? कपाळाला हात लावून अभाविक ब्राह्मण परतले आणि गडावर समर्थांकडे जाऊन पुन्हां गोटे मागूं लागले. श्रीसमर्थ म्हणाले, "ती वेळ गेली, तो पर्वकाळ गेला, तो प्रसंग गेला." तथापि दया येऊन एक एक होन त्यांना देऊन समर्थांनीं त्यांना वाटेला लावलें.

## (४२) बुडणारें जहाज तारलें

ज्या सौदागराचें जहाज बुडत असतां त्याचा धांवा ऐकून समर्थांनीं तारलें तो सौदागर आपल्या ओळखीचा आहे. श्रीसमर्थ पिसाटवृत्तींत असतां यानें च त्यांना ढकलून दिलें होतें, पण त्यांचा पाय लागल्यानें लोखंडाचें सोनें झालेलें पाहून हा त्यांच्या चरणीं लीन झाला होता. त्याचें जहाज तारल्याची कथा अशी आहे :

कोणी एकानें श्रीसमर्थांना बुद्धिबळाचा संच अर्पण केला होता. एकदा मौनीबाबा आणि समर्थ यांनीं त्यांचा डाव मांडला. नेहमीं अरण्यांत काळ कंठणारे बुद्धिबळाचा खेळ खेळतांना पाहून भोंवतालच्यांना आश्चर्य वाटलें. आरंभीं निर्बळी खेळ खेळले आणि मग बळी खेळ सुरू केला. तो संपतां संपेना. खूण ठेवून उठावें व फुरसत झाली कीं पुन्हां सुरू करावा. असा एक च डाव सात दिवस चालला. पुरे करावा म्हणून दोघे हि बोलत आहेत, तों एक ब्रह्मयोगी येऊन म्हणाला, "स्वामी, आपल्या ह्या आनंदांत तिकडे सौदागराचें जहाज समुद्रांत बुडत आहे, तो विलपत आहे, नवस करीत आहे, त्याची वाट काय?" समर्थांनीं अंतर्ज्ञानानें पाहिलें, आरडाओरड ऐकिली आणि मौनीबाबास म्हणाले, "तुम्ही एवढें संकट दूर करा." समर्थांचें हें एक धोरण च होतें—

**दासरायाचा ऐसा हो दंडक। ज्या कार्या योग्य जे असती सन्मुख।**
**त्यांचेनि करविती तें काम निःशंक। वोपिती गौरव बहुतांसी॥**

— दासविश्रामधाम, ९३, ८५

याप्रमाणें मौनीबाबावर कामगिरी सोंपविली, पण स्वतः आपण थांबले नाहींत, आपण हि गेले. जहाज सुरक्षित कडेला लावून दोघे हि परत आले. गडावर जमलेल्या सर्वांना प्रत्यक्ष प्रत्यय आला. मौनीबाबाचें मुख लाल झालें होतें, समर्थांची मेखळा क्षारोदकानें भिजली होती. कांहीं दिवसांनीं तो सौदागर हि नवस फेडण्यासाठीं अलोट द्रव्य घेऊन आला. त्यानें तें समर्थांपुढें ठेवलें. समर्थ म्हणाले, "हें द्रव्य घेऊन आम्हांस काय करावयाचें आहे रे, तूं च त्याचा विनियोग परोपकारार्थ कर, गोरगरिबांना साहाय्य कर, पात्रापात्र पाहून दान कर!" याप्रमाणें

**समर्थें हनुमानसामर्थ्य किंचित दाखविलें।**
**समुद्रीं जहाज बुडतां जाऊनि धरिलें।**
**आंग पुसावया धोत्र आणविलें।**
**तेव्हां संतसज्जनासी कळलें हे जगदोद्धारी॥**

— श्रीसमर्थप्रताप, १९, ६

## (४३) मंत्रांत फरक

सद्गुरूपासून घेतलेल्या मंत्रांत कोणा हि शिष्याला फरक करण्याचा अधिकार नसतो, हें उघड आहे. असें असतां श्रीसमर्थशिष्य कण्हेरीकर

वासुदेवबावा यांच्या मनांत विकल्प उत्पन्न झाला. त्यांना वाटलें श्रीसमर्थांचा त्रयोदशाक्षरी मंत्र तर चव्हाट्यावर आला, तो जगजाहीर झाला आहे. वाटेल तो, तो जपत असतो, त्याला न्यासादिकाचा कांहीं अटकाव नाहीं, असला मंत्र काय कामाचा, त्यांनीं आपला निराळा च मंत्र तयार केला आणि आपल्या सर्व शिष्यांना तो देत गेले; तरी स्वतःला श्रीसमर्थ-सांप्रदायी च म्हणवीत. वासुदेवबावा महान् पंडित होते, चतुर, निष्ठावंत होते, त्यांनीं मंत्रांत असा फरक करावयास नको होता. मंत्राक्षरें सर्वांना विदित झालेलीं असलीं, तरी काय बिघडतें. गुरुमुखावांचून मंत्र जपणें निष्फळ होय.

वासुदेवांनीं मंत्रांत फरक केल्याचें समर्थांच्या कानांवर गेलें. येत्या उत्सवाला आपल्या समुदायासह यावें, म्हणून त्यांनीं वासुदेवांना निरोप पाठविला. त्याप्रमाणें ते आले. नवमी आणि पौर्णिमा झाली. दोन्ही उत्सव झाले. यात्रेकरू गेले. आपल्या सर्व सांप्रदायिकांना समर्थांनीं मागें ठेवून घेतलें होतें. मग एके दिवशीं आज्ञा केली कीं, आज महारुद्राजवळ नैवेद्य होईल, परंपरेनें आपले उपदेशी असतील, तेवढ्यांनीं च तिकडे यावें, इतरांचा नैवेद्य मठांत च व्हावा. त्याप्रमाणें सर्व सांप्रदायिक महारुद्राजवळ जमले. त्यांत वासुदेवबावा आपल्या समुदायासह होते च. सर्व जण आसनस्थ झाले. शांतता पसरली. मग सर्वांच्या कडे कृपावलोकन करून श्रीसमर्थ म्हणाले, “ आतां येथें इतर तिऱ्हाईत कोणी नाहींत, आपले आपण च आहोंत, तेव्हां आपण सर्व जण मिळून सावकाश, मंजुळ स्वरानें मंत्रघोष करूं. सर्वांना सावध करून म्हणूं लागले तों वासुदेवबावाच्या मंडळींत भेद पडला, निराळा सूर निघाला. वासुदेव दचकले. श्रीसमर्थ अत्यंत कडक शिस्तीचे भोक्ते होते. मंत्रांत बिघाड केलेला पाहून समर्थांना क्रोध चढला, त्यांनीं बावास स्वहस्तें ताडन केलें—

**म्हणतिलें काय रे कापट्य पोटीं । जालासी वेगळा पडोन परमठीं ।**
**भुललासी कुसंगें मानासाठीं । सत्य गुरुधर्मा अव्हेरूनि ॥**

**नाडोन आपणु दुजयासी बुडवणें । रे वंचका कां गुरुक्रमासी त्यजणें ।**
**विद्यामदानें धरिसी अभिमान । म्हणोन काष्ठानें बडविती ॥**

—दासविश्रामधाम, ९०, ८३–८४

वासुदेवबावास मरणप्राय दुःख झालें. ते कल्याणस्वामींच्या पायांवर जाऊन पडले. म्हणाले, "मला तारा, मी तर भ्रष्टलों च, पण माझ्यामुळें इतर हि कित्येक भ्रष्टले." कल्याण कळवळले, म्हणाले, "तुमच्या हातून चुकी होऊं नये, ती झाली, पण आतां तुम्ही जाऊन श्रीसमर्थांचे च पाय धरा, ते कृपा करतील, ते दयाळु आहेत." "मला भीति वाटते, तुम्ही च कृपा करून मध्यस्थी करा," अशी वासुदेवबावांनीं कल्याणांना गळ घातली.

श्रीसमर्थ प्रसन्न असतील, तेव्हां गोष्ट काढावयाची, असें कल्याणांनीं ठरविलें. वासुदेवबावांवर आलेला प्रसंग पाहून श्रीवेणाबाईंना हि वाईट वाटलें. एका गुरुबांधवावरील संकट, तें सर्वांवर च होय. वेणाबाईंनीं हि श्रीसमर्थांपाशीं रदबदली केली. आम्ही कसे हि असलों, तरी आपले म्हणवितों, आपण आमचे अपराध पोटांत घालून क्षमा केली पाहिजे.

**आम्ही तुझी तुझी तुझी पावना ॥ ध्रु०**
**सुष्ट हो दुष्ट किं नष्टकु जरी तरी ॥ १**
**भाव अभाविकु भाविकु जरी तरी ॥ २**
**हीन दीन अपराधी अपराधी वेणी परी ॥ ३**

कल्याणांनीं हि, वेळ पाहून समर्थांपाशीं गोष्ट काढली. समर्थ म्हणाले, "जा, त्याला शुद्ध करून घेऊन या." त्याप्रमाणें कल्याणांनीं

**मग नमोन गुरुदेवा, वासुदेवासी । नेवोन कृष्णाडोहतीरासी ।**
**बुडोन पैलाडी ऐलाड तीरासी । आणिलें काखेंत धरूनि ॥**
**स्नान करवोनि शुद्ध सोवळ्यानें । आणोन गुरूनें करविलें दर्शन ।**
**तो सद्भावें घालितां लोटांगण । ऊठ बा नाभि म्हणतिलें ॥**

— दासविश्रामधाम, १०, १४४–१४५

याप्रमाणें श्रीसमर्थांनीं वासुदेवबावांवर पुनरपि कृपा केली. त्यांचे जे शिष्य होते, त्यांना हि बोलावून आणलें व वासुदेवबावांकडून च त्यांना उपदेश करविला.

याला प्रतापकारांची हि साक्ष आहे.

**कोण्ही येक महंतें मंत्रभेद केले । समर्थें येकांतीं वेत्रें ताडिले ।**
**मूळमंत्राविरहित जे शिष्यसमुदाय जाले । ते ते भ्रष्टले मतांतरें ॥**

— श्रीसमर्थप्रताप, ७, ३५

## ( ४४ ) मंत्रांत कमी जास्ती

( १ ) नानाजी म्हणून श्रीसमर्थांचे शिष्य होते. त्यांना एक शूद्र शरण आला असतां त्याला सबंध त्रयोदशाक्षरी मंत्र न सांगतां त्यापैकीं चार च अक्षरें निवडून तो मंत्र सांगितला.

( २ ) दुसरे एक रामगोसावी म्हणून शिष्य होते, त्यांनीं त्रयोदशाक्षरी मंत्राला न्यास आणि ध्यान यांची जोड दिली.

या दोन्ही गोष्टी श्रीसमर्थांना समजतां च त्यांनीं त्यांचा निषेध केला. मंत्रांत असा फरक करणें चूक आहे. कोणी मंत्राला आधीं प्रणव जोडतात. तें हि विहित नव्हे.

## ( ४५ ) मंत्र परत केला

राजयोगाच्या काळांत श्रीसमर्थांच्या बरोबर दहा वीस शिष्यांचा मेळा असे व प्रत्यहीं कोठें ना कोठें तरी पुडी लागत असे, सन्मानपूर्वक थाटामाटाचें भोजन होत असे. एका दरिद्री ब्राह्मणानें हा नित्याचा थाट पाहून मनांत आणलें कीं, आपण हि श्रीसमर्थांपासून मंत्र घेऊन त्यांच्या परिवारांत प्रविष्ट व्हावें. ब्राह्मणानें श्रीसमर्थांपाशीं गोष्ट काढली. त्यांनीं त्याचा भाव ओळखला. त्यास मंत्र दिला आणि दुसरे दिवशीं परिवारासह ग्रामांतराला निघाले. ब्राह्मण हि बरोबर चालला. त्या संचाराचा थाट कांहीं निराळा च होता. रोज शिष्यांनीं कोरडी भिक्षा मागून आणावी, पाण्याच्या आश्रयानें कशी तरी शिजवावी आणि गुजराण करावी. भोजनभाऊ ब्राह्मण पस्तावला आणि समर्थांना कांहीं तरी सबब सांगून आपल्या गांवीं परत गेला. तो तेथें एका धनिक हरिदासांचा तळ पडला होता व त्यांचा थाट चालला होता. त्या अभागी ब्राह्मणाला वाटलें, हें ठिकाण बरें आहे, त्याच्यांत सामील व्हावें. ब्राह्मणानें हरिदासांजवळ गोष्ट काढली. “ तुम्हीं पूर्वीं कोणापासून मंत्र घेतला आहे काय ? ” असें हरिदासांनीं विचारिलें. यानें सांगितलें. “ मग जा, त्यांचा मंत्र परत करून या, म्हणजे मग तुमचा स्वीकार करतों.” ब्राह्मण समर्थांकडे गेला आणि “ आपला मंत्र परत घ्या, ” म्हणाला. समर्थ म्हणाले, “ ठीक, चूळ भरा आणि ती त्या दगडावर टाका, म्हणजे मंत्र परत येईल.” त्या पाप्यानें तसें केलें, आणि दगडावर मंत्राचीं त्रयोदश अक्षरें उमटलीं,

पण ब्राह्मणाची वाचा गेली ! ब्राह्मण गेला हरिदासांकडे. हरिदास म्हणाले, "मूर्खा ! हें काय केलेंस ?" हरिदास आणि तो ब्राह्मण, दोघे हि श्रीसमर्थांकडे जाऊन कृपा भाकिते झाले. समर्थांना दया आली, दगडावर उमटलेलीं अक्षरें चाटावयास त्यांनीं ब्राह्मणास सांगितलें. ब्राह्मणानें अक्षरें चाटलीं, तशीं तीं अक्षरें गेलीं आणि याची वाचा आली. हरिदासानें हि श्रीसमर्थांचा अनुग्रह घेतला. समर्थांनीं त्याचें नांव जसवंत ठेवलें आणि तो धोंडा कल्याणाकडून आणवून चाफळच्या देवालयाच्या पायांत घातला.

सर्व चरित्रकारांनीं, थोड्या फार फरकानें, ही गोष्ट सांगितली आहे. श्रीदासविश्रामधामाच्या विसाव्या सर्गांत ती आहे व श्रीसमर्थप्रतापांत एका च ओवींत ती ध्वनित केलेली आहे :

**समर्थें अभाविकांचीं मंत्राक्षरें सांडविलीं ।**
**कर्णांतूनि हस्तावरी वोतिविलीं ।**
**प्रत्यक्ष राममंत्राक्षरें दाखविलीं ।**
**संतसज्जना कृष्णातीरीं ॥**

— श्रीसमर्थप्रताप, १९, ६८

## ( ४६ ) श्रीसमर्थ आणि रंगनाथ यांची भेट

श्रीसमर्थ आणि रंगनाथ यांची प्रथम भेट अरण्यांत झाली. ऐकून परस्परांची माहिती एकमेकांना होती. श्रीसमर्थ पूर्ण विरक्त आणि त्यागी, तर रंगनाथांचा थाट राजयोग्याचा. एका हातांत कुबडी आणि दुसऱ्या हातांत माळ व शरीरावर वस्त्र म्हणजे नुसती कौपीन, क्वचित् खांद्यावर व्याघ्रांबर, असें समर्थांचें स्वरूप असावयाचें, तर याच्याहून अगदीं भिन्न रंगनाथांची स्थिति असावयाची. अंगावर उंची उंची वस्त्रें, हातांत तीरकमटा आणि ते बहुधा घोड्यावर असावयाचे. समोर हुद्देदार आणि मागें शिष्य, घोड्यामागें पळताहेत. अशा थाटांत जात असतां रंगनाथांनीं अरण्यांत समर्थांना पाहिलें. घोड्यावरून उतरले, समर्थांना नमस्कार केला आणि दोघे हि एका झाडाखालीं बसले. त्या वेळीं त्यांच्यांत झालेला संवाद दासविश्रामधामाच्या ५६ व्या विसाव्यांत आला आहे, तो मी येथें माझ्या शब्दांत देतों.

**रंगनाथ :** महाराज, तुम्ही सर्वज्ञ, योगी, समर्थ असतां, वैराग्य धारण करून, सदा उदासपणें वनांत वास करता, हें असें कां ?

**समर्थ :** तुम्हांला सर्व माहीत आहे, तुम्ही च कीर्तनांत वैराग्याची महती सांगत असता, तथापि विचारतां च म्हणून सांगतों, मला रामावांचून कसल्या हि वैभवाची चाड नाहीं.

**रंगनाथ :** राम परब्रह्म आहे, त्याला कां उगी च भिडेस घालतां ?

**समर्थ :** त्यानें आत्मस्वरूपाचा प्रत्यय आणून देऊन भक्तांचा सांभाळ करावा, म्हणून.

**रंगनाथ :** सारें जग च राममय आहे, हें सारें वैभव रामाचें च आहे.

**समर्थ :** म्हणून च मी सर्व सोडून माझ्यामध्यें च राम पहातों. हें असो, पण मला हें सांगा, "सारें जग च राममय आहे, हें सारें वैभव रामाचें च आहे" हें तुम्हांस कधींपासून कळलें ?

( रंगनाथांना प्रश्न पडला. पहिल्यापासून च म्हणावें तर गुरुभक्तीला बटा लागतो, हें जाणून )

**रंगनाथ :** गुरुकृपा झाल्यापासून.

**समर्थ :** मग, त्या गुरुकृपेपुढें या वैभवाची काय प्रतिष्ठा ?

( रंगनाथ कच्चे नव्हते. )

**रंगनाथ :** श्रुतीनें विरक्तीचा निषेध केला आहे, तेव्हां मी या वैभवाचा त्याग कां करावा ?

**समर्थ :** उगी च नका श्रुतीचा आधार घेऊं. विषयांचा ध्यास जन्माला कारण होणारा आहे. विषयाचा ध्यास घेतला कीं, एकामागून एक षड्रिपु पाठीस लागणार च. साधनें करून मुमुक्षूचे साधक आणि साधकाचे सिद्ध होता आणि पुन्हां विषयांचा आश्रय करता, यास काय म्हणावें ? बद्धदशा ती आणखी निराळी कोणती ? तात्पर्य, विषयांच्या पाठीमागें केव्हां हि लागूं नये व साधनें सोडूं नयेत. अभिमान सोडावा. जाणिवेची मक्षिका केव्हां हि भक्षूं नये. ऐका माझें

**सज्जन संत मुनीजन योगी । मानिसी तरी जाणीव सांडीं ॥ १**
**षड्रिपुकुळ भव भ्यासुर थापा । ह्राणसी तरी जाणीव सांडीं ॥ २**
**दास म्हणे गुण निर्गुण ते खुण । बाणसी तरी जाणीव सांडीं ॥ ३**

**रंगनाथ :** महाराज, आपली गोष्ट वेगळी, पण पुढें आपला संप्रदाय वाढणार आहे, सर्व च जण आपल्यासारखे कोठून असणार? तेव्हां सर्वांना साधेल, असा च कित्ता आपण घालून कां न द्यावा ?

**समर्थ :** जन लालची असतात, म्हणून काय, आपण हि लालूच बरी म्हणावी ? कर्म, उपासना आणि ज्ञान, ह्या च थोरांनीं दाखविलेल्या मार्गानें आपण जावें.

**रंगनाथ :** आपली आज्ञा सर्वथैव मान्य.

**समर्थ :** ( हंसून आणि विषय बदलून, प्रेमानें ) हातीं तीरकमटा आहे, त्याचा कांहीं पराक्रम दाखवा ना ?

**रंगनाथ :** आतां याचें काय प्रयोजन उरलें ? तथापि सांगा, कशावर सोडूं ?

**समर्थ :** ती पहा आकाशांत घार उडत आहे, तिच्यावर.

( रंगनाथांनीं तत्काळ तीर मारून घार खालीं पाडली. त्यांच्या नेम मारण्याचें समर्थांना कौतुक वाटलें. )

**समर्थ :** निरपराध प्राण्याची हत्या घडली, तरी तिला पूर्ववत् जिवंत करून जाऊं द्या आकाशांत उडून.

**रंगनाथ :** हें कसें व्हावें ?

**समर्थ :** मारक शस्त्र हातांत बाळगावयाचें, तर तारकयुक्ति हि साधलेली असावी. तारक आणि मारक एक रघुवीर आहे. जनीं वनीं हिंडतांना भयाचें निवारण करण्यासाठीं आपण हातीं शस्त्र बाळगतों, पण आपल्या रक्षणाचें तें च कार्य जगाचा रक्षिता राम करीत असतो. तो भक्ताला केव्हां हि विसंबत नाहीं.

असें बोलून श्रीसमर्थांनीं घारीकडे कृपाकटाक्ष टाकतां च ती उठली, पायीं लागली आणि भुरकन् उडून गेली.

त्यावर रंगनाथ तीरकमटा भिरकावून देऊं पाहूं लागले. समर्थांनीं मना केलें, "असूं द्या संग्रहीं" म्हणाले आणि रंगनाथांची इच्छा जाणून आपल्या हातांतली स्मरणी त्यांना दिली.

नंतर तेथें वनांत च पाकसिद्धि होऊन सर्वांचीं जेवणीं झालीं आणि समर्थ व रंगनाथ तांबोल सेवीत बसले असतां

**रंगनाथ:** पुन्हां आपलें दर्शन केव्हां आणि कोठें ?

**समर्थ:** आमचें एक स्थान थोडें च आहे! पण आतां आम्हांस चाफळास क्षेत्र उभारावयाचें आहे, तेथें येत चला.

असा संवाद होऊन रंगनाथ नाझरेस गेले आणि समर्थ सिंगणवाडीस गेले. त्यानंतर त्या उभयतांच्या अनेकवार भेटी झाल्या आहेत.

शक १८२४ त रंगनाथस्वामींच्या पदांचें एक पुस्तक प्रसिद्ध झालें होतें. त्यांत

**रे सखया अंतर निववीं सांगे गोष्टी। थोर भाग्यें जाहली तुझी भेटी॥ ध्रु०**

**सखया अनुभवीं मुळींचिया खुणा। जाण समूळ सांडुनि जाणपणा॥ ध्रु०**

या ३२१ व्या पदावर दिलेल्या टीपेंत म्हटलें आहे कीं, कोणी सच्चिदानंदस्वामी काशीस अनुष्ठान करीत असतां त्यांस दृष्टान्त झाला कीं, निगडीस रंगनाथस्वामींकडे जावें, त्याप्रमाणें ते निगडीस गेले व तेथें त्या उभयतांत जो संवाद झाला त्यास अनुलक्षून हें पद आहे. पण धामांत दिलेला वरील संवाद आणि तें पद पाहतां माझी खात्री होते कीं, समर्थांशीं झालेल्या संवादाच्या अनुरोधानें च रंगनाथांनीं तें पद रचलें असावें. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक २०७ यांत तें पद दिलेलें असून त्याच्या मथळ्यावर "रामदासस्वामी व रंगनाथस्वामी यांच्या भेटीचें पद" असें स्पष्ट च म्हटलेलें आहे, तेव्हां कांहीं च शंका रहात नाहीं.

## ( ४७ ) जयरामांच्या वडगांवीं रथोत्सव

एकदां जयरामस्वामी आपल्या गुरूच्या पुण्यतिथीला समर्थांना बोलावण्यास आले असतां समर्थांनीं इच्छा दर्शविली कीं, वडगांवीं उत्सवांत रथाची मिरवणूक निघत जावी. पुण्यतिथीचा दिवस जवळ आला, तेव्हां

हें यंदा कसें साधावें म्हणून जयरामांनीं चिंता दर्शविली. समर्थ म्हणाले, “ चिंता करण्याचें कारण नाहीं, आपण रथ तयार करून च रथ घेऊन पुण्यतिथीला येतों.” लागली च समर्थांची शिष्यांना आज्ञा झाली आणि त्यांनीं बरु आणि वेत यांचे भारेच्या भारे आणून टाकले. समर्थांनीं स्वत: रथ तयार केला आणि तो घेऊन पुण्यतिथीच्या आदल्या दिवशीं वडगांवीं गेले. जयरामस्वामींना आनंद झाला, समर्थांची धन्यता वाटली. या नवीन उपक्रमामुळें त्या वर्षीं उत्सवाला खूप लोक लोटले. समर्थांनीं रथ अगदीं सजवून आणला होता, कांहीं करावयाचें बाकी ठेवलें नव्हतें. सर्वांना मोठें कौतुक वाटलें. मनांत येतें, समर्थ जाणत नव्हते तरी काय? ते सर्व च कांहीं जाणत होते.

**समर्थें जयरामयोगीयाचा मोहछह वाढविला ।**
**प्रथम वडगांवीं समर्थें रथ काढविला ।**
**ग्रामपक्कान्नमार्ग मोडविला ।**
**सिद्धान्न स्वयंपाक करविले ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १८, ४८

## (४८) समर्थांना बोलावण्यास वडगांवीं खटावकर आले

याप्रमाणें श्रीसमर्थ वडगांवीं असतां एक खटावकर श्रीमान् गृहस्थ त्यांना बोलावण्यास आला. कृपा करून आपण खटावास चलावें, अशी त्यानें समर्थांपाशीं गोष्ट काढली. समर्थ म्हणाले, “ आम्ही विरक्त, अरण्यांत राहण्यांत सुख मानणारे, मानास्तव गांवोगांवीं असे हिंडूं लागलों, तर भलते च उपसर्ग लागणार.” यावर जयरामस्वामींनीं मध्यस्थी करून म्हटलें, “ महाराज, दीनांचा उद्धार करण्यासाठीं आपला अवतार, तेव्हां खटावकर भक्तानें केलेली प्रार्थना वाया न जावी.” जयरामांच्या मध्यस्थीला यश आलें. श्रीसमर्थ, जयराम वगैरे सर्व च जण खटावास गेले. तेथील थाट काय सांगावा? त्या श्रीमंताच्या प्रचंड वाड्यांत सर्व जण उतरले. तेथें सर्व सोयी होत्या आणि शब्द झेलण्यास आज्ञाधारक सेवक होते. पण तेथें समर्थांना बुजल्यासारखें झालें. ते निघून गेले नदीवर आणि तिकडे च रमले, वेळेवर आले. मेजवानीचा थाट झाला. रात्रीं जयराम कीर्तनास उभे ठाकले. त्यांनीं निरूपणाला

**चाल रे मना भेटीं जाऊं सज्जना। तेथें आहे आमुचा रामराणा ॥ ध्रु०**
**ऊठ लवकरीं चाल जाऊं झडकरीं। जाऊन रामपायीं सुख घेऊं धणीवरी॥**
**भाव दाविला तो हि असे गोंविला। सोडीं काम जावों, राम पाहों आपुला॥**
**मन चालिलें तेणें मूळ शोधिलें। संत रामदास त्याला सकळ भेटले ॥**

हें समर्थांचें च पद घेऊन, श्रीसमर्थांकडे पाहून प्रेम उचंबळून येऊन एक श्लोक म्हटला.

**दयानिधी केवळ संतमूर्ती। हातीं च हा राम धरोन देती।**
**याकारणें संग करी तयाचा। तूं पावसी लाभ महत्सुखाचा॥**

अरुणोदय होईतों कथा झाली, आरती झाली, श्रोते आपआपल्या स्थानीं गेले, समर्थ नदीवर निघून गेले आणि त्या गृहस्थानें जयरामांचे पाय धरले आणि म्हणाला, "मला कृतार्थ करावें, आपल्यासारखे संत दुसरीकडे कोठें पाहण्यांत येणार, आपण कथेंत म्हटल्याप्रमाणें श्रीरामाला माझ्या हातीं धरून द्यावें, मी माझें सर्वस्व आपल्या चरणीं अर्पण करतों." जयराम म्हणाले, "अरे, राम कोठें दूर आहेत, ते तुझ्या जवळ, अंतर्यामीं आहेत च." एवढ्यानें त्याचें समाधान होणें शक्य नव्हतें. तो म्हणाला, "प्रत्यक्ष श्रीराम दाखवा, भेटवा, हातीं धरून द्यावा, मी उतावीळ झालों आहें, आतां आपले पाय सोडणार नाहीं." जयराम फिकीरींत पडले. त्यांनीं शिष्य गोपाळ यास समर्थांकडे बोलावण्यास पाठविलें. नेहमींप्रमाणें श्रीसमर्थ म्हणाले, "स्वत: जयरामांत सामर्थ्य असतां मजवर भार कां टाकतो? जा, मी येत नाहीं." असें गोपाळास सांगितलें मात्र, पण त्यांना राहवणें शक्य नव्हतें. तत्काळ वाड्यांत प्रकट झाले आणि गृहस्थास म्हणाले, "सोड जयरामांना आणि ये मी जातों त्या मार्गानें, म्हणजे रामाला हातीं धरून देतों." असें म्हणून समर्थ झरोक्यांतून बाहेर पडले. झरोक्यांतून जाण्याचें त्या गृहस्थाला कोठून धैर्य होणार? तो मागें सरकला आणि राम हि पाठमोरे झाले! शेवटीं त्या गृहस्थास गोपाळापासून अनुग्रह घेण्याची आज्ञा करून समर्थादि सर्व जण वडगांवीं परत गेले.

## (४९) जयराम तीन दिवस विहिरीच्या पाण्यांत तळाशीं

एकदां कांहीं पर्वकाळ होता. जयरामास बरोबर घेऊन श्रीसमर्थ स्नानास निघाले. एक विहीर लागली. पाणी खोल होतें. समर्थ आंत

उतरले, पोहूं लागले. जयरामांना पोहतां येत नव्हतें, ते कांठावर च बसून राहिले. समर्थ आंतून आग्रह करितात, "मारा उडी, काय भय आहे?" जयरामांनीं कांहीं विचार न करतां उडी टाकली, तों तळास च गेले. स्मरणी हातांत तशी च होती. समर्थ बाहेर आले आणि नीट चाफळास निघून गेले. जयराम समर्थांबरोबर गेले, ते अजून परत आले नाहींत, म्हणून त्यांचे एकनिष्ठ शिष्य गोपाळ शोधार्थ चाफळास आले. "कां आलांत?" म्हणून गोपाळास समर्थांनीं विचारिलें. "महाराज, आपणाबरोबर स्वामी गेले, ते परत आले नाहींत, ते कोठें आहेत, कोणत्या कामगिरीवर त्यांना कोठें पाठविलें? कृपा करा, ते कोठें आहेत, सांगा."

**आम्ही लेकरु लडिवाळ केवळ। न देखतां होतसे चित्त व्याकुळ।**
**जीव हा टिकलासे यावत्काळ। पददर्शनामृतें दयाळा॥**

— दासविश्रामधाम, ८२, ५४

गोपाळबावांचें हें प्रेम पाहून सर्वांना आनंद झाला. समर्थ म्हणाले, "अर्थात् वरपांगीं, तुझा गुरु विहिरींत बुडाला, तळाशीं असेल, जा, काढा त्याला." श्रीसमर्थांची ही कांहीं तरी लीला असावी, असा विश्वास तर वाटला, पण चिंता हि वाटली. गोपाळबावा कांहीं जणांना घेऊन विहिरीशीं गेले, गळ टाकोन शोधिलें, बुड्या मारून पाहिलें, पण जयराम आढळले नाहींत. तेव्हां समर्थांची प्रार्थना करण्यांत आली. समर्थांनीं बुडी मारली आणि जयरामाला घेऊन बाहेर आले. जयरामांची जणूं समाधी लागली होती. समर्थांनीं "सावध हो, ऊठ," म्हणतां च सावध होऊन श्रीसमर्थचरणीं मस्तक ठेवलें.

**सदा सस्वरूपीं निमग्न जे भक्त।**
**साह्य सदा त्यांत आत्माराम॥**

— दासविश्रामधाम, ८२

अशी श्रीदासविश्रामधामकर्ते आत्माराम यांची या सर्व अद्भुत लीलांविषयीं उपपत्ति आहे. त्यांचें म्हणणें, निस्सीम, निस्स्वार्थी भक्तांना सिद्धि अनुकूल असतात व त्यांच्या हातून असले दैवी शक्तीचे चमत्कार होणें अशक्य नव्हे.

## (५०) करवीरकर शंकराचार्यांवरील संकटाचें निवारण

औरंगाबादेस श्रीसमर्थ कीर्तन करीत असतां एकाएकीं गुप्त झाले. सर्वांना आश्चर्य वाटलें. कां गुप्त झाले? कोठें गेले? करवीरकर शंकराचार्य

गंगातटाकीं असतां त्यांच्यावर अविंधानें संकट आणलें होतें. आचार्यांनीं श्रीसमर्थांचें स्मरण केलें. त्यांना वाटलें, जयरामस्वामींना जसें त्यांनीं संकटांतून सोडविलें, तसें च आपणांस सोडविण्यास ते च समर्थ आहेत. आचार्यांच्या हृदयांत श्रीसमर्थांनीं प्रवेशून त्यांना आश्वासन दिलें. तसें च पादशाहाच्या हृदयांत हि त्यांनीं प्रवेश केला. त्यानें आज्ञा विचारिली आणि " आचार्यांना छळूं नको, " म्हणून यांनीं आज्ञा केली. समर्थांचें सामर्थ्य अविंधास माहीत होतें. त्यानें आज्ञा मान्य केली इतकें च नव्हे, तर आचार्यांचा सत्कार केला. पुन्हां समर्थ कथेंत प्रकट झाले.

## ( ५१ ) जयरामांचें संकटनिवारण

वरील गोष्टींत जयरामांवरील संकटाचा उल्लेख आला आहे, तो प्रसंग असा. कऱ्हाडच्या अविंध अधिकाऱ्यानें जयरामांना कांहीं पेंचांत धरलें. साधूची संगति क्षणभर जरी लाभली तरी मनुष्य मुक्त होतो, असें कांहीं जयरामांनीं प्रतिपादन केलें होतें, तें अविंधानें ऐकलें होतें. तो जयरामांना म्हणाला, " मला आपली संगति थोडा वेळ लाभली, तर करा मला मुक्त. " जयरामांनीं मनांत समर्थांचा धांवा मांडला. समर्थ प्रकट होऊन अविंधास म्हणाले, " साधु ज्या मार्गानें जातात, त्या मार्गानें गेल्यास मनुष्य मुक्त होतो, तेव्हां, या माझ्या मागोमाग. " असें अविंधास म्हणून समर्थ मनोऱ्यावर चढले आणि अविंध मागोमाग गेला. मग समर्थ वायुस्वरूप धारण करून एका छिद्रांतून खालीं आले आणि अविंधास म्हणाले, " ये माझ्या पाठोपाठ. " तो कोठून येणार? तो शरण आला, खालीं उतरला आणि ज्यांचे पाठीराखे असे समर्थ आहेत, त्या जयरामांचे आणि समर्थांचे त्यानें पाय धरले.

या च प्रसंगाचा उल्लेख गिरिधरांनीं समर्थप्रतापांत केला आहे.

**समर्थें जयरामयोगी म्लेछउपद्रवीं सोडविले ।**
**कऱ्हाडीं उंच मनोऱ्यावरूनि उतरिले ।**
**समर्थ वायुस्वरूप देखोनि म्लेछ चमत्कारले ।**
**भुभुकारें जाले मूर्छागत ॥**

— श्रीसमर्थप्रताप, १९, ७५

## (५२) पाटगांवचे मौनीबाबा

श्रीसमर्थ चाफळास असतां पाटगांवचे एक गृहस्थ त्यांच्या भेटीस आले होते. समर्थांनीं विचारल्यावर त्यांनीं पाटगांवच्या मौनीबाबाच्या चमत्काराच्या अनेक गोष्टी सांगितल्या. तो गृहस्थ म्हणाला, " आरंभीं मौनीबाबांची पिशाचवृत्ति होती, ते रस्त्यांत च कोठें तरी पडून असत, उकिरड्यावर लोळत, परंतु अलीकडे त्यांनीं फार च शांतवृत्ति धारण केली आहे. पूर्वीं त्यांनीं अनेक चमत्कार केले, हकिमानें यांचा हुक्का बंद केला, तर यांनीं सर्वांचें शौचमूत्र च बंद केलें, सावकाराचें बुडतें जहाज तारलें, तेव्हां त्यांचा झुबा पिळून पाहिला तों पाणी खारें लागलें. एकदां पोरांनीं यांना सात दिवस पुरलें होतें. यांनीं पाण्याचें तूप करावें, मातीचा ऊद करावा, मद्याचें दूध आणि मांसाचीं फुलें करावीं." तो गृहस्थ मौनीबाबांचे म्हणून हे चमत्काराचे प्रकार सांगत असतां, आपल्या मनांत येतें, मौनीबाबा म्हणजे दुसरे श्रीसमर्थ च होत. त्या उभयतांची भेट तोंपर्यंत झालेली नसली, तरी उभयतांना परस्परांविषयीं फार आदर वाटत असे.

एकदां समर्थांनीं शिरगांवकर कल्याणबंधु दत्तात्रेय यांना मौनीबाबाकडे पाठविलें होतें. रिक्तहस्तानें दर्शन घेऊं नये म्हणून बाबापुढें ठेवण्यासाठीं दत्तोबाजवळ समर्थांनीं अकरा खारका दिल्या होत्या. दत्तोबा तरी सत्पुरुष च होते. सत्पुरुषानें सत्पुरुषाची परीक्षा काय पहावयाची ? पण दत्तोबाच्या मनांत आलें, पाहूं या बाबांची परीक्षा, म्हणून त्यांनीं दर्शन घेतांना अकराऐवजीं दहा च खारका बाबांच्या पुढें ठेवल्या व एक लपविली. बाबांची परीक्षा पहावयाचें दत्तोबाच्या मनांत यावयास नको होतें. पण तें आलें हें आपल्या पथ्यावर पडत आहे. मौनीबाबांना श्रीसमर्थांविषयीं काय वाटत होतें, तें त्यांच्या मुखांतून, या निमित्तानें बाहेर पडलें. ते दत्तोबाला म्हणाले, " तूं समर्थांचा शिष्य म्हणवितोस आणि असा कापट्यभाव मनांत बाळगतोस ? त्यांनीं अकरा खारका दिल्या असल्या पाहिजेत. ऐक

**अकराफळकारण न कळलें तुम्हांस । मारुती अवतार श्रीरामदास ।**
**वंदूं द्या झडकरी अकरावा अंश । जयाचा ध्यास आम्हां सदां ॥**
**रामदासदाता श्रीरामईश्वर । यामाजी नसे पां भिन्न अणुमात्र ।**
**धन्य अवतारी जगदोद्धार । महिमा अपार न जाणा कां ॥ "**

— दासविश्रामधाम, ९१, ६१-६२

दत्तोबा विरमले आणि लपविलेली अकरावी खारीक हि त्यांनीं बाबांपुढें ठेविली.

बाबांनीं दत्तोबास अकरा दिवस ठेवून घेऊन मग परत जाण्यास परवानगी दिली. त्यांच्या बरोबर छडी, रुमाल, अबीर, वसन व शर्करेचें वृंदावन देऊन त्यांना रवाना केलें व श्रीसमर्थांना निरोप पाठविला कीं, आपण एकवार श्रीच्या दर्शनास गडावर अवश्य येऊं. त्याप्रमाणें ते, गडावर श्रीशिवरायांनीं जी संतपरिषद् भरविली होती तिला आले होते.

**सात शत वर्षांचा पाटगांवीं मौनी । मौन भंगोनि धांवे समर्थदर्शनीं । लक्षानलक्ष यात्रा वनीं । समर्थामागें लागतसे ॥**

— श्रीसमर्थप्रताप, ७, २३

## ( ५३ ) सांप्रत कोणी विदेही आहेत काय ?

एकदां श्रीशिवाजीराजे एका पुराणास गेले होते. तेथें पुराणिकबुवांच्या तोंडून त्यांनीं ऐकलें कीं, पूर्वींच्या काळीं जसे अनेक मोठमोठे विदेही होऊन गेले, तसे हल्लींच्या काळीं कोणी राहिले नाहींत; या कलीयुगांत विदेहीपणाच्या गोष्टी बोलणारे पुष्कळ आढळतील, पण विदेहीपणाचें आचरण करणारे औषधाला हि मिळणार नाहींत.

पुढें भेटींत राजांनीं समर्थांना च विचारिलें, " सांप्रत कोणी विदेही आहेत काय ? " समर्थांनीं उत्तर दिलें, " नसतील च असें कसें म्हणतां येईल? तुकाराम विदेही नाहींत असें कोण म्हणूं शकेल ? भेटा जाऊन त्यांना, पहा, करा परीक्षा. "

राजे तुकाराममहाराजांकडे गेले, तों ते डोळे मिटून भजनांत दंग होऊन नाचत होते. श्रोते पुढें बसले होते. राजे आलेले पाहून श्रोत्यांत थोडी गडबड उडाली, ते बाजूस सरकले, राजांना पुढें वाट करून दिली. तुकारामांनीं डोळे उघडून पाहिलें तों श्रोते दूर झालेले आणि राजे पुढें आलेले त्यांना दिसले. शिवाजी राजे कशासाठीं आले होते, हें ओळखून समर्थांना आठवून तुकाराममहाराज राजास म्हणाले, " राजा, अरे,

**जो विदेहियांचा सिरोमणी । जया महायोगी ध्याती मनीं ।**
**चर्या जयाची न कळे म्हणोनि । देवादि तिष्ठती सभोंवते ॥**
**जे कथा निघाली विदेहप्रसंगीं । ते चिन्हें असती कीं समर्थअंगीं ।**

ते काय तुला, मी आहें तसा, म्हणून आपण होऊन सांगतील ?

**आपस्तुति नावडे साधुलागीं । म्हणोनि कळविती परस्परीं ॥**
**कैचीं पुराणें पुराणीकपण । भ्रामिकासंगीं जासी ठकोन ।**
**मी रे जयाचें करित ध्यान । कीर्तनीं नाचत होतों कीं ॥**
**त्या समर्थाचा म्हणविसी जनीं ।**

— दासविश्रामधाम, ४०, ४७–४८–५०–५१

तेव्हां तुला जास्त काय बोलूं?" असें म्हणून तुकाराममहाराज डोळे मिटून श्रीसमर्थांचें ध्यान करीत भजनांत मग्न होऊन नाचूं लागले !

तुकाराममहाराजांचे निर्भीड बोल ऐकून राजांच्या हृदयाचें पाणी झालें. तुकारामांच्या गळ्यांत त्यांनीं मोत्यांचा हार घातला. त्यासरशीं

**मृत्युलोकीं आम्हां आवडतें परी । नाहीं येक हरिनामाविण ॥ १**
**सोनें रुपें धन मृत्तिकासमान । माणीक पाषाण खडे जैसे ॥ २**

असें म्हणून तुकारामांनीं तो हार तोडून फेकून दिला.

राजे समर्थांकडे मुरडले. त्या भेटींत काय झालें असेल, याची कल्पना करावी.

सांप्रत कोणी विदेही पुरुष आहेत काय, या प्रश्नाचें प्रत्यक्ष उत्तर परभारें मिळावें म्हणून समर्थांनीं राजांना तुकाराममहाराजांकडे जाण्यास सांगितलें, तर तुकाराममहाराजांनीं उलट राजांना दोष लावून परत श्रीसमर्थांकडे पाठविलें ! असे एकमेकांना ओळखणारे दोन विदेही पुरुष त्या काळीं महाराष्ट्रांत नांदत होते.

## ( ५४ ) श्रीतुकाराम-रामदास भेट

मंदिरांतील बाडांक २५६ हें पांघरी मठांतील असून सुमारें सवाशें वर्षांमागचें आहे. त्यांत तुकाराममहाराजांचे बरेचसे अभंग आहेत. त्यांत चिंचवडचे मोरदेव व तुकाराम यांच्या भेटीचे अभंग आहेत, तसे च

श्रीसमर्थ आणि श्रीतुकाराम यांच्या भेटीची एक ओवी देऊन तुकारामांचा अभंग दिला आहे.

**समर्था समीप येउनी त्वरित । तुकाराम घाली दंडवत ।**
**रामदास उठोनि त्वरित । प्रेमें भेटती तेधवा ॥ १**

**देशावरी आलो आतां । लाभ कोणता याहुनी ॥ १**
**प्रेमें चित्तीं आनंद जाला । जीव धाला दर्शनें ॥ २**
**भाग्यें जाली दासभेटी । आवड पोटीं दुणावे ॥ ३**
**तुका म्हणे श्रम केले । तितुके आले फळासी ॥ ४**

## ( ५५ ) तुकाराम-रामदास संबंध

तुकारामांना जरी बाबाजीकडून षडक्षरी मंत्र मिळाला होता, तरी समर्थांच्या पासून त्रयोदशाक्षरी तारक मंत्र घ्यावा, अशी त्यांना पंढरीनाथांनीं आज्ञा केल्यावरून, श्रीसमर्थ देहूस आले असतां तुकारामांनीं त्यांच्यापासून तो मंत्र घेतला होता, असें वर्णन श्रीदासविश्रामधामाच्या ३९ व्या विसाव्यांत आत्मारामहाराजांनीं केलें आहे.

तें ग्राह्य मानावें किंवा मानूं नये. इतिहास काय घडला असेल तो खरा. संशोधन होऊन कालांतरानें जें सत्य असेल तें प्रकट होईल. तोंवर ही गोष्ट नुसती ऐकून ठेवावी.

## ( ५६ ) अमात्यांचें घराणें

गुरुभक्ताला गुरूचें प्रेम इतकें निस्सीम वाटत असतें कीं, दुसऱ्याजवळ गुरूची प्रशंसा करून तो आपलें प्रेम वाढवीत असतो आणि दुसऱ्याच्या ठिकाणीं जिज्ञासा उत्पन्न करीत असतो. श्रीशिवाजीराजांचें असें च झालें. त्यांनीं आपले विश्वासु अमात्य नीळोपंत यांच्या जवळ समर्थांच्या गोष्टी काढल्या आणि नीळोपंतांना चुटपुट लागली कीं, अशांची कृपा आपणावर केव्हां होईल. इतकी तळमळ लागल्यावर ती तत्काळ फलद्रूप होत असते. नीळोपंतांचें निर्मळ हृदय पाहून समर्थांनीं त्यांच्यावर अनुग्रह केला आणि नीळोपंत तत्काळ स्वरूपीं तन्मय होऊन राहिले. त्यांची अशी वृत्ति

पाहून त्यांची भार्या निराई ह्या उतावीळ झाल्या. त्यांनीं प्रतिज्ञा च केली कीं, स्वामींचें दर्शन झाल्यावांचून अन्नपाणी घ्यावयाचें नाहीं. बत्तीस दिवस लोटले व श्रीसमर्थ प्रगटले आणि निराई अम्मा श्रीसमर्थचरणीं विनटल्या.

अशांच्या पोटीं रामचंद्रांचा जन्म झाला. रामचंद्र नीळकंठ अमात्य यांची गुरुभक्ति अपूर्व होती आणि राजाराममहाराजांच्या कारकीर्दींत त्यांनीं केलेली राष्ट्रसेवा इतिहासज्ञांना विदित च आहे. श्रीसमर्थांकडील वृत्त आपणांस नेहमीं कळत जावें, म्हणून यांनीं 'श्रीकडील लिहिणीयाचा हुद्दा वतनी' आपणांकडे मुद्दाम करून घेतला होता व त्या कामासाठीं प्रथम राघो शंकर यांस व नंतर स्वतःचे मामा हरि दादाजी यांना श्रीसमर्थ-संस्थानांत ठेविलें § होतें.

## (५७) राज्यकारभारांतील लोकांना श्रीसमर्थ सहसा अनुग्रह देत नसत

नीळोपंतांना श्रीसमर्थांचा अनुग्रह झाल्याचा परिणाम असा झाला कीं, नीळोपंत येतां च स्वतः शिवाजीराजे उठून त्यांना नमस्कार करूं लागले. पंतांनीं म्हणावें, "महाराज, हें काय, आम्ही आपले सेवक, आपल्या अन्नाचे पोषक, तेव्हां असें विपरीत न व्हावें." त्यावर राजे म्हणाले, "ब्रह्मादिक हि गुरुभक्तांपुढें लीन होतात, गुरुपुत्रांत लहानमोठा असा भेद उरत नाहीं, गुरुवर्म ज्यांना कळलें ते सारे सारखे च थोर होत."

याचा परिणाम असा झाला, राजसंबंधी लोकांना अनुग्रह देण्याचें समर्थांनीं टाळावें. त्यांना वाटे, असे लोक राजाला क्वचित् भुलवून स्वार्थ साधावयाचे किंवा राजा च अशांच्या कडे सौम्य दृष्टीनें पहावयाचा. त्यांतून हि एकाद्यावर श्रीसमर्थांनीं कृपा केली च, तर त्याला गुप्तता राखण्याविषयीं निक्षून सांगण्यांत येत असे.

## (५८) शमनामीर पीर

उंब्रजहून शिरगांवपालीकडे जातांना वाटेंत शमनामीर नांवाचा पहाड लागतो. त्यावर पीर असून त्याचा उरुस भरत असतो. एकदां श्रीसमर्थ

§ पहा श्रीसांप्रदायिक कागदपत्रें, लेखांक ७८, १६५, ३७६ वगैरे.

तिकडे जाण्यास निघाले, पण लोक जात होते ती वाट सोडून अवघड वाटेनें जाऊं लागले, तों एका ठिकाणीं पाय निसटून मुरगळला आणि सुजला. तेव्हां मीर शमना प्रकट होऊन त्यांनीं पायावरून हात फिरविला आणि पाय बरा झाला. समर्थांना आश्चर्य वाटून त्यांनीं त्यांचा हात धरून, आपण कोण म्हणून विचारिलें. शमना मीर असें उत्तर देऊन, त्यांनीं आपण कोण म्हणून समर्थांना उलट विचारिलें. " मी एक दुबळा फकीर आहें," असें समर्थ म्हणतां च मीर म्हणाले,

**नहि जी तुम हो भगत साचार । जिंदा फकीर अवलिया ॥**

मीरांनीं आपलें सर्व सामर्थ्य समर्थांना दिलें. ( दासविश्रामधाम, १८ )

**शमनपीर समर्थें परीक्षिले । शमनपीरें समर्थ अजमाविले ।**
**मार्तंडपुरीं गिरिवरी भले । येतां जातां अभिवंदिती ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३, ७३

## ( ५९ ) दशावतारी एकदां श्रीसमर्थांच्या दर्शनास आले होते

दशावतारी म्हणजे दहा हि अवतारांचीं सोंगें आणणारी मंडळी. एकदां अशी मंडळी श्रीसमर्थांच्या दर्शनास आली असतां श्रीसमर्थांच्या पुढें सोंगें दाखविण्यास त्यांनीं सुरुवात केली. श्रीरामाचा अवतार येतां च श्रीसमर्थ एकदम उभे राहिले. तें सोंग पाहून श्रीसमर्थांना बरें वाटलें नाहीं. खेळ संपला आणि त्या मंडळींना वस्त्रें, भूषणें आणि विपुल द्रव्य देऊन श्रीसमर्थांनीं आज्ञा केली कीं, " अशानें श्रीरामाची मर्यादा रहात नाहीं, मंडळी हो, दिलेल्या द्रव्यानें तुमच्या दारिद्र्याचें निवारण झालें आहे, तेव्हां आतां यापुढें श्रीरामावताराचें सोंग कोठें आणूं नका." तें सोंग पाहून त्यांना वाईट वाटलें, इतकें कीं,

**( त्यांची ) शपित वाणी वदली ।**
**श्रीरामअवतार खेळतां निर्वंश ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ८, २६

श्रीसमर्थांची सारी च तऱ्हा जगावेगळी. केव्हां हि आणि कोठें हि श्रीरामकथा चालू असतां श्रीरामाची मर्यादा पाळली जावी म्हणून कथा संपेतों श्रीसमर्थ उभे रहात आणि ते उभे रहात म्हणून, राजे, प्रधान सर्व च जण उभे रहात, मग कथा सूर्योदयापर्यंत हि कां चालेना !

## ( ६० ) आकाशांतून फुलें पाडणारा हरिदास

क्षुद्र दैवतें असतात व तीं कोणा कोणाला प्रसन्न असतात. तीं ज्याला प्रसन्न होतीं असा एक हरिदास साताऱ्यास आला होता. आपणांस जगदात्मा प्रसन्न असून आपल्या कथांच्या समाप्तीला आकाशांतून सुरवर पुष्पवृष्टि करतात, असें तो सांगे व तसें घडे हि. एवढ्या चमत्कारावर त्यानें भोळ्या भाबड्यांना बरें च नादीं लावलें होतें. या चमत्काराच्या बळावर तो सर्व साधुसंतांची यथेच्छ निंदा करी. आपल्या चमत्काराची हकिकत सांगून आपली प्रतिष्ठा लोकांत प्रसृत करण्यासाठीं त्यानें पगारी माणसें हि ठेवलीं होतीं. त्याच्या कथांना लोकांची गर्दी फार लोटे. त्याच्या सेवकांनीं श्रीसमर्थांच्या कानांवर एकदां त्याचा लौकिक घातला. समर्थांनीं ठरविलें कीं, रोज एकएका शिष्यानें त्याच्या कीर्तनास जात जावें व आपणांस विदित करीत जावें. त्याप्रमाणें एके दिवशीं मुसळराम गोसावी यांची कथेला जाण्याची पाळी आली. त्या हरिदासाच्या क्षुद्र दैवतावर, मुसळराम गोसावी यांचे जवळ तोडगा होता.

**मुसळ करीं मुसळ नामा । मुसळीं हनुमानाचा दावी महिमा ।**

—श्रीसमर्थप्रताप, १०, ५१

त्या मुसळरामांना हनुमंत अनुकूल होते व हनुमंतापुढें क्षुद्र दैवतांचें काय चालणार ? तीं क्षुद्र दैवतें हनुमंतास शरण आलीं आणि म्हणालीं, “ या हरिदासाच्या जाचांतून आम्हांस सोडवा, तो आम्हांकडून नाहीं नाहीं तीं कामें करून घेत आहे. स्त्रियांना भुलविणें, लोकांच्या मनांतील सांगणें, वरून फुलें टाकणें, इत्यादि कामें आम्हांस करावीं लागत आहेत.” मुसळरामांच्या पाळीच्या दिवशीं त्या क्षुद्र दैवतांना आज्ञा झाली कीं, “ आज फुलें न टाकतां घाण टाका, पण ती टाकतांना एक काळजी घ्या, कथेला जे पुण्यशील लोक आले असतील त्यांच्या वर घाण पडूं देऊं नका.” कथा संपली आणि हरिदास श्रोत्यांना म्हणाले, “ पहा आतां वरतीं, फुलें पडतील.”

**तंव चौफेरी पसरली घाणी । सुमनबदला ते कश्मळा आणुनी ।**
**उत्तम लोकांते सांभाळुनी । वर्षाव करूं लागले ॥**

—दासविश्रामधाम, १०३, ७०

श्रोत्यांत खळबळ झाली, "बुवास हाणा, मारा, ठोका," असें लोक बोलूं लागले, मुसळरामांनीं बुवास उचललें आणि श्रीसमर्थांपुढें आणून टाकलें. बुवा शरमला, "पोटासाठीं हें सारें करतों" म्हणाला, शरण आला.

सांगणें नलगे, श्रीसमर्थांनीं त्याला बोध करून त्याचा उद्धार केला.

रामदासगुणार्णवाच्या २९ व्या अध्यायांत हि ही कथा आहे.

## ( ६१ ) एक स्त्रीलंपट कपटी गृहस्थ

सातान्यास एक स्त्रीलंपट पण ढोंगी, कपटी, बोलका गृहस्थ होता. आपल्या वृद्ध आईबापांची सेवा करी, असें वरपंगी तो दाखवी, पण खरोखर आईबापांच्या सुखाकडे त्याचें मुळीं च लक्ष नसे. त्यांचे हाल असत. मुलाजवळ राहणें नको, जावें चाफळास श्रीसमर्थांच्या आश्रयाला, असें त्यांच्या मनांत आलें. तों तिकडे श्रीसमर्थ च कळवळले आणि त्यांच्याकडे सातान्यास आले. "या, वसा," असें वरपंगी म्हणावयाला कपटी चिरंजीव घरीं होते च. समर्थांनीं त्याची कानउघडणी केली, आईबापांशीं बोलले. चिरंजीवाची वृत्ति पालटली. चौघांनीं हि श्रीसमर्थांचा अनुग्रह घेतला.

अशा विवेकभ्रष्ट चिरंजीवांचीं उदाहरणें जगांत फार आढळतात. आईबापांच्या सेवेसारखें सद्यफलदायी पारमार्थिक दुसरें साधन नाहीं, हें असल्या चिरंजीवांच्या लक्षांत येत नाहीं. आईबापांचा संतोष हें आत्मकल्याणाचें केवढें मोठें भांडवल होय !

**तोष न करितां जननीजनकासी । केला वास काशीं तऱ्ही व्यर्थ ॥**

## ( ६२ ) एका ब्राह्मणास संसार सोडण्याची झालेली इच्छा

श्रीसमर्थ स्वतः हि केव्हां केव्हां श्रीमत् दासबोधावर प्रवचन करीत. असें एक प्रवचन ऐकून शहापुरच्या शामबा नांवाच्या एका तरुण ब्राह्मणाच्या मनांत आलें, संसार सोडावा आणि विरक्त होऊन जावें कोणीकडे तरी. दुसऱ्या दिवशीं तो श्रीसमर्थांकडे आला आणि

**स्वामीरायाला करूनि नमन । करी विज्ञप्ति कर जोडून ।**
**विरक्त होऊं मी इच्छितों पूर्ण । ( पण ) संसार सुटेना काय करूं ॥**

—दासविश्रामधाम, ८६, ८१

श्रीसमर्थ हसून म्हणाले, "संसार सोडण्याला किंवा धरण्याला तुझा तूं स्वतंत्र आहेस, तेथें आडकाठी कोण करणार?" ब्राह्मण म्हणाला, "मला सोडावासा वाटतो, पण सुटत नाहीं, आपण च सुटेल असें करा."

समर्थ – आमच्या नादीं उगी च लागूं नकोस. आम्हीं एकादी आज्ञा केली आणि तूं अवज्ञा केलीस, तर वृथा त्रास होईल. तुझा तूं च विचारानें काय करणें तें कर.

ब्राह्मण – अवज्ञा कधीं हि करणार नाहीं.

समर्थ – बरें आहे, रहा आमच्या संगतींत.

ब्राह्मण राहिला. श्रीसमर्थ कांहीं शिष्य बरोबर घेऊन संचारार्थ निघाले. हा हि निघाला. रानांत एका विहिरीवर सर्व जण उतरले. स्वयंपाक सुरू झाला. विहिरीजवळ एक प्रचंड वृक्ष होता व त्याची एक फांदी बरोबर विहिरीवर आली होती.

**पसार कूपीं उदंड उदक । आडवा आलासे फांटा येक ।**
**त्या बिचाऱ्याकडे लक्षूनि देशिक । आज्ञापिलें वेघ बा वृक्षावरी ॥**

ब्राह्मण घाबरला, पण करतो काय, शब्द गेला होता, अवज्ञा करणार नाहीं. भीत भीत चढला आणि त्या फांदीवर आला.

खालून समर्थ आज्ञा करितात, "अभ्यास न करणाऱ्या मुलाला पंतोजी जसा कोलदंडा घालतात, तसा त्या फांदीवर लोंबकळ." विप्र कांपूं लागला, नाहीं म्हणवेना. तो तसा लोंबकळूं लागला, तेव्हां समर्थ सांगतात,

**"जाण बा वृक्ष हा भवविस्तार । त्यांत फांटा तो तुझा ससारं ।**
**श्रमतां हि धरिला आहेसी दृढतर । किंवा तो गळा पडला कीं ॥**

— दासविश्रामधाम, ८६, ९७

तुला श्रम होत आहेत, तरी तूं फांदी घट्ट धरली आहेस, कां तिनें तुला धरिलें आहे? तूं धरिली आहेस ना? ती फांदी हा च तुझा संसार, दे सोडून आणि हो मोकळा."

त्यानें फांदी सोडली आणि तो विहिरींत पडला.

सारी शिष्यमंडळी गजबजली, पण श्रीसमर्थ स्वस्थ होते. जसें कांहीं झालें च नाहीं, अशा तऱ्हेनें सर्वांनीं जेवणीं उरकलीं आणि मुक्काम हलविला.

सात दिवसांनीं पुन्हां तेथें आगमन झालें. एकीकडे स्वयंपाक चालीस लागला, इतर मंडळी स्नानसंध्येला लागली, समर्थ त्या वृक्षाखालीं जप करीत बसले, कल्याण अंतरावर सेवेसाठीं उभे होते, विहिरींत ब्राह्मण पडल्याचें सर्वांना स्मरण होतें च, पण कोणी गोष्ट काढीना, समर्थांनीं कल्याणाकडे पाहिलें, तोंड उतरलेलें होतें, नेहमींचा उल्हास नव्हता. " कां रे बाबा, असें कां ? " म्हणून समर्थांनीं विचारिलें.

**नमोन विनवितु जोडूनि हात । जळगृहीं लपला बंधु क्षुधिस्त ।**
**तेणें सर्वांचें हिरतिलें चित्त । मूल पुण्यवंत विश्वासी ॥**

— दासविश्रामधाम, ८६, १०४

समर्थ म्हणतात, "बरें, हांक मार त्याला, वर ये म्हणावें." "समर्थ बोलावतात, वर ये, " म्हणून कल्याणांनीं हांक मारतां च तो तरुण ब्राह्मण वर आला आणि त्यास विचारतां सांगूं लागला, " आपण त्या संसाररूपी फांदीपासून निसटलों ते आंत देवळांत च प्रवेश केला, स्वामींनीं जवळ बोलावून उपदेश केला, आपणांवर कृपा केली, दासबोध वाचीत बसलों होतों, तों हांक ऐकून आलों, काळाचें भान नाहीं, मुहूर्तामाजी जणूं ही लीला घडली, मी आतां कळीकाळाला मोजीत नाहीं. " रामाचें स्मरण होऊन समर्थांचें चित्त चमत्कारलें. त्या वेळीं त्यांनीं एक पद रचलें, तें कल्याणांनीं उतरून घेतलें.

**रे माझी चिंता मज नाहीं ॥ ध्रु०**
**भक्तजनाचा भार चि वाहे । मज हें न कळे कांहीं ॥ १**
**पापविनाशन संकटनाशन । पावतसे लवलाही ॥ २**
**दास म्हणे भवपाश तुटाया । संशय न लगे कांहीं ॥ ३**

तें गुप्तजळक्षेत्र आपल्यास हि पहावयास मिळावें, अशी सर्वांना इच्छा झाली. उशीर कसला ? मारुतीरायांनीं तें विंदाण रचिलें, तो सर्व देखावा दिसूं लागला ! पुन्हां सारें पूर्ववत् झालें.

## ( ६३ ) जाळगेवाडीचा कुणबी

**वळख न देतां चालिले फिरत । बहु ठाई बहुता परीक्षा करित ।**
**येकांतस्थानीं पर्वतीं राहत । भजन करित डोलत प्रेमादरें ॥**

— दासविश्रामधाम, ८९, २१

अशी समर्थांची तऱ्हा असे. अनुभवावांचून त्या आनंदाची आपणांस कल्पना करतां येणार नाहीं. ओळखणारें कोणी नसावयाचें, एकान्त असावयाचा आणि स्वच्छंदानें मनाशीं रमावयाचें, अंतरात्म्याशीं सलगी करावयाची, आराध्य दैवताला आळवावयाचें! याला जन्मजन्मांतरींचें भाग्य लागतें. यांत आणखी नवल असें कीं, दऱ्याखोऱ्यांत, गुहेंत, पर्वतावर ते निर्भय असत.

असे च एकदां स्वच्छंदानें फिरत ते जाळगेवाडीस गेले. रात्र पडली होती. "रात्रीपुरतें उतरूं देता कां?" म्हणून त्यांनीं एका कुणब्यास विचारिलें. त्यानें ओसरीवर उतरूं दिलें. बरोबरीचें कोणी नव्हतें कीं ज्याच्याशीं कांहीं ज्ञानचर्चा करावी, किंवा कांहीं महंतीचें हि कोणाशीं काम नव्हतें, म्हणून समर्थांनीं प्रेमभरानें, मंजुळ स्वरानें भजन आरंभिलें आणि श्रीरामाला आळवूं लागले. पण याची त्या कुणब्याला कटकट वाटली. "बाबा, कां उगीच माझें डोकें उठवितां? स्वस्थ निजा ना!" बसल्या जागीं यांनीं मनांतल्या मनांत उद्योग सुरू केला, त्याचें बाह्य चिन्ह नेत्रांवाटे उमटलें. आहे तरी कोण, म्हणून कुणब्यानें घरांतून दिवा आणून पाहिलें. ओळख पटली, राजाचा गुरु दिसतो. चरणीं मस्तक ठेविलें. उद्धरला.

**राम सर्वकाळ ध्यावा। यासी आळस न करावा॥ १**
**वाल्हाकोळी होता निंद्य। नामें केला जगद्वंद्य॥ २**
**रामदास म्हणे सार। दोनी अक्षरउच्चार॥ ३**

## (६४) त्यांच्याकडे कोणी हि येवो, ते सर्वांचें समाधान करीत

**कुटीळ कपटी प्रेमळ भाविक। स्त्री पुरुष शूद्र बाळ कामिक।**
**येती तयांला प्रत्ययवाक्य। बोलूनि सन्मार्गा लाविती॥**

—दासविश्रामधाम, ६८, ८८

सुष्ट, दुष्ट, सर्व तऱ्हेचे लोक श्रीसमर्थांकडे येत. बरे च जण सद्भावनेनें येत, तर कित्येक कांहीं कपटभाव मनांत धरून हि येत. बरे च जण विनयपूर्वक त्यांच्या जवळ जात, तर कोणी आपल्या च आढ्यतेंत मग्न होऊन जात. आत्मकल्याण करून घेण्याच्या इच्छेनें येणारांची संख्या

मोठी असली, तरी आपली च प्रतिष्ठा मिरविण्याच्या ईर्ष्येनें किंवा धन मिळविण्याच्या आशेनें येणारांची संख्या कमी नसे. त्यांच्या कडे सर्व तऱ्हेचे लोक येत, तपी येत, योगी येत, संत साधु, विद्वज्जन, वेदशास्त्रज्ञ, कलावंत, सर्व च येत. डोंबारी सुद्धां येत. राजाचे गुरु आहेत, तेव्हां त्यांच्या कडे गेल्यानें कांहीं विशेष प्राप्ति होईल च, म्हणून हरिदास तर नेहमीं च येत. तात्पर्य, त्यांचें नांव ऐकून सर्व प्रकारचे, धंद्याचे, वृत्तीचे लोक त्यांच्याकडे येत व सर्वांच्या मनांतला भाव ओळखून आपल्या सूचक बोलण्यानें श्रीसमर्थ सर्वांचें समाधान करीत.

## (६५) एकदां एक गायक जयपत्र मिळविण्याच्या आशेनें आला

एकदां एक गायक, बरोबर आपले साथकरी घेऊन, जयपत्र आणि त्याबरोबर च द्रव्य मिळवावें म्हणून श्रीसमर्थांकडे आला. समर्थांनीं कल्याणांच्या हातीं वीणा देऊन त्यास गावयास सांगितलें. कल्याणांनीं मोहनमोहक आलाप काढला, तो स्वर गायकाच्या हृत्कमळीं विंधला आणि तो तत्काळ मूर्च्छित होऊन पडला. त्याच्या बरोबर आलेले साथकरी हाय हाय करूं लागले. श्रीसमर्थांचें हृदय कोमल होतें, त्यांना त्या गायकाचा थोडा च अंत पहावयाचा होता? त्यांनीं वेणाबाईस उताराचें गाणें गाण्याची आज्ञा केली. तें गाणें ऐकतां च गायक शुद्धीवर आला, त्याचा गर्व उतरला, शरण आला आणि कृतार्थ झाला. असे च जे येत, ते सर्व कृतार्थ होऊन च जात.

गायनकलेंत श्रीसमर्थ किती निष्णात होते, हें हि या गोष्टीवरून कळतें.

**परेची पश्यंती । ध्वनी मध्यमा नाद ।**
**नादेंचे जाले शब्द । शब्दाचे भेद ॥ १**
**गगनीं भरला पवन । जाहले तान ।**
**तानीं विगुंतलें मन । मनमोहन ॥ २**
**मनाची होती उन्मनी । विवेकें जनीं ।**
**जनीं पुसावें सज्जनीं । तत्त्वनिर्शनीं ॥ ३**
**संसारीं व्हावें उदास । सज्जनीं वास ।**
**वासें विवेकें अभ्यास । सांगतो दास ॥ ४**

## ( ६६ ) सर्वांचें च ते विश्रांतिस्थान झाले होते

त्यांच्या चरणांचा आश्रय करण्यांत आपलें इहपरलोकीं कल्याण आहे, असें सर्वांना वाटूं लागलें होतें. दुराचारी, रोगी, चोर, कपटी, त्रस्त, दरिद्री, द्रव्यासक्त, तात्पर्य, सर्व तऱ्हेचे भवरोगी श्रीसमर्थांना शरण जात आणि पुनीत होऊन येत. जसे नाना तऱ्हेचे शारीरिक रोग असतात, आणि त्यावर उपचार करणारे वैद्य असतात, तद्वत् भवरोग हि अनेक प्रकारचे असतात व त्यांनीं पछाडलेले भवरोगी या राजवैद्याकडे चहूंकडून येत आणि श्रीसमर्थांची करणी अशी अद्भुत म्हणावयाची कीं, त्या सर्वांना आपल्या चरणांपाशीं थारा देऊन श्रीसमर्थ त्यांना रोगमुक्त करीत आणि मग ते रोगी स्वतः मुक्त होऊन इतरांस मुक्त करीत.

**धन्य समर्थकरणी अद्भुत । जार चोर कपटी द्रव्यासक्त ।**
**नानापरी जन जाले पुनित । करिती सनाथ पुढतपुढती ॥**

— दासविश्रामधाम, ८६

श्रीसमर्थांचें तपपुण्य च इतकें अगाध होतें कीं, त्यांचा शब्द खालीं पडत नसे, ते एकाद्याचें प्रारब्ध हि बदलूं शकत. याचीं अनेक उदाहरणें घडलीं असतील, त्यांतील कांहीं थोडीं चरित्रकारांनीं नमूद केलीं असतील, त्यांतील अवघीं दोन च आपण येथें सांगूं.

( १ ) वाईस राहणारा एक गृहस्थ दारिद्र्यानें अगदीं त्रस्त झाला होता, अन्नवस्त्राच्या आपदेनें पिडला होता. गेला गडावर श्रीसमर्थांपाशीं आणि दूर दीनासारखा उभा राहिला. समर्थांनीं जवळ बोलावून पुसलें. यानें आपली काहाणी सांगितली आणि समर्थांनीं त्याच्या कपाळाला विभूति लावली. मारुती साहाय्यास पातले. वाईच्या एका श्रीमंताच्या स्वप्नांत त्यास सूचना दिली कीं, गडावर गेलेल्या गृहस्थास बोलावून त्यास उद्योग लावून दे. त्याप्रमाणें त्या श्रीमंतानें केलें आणि त्या दरिद्री माणसाचें दैन्य फिटलें.

( २ ) अशी च एक गोष्ट दारिद्र्यानें पीडलेल्या वृद्ध दंपत्याची आहे. अंगावर पुरतीं वस्त्रें हि नाहींत, म्हणून काकुळतीनें समर्थांना विनवीत आहेत, तों समर्थ म्हणाले, "जा, जगदीशाला शरण जा, त्यास सर्वांची

चिंता आहे, मी काय करणार ?" समर्थांचें हें निराशेचें बोलणें ऐकून दंपत्यास वाटलें, आपलें प्राक्तन खोटें, समर्थांस आपली करुणा आली नाहीं. दंपत्य दुर्मुखलेलें परतलें, तों पाठोपाठ

**लुगडी चोळी धोतर । सेला पागोटें दुपट्टा अंगोस्त्र ।**
**घेऊनि पातला पवनपुत्र । दासांनीं धाडिलें घ्या म्हणत ॥**

—दासविश्रामधाम, ९६, ७६

असल्या कथा जनमुखीं तत्काळ होत आणि लोक आश्चर्य करीत. तात्पर्य, श्रीसमर्थांचें पुण्य इतकें थोर होतें कीं, त्यांचा अभिमान देवाला वाटे !

## ( ६७ ) श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाची रचना

( १ ) ग्रन्थराजाच्या स्वरूपावरून आपण जी कल्पना केली कीं, सात दशकांपर्यंत सूत्रबद्ध रचना झाली व ती १५८१ त झाली, याला प्रमाण सहाव्या दशकाच्या चौथ्या समासांत आहे च, आठवा दशक स्वतंत्र च आहे व येऊन जाऊन जे स्फुट समास सांगण्यांत आले, त्यांची विल्हे लावून व दशक पाडून अखेरीस एकंदर वीस दशक सिद्ध झाले, ती आपली कल्पना बरोबर असल्याचें श्रीदासविश्रामधामावरून हि दिसतें.

**सांगती लिहिती अनुभवार्थ हरिख ।**
**ज्ञानपरियंत जाले आठ दशक ।**
**मग चाफळासि येऊनि गांवाजवळिक ।**
**येत जात लिहित हिंडती ॥**

—दासविश्रामधाम, ६२, ६२

आणि पुढें

**आतां इकडील वर्तमान । प्रमय आठवला तो लिहविती सज्जन ।**
**सांगती प्रमयीं विले लाऊन । पूर्णत्वास ग्रंथ आणि पा ॥**

असें कल्याणांना सांगत, त्याप्रमाणें

**तैसें चि प्रसंगीं मेळऊन रहस्य । दशकीं सामाविती तो तो समास ।**
**द्वादश दशकापासोन ध्यानास । आणितां कळेल हें वर्म ॥**

—दासविश्रामधाम, ६२, ८६-८७

( २ ) एकदां सांगावयास बसले म्हणजे हजार, आठशें ओव्या सहज सांगत. पुष्कळदां असें हि होई कीं, सांगतां सांगतां मध्यें च थांबून विचारांत मग्न होऊन जात किंवा ध्यानस्थ होऊन बसत. चौथ्या दशकाचा दहावा समास चालू असतां, असे च ध्यानस्थ होऊन बसले होते. कल्याणांनीं विचारलें तर म्हणाले,

**अरे लिहितां आतां चि पुढील चरण । कळेल आपसया वर्तमान ।**
**मार्ग न सुचतां जालें पाहणें । मेरुपाठार जाऊनि ॥**

—दासविश्रामधाम, ६२, ६०

## ( ६८ ) दासगीता तथा पंचाध्यायी

( १ ) एका चैत्रांत उत्सवाचे वेळीं बाहेरची बरी च मंडळी जमली असतां त्यांच्यांत एकीकडे चर्चा चाले कीं, कल्याण चोवीस तास गुरुसेवेंत सारखे निमग्न असतात, गीताभागवतादि ग्रन्थ कधीं वाचीत नाहींत, भजन, पूजन, जप, अनुष्ठान कांहीं करतात, असें हि दिसत नाहीं, तेव्हां नुसत्या सेवेनें यांना गुरुवर्मखूण कशी कळणार ? एकानें कल्याणांना तसें विचारिलें च कीं, " तुम्ही कधीं कांहीं वाचीत नाहीं, पढत नाहीं, हें काय ? " कल्याणांनीं उत्तर केलें,

**वाचणें पढणें कासयासाठीं । हे न कळली मातें अजु गोष्टी ।**
**कासया होऊं कल्पनेंत कष्टी । गुरु समर्थ दाता असतां ॥**

— दासविश्रामधाम, ७४, ८४

कल्याणांच्या या म्हणण्याचें वर्म न समजल्यामुळें त्या लोकांनीं आपसांत कल्याणांची निंदा चालविली च.

( २ ) तेव्हां त्या सर्वांच्या प्रत्ययास कल्याणांची योग्यता यावी, म्हणून भर सभेंत समर्थांनीं संस्कृतांत दोन चरणें लिहून पुढचीं दोन चरणें तुम्ही कोणी लिहा, असें सर्वांना म्हटलें. पण कोणी च श्लोक पुरा करण्यास पुढें येईना ! तेव्हां समर्थांनीं कल्याणाकडे पाहिलें आणि आज्ञापिलें, " तूं कर श्लोक पुरा. " समर्थांना नमन करून कल्याणांनीं श्लोक पुरा केला. याप्रमाणें दोन चरणें समर्थांचीं आणि दोन चरणें कल्याणांचीं, असे एका पुढें एक शंभर श्लोक झाले. वीस वीस श्लोकांचा एक एक अध्याय

असे त्या शंभर श्लोकांचे पांच अध्याय करून त्यांचें दासगीता तथा पंचाध्यायी, असें नामाभिधान ठेवण्यांत आलें. निंदक मनांतल्या मनांत खजिल झाले. कल्याण आपला सारा काळ गुरुसेवेंत कंठीत हें खरें, पण त्या सेवेमुळें च त्यांना ज्ञान हि स्फुरत असे. त्यांची स्मरणशक्ति हि दांडगी असे.

( ३ ) दुर्दैव असें कीं, डोमगांव येथील कल्याणांचा मठ, इंदुरबोधन येथील उद्धवांचा मठ व तंजावर येथील भीमांचा मठ, अशा तीन मठांतील पंचाध्यायीच्या पांच प्रती उपलब्ध असून त्या पांच हि प्रतींत फक्त पहिले चार अध्याय आहेत, पांचवा नाहीं. उद्धवांच्या मठांतील प्रतींत पांचव्या अध्यायाला आरंभ हि केला असून पहिले अडीच च श्लोक आहेत. मग काय, पांचवा अध्याय पुरा झाला च नव्हता कीं काय, कोण § जाणे ?

## ( ६९ ) लिहून देण्याचा कंटाळा नसे

एकदां एक भोळा गृहस्थ शुद्ध भावानें समर्थांकडे आला आणि म्हणाला, " मी कृष्णोपासक आहें, आश्रमांत विठ्ठलाची स्थापना केली आहे, दर्शनास भाविक जन येतात, पण मला कीर्तन करतां येत नाहीं, त्यामुळें उत्सवाला शोभा येत नाहीं, तरी आपण कृष्णविठ्ठलपर कवन मला देण्याची कृपा करावी, म्हणजे त्याच्या आधारें मी कीर्तन करीत जाईन. " त्याचा शुद्ध भाव पाहून समर्थांनीं कल्याणाकडे पाहिलें आणि

**सांगितलें कीं कृष्णविठ्ठलपर । पदें श्लोक अभंग वोव्या चरित्र ।**
**आणि ललिताचीं पदें सुंदर । लिहोन भरणा दे यासी ॥**

आणि

**जयरामबावाला बाहूनि सज्जनें । सांगूनि भोळयाचें वर्तमान ।**
**गोपाळकालेचें साहित्य लिहून । द्यावें म्हणतिलें करुणाकरें ॥**

—दासविश्रामधाम, ९७, १२८ – १२९

त्याप्रमाणें त्या दोघांनीं हि केलें.

---

§ श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ६४, १०३, ४८३, ९३८ व १२४० पहा.

## ( ७० ) कर्मकांडाहून ज्ञानकांड श्रेष्ठ

एकदा कन्यागताचे श्रीसमर्थ समुदायासह माहुलीस गेले होते. एके दिवशीं भोजन लवकर उरकलें. थोडीशी विश्रांति घेऊन समर्थ उठले व स्वतः च कीर्तनास एकदम उभे ठाकले. लोक तत्काळ जमले. कीर्तन इतकें रंगलें कीं, तिन्ही सांजा होऊन गेल्या, सूर्य बुडाला, चंद्र उदयास येऊं लागला, तरी समर्थांना वेळेचें भान न राहून कीर्तन लवकर संपण्याचा संभव दिसेना. सायंसंध्येची वेळ टळणार, म्हणून कर्मतंत्री श्रोते चुळबुळ करूं लागले हें श्रीसमर्थांच्या लक्षांत येऊन त्यांनीं प्रस्थापित केलें कीं, निष्कामकीर्तनांत, नामस्मरणांत, भगवच्चिंतनांत मन रमून गेलें, तर कर्माची वेळ टळली तरी हरकत नाहीं, असा निर्णय भागवतांत आहे, आचार्यांनीं दिलेला आहे, एका प्रसंगीं दासोपंत आणि एकनाथ यांनीं हि मान्य केलेला आहे.

## ( ७१ ) तो राजा केव्हां होणार आहे ?

समाजांत अनेक पंथ निर्माण झाले आहेत, मतामतांचा गलबला माजला आहे, भिन्नभिन्न मतांचें प्रतिपादन करणारे ग्रन्थ निर्माण होत आहेत, तेव्हां या सर्वांचें संशोधन करून समाजाला एक मार्ग दाखविणारा कोण पुरुष केव्हां उदयास येणार आहे, असा प्रश्न विचारला असतां समर्थांनीं जें उत्तर दिलें, तें गिरिधरांनीं विश्वासानें लिहून ठेवलें आहे.

**समर्थमुखींचें वाक्य घडोनि येईल ।**
**कोण्ही येक ब्रह्मनिष्ठ धर्मिष्ठ राजा होईल ।**
**समस्त ग्रंथ पंथ शोधूनि पाहील ।**
**समर्थदेवें सांगितलें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १८, ५४

## ( ७२ ) प्राकृत ग्रंथांचें पुढें काय होणार ?

असा च आणखी एक प्रश्न संतामहंतांनीं समर्थांना केला होता, इतके प्राकृत ग्रंथ आजपर्यंत निर्माण झाले व अद्यापि होत आहेत, त्यांचें पुढें काय होणार, त्यांचें संरक्षण कोण करणार आणि ते जगापुढें केव्हां येणार ?

**समर्थासी संत महंत प्रश्न करिती ।**
**प्राकृत ग्रंथ काळांतरें कोठें जी राहती ।**

त्याचें श्रीसमर्थ उत्तर देतात :

**अहो आपुलाले आराध्यदैवतीं लीन ग्रंथ असती ।**
**यथापूर्व प्रगटती युगांतरें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १९, २०

## ( ७३ ) मद्यपाननिषेध

एकदां श्रीशिवराय वामनस्वामींकडे गेले असतां स्वामी राजास म्हणाले, " श्रीसमर्थांचा अंतर्भाव तुम्ही जाणत असतां, मद्यपानाला अजून बंदी केली नाहीं, हें कसें ? " राजांच्या लक्षांत चुकी येऊन त्यांनीं तत्काळ हुकुम केला कीं, " दारू गाळणारे, पिणारे, पिऊन धुंद होऊन पडणारे यांना धरून आणून शिक्षा करावी, शिंदीचीं झाडें मुळांसकट छेदून टाकावीं, त्यांचें बी सुद्धां राहूं देऊं नका. " त्यामुळें श्रीशिवरायांच्या राज्यांत

**नाहीं च जाले हो सुरापानी । निर्माणकर्ते न पडती नयनीं ।**
**विटाळ स्रवतरु नाहीं च रानीं । शुद्ध मार्ग जाला चहुंकडे ॥**

—दासविश्रामधाम ९६, ११४

## ( ७४ ) एक मायाळु म्हातारी बाई

हिंडत हिंडत श्रीसमर्थ भद्राचलाकडे जात असतां एका गांवीं एका म्हातारीनें समर्थांना पाहिलें. त्यांची दिनचर्या तिनें बारकाईनें पाहिली. स्नान करतो, भिक्षा मागतो, पानगे भाजतो, नैवेद्य दाखवितो, कोरडें च खातो, तथापि समाधानांत असतो, चिंतनांत मग्न असतो, कष्ट करतो पण तेजस्वी दिसतो, नामस्मरणावांचून क्षण दवडीत नाहीं, सर्वांसी गोड बोलतो, ज्ञानाच्या गोष्टी सांगतो, बाल वृद्ध, नर नारी, अनाथ सनाथ, निर्धन सधन, सर्व जण याला सारखीं च वाटतात, ही समर्थांची सारी स्थिति अवलोकन करून त्या म्हातारीला स्वाभाविक अति कळवळा आला. यच्चयावत् स्त्रीजातीचें हृदय म्हणजे आईचें च हृदय, हें अगदीं सत्य आहे. त्या म्हाताऱ्या बाईला समर्थांना पाहून जणूं पान्हा फुटला. ती विचारते,

**( कां ) परदेशी जालासि बापा । आंग मळलेंसे धड नसे कैं पां ।**
**कां देवासी न आली कृपा । श्रम भोगणें किती हे ॥**

**माय बाप बंधु चुलत्या बहिणी । नाहींत कीं काय सांभाळूं कोणी ।**
**रडत असेल कीं भार्या सदनीं । ठाव मिरास कां त्यजिलें ॥**

— दासविश्रामधाम, २६, २९–३०

मातृतुल्य त्या म्हातारीला श्रीसमर्थांनीं उत्तर दिलें, " माझे माय बाप सर्व कांहीं सीताकांत श्रीराम आहेत. आई, तूं श्रीराम म्हणजे कोण समजलीस, काय समजलीस ? सांगूं कां तुला ? "

॥ **पद** ॥ ( दंडीश्वर )

**श्रीराम गणेश वेदमाता । श्रीराम सद्गुरु भवत्राता ।**
**श्रीराम सज्जन श्रोता वक्ता । स्वानुभवकथा श्रीराम ॥ १**

**श्रीराम भक्तीं आतुडे सांग । श्रीरामें सदृढ वैराग्य योग ।**
**श्रीरामें आत्मज्ञान अव्यंग । विज्ञान पूर्ण श्रीराम ॥ २**

**श्रीराम सार्थक श्रवण । श्रीराम सकळ मनन ।**
**श्रीराम अखंड निजध्यान । साक्षात्कार संपूर्ण श्रीराम ॥ ३**

**श्रीराम शक्तिचक्रा चाळक । श्रीराम सकळा देहीं व्यापक ।**
**श्रीराम होत्साता येक । नित्य निःकळंक श्रीराम ॥ ४**

**श्रीराम वाचें नवचे वर्णिला । श्रीराम मनें नवचे कल्पिला ।**
**श्रीराम नवचे चित्तीं चिंतिला । आत्मरूप पाहिला नवचे नेत्रीं ॥ ५**

**श्रीराम सकळा आद्या आद्य । श्रीराम सकळा वंद्या वंद्य ।**
**श्रीराम सकळा स्वतसिद्ध । रामदासीं बोध श्रीराम ॥ ६**

अशी ज्याला दृष्टि प्राप्त होते, त्याच्याहून श्रीराम कोणी निराळा असतो काय ? याहून आत्मज्ञान कांहीं निराळें असतें काय ? म्हातारीस कृतार्थ करून श्रीसमर्थ भद्रगिरीकडे जाण्यास निघाले.

## ( ७५ ) खिरीची वासना

समर्थांचा नित्याचा क्रम म्हणजे बहुधा एकटे एकीकडे भोजनास बसत. एकदा खीर केली होती. खावयाची तितकी खीर समर्थांनीं खाल्ली. पण

आणखी पाहिजे, अशी त्यांना वासना झाली. आपणांस अशी वासना व्हावी, याचें त्यांना बरें वाटलें नाहीं. वासनेची खोड मोडली पाहिजे, असें त्यांच्या मनानें घेतलें. त्यांनीं आणखी खीर मागितली. वेणाबाईनीं वाढली. ती भुरकून " आणखी वाढा " म्हणाले. ती हि वाढली आणि भुरकली, तरी " आणखी वाढा " म्हणाले च. वेणाबाईना थोडें चमत्कारिक वाटलें. कारण असें कधीं मागत नसत. त्यांनीं वाढली, ती संपली, तरी यांचें ' आणखी वाढा ' सुरू च होतें. शेवटीं ओकून पडली. तरी " आणखी वाढा " म्हणाले. खीर संपली होती. " वासने, तुला आणखी खीर हवी ना ? " असें म्हणून ओकलेली खीर भुरकून वासनेची खोड मोडण्यास तयार झाले. वेणाबाईनीं त्वरा करून ओकारीवर राख टाकली. ( दासविश्रामधाम ४२, संतविजय २२, उद्धवसुत ४३, गुणार्णव ३४ )

वासना जिंकलेल्या असाव्या, हें या गोष्टीचें तात्पर्य दिसतें.

न जाणों, पुढील अभंग या च प्रसंगाला उद्देशून केलेला असेल.

**वोकीतां वोकीतां मन कंटाळलें । राखेनें झांकीलें सावकाश ॥ १**
**सावकाश तया कोण अभीळासी । कोणाला असोसी कासयाची ॥ २**
**कासयाची आतां वासना धरावी । गोडी विवरावी विषयांची ॥ ३**
**विषयांची गोडी कंटाळलें मन । नागवले जन असोसीचे ॥ ४**
**असोसीचे जन ते जन्म घेईल । जीव चि देईल विषयांसी ॥ ५**
**विषयांसी वीट मनापासुनीयां । निर्वासना तया जन्म नाहीं ॥ ६**
**जन्म नाहीं ऐसें केलें देवरायें । वासना उपायें सोडविली ॥ ७**
**सोडविली देव धन्य दयानिधी । तुटली उपाधी सर्व कांहीं ॥ ८**
**सर्व कांहीं नाहीं हें चि हें प्रमाण । दास म्हणे खूण देव जाणे ॥ ९**
**देव जाणे सर्व राहिला विकार । ब्रह्म निर्विकार दास म्हणे ॥ १०**

—स्फुट ओव्या ७३

## ( ७६ ) हुरड्यासाठीं कणसें तोडलीं

समर्थांनीं एकदा साताऱ्यास आपल्याकडे यावें, असा शिवाजीराजांचा फार आग्रह होता. तेवढ्यासाठीं त्यांना बोलावण्यास ते चाफळास गेले होते. समर्थांनीं जाण्याचें मान्य केलें. तुम्ही व्हा पुढें, आम्ही चार दिवसांनीं

मागाहून येऊं, असें समर्थ राजांस म्हणाले. राजांना आनंद झाला. तयारीसाठीं ते पुढें गेले. चार दिवसांनीं समर्थ निघाले. बरोबर फक्त दत्तु नापिक होता. मार्गांत दुपारची वेळ म्हणून देहेगांवच्या शिवारांतील एका शेतांत थांबले. समर्थांना जरा शीण आला होता, हें दत्तूच्या लक्षांत आलें, पण पाक करणें शक्य नव्हतें. शेतांत हुरडा हिरवागार पिकला होता. पांच कणसांनीं शेतकऱ्याचें काय कमी होणार, असें वाटून दत्तुबुवांनीं पांच कणसें तोडलीं, गोवऱ्या गोळा केल्या आणि समर्थांपाशीं येऊन थारोळें करून कणसें भाजूं लागला. समर्थ आसनावर बसलेले च होते. शेताचा मालक गांवचा पाटील होता. तो दूर होता. धूर निघालेला त्याला दिसला, तसा जवळ आला, शिव्या देत देत च आला आणि हें काम आसनावर बसलेल्या या बुवांचें असलें पाहिजे, असें मनांत आणून तीं च ओलीं ताटें घेऊन समर्थांना मारूं लागला. प्रतिकार करण्यास दत्तु सिद्ध झाला होता, पण त्यास समर्थांनीं स्वस्थ राहण्यास खुणविलें. समर्थांनीं हुरडा न खातां शांतपणें मार खाल्ला. मारतां मारतां शेतकरी दमला. दत्तूला रडें कोसळलें. समर्थांच्या पाठीवर चांगले दहा पांच तांबडे वळ उठले होते.

तेथून पुढें उभयतां साताऱ्याकडे गेले. बागेंत उतरले. राजे यांना वर्दी पोचली. बागेपासून वाड्यापर्यंत मिरवणूक निघाली. तें वर्णन नंतर स्वतंत्र करूं. समर्थांना स्नान घालतांना महाराजांच्या नजरेस ते वळ पडले. त्यांनीं दत्तूस विचारलें. दत्तूस समर्थांनीं, कोणास न सांगण्याविषयीं, सांगून ठेवलें होतें. महाराजांच्या मनास सारखी चुटपुट लागली. भोजनें झालीं, विश्रांति झाली. दरबार भरण्याची वेळ ठरली. समर्थांनीं राजांना आज्ञा केली कीं, देहेगांवच्या पाटलास दरबारच्या वेळेला आणवावें. त्याप्रमाणें त्यास आणण्यास महाराजांनीं दोन ढालाईत रवाना केले. ढालाईत पोचण्यापूर्वीं च पाटलास कळलें होतें कीं, ज्यांना आपण आज शेतांत मारलें ते महाराजांचे गुरु रामदासस्वामी होते. तें कळल्यापासून तो भयभीत झाला च होता. तशांत त्यास घेऊन जाण्यास आतां ढालाईत येऊन पोचले. पाटलाचें काय होणार याची गांवांत कोणास च शंका राहिली नाहीं. पाटलाच्या घरांत तर रडारड सुरू झाली.

पाटलास बरोबर घेऊन ढालाईत निघाले, ते दरबारच्या वेळेस सातान्यास पोचले. तोंपर्यंत पाटलाच्या अपराधाची कल्पना स्वतः राजे व दरबारांतील इतर मंडळी यांस येऊन चुकली होती. "आम्ही सांगूं ती शिक्षा पाटलास करणार ना ?" असें समर्थांनीं राजांना विचारलें होतें व राजांनीं मान्य केलें होतें. पाटलास आंत घेऊन येण्याचा हुकुम झाला. पाटलास आपलें भवितव्य कळून चुकलें. त्याचे पाय लटपटूं लागले. हात जोडून कांपत कांपत तो आला. उच्चासनीं बसलेल्या समर्थांकडे त्याची नजर गेली. त्यानें ओळखिलें. दंडप्राय नमस्कार घातला. समर्थांनीं त्यास जवळ बोलाविलें. दरबारांतील मंडळीकडे पाहून व पाटलास उद्देशून समर्थ म्हणाले, "आमच्या शांतीची अशी परीक्षा मागें कोणीं केली नाहीं व पुढें हि कोणी करणार नाहीं, ती या पाटलानें केली, तेव्हां राजे, या पाटलास वस्त्रें, मुद्री, कडदोरा, कंठी, शिरपेंच देऊन त्याचा सन्मान करा व तें शेत त्यास इनाम करून द्या."

पाटलास झालेली ही शिक्षा ऐकून राजांसह सर्व दरबारी मंडळी थक्क झाली आणि पाटलाच्या मनाची काय अवस्था झाली असेल ती शब्दांनीं कोण सांगूं शकेल ! पाटील आनंदानें घरीं गेला असेल व घरच्या माणसांना आणि गांवच्या लोकांना काय वाटलें असेल तें हि कोणी सांगावें ! त्या पाटलाचें नांव चिलाजी व आडनांव जाधव.

ही गोष्ट थोड्या फार फरकानें सर्व चरित्रकारांनीं वर्णिली आहे व कविवर्य मोरोपंत यांनीं केलेल्या श्रीसमर्थस्तवनांतील एका आर्येंत तिचा उल्लेख आला आहे.

**पूजी त्यातें, ताडी जो कर्षक मूढ, काढितां हुरडा ।**
**यश शुद्ध रामदासी; याचिकडे, म्हणुनि, साधु हो, मुरडा ॥**

## (७७) पिशाचवृत्ति

श्रीसमर्थ केव्हां केव्हां पिशाचवृत्ति सहेतुक धारण करीत. लोकांचें खरें स्वरूप, अशा च वेळीं प्रकट होत असतें. एकदां ते अशा वृत्तींत असतां, एका कुचेष्टाखोर ब्राह्मणानें उकिरड्यावरील उष्ट्या पत्रावळींचा

हार करून तो श्रीसमर्थांच्या गळ्यांत घातला होता. समर्थांचें तिकडे लक्ष हि नव्हतें. त्यांनीं त्याचें सुखदुःख मानलें नाहीं. लोकांना मात्र मौज वाटली व चटोरांचा हंशा पिकला.

. कालांतरानें राजयोगप्रसंगीं श्रीसमर्थ सभेंत बसलेले असतां, ज्यानें वरीलप्रमाणें चेष्टा केली होती, तो च ब्राह्मण दर्शनास आला, तेव्हां श्रीसमर्थ त्याच्या सन्मानार्थ उठून उभे राहिले. श्रीसमर्थ च उभे राहिले, तेव्हां सभेंतील सारे च लोक उभे राहिले. पण चेहऱ्यावरून तरी नतद्रष्ट दिसणारा असा हा ब्राह्मण कोण, कीं ज्याचा श्रीसमर्थांनीं एवढा सन्मान करावा, हें कोणाला च कळेना. समर्थांना कोणी च विचारीना, कीं हे कोण ! सर्व जण संशयांत पडलेले पाहून श्रीसमर्थ म्हणाले, "हे आमचे व्याही आहेत, यांनीं एकदां आमचें व्याहीपूजन केलें होतें." समर्थांना व्याही कोठून असणार, म्हणून लोकांना जास्त च आश्चर्य वाटलें. ब्राह्मण ओशाळला, खजिल झाला, तळमळूं लागला, शरण गेला, रडूं लागला, त्यानें समर्थांच्या चरणांवर लोटांगण घातलें ! ( दासविश्रामधाम, १८, ८७–१०४ )

**समर्थासी कोण्हीयेक मूर्खें गुप्त विनोद केले ।**
**समर्थें अति दुर्धर पोटीं गुणदोष घातले ।**
**सोयरे म्हणोनि दुष्ट सन्मानिले ।**
**अपराध प्रगट न केला ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १२, २९

या ओवींतला मूर्ख सोयरा तो च या गोष्टींतला दुष्ट ब्राह्मण व्याही असावा.

## ( ७८ ) संकटकाळीं शिष्यांसाठीं धांवून जात

माहुलीच्या मठांत उद्धवबाबा होते. तें ठाणें होतें. अविंधाच्या अंमलाखालीं उघड रीतीनें भजन, कीर्तन करण्याची चोरी होती. संगमावर स्नानाला गेलेल्यांची अविंध अधिकारी कुचेष्टा करी. उद्धवबाबा तळघरांत भजन करितात, असें कळल्यावरून त्यांना पकडून मुसलमान करण्याचा अविंधानें हुकुम केला. आणले उद्धवबाबांना. त्यांनीं मनांतल्या मनांत

समर्थांचा धांवा मांडला, " मला अपाय घडला, तर सर्व सांप्रदायिकांना दचक बसेल, रामाचें भजन राहील " तो धांवा ऐकून श्रीसमर्थ एकाएकीं सभारंगणीं प्रकट झाले. अविंध घाबरा झाला. समर्थ चौताळले. काजी आणि त्याचा ठाणेदार अविंध अधिकारी यांना शिक्षा केली. अविंध पायीं लागला. त्याचे कडून समर्थांनीं कुराण आणविलें आणि

**सर्व हि आहे येक निर्माण। धर्म जयाचा त्यासी प्रमाण।**
**दूषण कराया नाहीं कारण। हें वचन कुराणीं दाखविलें॥**

—दासविश्रामधाम, ६६, ८९

त्या काळीं, अनेकदां अनेकांवर असे संकटाचे प्रसंग आले असतील व श्रीसमर्थांनीं त्यांचें निवारण केलें असेल. श्रीसमर्थप्रतापकार तें च सांगतात.

**समर्थें नाना सिद्धिसामर्थ्यें विघ्नें निवारिलीं।**

—श्रीसमर्थप्रताप १९, १८

## (७९) पलंगावर कां न निजत ?

श्रीसमर्थ पलंगावर निजत नसत. शिवाजीराजांनीं आग्रह करून पाहिला, पण उपयोग झाला नाहीं. तेव्हां स्वतः हि पलंगावर निजण्याचें राजांनीं सोडलें. आपण पलंगावर कां निजत नाहीं, हें राजास कळावें, म्हणून श्रीसमर्थांनीं एक युक्ति केली. त्यांचे कांहीं शिष्य पंढरीस जात होते, तेव्हां समर्थ राजास म्हणाले, " तूं हि त्यांचे बरोबर पंढरीस जा, तेथें अनेक साधुसंत येतात, त्यांत पलंगावर निजण्याच्या योग्यतेचा कोणी असल्यास पहा. "

सैन्य बरोबर घेऊन राजे पंढरीस गेले. तेथें त्यांना वरपांग वेष धारण करणारे, कपटी, ठकडे पुष्कळ च आढळले. कांहीं भोळे हि दिसले. कोणी ज्ञानी भेटावा, अशी राजांनीं अपेक्षा केली. तसे त्यांना गणेशनाथ आढळले. त्यांना आग्रह करून राजांनीं आपल्या जवळ ठेवून घेतलें. त्यांचा बिछाना मंचकावर तयार करून ठेवला व नाथांना विचारून आपण दुसरीकडे गेले. नाथांनीं भीमेपलीकडून कांटे, चुनखडे गोळा करून आणून, चादर दूर सारून ते कांटे व खडे बिछान्यावर पसरले व वर

चादर घालून त्यावर आपण निजले. सकाळीं नदीवर जाऊन, स्नान वगैरे करून भजनानंदीं मग्न होऊन बसले. राजे सकाळीं येऊन पहातात तों बिछान्याचा तो थाट — कांटे, खडे व वर चादर ! नाथांना विचारिलें, " हें काय ? " नाथ म्हणाले, " राजा,

**अरे देहासी देतां सौख्यसुरवाड । होईल तेणें परमार्थ घरबूड ।**
**साधकासी कासया भलती भीड । स्वहितासी खंड करावया ॥**

**साधनें नावडती जया साधका । तनु कष्टवीना लुबरा जो कां ।**
**न फिटे तयाला भवभयधोका । साधनें चि सिद्धा जीवन ॥**

राजा,

**सेवेंत तिष्ठसी गुरुनिकटीं । येती भल्याची देखसी राहटी ।**
**कां प्रपंचसौख्याची न फिरे दृष्टि । कां विकल्पु पोटीं उठतसे ॥**

— दासविश्रामधाम, ६९, ६१ – ६३

राजा, आम्ही स्वत:

**समर्थपदातें धरोन हृदईं ।**
**कृतार्थ जालों रे या जगीं आम्ही ।**
**वैराग्यापरतें भाग्य चि नाहीं ।**

याविषयीं समर्थांचा च एक अभंग आहे, तो तुला सांगतों, ऐक,

**देहा सुख योगी दे तो भवरोगी । राम तयालागीं प्राप्त कैंचा ॥ १**
**देहा सुख जालें मन तें रंगलें । समाधान गेलें हारपोनी ॥ २**
**देहा सुख देतां ज्याची त्याला चिंता । सांकडें अनंता पडेना कीं ॥ ३**
**देहा सुख देणें लोभाचेनि गुणें । मग नारायण पाविजेना ॥ ४**
**रामीरामदास सर्वस्वें उदास । तया जगदीश विसंबेना ॥ ५ "**

आपण पलंगावर कां निजत नाहीं, याचें श्रीसमर्थांनीं शिवाजीराजांना परभारें उत्तर दिलें.

## ( ८० ) वासनेचें रूप आणि तिचा परिहार

शिष्यांच्या मेळाव्यांत श्रीसमर्थ केव्हां, कोठें बसतील, याचा नेम नसे. कधीं डोंगरावर, कधीं घळींत, कधीं खोऱ्यांत, कधीं रानांत, कधीं कोठें

मन रमेल तेथें, ते तळ देऊन बसत, हें जरी खरें, तरी चाफळास श्रीराममंदिराच्या मागच्या बाजूस कांहीं अंतरावर जें महारुद्राचें स्थान आहे तेथें, किंवा शिंगणवाडीच्या रानांत, त्यांच्या फार करून बैठकी होत. अशा बैठकींत शिष्य लडिवाळपणानें अनेक प्रश्न करीत, शंका विचारीत, माहिती पुसत आणि तितक्या च प्रेमानें श्रीसमर्थ सर्वांचें समाधान करीत. अशा बैठकी शेंकडों झाल्या असतील आणि हजारों प्रश्न विचारण्यांत आले असतील. चरित्रांत एक प्रसंग वर्णिलेला आहे, तेवढा सांगतों.

एकदां श्रीमहारुद्राच्या सन्मुख भोंवताली शिष्य घेऊन श्रीसमर्थ बसले असतां, एका शिष्यानें प्रश्न केला, "महाराज, वासना जिंकल्यावांचून जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका नाहीं म्हणतात, त्या वासनेचें रूप कसें आहे व तिचा परिहार कसा करावा?"

श्रीसमर्थ म्हणाले, "वासनेचें रूप संकल्पात्मक आहे व ती कोणत्या तरी वस्तूवर अधिष्ठित असते. ती निवळ हवेंत नसते, तिला कसला तरी आधार लागतो. स्त्री, पुत्र, घरदार, शेतीवाडी, देश, धर्म, समाज, बांधव, एकादें कार्य, एकादी संस्था, इत्यादि अनेक वस्तु आहेत. एकाद्यावर प्रेम, कोणाचा द्वेष, असलें कांहीं ना कांहीं तरी अधिष्ठान वासनेला लागतें. जन्ममरणापासून सुटावयाचें तर जिवंतपणीं च इतर वस्तूंवरील वासना काढून ती श्रीराम-समर्थ-चरणीं जडवावी म्हणजे अंतकाळीं ती च वासना प्रबळ होऊन जीवात्म्याचें परमात्म्याशीं तादात्म्य होईल." अशा अर्थाचा, त्या वेळीं, श्रीसमर्थांनीं एक अभंग च रचला. तो अभंग महत्त्वाचा आहे, तुम्हांआम्हांस मार्गदर्शक होईल, म्हणून उद्धृत करतों.

**अंतीं पंच भूतें पांचासी मिळालीं । वासना राहिली कोणें ठायीं ॥ १**
**कोणे ठायीं तेव्हां वासना हे राहे । कैसें रूप आहे वासनेचें ॥ २**
**वासनेचें रूप सुक्षम जाणावें । संकल्प स्वभावें रूप तिचें ॥ ३**
**रूप तिचें अंतकाळीं कोठें राहे । अनुभवें पाहें आपुलीयां ॥ ४**
**आपुला संकल्प जये वस्तूवरी । तेथें वस्ती करी वासना हे ॥ ५**
**वासना हे वस्ती करी अगोदर । जंव कळेवर सचेतन ॥ ६**
**सचेतन काया कारणीं लावावी । वासना गोवावी रामरूपीं ॥ ७**

**रामरूपीं सत्य संकल्प धरावा । संसार तरावा अवलीळा ॥ ८**
**अवलीळा भवसागर वोसरे । जरी मनीं धरे गुरुवाक्य ॥ ९**
**गुरुवाक्यें गती रामदासीं जाली । मुक्ति हे लाधली सायोज्यता ॥ १०**

प्रश्न किती गहन, पण त्याचें उत्तर किती सुलभ, सहज समजण्यासारखें दिलेलें आहे ! मला वाटतें, हा अभंग जसा प्रसंगानुसार रचला गेला, तशी श्रीसमर्थांच्या पुष्कळ स्फुट कवनाची निर्मिति प्रसंगोपात झालेली असावी. पण ते सारे प्रसंग आपणांस आतां कोण सांगणार ?

## ( ८१ ) अन्यायाची चीड आणि धर्माच्या लोपाची असह्यता

श्रीसमर्थ चाफळास राजयोगी म्हणून सुखानें नांदत असतां, एकदां सभेंत बसले होते, तों तेथें एक विप्र येऊन ठेपला. समर्थांच्या सभा म्हणजे भोंवताली शिष्यांचा गराडा, मध्यें समर्थ आणि गुरुशिष्यांचीं प्रश्नोत्तरें चालावयाचीं. अशी एकदां सभा भरली असतां तो विप्र पातला. त्यास समर्थांनीं पुसलें, " आपलें आगमन कोठून झालें ? " उभा राहून, हात जोडून विप्र म्हणाला, " समुद्रस्नान करून मुलुख पहात पहात व भेटतील त्या लोकांस वर्तमान पुसत पुसत चाललों असतां आपलें दर्शन घ्यावें, अशी मनाला उत्कंठा वाटली, म्हणून थोडें बाजूला वळून येथें आलों." त्यावर समर्थांनीं विचारिलें, " आपण पहात आलां त्या समुद्रकांठच्या मुलुखांतील लोक सुखी आहेत ना, धर्मकार्यें निर्विघ्नपणें चालू आहेत ना, रामभजनांत लोक गुंग असतात ना, कथाकीर्तनांत रामाचा प्रताप ऐकावयास मिळतो ना, त्या प्रांतीं पुण्यवान् पुरुष आहेत ना ? " विप्र म्हणाला, " महाराज, अभय असेल तर सर्व प्रश्नांचें उत्तर एका शब्दांत देतां येईल." समर्थ म्हणाले, " यथातथ्य वृत्त सांगण्यास हरकत कोणती ? अभय च आहे." विप्र म्हणाला, " काय सांगावें, सर्वत्र **अन्याय** भरला आहे. कसला धर्म आणि कसलें कर्म; पुरुष काय, पण स्त्रिया हि काय, कोणाच्या च वदनांत रामनाम नाहीं; कुठलें भजन आणि पूजन, कोणता च उपचार नाहीं !"

हें सारें त्या विप्राच्या तोंडून ऐकलें मात्र, श्रीसमर्थ ताडकन् उभे राहिले ! " जा, तुम्ही आपआपल्या उद्योगास लागा. आलेल्या पाहुण्यांस काय हवें

नको, पहा " असें शिष्यांना सांगून कोणास न कळवितां व कोणास हि बरोबर न घेतां, समुद्रकांठच्या त्या मुलुखाकडे जाण्यास समर्थ निघाले ! ' अन्याय ' शब्द कानीं पडला, थांबले नाहींत, निघाले ! मार्गांत उंच पर्वतावर निनाई देवीचें स्थान लागलें. श्रमले होते, पायांतील पैजारा, अंगावरील वस्त्र, छाटी, काठी बाहेर ठेवून आंत देवीपाशीं गेले. देवीनें आदरातिथ्य केलें, भोजन घातलें. ' श्रीसमर्थप्रतापांत ' निनाई देवी श्रीसमर्थांचें स्तवन करतांना म्हणते,

**निनाई देवी म्हणे मी श्रीचरण सेवीं । माझे घरीं तूं आजि जेवीं ।**

— श्रीसमर्थप्रताप, ५, ३५

आणि त्या दिवशीं, खरोखर च निनाई देवीच्या घरीं श्रीसमर्थांचें जेवण झालें. नंतर समर्थ विचार करीत विश्रांति घेत बसले.

इकडे चाफळास, समर्थ एकटे च निघून गेलेले पाहून, शिष्यमंडळी चिंतातुर झाली. त्यांनीं आपसांत ठरविलें आणि अकरा जण पाठोपाठ निघाले. वाटेंत लागतील त्या गांवोगांवीं शोध घेत चालले. लोकांनीं सांगावें, " आले होते आणि गेले." असा शोध काढीत काढीत डोंगर चढून ते अकरा जण निनाईच्या देवळापाशीं येतात, तों बाहेरच्या बाजूस समर्थांच्या पैजारा, छाटी, काठी या ओळखीच्या वस्तु त्यांच्या नजरेस पडल्या आणि उतावीळ होऊन प्रफुल्लित मनानें त्वरित आंत गेले, श्रीसमर्थांना पाहिलें आणि क्रमशः एकएकानें त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवलें. शिष्यांना तर आनंद झाला च, पण त्यांची निष्ठा पाहून समर्थ हि मनांतल्या मनांत संतुष्ट झाले असतील. अकरा हि जणांचीं भोजनें झालीं आणि त्यांना बरोबर घेऊन तेथून श्रीसमर्थ कोल्हापुरास गेले. तेथें हि मुक्काम जगदंबेपाशीं च झाला. कीर्तन झालें.

दुसरे दिवशीं त्या अकरांपैकीं फक्त सीतारामबावास ठेवून घेऊन बाकीच्या दहा जणांस चाफळास परत जाण्याची समर्थांची आज्ञा झाली. त्याप्रमाणें ते दहा जण परतले आणि सीतारामास बरोबर घेऊन श्रीसमर्थ पुढें जाण्यास निघाले. सिंगिनादाचें स्थान लागलें. तेथें दर्शनार्थ थांबले, मुक्काम झाला. तेथून पुढें परशुरामक्षेत्रास गेले. परशुरामाची समर्थांनीं प्रार्थना

केली. प्रार्थनेचे ते पांच श्लोक, करुणाष्टकांच्या पुस्तकांत विसावें करुणाष्टक म्हणून प्रकाशित आहेत. हे पांच श्लोक फार महत्त्वाचे आहेत. समर्थांच्या अंतरंगांतील तरंग त्यांत उमटले आहेत. त्यांचा विचार श्रीसमर्थहृदय ग्रन्थांत करणें जास्त सयुक्तिक होय.

क्षेत्रस्थांचा आग्रह पडला म्हणून समर्थांनीं, आपला प्रतिनिधि म्हणून सीतारामबावास त्या प्रांतीं मठ करून राहण्याची आज्ञा केली. सीतारामबावा कवि होते. थोडें विषयान्तर करून सांगतों, अन्वयव्यतिरेक हीं प्रकरणें आहेत खरोखर या सीतारामांचीं पण 'रामदासांचे समग्र ग्रंथ' म्हणून प्रकाशित करणारे प्रकाशक, हीं दोन्ही प्रकरणें श्रीरामदासांचीं म्हणून त्या ग्रन्थांत खुशाल समाविष्ट करीत असतात. §

परशुरामाची आज्ञा घेऊन श्रीसमर्थ समुद्रतीराला गेले, सहा महिने त्या भागांत राहिले, तेथील लोकांची बोली शिकले आणि त्यांच्या बोलींत त्यांना सदुपदेश करून त्यांना सदाचारप्रवृत्त केलें.

पहा, विचार करा, "अन्याय आहे, धर्माचा लोप झाला आहे" हें ऐकून श्रीसमर्थ अस्वस्थ होतात आणि त्यांच्या प्रतिकारार्थ कष्ट करण्यास प्रवृत्त होतात, यांत च त्यांच्या अवताराचें प्रयोजन आपल्या प्रत्ययास येत नाहीं काय ? मला हा प्रसंग श्रीसमर्थांच्या अवतारकार्याचें स्पष्ट दिग्दर्शन करणारा भासतो.

## (८२) कफाची व्यथा

श्रीसमर्थांच्या आयुष्यक्रमाचा विचार केला, म्हणजे त्यांना कफाची व्यथा जडावी, हें स्वाभाविक होतें. पुरश्चरणाचा काळ, तीर्थाटणाचा काळ आणि नंतरचा हि थंडीवाऱ्यांत, पाणीपावसांत, रानावनांत हिंडण्याचा काळ आणि या सर्व काळांत खाण्यापिण्याचे जे हाल झाले असतील ते, हें सर्व मनांत आणा. त्यांच्या मनाला याचें कांहीं वाटलें

---

§ सीतारामकवींनीं केवळ एवढीं दोन च प्रकरणें लिहिलीं असतील, असें मला वाटत नाहीं. त्यांची इतर हि पुष्कळ कविता असली पाहिजे. तिचें संशोधन माझ्या हातून झालें नाहीं. तें कोणीं तरी अवश्य करावें.

नसेल, किंबहुना त्यांत च त्यांचा आनंद हि असेल, पण शरीरावर परिणाम व्हावयाचा तो झाला च असणार.

**नित्य सीतोदकीं प्रातःस्नान । भूशिळावरी तटीं पहुडण ।**
**फळमूळ भक्षोन घ्यावें जीवन। कफवात तेणें प्रबळला ॥**

**त्यावरी जालें राहणें गडांत । सर्वकाळ वाजे सीतल वात ।**
**वृद्धपण हि सानकूल त्यांत । होतसे पीडा खोकल्यानें ॥**

—दासविश्रामधाम, ९४, १२–१३

वैद्यानें विड्यांत कांहीं औषध द्यावें व त्यांनीं वैद्याच्या समाधानासाठीं तें घ्यावें, पण त्यांचें स्वतःचें औषध मात्र वेगळें च होतें. तें त्यांचें वेगळें औषध म्हणजे मारुतीचा धांवा होय. तो त्यांनीं केलेला धांवा 'फणिवर उठवीला' या करुणाष्टकांत आपणांस वाचावयास व शक्य तर पाठ करावयास मिळतो. §

## (८३) भोळाराम खरा

या कफाच्या निमित्तानें भोळारामाच्या पीकदाणीची गोष्ट कोणास हि आठवेल.

पीकदाणी भरली म्हणजे कोणी तरी शिष्य ती धुवून आणून ठेवीत असे. एकदां जवळपास दुसरा कोणी शिष्य नव्हता, रामा नांवाचा एक मंद बुद्धीचा मुलगा होता. त्या मुलाला बापानें हांकलून दिलें होतें व त्याला कोणी चाफळास जा, असें सांगितल्यावरून तो चाफळास व नंतर गडावर श्रीसमर्थांच्या जवळ होता. या वेळीं त्याला च श्रीसमर्थांनीं हांक मारून पीकदाणी साफ करून आणण्यास सांगितलें. आपल्याला समर्थांनीं काम सांगितलें याचा रामास आनंद झाला. तो जड डोक्याचा असल्यामुळें, सांगितलेलें काम नीटपणें करील, असा त्याच्याविषयीं कोणास च विश्वास वाटत नसे, म्हणून त्यास कोणी कोणतें च काम सांगत नसत. पण या वेळीं समर्थांनीं आपणास काम सांगितलें, ही आपणावर त्यांची कृपा च झाली, असें त्यास वाटलें. हा पीकदाणींतला

§ १४४ वें करुणाष्टक पहा.

रस श्रीसमर्थमुखींचा आपणांस प्रसाद च लाभला, असा त्यानें विचार करून तो सारा रस गट्ट केला आणि पीकदाणी धुवून जेथल्या तेथें नेऊन ठेविली. थोड्या वेळानें रामास मळमळूं लागलें. काय होतें, म्हणून एका गुरुबांधवानें विचारलें. त्यानें खरें तें सांगितलें. त्या गुरुबंधूनें जाऊन समर्थांस कळविलें. त्यांनीं रामास बोलाविलें. रामा भीत भीत आला व एकदम श्रीसमर्थांच्या पायांवर पडला. मळमळणें राहिलें ! समर्थ म्हणाले, "दुसरा कोणी शहाणा असता तर त्यास शिक्षा च केली असती, पण तुला काय शिक्षा करावी, खरा भोळा राम आहेस." तेव्हांपासून त्याचें नांव च भोळाराम पडलें. पण त्यास हि समर्थांनीं महंती करावयास मारवाडप्रांतीं पाठविलें होतें. त्या प्रांतीं मानभावांचें बरेंच प्रस्थ माजलें होतें, तें भोळारामानें कमी केलें.

या भोळारामांचा निर्याणकाळ समीप येऊन ठेपला, तेव्हां भोळारामांना विचार पडला, आपल्या देहांत श्रीसमर्थांचा प्रसाद गेला आहे, तेव्हां हा देह भस्मसात् होऊं नये, पण आपल्यांत तर पुरण्याची चाल नाहीं, तेव्हां काय करावें ! त्यांनीं भूमीची प्रार्थना केली, "तूं च सर्वांचा आधार आहेस, मला पोटांत घे !" त्यासरसी भूमि तडकली, द्विभागी झाली आणि निजात्मरंगीं मग्न होऊन, भजन करीत करीत भोळाराम आंत जाऊन बसले !

**बैसणें काशाचें ठेविला देह । आपण तों गुरुपदीं जाला तन्मय ।**
**होणें काशाचें स्वरूप चि स्वयें । स्वतःसिद्ध गुरुकृपें असे हो ॥**
**जाली मग क्षिती येकाकार । ज्या स्थळीं असे योगींद्रशरीर ।**
**ते स्थानीं पृथ्वीला लंबायछिद्र । असे अद्यापि पूजावया ॥**

— दासविश्रामधाम, ९४, ८७–८८

माझ्या पाहण्यांत हें स्थान नाहीं. तें कोणतें ? भालगांवास डोंगरावर समाधी आहे, ती भोळारामाची असें तेथील लोक म्हणतात, पण ती आहे त्रिंबकांची. तसा लेख च त्या समाधीवर आहे. एलिचपुरास समाधी आहे, ती भोळारामांची, असें मी मानीत आलों आहें. पुढिलांनीं निर्णय करावा.

## ( ८३ ) श्रीसमर्थ बहुधा एकांतांत भोजन करीत

एरव्हीं नित्य श्रीसमर्थ एकांतांत भोजन करीत. आधीं मारुतिरायाचें भोजन होई आणि मग आपण प्रसाद म्हणून स्वीकारीत. त्यामुळें एक

वाढ करून घेऊन दार लोटून बसत. सर्वांना ताकीद असे कीं, कोणी मध्यंतरीं येऊं नये. या आज्ञेचें उल्लंघन वेणाबाईकडून होणें मुळीं च शक्य नव्हे. पण प्रस्तुत आम्ही सांगणार ती गोष्ट वेणाबाईची होय, असें कोणी चरित्रकार म्हणतात, पण तें खरें नव्हे, असें दासविश्रामधामकर्ते सांगतात. ते म्हणतात, नवीन उपदेश घेतलेल्या अम्माई नांवाच्या बाईची ही गोष्ट आहे. तिला समर्थांची ताकीद ऐकून ठाऊक होती, पण तिला इच्छा झाली पहावें, म्हणून तिनें फटींतून पाहिलें मात्र तों खोलींत सर्वत्र दैदिप्य प्रकाश भरलेला असून कपिनायक मारुती तिच्या दृष्टीस पडले. बाई तत्काळ मूर्च्छा येऊन पडली. श्रीसमर्थ बाहेर येऊन काननांत निघून गेले. सात दिवस परतले च नाहींत. बाई हि तशीच मूर्च्छित पडून होती. अशा प्रसंगीं रदबदली करण्याचें काम एक तर वेणाबाईकडे किंवा कल्याणाकडे येई. कल्याणांनीं जाऊन मन वळवून समर्थांना आणलें. समर्थांचा पदस्पर्श झाला आणि बाईची समाधी उतरली.

मेरुस्वामी ही गोष्ट कोणा एका बाईची जावळीजवळ पार येथें श्रीसमर्थ एकांतांत भोजन करीत असतां घडली म्हणून सांगतात. ती वाढावयास गेली तों मारुती भोजन करीत होते.

श्रीसमर्थप्रतापांत म्हटलें आहे—

**गंगाबाईसी हनुमानदर्शन । समर्थें येकांत भोजनीं दिल्हें जाण ।**
**काय स्वामी व्हावें पुसतां आपण । जेवितां हनुमान देखिले ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ११, २७

कोणाची हि ही गोष्ट घडलेली असो, एकदां घडलेली असो, किंवा तीनदां घडलेली असो, श्रीसमर्थ बहुधा एकांतांत जेवीत, तें कां, हें आपणांस समजलें, एवढें खरें.

## ( ८४ ) प्रतापगडावरील देवीच्या नथेंतील मोतीं

**श्रीतुळजादेवीसी नवसफूल वाइलें ।**
**देवीनें कंठमौक्तिकी श्रवणभूषण दिधलें ।**

—श्रीसमर्थप्रताप, ७, ९

सायंकाळची पूजा झाल्यावर दरवाजे बंद करून पुजारी गेला होता. शिवाय दरवाजावर पहारेकरी होते. असें असतां दुसऱ्या दिवशीं सकाळीं

पुजारी आला असतां देवीच्या नथेंतील चार मोतीं नाहींत, असें त्यास आढळलें. पुजारी, रखवालदार सर्व घाबरले. आदल्या सायंकाळीं होतीं आणि आतां सकाळीं नाहींत, हा काय चमत्कार. पुजारी किंवा फार तर पहारेकरी यांशिवाय दुसऱ्या कोणाचा संशय येण्याला हि जागा नव्हती. श्रीशिवाजी-राजांच्या कानांवर गोष्ट गेली. ते पुजारी आणि पहारेकरी यांस शिक्षा करण्यास प्रवृत्त झाले. देवीचा राजांना साक्षात्कार झाला कीं, सज्जनगडीं जाऊन श्रीसमर्थांना भेटून ये. राजे सज्जनगडास गेले, श्रीसमर्थांना नित्याप्रमाणें अकरा नमस्कार घातले आणि त्यांच्या कडे पहातात, तों त्यांच्या कानांत त्या चार मोत्यांचा चौकडा दिसला, पण हें एका रात्रींत झालें कसें ?

देवीनें त्या रात्रीं श्रीसमर्थांना बोलावून, आपल्या नथेंतील चार मोतीं काढून सोनाराकडून चौकडा तयार करवून श्रीसमर्थांच्या कानांत घालून त्यांचा गौरव केला होता.

श्रीशिवाजीराजांना आनंद झाला.

## ( ८५ ) एकदां न जेवतां च श्रीसमर्थ वनांत निघून गेले

कल्याणाची परीक्षा च पहावयाची होती. स्वयंपाक सिद्ध झाला, आतां भोजनास बसावयाचें, तों श्रीसमर्थ वनांत निघून गेले. कोणीकडे गेले, कोणीं सांगावें ! नैवेद्याचें ताट घेऊन वनाकडे जावयास कल्याण निघाले. अंधार पडत चालला, पुढें कोयना लागली. तसे च उतरून पार गेले. दोघे भिल्ल भेटले. त्यांनीं मार्ग दाखविला आणि श्रीसमर्थांची कल्याणांना गांठ घातली. कल्याणांनीं अभिवंदन केलें आणि ताट पुढें ठेवलें. अन्न तयार होऊन सहा प्रहर लोटले होते, गार झालें होतें. समर्थांनीं हातानें वाढून घेतलें आणि शेषपात्र झुगारून दिलें.

**समर्थांचें आत्मभोजन जालें ।**
**मुखशुद्धि तांबुल कल्याणें दिधलें ।**
**समर्थशेषपात्रीं जों शोधूनि पाहिलें ।**
**तों शेष ना पात्रें दिसेतिना दृष्टीं ॥**

**सद्गुरुनाथजी बोलती हास्यवक्तें ।**
**कल्याणा परलोकासी गेलीं तीं सत्पात्रें ।**
**वैकुंठ कैलास सत्यलोक पावलीं, चर्मनेत्रें ।**
**पुन्हां आतां दृष्टी दिसेतिना ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १५, १८–१९

नंतर घोंगडी आंथरली आणि तीवर श्रीसमर्थ पहुडले, तों इतक्यांत कल्याणांना दूर उजेड दिसला आणि ते म्हणाले, "महाराज, कोणी दर्शनास येत आहे, असें वाटतें." समर्थ म्हणाले, "अशा अंधारांत आणि अडचणींत दुसरे कोण येणार? येत असतील आमचे रंगनाथपंत." तों रंगनाथस्वामी येऊन थडकले.

## (८६) रंगनाथांचा थाट आणि श्रीसमर्थांचा विनोद

रंगनाथस्वामींचा राजयोग होता. त्यांचा नेहमीं थाट असे. ते एकटे नसत च. ते आले ते बरोबर सहस्र अनुयायी घेऊन. दिवट्या हिलालांच्या उजेडांत ते आले. कनाता, पडदे, पलंग, समया सर्व कांहीं त्यांच्या बरोबर होतें. श्रीसमर्थांच्या पूजेसाठीं फुलें आणि फळें त्यांनीं आणलीं होतीं. दहीं, दूध, साखर, सार्धीं केळीं, सोनकेळीं समर्थांना अर्पण केलीं. समर्थांनीं त्यांतील थोडथोडें सेवन करून कल्याणांस हांक मारली आणि म्हणाले, "अरे बघ तुजसाठीं रंगनाथांनीं काय काय आणलें आहे, तेव्हां आतां संकोच न करतां

**नैवेद्य करावा बलभीमार्पण ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १५, २५

मग रंगनाथांनीं एक एक केळें सोलून द्यावें आणि कल्याणांनीं खावें याप्रमाणें सर्व पदार्थांचा कल्याणांनीं फडशा पाडला.

## (८७) विलासाबरोबर च त्यागवृत्ति एका रंकाच्या जीवासाठीं

पावसाळा होता, मांडवी नदीला महापूर आला होता. श्रीसमर्थ पूर पहात कांठाशीं आरामशीर बसले होते. त्यांचा थाट पाहून एका अप्रबुद्ध

गृहस्थाच्या मनांत आलें, हे महाराज बरे च विलासी दिसतात. अशी कल्पना त्याच्या मनांत आली मात्र, तों वरच्या बाजूस हाहाकार झाला कीं, एक दीन दुबळा रंक पुरांत वाहवत चालला, काढा हो काढा. तो हाहाकार ऐकला आणि श्रीसमर्थांनीं तत्काळ पुरांत उडी घातली आणि उंब्रजपाशीं मांडनदीचा कृष्णेशीं संगम होतो, त्या ठिकाणीं त्या रंकासह श्रीसमर्थ बाहेर निघाले.

**समर्थासी कोण्ही येक म्हणे हे विळासमूर्ति शोभली।**
**समर्थें क्षण येक गोष्टी मनीं ठेविली।**
**येका रंकासाठीं बुडतां मांडवीनदींत उडी घातली।**
**उदंबरग्रामीं निघाले कृष्णासंगमीं॥**

—श्रीसमर्थप्रताप, १८, ३४

तो गृहस्थ तदनंतर श्रीसमर्थचरणीं अत्यंत लीन झाला आणि त्याला हि श्रीसमर्थांनीं मायेच्या पुरांतून सुखरूप परतीरास नेलें!

## ( ८८ ) वैदिकी ब्राह्मणांच्या तऱ्हा

एका श्रीरामनवमीच्या दिवशीं वैदिकी ब्राह्मण मंदिरांत प्रसादाला न येतां दत्ताजीपंत वाकेनिवीसाकडे जास्त दक्षिणा मिळेल, या आशेनें तिकडे गेले. तेव्हां श्रीसमर्थांनीं भोवरवाडीचीं शूद्र दंपत्यें आणवून त्यांना मांडनदींत मंगलस्नानें घालवून त्यांना च हजारों चोळ्या, पातळें, धोतरें देऊन त्यांचा च सन्मान केला. हें ब्राह्मणांना कळल्यावर मग ते श्रीसमर्थांकडे आले. तेव्हां समर्थांनीं नुसतें गोड बोलून च त्यांचा सन्मान केला आणि म्हणाले, "शूद्रांच्या वांट्याला वस्त्रें गेलीं, तुमच्या वांट्याला गोड शब्द आले, तेव्हां यदृच्छा जें मिळालें, त्यांत च संतुष्ट असावें." ( श्रीसमर्थप्रताप, १९, ७७–७९ )

## ( ८९ ) विवाहमंडपीं अधोदृष्टि

एकदां एका शिष्याच्या घरीं लग्नसमारंभ होता. त्याला साहजिक वाटलें कीं, श्रीसमर्थांनीं आपल्याकडे समारंभास यावें. त्यानें फार आग्रह करून त्यांना आपल्या घरीं नेलें व लग्नमंडपांत नाच चालला होता, तेथें

त्यांना नेऊन बसविलें. तेथें गेल्यावर श्रीसमर्थांनीं जें एकदां एक आसन ठोकून दृष्टि खालीं घातली, ती सहा प्रहर वर केली च नाहीं !

**समर्थांसी आग्रहें विवाहमंडपीं बैसविलें ।**
**ब्रह्मचर्यापुढें नाचणीध्यान मज्यालसींत मांडिलें ।**
**समर्थें साहा प्रहर अधोदृष्टी आसन घातलें ।**
**कवतुकें फजित केले प्रपंचीक जन ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १८, ४०

## (९०) निस्पृहतेचें सुख

श्रीसमर्थ आणि त्यांच्या भोंवतालचा ब्रह्मचारी शिष्यांचा मेळावा पाहून श्रीपांडुरंगाच्या हरिदासांना मोठें नवल वाटे. त्यांना त्यांची कींव येई. त्यांनीं एकदां समर्थांना म्हटलें च, "महाराज, आमचें पहा, पांडुरंगाच्या कृपेनें आम्हांस संतति आणि संपत्ति यांचा लाभ होत असतो आणि या तुमच्यापाशीं राहणाऱ्या निस्पृह शिष्यांना काय बरें सुख आहे?"

समर्थ श्रीवेणाबाईंना म्हणाले, "द्या यांच्या या प्रश्नाचें उत्तर."

वेणाबाई म्हणाल्या, "मंडळी हो, स्वतः अनुभवल्यावांचून यांच्या सुखाची कोणास कल्पना करतां येणार नाहीं, प्रपंचांत च ज्यांनीं सुख मानून घेतलें, त्यांना या निस्पृहांच्या राहणींतलें वर्म कळणार च नाहीं. समर्थांविषयीं म्हणाल, तर ज्ञान आणि वैराग्य ही च त्यांची संपत्ति आणि शिष्यसंप्रदाय ही च त्यांची संतति होय. या सर्वांच्या भाग्याला आणि वैभवाला काय तोटा आहे!"

—श्रीसमर्थप्रताप, १८, ५१–५३

## (९१) सेवाप्रेम

श्रीराम आणि श्रीसमर्थ यांची सेवा करण्यांत लवमात्र कसूर करूं नये. गुरुदेवघरीं अमुक काम मी कसें करूं, अशी शंका सुद्धां मनांत आणतां कामा नये. प्रत्यक्ष श्रीसमर्थांनीं या बाबतींत एकदां एक उदाहरण घालून दिलें. कोणी उठण्यापूर्वीं एकदां श्रीसमर्थांनीं सर्वांच्या आधीं उठून

अरुणोदयीं सभामंडप झाडून काढला व पुढें आंगणांत सडा हि घातला. मग शिष्यमंडळी उठली, अर्थात् पाहून ओशाळली. समर्थ म्हणाले :

**समर्थ म्हणती रे जो देवद्वार झाडी। तो नर चढे वैकुंठपाहाडीं।**
**थोरपणें धरितील ते ज्ञातीं वेडीं। सर्वां सर्वत्र हें सांगितलें॥**

—श्रीसमर्थप्रताप, १८, २९

म्हणून तर हें वृत्त गिरिधरांच्या मार्फत आपणांपर्यंत येऊन पोंचलें.

## (९२) श्रीसमर्थ गडावर असतां एक वर्षीं दुष्काळ पडला

श्रीसमर्थ गडावर रहावयास गेल्यापासून त्यांच्या संनिध राहणारांची संख्या सारखी वाढत च चालली होती. तशांत एक वर्षीं प्रखर दुष्काळ पडला. तें वर्ष बहुधा शके १५९९–१६०० असावें. गडावर दुष्काळ जाणवूं लागला, तेव्हां इतरत्र त्यानें किती कहर मांडला असेल! अनेकांनीं विचार केला, गडावर जाऊन समर्थांपाशीं रहावें, ते आपणांस घालवून थोडे च देतील! शिवाय गडावर पंक्तिप्रपंच नाहीं, जें समर्थांच्या पात्रांत, तें च सर्वांच्या.

गडावरील हलाखीची वार्ता शिवाजीराजांच्या कानांवर गेली. त्यांनीं मनांत आणलें कीं, श्रीसमर्थ कष्टी असतां माझ्या राज्यसंपदेचा काय उपयोग? त्यांनीं लागली च योजना केली. एका मनुष्याची त्या कामावर त्यांनीं नेमणूक केली व गडावर येतील त्या सर्वांची भोजनाची व्यवस्था लावली. राजे स्वतः गडावर गेले व त्यांनीं अकरा गांवांची सनद समर्थांपुढें ठेविली. समर्थ म्हणाले, "ही सनद सध्यां बाजूस ठेव, हें पहा, आम्ही गडावर सुखांत असलों म्हणजे सारी जनता थोडी च सुखी होणार आहे? दुनिया दुःखांत असतां आम्ही गडावर सुखांत असावें, हें शोभेल काय? आणि मला तें सहन तरी होईल काय? गडावर आम्हां निस्पृहांना चिंता वाटावी, अशी स्थिति आहे, तर देशांत प्रपंची जनांचे काय हाल होत असतील?" अशा च वेळीं, 'कल्याण करी देवराया' या पदाची निर्मिति झाली असावी, असें वाटतें. मोठ्यानें श्रीरामनामाची गर्जना करून दाही दिशांकडे दृष्टि फेकून श्रीसमर्थांनीं श्रीरामाचा धांवा केला.

खंडळ मंडळ सव भूमंडळ ।
लोक पडिले विकळ तूं कृपाळ ॥ १

अन्न चि मिळेना चिंता लागली मना ।
धांवे तूं जगज्जीवना रे पावना ॥ २

ऐसा विषम काळ जाली तळमळ ।
जाहले व्याकुळ तूं सर्वपाळ ॥ ३

कोणी नाहीं जनासी सांगावें कोणापासीं ।
जाल्या दुःखाच्या राशी रे हृषीकेशी ॥ ४

दास म्हणे जना भजन मानेना ।
आतां कोणी च धांवेना रे पावना ॥ ५

लवकर च सुभिक्ष झालें.

## ( ९३ ) गडावरील अग्निकुंडांतील विभूति

गडावर श्रीसमर्थ बहुधा एकांतांत अग्निकुंडाजवळ बसलेले असत. जें कुंड आज शेजघरांत आहे, तें च त्या वेळचें असेल, असें वाटत नाहीं; पण जागा मात्र ती च असावी. तेथें ते बसत आणि भेटावयास येण्याची कोणाला च आडकाठी नसल्यामुळें आपआपलीं सुखदुःखें सांगावयास अनेक लोक तेथें येत. कोणी हि आले, म्हणजे

**आरत या हे चि वदती सज्जन । कुंडामाजील भस्म स्वकरानें ।**
**चर्चितां भाळीं सवे चि दुखणें । होऊनि निरशन सुखावती ॥**

—श्रीदासविश्रामधाम, ९४, २९

श्रीदासविश्रामधामकर्ते आत्मारामहाराज सांगतात, " माघ वद्य नवमीच्या नऊ दिवसांच्या उत्सवांत कोणत्या हि दिवशीं किंवा एरव्हीं कोणत्या हि शनिवारीं त्या कुंडांतील विभूति घेऊनि आपल्या संग्रहीं ठेवावी, म्हणजे ऊर्जित होतें. " ते म्हणतात, " माझ्या कडे च पहा, माझी काय योग्यता दासलीला वर्णन करून सांगण्याची, पण मीं ती विभूति जिव्हेला लावली आणि मला वाचा फुटली ! "

श्रद्धावान् भक्त अद्यापि त्या विभूतीचा याप्रमाणें अनुभव घेत आहेत, आज हि उत्सवांतील नऊ दिवसांत किंवा कोणत्या हि शनिवारीं त्या कुंडांतील भस्म मोठ्या प्रेमानें कपाळीं लावतात व घरीं घेऊन जातात.

## (९४) पुढें पुढें मग श्रीसमर्थांच्या लहानपणच्या गोष्टी लोक सांगूं लागले

अर्थात्, त्यांत कांहीं घडलेल्या असतील, कांहीं नसतील हि व कांहीं फुगवलेल्या असतील. तथापि पुढील गोष्टी जनतेंत प्रचलित झाल्या होत्या.

(श्री) एका मुलाची गोटी खेळतांना फुटली. नारायणाचा स्पर्श होतां च ती पूर्ववत् धड झाली !

(रा) एकाची कुंची हरवली. तेव्हां मूल रडत घरीं गेलें. आईबापांनीं त्याला मार दिला व कुंची हरविल्याचें निमित्त नारायणावर घातलें. कुंचीच्या शोधार्थ ते नारायणाकडे आले, तेव्हां नारायण म्हणाला, "कुंची तर ती तेथें पडली आहे." आईबाप ती उचलून घेऊन गेले, तर वाटेंत त्या मुलाची होती ती कुंची सांपडली ! मग ही पहिली हुबेहुब तशी च कुंची कोठून आली ? मारुतीरायाला ठाऊक !

(म) एका सासुरवासिणीची घागर फुटली. आतां सासू बोलेल म्हणून बिचारी रडत बसली. नारायणाच्या कटाक्षानें घागर धड झाली !

(दा) एका बाईची गळसरी तुटून मोतीं नदींत गळालें. बालसंतानें कृपेनें पाहिलें आणि मोतीं तरंगत वर आलीं.

(स) शाळेंत एका पोरानें पाटीवर लिहिलेलीं अक्षरें पुसलीं गेलीं. पोर रडूं लागलें. नारायणानें पाटीकडे पाहिलें आणि अक्षरें उमटलीं.

लहानपणीं जांबेस असतां या गोष्टींकडे कोणाचें हि लक्ष गेलें नसेल. पण कालांतरानें जेव्हां त्यांची राजयोगकीर्तिप्रभा सर्व देशभर फांकली, तेव्हां या गोष्टी लोकांच्या बोलण्यांत येऊं लागल्या.

## ( ९५ ) विशिष्ट अभंगाचें कल्याणांना स्मरण

औरंगाबाद येथील मुक्कामांत एका रात्रीं कीर्तन करीत असतां, संदर्भाच्या ओघांत एक विशिष्ट वैराग्यपर अभंग म्हटला जावा, असें समर्थांच्या मनांत आलें. कल्याण मागें उभे होते च. " म्हणा तो अभंग, " असें त्यांना समर्थ म्हणाले. कोणता अभंग तो कल्याणांच्या लक्षांत येईना. समर्थांनीं टाळ भिरकावली, ती कल्याणांना लागली आणि त्यांना अभंग आठवला :

**नको ओळखीचे जन । आंगीं जडे अभिमान ॥ १**
**आतां तेथें जाई मना । जेथें कोणी ओळखेना ॥ २**
**लोक म्हणती कोण काय । पुसों जातां सांगों नये ॥ ३**
**रामदास म्हणे पाहीं । तेथें कांहीं चिंता नाहीं ॥ ४**

## ( ९६ ) निनामपाडळी जळाली

केव्हां एकाकी, तर केव्हां केव्हां शिष्यांना बरोबर घेऊन काननांत हिंडण्याचा श्रीसमर्थांचा दंडक असे. तळ अरण्यांत च पडावयाचा. शिष्यांनीं गांवांतून भिक्षा मागून आणावयाची, रात्रीं गांवांत कीर्तन करून मिळालेल्या भिक्षेची जणूं फेड करावयाची, लोकांना श्रवणाचा चटका लावावयाचा व कोणास न कळत दुसरीकडे चालतें व्हावयाचें, असा त्यांचा शिरस्ता होता. त्याप्रमाणें एकदां निनामपाडळीच्या रानांत तळ पडला असतां बरोबर चौसष्ट शिष्य होते. ते गांवांत भिक्षेला गेले. तेव्हां गांवचे पाटील पटवारी शिष्यांना टाकून बोलले,

**कां घमंडे हो टाकिला संसार । कां गोरगरिबा पाडिता सितर ।**
**बोलूनि अवाच्य करूनि मार । त्रासिले सत्त्वसील भक्ता ॥**

—दासविश्रामधाम, ४०, ७३

शिष्य परत येऊन हा प्रकार श्रीसमर्थांना विदित करतात, तों तिकडे गांवांत

**सदा सर्वदा रामदासासि पावे । खळीं गांजितां ध्यान सांडूनि धांवे ॥**

ते मारुतिराय प्रकट होऊन त्यांनीं हातीं चूड घेऊन गल्लोगल्लीं फिरून अग्नीचा धडका उठवून दिला. आग गांवभर पसरली. हें कशाचें फळ

होय, हें लक्षांत येऊन गांवकरी श्रीसमर्थांकडे जाऊन आडवे पडले आणि बोलले, " महाराज, कांहीं जणांच्या अपराधामुळें सर्वांना च शिक्षा होत आहे, क्षमा करावी. " समर्थांना दया आली, त्यांनीं गांवकरी यांना " उठा " म्हणून आज्ञा केली आणि " गांवाकडे पहा, " असें सांगितलें. गांवकरी पाहतात तों काय ? जो चूड घेऊन आग लावीत होता, तोच आतां खांद्यावर प्रचंड घागर घेऊन ती विझवीत होता !

अशा च एका प्रसंगाचा गिरिधरांनीं हि उल्लेख केला आहे ;

**समर्थांच्या निस्पृहांसी यवन छळक ।**
**नागठाणीं भिक्षाटणीं छळी देख ।**
**समर्थ ऐकोनि वनीं पळती निशंक ।**
**मागें हनुमान जाळिती यवनगृहें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १८, ३५

## (९७) उंब्रजेचा जटिल

उंब्रजेस एक जटिल होता. त्यानें गुरुपणाचें बरें च प्रस्थ माजविलें होतें. तेथील एक शूर मराठा त्याचा शिष्य झाला होता. कामानिमित्त तो मराठा परगांवीं गेला असतां जटिलाची बुद्धि चळली. त्या शूराची तरुण स्त्री हि त्यास वश झाली. शिष्य परगांवाहून येण्याचे दिवस जवळ आले, तसे दोघे हि घाबरले. शिष्य आला व त्याच्या कानांवर स्वस्त्रीची वार्ता गेली. त्यास तिची धन्यता वाटली कीं तिनें आपला देह गुरूस अर्पण केला. तेव्हांपासून तो तिला गुरुपत्नी मानून आई म्हणूं लागला.

जटिल गुरु व मराठा शिष्य यांचें हें चरित्र श्रीसमर्थांच्या ऐकण्यांत आलें. ते उंब्रजेस मुद्दाम त्या शिष्याच्या भेटीस गेले. " आम्हांस त्या शिष्याची भेट करवा " असें समर्थ लोकांस म्हणाले. पण तेव्हां हि त्या शिष्याचें दुसऱ्या गांवीं जाणें झालें होतें. लोक म्हणाले, " शिष्य गांवीं गेला आहे, पण त्याचे गुरुमहाराज येथें आहेत, त्यांची भेट होऊं शकेल. " समर्थ म्हणाले, " आम्हांस त्या थोरवंटाशीं ( चांडाळाशीं ) कांहीं कर्तव्य नाहीं, आम्हांस त्या शिष्यास भेटण्याची इच्छा आहे. "

समर्थांची भाषा जटिलाच्या कानांवर गेली. तो घाबरला. तो पळाला, उंब्रज सोडून दुसरीकडे च गेला. शिष्य परत आला, गुरुमहाराज आपणांस टाकून गेल्याचें पाहून तो कष्टी झाला.

समर्थ त्यास भेटले, त्याच्या हृदयांत शिरले, त्याचा उद्धार झाला. जटिल हि पुढें पश्चात्तापानें दग्ध झाला. ( दासविश्रामधाम, ४१ )

## ( ९८ ) शाहीरांचें गर्वहरण

कांहीं शाहीर गांवोगांवीं जाऊन आपलीं कवनें गाऊन दाखवून लोकांचें मनोरंजन करीत व जयपत्रें घेत घेत, एका पौष महिन्यांत चाफळास येऊन पोंचले. ते चाफळास हि जयपत्राचा च हट्ट धरून बसले. समर्थांनीं त्यांना सांगून पाहिलें कीं, "असला अहंकार चांगला नव्हे, गावयाचें तें गा, मंडळींची करमणूक करा, मिळेल तें द्रव्य घ्या आणि आनंदानें जा." पण ते ऐकेनात. "बरें तर, तुम्ही सवाल टाकतां कां आम्ही टाकूं ?" असें त्यांना समर्थांनीं विचारतां च, "तुम्ही आधीं पुसा, आम्ही तुमच्या प्रश्नाचा परिहार करूं आणि मग आम्हांस काय पुसावयाचें असेल तें पुसूं," असें शाहीर म्हणाले. समर्थांनीं लागली च डफ सज्ज करण्याची व झालर, तुणतुणी घेण्याची कल्याणादि शिष्यांना आज्ञा केली. सर्व सिद्धता होतां च श्रीसमर्थ सरसावून बसले आणि डफगाणें गाऊं लागले. तें गाणें त्या वेळीं श्रीसमर्थांच्या तोंडून सर्व भाग्यवंतांनीं ऐकिलें आणि आज आपण तें नुसतें वाचून कां होईना, पण अहंता सोडून श्रीरामसमर्थचरणीं लीन होऊन रहावयाचें आहे.

( बाडांक ६१८ वरून )

**किती पृथ्वीचें वजन । किती अंगुळें गगन ।**
**आहे सिंधूचें जीवन । किती टांक ॥ १**

**वायुसरिसे उडती । सांग अणुरेणु किती ।**
**लक्ष चौऱ्यायसी उत्पत्ति । रोम किती ॥ २**

**किती आकाशींचा वारा । किती पर्जन्याच्या धारा ।**
**तृण भूमीचें चतुरा । किती आहे ॥ ३**

सर्व सरिताची वाळु । सप्तसागरीं केंवाळु ।
किती आहेती हरळु । सांग मज ॥ ४

बीज वडीं आणि पिंपळीं । किती आहे भूमंडळीं ।
सर्व धान्याची मोकळी । संख्या सांग ॥ ५

अठराभार वनस्पति । भूमंडळीं पानें किती ।
फळें फुलें मजप्रति । सांग आतां ॥ ६

जें जें पुसिलें म्यां तुज । तें तें सांग आतां मज ।
अनंत ब्रह्मांडीं बेरिज । किती जाली ॥ ७

सांग माझें डफगाण । नाहीं तरी सोडी जाणपण ।
देहबुद्धीचें लक्षण । सोडवीन ॥ ८

रामदासाच्या विनोदें । सोडा अहंतेचीं ब्रीदें ।
मग स्वरूपीं स्वानंदें । सुखी राहा ॥ ९

श्रोतीं व्हावें सावचित । आतां सांगतों गणित ।
सर्व आहे अगणित । सत्य वाचा ॥ १०

हें गणित शाहीरांना कोठून सांगतां येणार? ते निरुत्तर झाले, त्यांचा गर्व गळाला. ते समर्थांना शरण आले. समर्थांनीं त्यांस हुर्मुजी रुमाल देऊन संतुष्ट केलें.

## (९९) बाहेगांवचा मारुती

या मारुतीची कथा कोणत्या रामायणांत किंवा पुराणांत आहे, मला ठाऊक नाहीं. ती श्रीसमर्थांनीं च एका करुणाष्टकांत सांगितली आहे व तिचा च अनुवाद त्यांच्या सर्व चरित्रकारांनीं केलेला आहे. ती कथा अशी :

रावणाचा वध करून, त्याच्या बंदिशाळेंत पडलेल्या देवांना मुक्त करून व बिभीषणास लंकेचें अक्षय राज्य देऊन विमानानें राम परतले असतां, मार्गांत सिरटें गांव आहे, तेथें सीतामाई राहिल्या व जवळ च एका ठिकाणीं कृष्णातीरीं स्नानसंध्येसाठीं स्वतः राम आणि लक्ष्मण उतरले. दोघे हि देहभान विसरून जपध्यानांत मग्न असतां कृष्णेला एकाएकीं मोठा थोरला लोंढा आला. त्यायोगें त्या दोघांच्या ध्यानाचा भंग होणार असें पाहातां च,

ते ध्यानस्थ बसले होते त्याच्या वरच्या बाजूस दोन्ही बाहु दोन बाजूंस पसरून सबंध लोंढा आपल्या छातीवर घेऊन पाणी दोन्ही बाजूंस काढून द्यावें व आपल्या पाठीशीं राम-लक्ष्मणांना घालून महापुराचा त्यांना उपसर्ग पोंचूं देऊं नये, अशा इराद्यानें भीमरूपी मारुती उभे ठाकले. त्यांच्या छातीवर लोंढ्याचें पाणी आदळून तें दोन योजनें मागें हटलें व तुंबून तेथें मोठा डोह झाला व जास्त पाणी होतें तें दोन्ही हातांच्या दोन बाजूंनीं वाहत जाऊन पुढें कांहीं अंतरावर खालच्या बाजूस पुन्हां एक होऊन वाहूं लागलें. म्हणजे मारुतीच्या पाठीमागच्या बाजूस एक बेट बनलें आणि राम-लक्ष्मणांच्या ध्यानांत जें विघ्न येऊं पाहात होतें, त्याचें मारुतीरायांनीं याप्रमाणें निवारण केलें. दोन्ही बाहूंनीं नदी विभागली गेली म्हणून त्या ठिकाणीं जें गांव आहे, त्याचें नांव हि 'बाहे' पडलें.

त्या अष्टकांत श्रीसमर्थ म्हणतात, "आपणांस हा कथाभाग ठाऊक असल्यामुळें, आपणांस साहजिक च वाटलें कीं, अशा ठिकाणीं मारुती असणार च, म्हणून आपण मोठ्या उत्सुकतेनें त्यांच्या दर्शनास आलों, तों येथें मारुती नाहींत, हें पाहून आपणांस परम विस्मय वाटला." समर्थांनीं साहजिक च, मारुतीचा धांवा मांडला आणि मारुतीनें डोहांतून मेघगर्जनेप्रमाणें हांक देऊन श्रीसमर्थांना बोभाइलें. त्या हांकेसरसी, श्रीसमर्थप्रतापकार म्हणतात :

**समर्थें कृष्णेमध्यें भीमकुंडीं बुडी दिधली ।**
**हनुमानमूर्ति पुरातन निद्रिस्थ उठविली ।**
**ब्रह्मदेवें त्रेतायुगीं पुजूनि जे प्रासादिली ।**
**कलयुगीं जागी केलीसे जगदोद्धारा ॥**

**ब्रह्मदेवाचें भविष्यवचन । कलयुगीं हनुमान अवतार होईल जाण ।**
**आपआपणा जागें करून । जगदोद्धार करील ॥**

**गौतमीतीरीं उत्पन्न होऊन । कृष्णातीरीं रहावया हें चि कारण ।**
**श्रीरामअवताराचें अखंड स्मरण । पूर्वाख्यान स्मरतसे ॥**

— श्रीसमर्थप्रताप, ३, ३८ – ४०

म्हणतात, श्रीसमर्थ अकरा दिवस त्या डोहांत च होते. नंतर बाहेर आले आणि जेथें मारुती उभे ठाकले होते, तेथें त्यांनीं मारुतीची स्थापना केली.

राम वैकुंठधामास गेले तेव्हां मारुतीला चिरंजीव करून आपल्या मागें ठेवून निरवून च गेले होते कीं,

**रघुनाथउपासकाला प्रसंगें। सख्या मारुती पाव रे लागवेगें ॥**

— करुणाष्टकें, ५३, ९

समर्थ म्हणतात, " प्रभूच्या या निरविण्याचा मला या क्षणीं याप्रमाणें प्रत्यय आला, पण मी हें कोणास सांगूं, कोण ऐकतील आणि कोण मानतील, तेव्हां हा सद्यप्रत्यय पाहून माझ्या मनाची जी अवस्था झाली, ती माझी मला च ठाऊक ! "

श्रीसमर्थांना आमचा असा अविश्वास कां वाटावा ? " महाराज, आम्ही आपलें प्रत्येक वचन वेदतुल्य मानतों. "

## ( १०० ) शिवरायानुग्रहाची कथा

श्रीदासविश्रामधामकारांच्या म्हणण्याप्रमाणें श्रीसमर्थांची श्रीशिवरायावर कृपा झाल्याची हकिकत अशी आहे :

देशाची आणि धर्माची विपन्नावस्था पाहून महाराजांना एकदां वैराग्य प्राप्त होऊन सात दिवस अन्नपाणी वर्ज करून तप करीत ते देवीच्या चरणांपाशीं बसून राहिले. " काय पाहिजे तें माग, " असें देवी बोलली. यांनीं दोन गोष्टी मागितल्या. १. राज्यसंपदावैभवपद आणि २. भक्तिमुक्तिप्रत्ययज्ञान शुद्ध. देवी म्हणाली, " पहिली गोष्ट देणें माझ्या स्वाधीनचें आहे, पण दुसरी सद्गुरुवांचून प्राप्त होणें नाहीं. " महाराजांनीं नम्रपणें विनंति केली, " मला एक नको, दोन्ही पाहिजेत. " देवीनें हा वृत्तान्त समर्थांना कळवून " तुमच्याकडे राजाला पाठवितें, " म्हणाली. त्याप्रमाणें महाराजांनीं पर्वतातळीं श्रीसमर्थांची भेट घेतली, नजराणा पुढें ठेवला, तो श्रीसमर्थांनीं उधळला आणि

**देऊनि राजया अभयकर। सांगोनि कर्णी तारक मंत्र।**
**निरोप दिधले राज्य स्वतंत्र। करिसील रामकृपेनें ॥**

— दासविश्रामधाम, २१, १०८

श्रीसमर्थांच्या उन्मत्तदशेचा शेवट होण्याच्या पूर्वीं च त्यांची महाराजांवर कृपा झाली. ( दासविश्रामधाम, २२, १० )

## ( १०१ ) शिंगणवाडीचें रान

श्रीसमर्थांच्या चरणधूलीनें पवित्र झालेलीं सर्व च ठिकाणें मला अति प्रिय वाटतात, पण त्यांत हि चाफळखोऱ्यांतील शिंगणवाडीचें रान विशेष च वेड लावणारें आहे. चाफळक्षेत्र मग झालें, समर्थ प्रथम प्रथम शिंगणवाडीच्या रानांत च रहात. चाफळक्षेत्र उभारल्यावर सुद्धां पुष्कळ वेळां ते चाफळास न रहातां रात्रंदिवस शिंगणवाडीच्या रानांत च काळ कंठीत. त्या रानांत च जवळपासच्या डोंगरांत, घळींत, करवंदीच्या जाळींत ते सुखानें वास्तव्य करीत. तेथें च त्यांचें दर्शन घेण्यास लोक जात. श्रीशिवाजीराजावर कृपा झाली, ती या च रानांत. त्यानंतर हि पुष्कळदां या च रानांत त्यांच्या भेटी झाल्या.

आत्मारामहाराजांच्या दासविश्रामधाम ग्रन्थाची रचना शक १७२५ च्या सुमारास झाली. त्या वेळेपर्यंत परंपरेनें त्यांच्या ऐकण्यांत होतें कीं, या च ठिकाणीं शिवाजीराजांना समर्थांचा उपदेश झाला.

**पूर्वीं ते स्थळीं नृपासी वरद । जाला लाभला आत्मैक्यबोध ।**
**गुरुदक्षणाखालीं राज्य समुद्र । लेहोन अर्पिला तेथें चि ॥**

**लावावया हुर्मुजी निशाण । आज्ञा दिधली ते स्थळीं सज्जनें ।**
**आतां हि जाळींत ध्यान संधान । सांगूनि केलें कृतार्थ ॥**

**अद्यापि तेथें सांगती जन । हें नृपाचें उपदेशस्थान ।**
**परी उपदेशकाळींचें जें महिमान । जाणे जगदंबा पूर्वीं च ॥**

—श्रीदासविश्रामधाम, ५७, २१–२३

समर्थभक्तांनीं तेथें जाऊन लोटांगण घालावें आणि काय वाटतें त्याचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावा ! मी काय सांगणार ?

## ( १०२ ) शिंगणवाडीचा मारुती आणि श्रीराममंदिराची जागा

उत्तरेकडील तीर्थें करीत असतां श्रीसमर्थांना एका सिद्ध पुरुषानें एक सोटा अर्पण केला होता. तो श्रीसमर्थांनीं शिंगणवाडीच्या रानांत एका ठिकाणीं यदृच्छेनें रोवून ठेवला होता. त्याच्या पुढच्या वर्षीं तेथें जाणें झालें असतां,

पाहतात तों तें वाळलेलें काष्ट हिरवळून त्यास पालवी फुटली होती. समर्थांना आश्चर्य वाटलें. उन्हाळ्याच्या दिवसांत एकदा ऊन टाळण्यासाठीं तेथें बसले असतां शुभ शकुन होऊं लागले. शेजारीं भूमि चमकूं लागली, तेथें पाणी असावें, असें वाटलें, अंगावर वारा यावा, तर तो सुवासित असावा, अशीं चिन्हें पाहून या जागीं मारुती स्थापावा, असें त्यांच्या मनानें घेतलें. नंतर दिवसभर सभोंवतीं फिरत हिंडले आणि रात्रीं पुन्हां तेथें च येऊन निजले, तर स्वप्नांत श्रीराम आले. त्यासरसे उठले आणि पूर्व दिशेकडे पाहतात, तों अनुपम्य प्रकाश नजरेस पडला आणि कानांवर कीर्तनाचा घोष येऊं लागला. नवल करीत करीत च पुन्हां झोपीं गेले. प्रातःकाळीं उठून स्नानसंध्यादि कर्म सारून मानसपूजेस बसले असतां मारुतिराय प्रकट झाले. त्यांना नमस्कार करून रात्रींचा वृत्तान्त निवेदन केला. तो ऐकून मारुती हास्यमुखें समर्थांना म्हणाले :

**श्रीरामाचा तूं लाडका केवळ । स्वप्रकाशाचें प्रत्यक्ष फळ ।**
**येथूनि परमार्थ होय सुकाळ । वाढोनि प्रबळ उपासना ॥**

**ये स्थळीं स्थापी मम नाम मूर्ति । आणि जे स्थानीं देखिली ज्योती ।**
**क्षेत्र करूनि तेथें निगुती । श्रीरघुवर्या स्थापिजे ॥**

— श्रीदासविश्रामधाम, ४५, ३४–३५

त्याप्रमाणें समर्थांनीं त्या जागीं मारुतीची स्थापना केली आणि जेथें पाणी असावें, असें भासलें होतें, तेथें त्यांनीं स्वतःच्या हातानें खणून तीर्थ निर्माण केलें आणि स्वतः च बांधून काढलें. असें हें परम पवित्र स्थान आहे. या च शिंगणवाडीच्या रानांत समर्थांचा शिवरायाला अनुग्रह झाला.

जेथें प्रकाश दिसला आणि जेथून कीर्तनाचा घोष कानांवर आला त्या जागीं श्रीराममंदिर उभारण्याच्या उद्योगास श्रीसमर्थ लागले.

## ( १०३ ) श्रीसमर्थांचा मिरवीत राजगृहप्रवेश

"तुम्ही व्हा पुढें, आम्ही येतों मागाहून," असें श्रीशिवरायाला सांगितल्या-वरून राजे पुढें गेले व मागाहून चार दिवसांनीं दत्तला बरोबर घेऊन

श्रीसमर्थ निघाले, ते साताऱ्याजवळ एका बागेंत जाऊन उतरले. तो रथसप्तमीचा दिवस होता. श्रीसमर्थ आल्याची वर्दी राजे यांना पोंचतां च ते परिवारासह तत्काळ दर्शनास आले आणि आपल्या शिरस्त्याप्रमाणें अकरा नमस्कार घालून श्रीसमर्थांच्या सन्निध गेले. तो दिवस बागेंत च कंठावयाचा, असें ठरलें. साताऱ्याहून श्रीसमर्थदर्शनास येणाऱ्या स्त्रीपुरुषांचा प्रवाह सारखा सुरू झाला. औपचारिक बोलणीं होऊन राजे व्यवस्थेला लागले. भोजनाची तयारी झाली. राजांना समर्थ विनोदानें म्हणाले, "तुम्ही सर्व जण पंचपक्वान्नांचें भोजन करा, आम्ही आमचे दोन पानगे भाजून देवाला नैवेद्य करूं." समर्थांना राजे तसें थोडें च करूं देणार होते!

दर्शनेच्छु लोकांची रीघ चालू च होती. पंडित, वैदिक, हरिदास, साधुसज्जन, इतकें च काय, पण भोळे, भाबडे, भिकारी, याचक सर्व च आले आणि गेले. तरुण मंडळी तर गांवांत कोणी च मागें राहिली नव्हती. सर्व च बागेकडे लोटले होते. पण गागा पंडित मात्र आले नव्हते. त्यांना आणण्यासाठीं राजांनीं मुद्दाम पालखी पाठविली. गागा पडले विद्वान् शास्त्री, संस्कृताभिमानी! त्यांना प्रश्न पडला, आपण गेलों तर आपणांस समर्थांना आधीं नमस्कार करावा लागणार, शिवाय त्यांच्याशीं मराठी भाषेंत भाषण करावें लागेल! तेव्हां त्यांनीं पालखी परत करून निरोप पाठविला कीं, आपण आजारी असल्यामुळें येऊं शकत नाहीं. निरोप ऐकून राजांना नवल वाटलें नाहीं, कारण पंडितांचा आजार राजे जाणून होते. गागा गेले नाहींत, पण बागेंत काय काय होतें, कोण कोण येतात, राजे काय म्हणतात, समर्थ काय करितात, कीर्तनें कोणाचीं होतात, वगैरे बातमी आपणांस इत्थंभूत कळावी, अशी गागांना चुटपुट लागली, म्हणून त्यांनीं आपल्या विश्वासांतला एक माणूस पाठवून बातमी आणविली होती. रथसप्तमीच्या रात्रीं बागेंत च कीर्तनें झालीं.

दुसरे दिवशीं सकाळीं बागेपासून राजगृहापर्यंत मिरवणूक निघाली. त्या मिरवणुकीचा थाट कोण वर्णूं शकेल! शब्दांची उणीव कल्पनेनें भरून काढली पाहिजे. श्रीसमर्थांच्यासाठीं शृंगारलेला हत्ती सज्ज होता. शिष्यमंडळीसाठीं पालख्यांची योजना होती व इतरांसाठीं गाड्या, घोडे वगैरे तयार होते. राजे यांनीं सर्व योजना श्रीसमर्थांना विदित केली. त्यावर

श्रीसमर्थांनीं सर्वांना आज्ञा केली कीं, राजे यांचें भक्तिप्रेम पाहून आपणांस त्यांची भीड मोडवत नाहीं, तेव्हां त्यांनीं जी काय व्यवस्था केली असेल ती सर्वांनीं मान्य करावी, कोणता च विकल्प मनांत आणूं नये. त्याप्रमाणें सर्व तयारी झाली आणि

**मग थोर कृपाळु गुरुगोसावी । करिवरावरी बैसले ॥**

**आज्ञा दिधली जाणोनि समर्थ । चतुर प्रधानीं जाला माहुत ।**
**बैसोनि गुरुआज्ञे खवासित । मोरचेल करी राजा तो ॥**

**पुढें चौताळती पदांती वीरें । त्यामागें चालिले थाट अश्वस्वार ।**
**पाठीसी पालख्या मग नागभार । सैन्य विस्तारलें ससांग ॥**

**ढोल दमामे काहळा दुंदुभी । निशाण ढालादि फडकती नभीं ।**
**शोभा विलोकी फकीर गैबी । हरिपुरीं जैसा श्रीहरी ॥**

— दासविश्रामधाम, ४८, ३३–३६

मिरवणुकीबरोबर कोण कोण होते ?

**पंडितांचीं चालिलीं थाटें । वेदघोष करिती वैदिक भट ।**
**चालती जंगम येकवटें । डोलती फकीरें मागनिं ॥**

**चहुंकडोन पाहूं समर्थाला । मिळाले भोळे भजकमेळा ।**
**विणा चिपोळ्या टोपी माळा । घुंगरु शाटीसह शोभती ॥**

**चालिले भजनाचा करित कडका । भाविकीं वाहती सुमनहार बुका ।**
**संतोष वाटला मोक्षदायका । राममये चि हो ठेले ॥**

— दासविश्रामधाम, ४८, ४४–४६

श्रीशिवछत्रपतींचें केवढें हें भाग्य !

**जयदेवकवीचा क्रौंचनृपाळ । मुकुंदमुनीचा जैतपाळ ।**
**तुळसीदासाचा अविंध प्रेमळ । तैसा शिवभूप दासाचा ॥**

— दासविश्रामधाम, ४८, ४८

त्यांची जोडी कोण फोडूं शकेल ? त्या दिवसाच्या शिवछत्रपतींच्या आनंदाची कल्पना च करा.

बागेपासून निघाली आणि मिरवणूक शहरांत प्रवेश करती झाली. शहरांत कोण उल्हास होता ! गागासारखे कपटी पंडित होते ते

**झरोके माहड्या पारा झाड । विलोकूं लपाले करूनि आड ।**
**स्वामिरायाचें निरखोनि तोंड । भाविले जालों कृतार्थ ॥**

— दासविश्रामधाम, ४८, ५५

बाकीची सारी जनता

**येरी आपुलाल्या शक्तिनुसार । सोन्यारुप्याचीं फुलें अपार ।**
**वोवाळूनि टाकितां भिकारी किंकर । वदती फळलें हो प्राक्तन ॥**

**आरत्या करिती प्रेमभरें । उडविती सुमन गुलाल अबिर ।**
**एवं सभेसी पातले भवहर । सद्वृंदमेळासह उतरूनि ॥**

— दासविश्रामधाम, ४८, ५६ – ५७

याप्रमाणें राजगृहासी मिरवणूक पोंचली आणि श्रीसमर्थ हत्तीवरून उतरले तों

**राजाज्ञें राजयुवत्या । आणूनि साजुक जीवन आरत्या ।**
**दिव्य पाय ते क्षाळूनि तीर्था । सेवोनि प्रेमें नमोनि ॥**

**देऊनि सर्वांगा अबिरउटी । सुपुष्पहार घालोनि कंठीं ।**
**निंबलोण करिती भरभरों मुठी । रुपया मोहरा होनाच्या ॥**

— दासविश्रामधाम, ४८, ५८ – ५९

समर्थांनीं त्यांना प्रसाद दिला आणि त्या गेल्या. राजे पुढें आणि मागें समर्थ असे चालले आणि सिंहासनापाशीं येऊन राजे समर्थांना विनंती करितात, " महाराज, आपण सिंहासनारूढ व्हावें आणि मजकडून सेवा घ्यावी. " राजाचा हा निस्सीम प्रेमळ भाव पाहून समर्थ गहिंवरले आणि प्रेमानें म्हणाले,

**" आमुचें च कीं भोळ्या राज्य हें हि । तूं चि संरक्षी आपुल्या ठाईं ।**
**संशयो आतां न धरी हृदईं । देवभक्तासी तोषवी ॥**

— दासविश्रामधाम, ४८, ६६

आमचा सध्या विचार असा आहे, तुझ्या भक्तिप्रेमाला वश होऊन अकरा दिवस येथें तुझ्या जवळ रहावें व पुढें मग शिंगणवाडीच्या रानांत जेथें ज्योति दिसली त्या जागीं क्षेत्र निर्माण करून तेथें श्रीरामाची स्थापना करावी. राज्यभार तूं च वाहिला पाहिजेस, आम्हांस तो नलगे."

अकरा दिवस, दररोजचा कार्यक्रम कसा चालला असेल, याची कल्पना करतां येते. रात्रौ कीर्तनें होत. मिरवणुकीच्या वेळची गागाची आजारी-पणाची बतावणी जरी थकली, तरी अकरा हि दिवस ती च बतावणी चालण्यासारखी नव्हती. तेव्हां एकदा त्यांनीं कळविलें, " आतां आपणांस बरें वाटत आहे व आपण आज रात्रीं कीर्तनश्रवणास येऊं. " त्या रात्रीं प्रथम वेणाबाईचें कीर्तन झालें आणि नंतर समर्थांच्या आज्ञेवरून वामन पंडित वीणा घेऊन कीर्तनास उभे ठाकले. वेणाबाईचे बोल ऐकून कोणी हि कृतार्थ झाला असता, पण गागाभट पडले विद्वान् शास्त्री, त्यांच्या मनांत विकल्प उभा राहिला कीं, ' कीर्तन रांडेचें ऐकों नये ', पण कीर्तनांतून उठून हि जातां येईना ! वामनांचें कीर्तन चालू असतां त्यांची गाढ विद्वत्ता पाहून गागा हि थक्क झाले. त्यांच्या हि मनांत येऊन गेलें कीं, वामनासारखे व्युत्पन्न पंडित हि ज्यांच्या भक्तगणांत मोडतात, त्या श्रीसमर्थांची योग्यता केवढी असली पाहिजे. वेणाबाईच्या कीर्तनाचे वेळीं गागाच्या मनांत आलेला विकल्प कल्पनेनें जाणून तो हि वामनांनीं आपल्या पूर्वरंगांत खोडून काढला होता. तेव्हां गागाला वाटलें, येथें मनांत हि कांहीं विचार आणण्याची सोय नाहीं. गागाभट मोठ्या पेचांत पडले. उठून हि जातां येत नव्हतें. ' वाजवा टाळी ' म्हटलें, म्हणजे टाळी वाजवावी लागे, रामनामाचा घोष सुरू झाला, म्हणजे त्यांतून हि सुटतां येत नसे, याप्रमाणें कीर्तनाला जाऊन गागा जरी मोठ्या अडचणींत जाऊन पडले होते, तरी त्यांच्या हि मनावर सुपरिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. गागाची वृत्ति पालटत चालली.

ज्या वामनपंडितांचें कीर्तन श्रवण करून गागा पंडितासारख्या आग्रही शास्त्र्याची वृत्ति पालटली, त्या वामनांची योग्यता काय सांगावी ! ते वामन मोठ्या काकुळतीनें तुम्हां आम्हांस कांहीं सांगत असले, तर तें त्यांचें बोलणें आपण मानणार किंवा नाहीं ? ते सांगतात,

**ध्यातां सुतकामिनी   जाती दिनयामिनी ।**
**घडी येक तरी मनीं   आठवा राम ॥ १**

**धंदा न सुटे जरी   असा सुखें व्यापारीं ।**
**वाचा आणि अंतरीं   आठवा राम ॥ २**

दिवस गेला व्यापारीं निद्रेखालीं गेली रात्री ।
गेले दिवस व्यर्थ चारी आठवा राम ॥ ३

काळ हा घडिघडि मोजी देहाची घडी ।
गोष्टी हे तों उघडी आठवा राम ॥ ४

प्रार्थितो वामन कायावाचा मन ।
आइका हें वचन आठवा राम ॥ ५

## ( १०४ ) मराठे सरदारांचा परिपाठ

श्रीछत्रपतिशिवाजीमहाराज व इतर मराठे सरदार यांचा परिपाठ असा असे कीं, विजयादशमीचे दिवशीं ज्यानें त्यानें आपआपले घोडे साज घालून उत्तम शृंगारून श्रीसमर्थांच्या दर्शनास जावयाचें. श्रीसमर्थांच्या मनांत येईल त्या घोड्यावर ते स्वार होत. ज्याच्या घोड्यावर ते बसत त्यानें आपला भाग्योदय आहे, म्हणून समजावें.

**समर्थांचा प्रतिवर्षी शकुन घेती ।**
**विजयादशमीसी दर्शनासी येती ।**
**ज्याचा अभ्युदय त्याच्या अश्वावरी स्वार होती ।**
**भोंवते चालती सरदार ॥**

— श्रीसमर्थप्रताप, १८, २३

## ( १०५ ) स्वारशिपायी यांना विजयाचा मंत्र

श्रीसमर्थ राजगृहीं असतां, स्वारशिपायी, व्यापारी, उदमी यांनीं संधि साधून श्रीसमर्थांना विनंति केली कीं, आम्हांस नेहमीं यश च येत जाईल, असा कांहीं उपाय कृपा करून सांगावा. समर्थांनीं सांगितलें,

**ठसा हेमधातूवरी वातसूतु । तथा ताइताची बरी रौप्यधातु ।**
**तयाची पुजा मंदवारीं करावी । बरी आवडी आर्त पोटीं धरावी ॥**

हा श्लोक करुणाष्टकांतील १३४ व्या स्फुट श्लोकांत ५६ वा आहे.

## ( १०६ ) सिंहस्थांत गंगायात्रा

सिंहस्थासाठीं नाशिकत्र्यंबकास जाण्याची इच्छा श्रीसमर्थांनीं दर्शविली आणि महाराजांनीं सर्व तयारी करून दिली. दोन हत्ती,

दोनशें स्वार, गाड्या, घोडीं, पालख्या, दक्ष कारकून आणि चार लक्ष रुपये बरोबर देऊन महाराजांनीं श्रीसमर्थांची रवानगी केली. समर्थ यात्रेला निघाले, त्यासरसे इतर हि कांहीं नागरिक स्त्रीपुरुष त्यांच्या बरोबर निघाले. अशी प्रचंड यात्रा सिद्ध झाली. बारा कोसपर्यंत स्वतः महाराज पोंचविण्यास गेले. निरोप घेतांना, “ लवकर परत या, ” अशी त्यांनीं समर्थांची प्रार्थना केली. तेव्हां समर्थ म्हणाले, “ जरूर, तुझ्यामाझ्यांत द्वैत आहे च कोठें ! ” महाराजांना गहिंवर आला, नेत्रांत प्रेमानें अश्रु चमकले, कंठ भरून आला. श्रीसमर्थ निघाले आणि ते दिसत होते तोंवर महाराज तेथें च तटस्थ उभे राहिले! नंतर तेथें एक साष्टांग नमस्कार घातला आणि जड अंतःकरणानें परतले.

मार्गांत ठिकठिकाणीं मुक्काम करीत यात्रा चालली. जेथें मुक्काम होई तेथें कथाकीर्तनें होत. गांवोगांवचे लोक संतुष्ट होत. यात्रा पुगत च चालली. ठिकठिकाणचे फकीर, गोसावी, वैदिक ब्राह्मण, विद्वज्जन, तपस्वी, योगी इत्यादि भेटीस येत, त्यांचा श्रीसमर्थ सन्मान करीत, भणंगभिकारी येत त्यांना हि विन्मुख दवडीत नसत. ठिकठिकाणीं दानधर्म करीत, ब्राह्मणभोजनें होत, स्वतः मात्र भिक्षा मागून आणीत व पानगे भक्षण करीत.

नाशकास मंडळी पोंचली. सर्व यात्राविधान यथासांग संपादिलें. तेथून त्र्यंबकास जाऊन, तेथें हि यथासांग संतर्पणादि सारून श्रीसमर्थ नाशकास परतले आणि श्रीरामाची एकान्तांत प्रार्थना करिते झाले. ती प्रार्थना ऐकून, प्रकट होऊन व श्रीसमर्थांस आलिंगन देऊन राम आज्ञा करितात :

**“ संक्षेप करीं आतां येणें जाणें । तुज विसंबेना मी येक क्षण ।**
**क्षेत्र निर्मोनि पुण्यपावन । उपासना वाढवी ॥**

— श्रीदासविश्रामधाम, ५२, १०७

माझ्या कृपेचा तुला यापूर्वीं अनेकदां प्रत्यय आलेला आहे ना ? मग आतां शंका कसली राहिली ? पूर्वींच्या प्रसंगांची आठवण कर :

**तूं उभा राहोनि शरयुतटीं । बाहतां पावलों कीं उठाउठीं ।**
**तात्काळ पावलों चित्रकूटीं । रामटेकीं पर्वतीं ॥**

**भेटलों येऊनि समुद्रतीरीं । दर्भशयनीं पंपासरोवरीं ।**
**रूप पालटिलों पंढरपुरीं । आतां अनुमान कायसें ॥**

— श्रीदासविश्रामधाम, ५२, १०८–१०९

जा, आतां हिंडणें फिरणें सोडून, एका जागीं राहून माझी स्थापना करावी, माझी आठवण जेव्हां जेव्हां काढशील तेव्हां तेव्हां मी पावत जाईन, कसली हि शंका मनांत आणूं नकोस, जा, जास्त सांगणें तें सर्व मारुती सांगेल. ”

श्रीरामाची अशी आज्ञा घेऊन श्रीसमर्थ निघाले. येथवर आलों च आहोंत तर जांबेस जाऊन मातु:श्रींचें दर्शन घेऊन व बंधूंना भेटून परत जावें, असा विचार करून नाशकाहून सर्व यात्रा सिऊर, पैठणवरून जांबेस गेली. जांबेचा सोहळा कोण वर्णन करूं शकेल? तो मनानें च कल्पिला पाहिजे! पांच दिवस जांबेस मुक्काम झाला. औरंगाबादेस भवानी नाईक म्हणून श्रेष्ठांचे शिष्य होते. समर्थांचें जांबेस आगमन झाल्याचें ऐकून ते औरंगाबादेस येण्याविषयीं समर्थांना विनंति करण्यासाठीं जांबेस गेले. त्याप्रमाणें समर्थ औरंगाबादेस जाऊन तेथें चार दिवस राहून, कथाकीर्तनांनीं जनतेस संतोषवून परत जांबेस गेले.

अखेरीस मातु:श्रींचा निरोप घेऊन व दासविश्रामधामकारांप्रमाणें वडील बंधूंना बरोबर घेऊन श्रीसमर्थ परत फिरले, ते साताऱ्यास आले. ‡ समर्थांप्रमाणेंच श्रेष्ठांना मानून महाराजांनीं त्यांचा गौरव केला.

## ( १०७ ) श्रीसमर्थांचें जांबेला हें जाणें तिसऱ्यांदा होय

शक १५४२ त लग्नसमारंभांतून निसटल्यानंतर श्रीसमर्थांचें जांबेला हें जाणें तिसऱ्यांदा होय. उत्तरेकडील तीर्थाटण संपवून १५६२च्या सुमारास श्रीसमर्थ दक्षिणेकडे परत फिरले, तेव्हां पैठण किंवा अंबा जोगाई येथें कोणी ओळखल्यावरून ते जांबेस गेले, आईला भेटले, तिला दिव्यदृष्टि दिली, ती पहिली खेप होय.

---

‡ सिंहस्थांतील या गंगायात्रेचें वर्णन धामाच्या ५२ ते ५५ अध्यायांत सविस्तर आलें आहे. संतविजय अध्याय ६ व उद्धवसुतकृत चरित्र अध्याय १६ वा, यांत हि तें आहे.

दुसरी खेप १५७६ तील होय. ही खेप ऐतिहासिक पुराव्यानें च निश्चित झालेली आहे. श्रीसमर्थशिष्य तिसगांवमठपति दिनकर यांनीं स्वतःस श्रीसमर्थांचा अनुग्रह १५७६ च्या फाल्गुन शुद्ध १५ स झाल्याचें आपल्या स्वानुभवदिनकर ग्रन्थांत म्हटलें आहे. त्यांनीं म्हटलें आहे, आपणांस आदल्या च वर्षीं त्यांच्या दर्शनाचा स्वप्नांत भास झाला आणि पुढच्या च वर्षीं

**निज ग्राम जांब नगरी । गौतमीचां उत्तरतीरीं ।**
**तेथूनि निजगणपरिवारीं । दक्षिणाभिगमन ॥ ॥**

**गौतमीहूनि कृष्णातीरपर्यंत । समर्थागमन जालें त्वरित ।**
**मार्गी उद्धरिले जड जीव अनंत । कृपादृष्टिमात्रें ॥**

**आंगीं वैराग्याचा भर । समागमें निस्पृह परिवार ।**
**मार्ग क्रमित चालिले अपार । यथेच्छा निजसुखें ॥**

**गौतमीतट टाकूनि मागें । वृद्धेश्वरदर्शन घेऊनि निजांगें ।**
**येइजे नृसिंहक्षेत्रानुयोगें । भातवटिकेसी ॥**

**घेऊनि सामराजदर्शन । वटग्रामामाजीं आगमन ।**
**अनाथ पतित शरणागत जन । उद्धरावया अनेक ॥**

**तेथ ग्रामाधिकारी ब्राह्मण । असती पुण्यपरायण ।**
**तद्‌गृहीं स्वेच्छा निवासस्थान । स्वामीसमर्थांचें ॥**

**तवं इकडे दिनकरासी । स्वप्नदर्शनाचिया साहसीं ।**
**परम क्लेशें निजमानसीं । विरहेंकरूनि संतप्त ॥**

**पंधरासें स्याहात्तरीमाझारीं । जयाब्द फाल्गुनी पूर्णिमा अवसरीं ।**
**श्रीरामदासकृपा दिनकरीं । स्वानुभवसुख प्राप्त ॥**

—स्वानुभवदिनकर, १६, ४, २७–२८, ८५–९०

अशी ही जांबेची दुसरी खेप अस्सल प्रमाणानें सिद्ध आहे.

आणि प्रस्तुतची सिंहस्थाच्या कारणानें झालेली ही तिसरी खेप होय. हा सिंहस्थ कोणत्या शकांतला मानावा, याचा विचार पुढील गाथेंत स्वतंत्रपणें करूं.

## ( १०८ ) हा सिंहस्थ कोणत्या शकांतला ?

( १ ) ज्या सिंहस्थांत श्रीसमर्थ गंगायात्रेसाठीं नाशिकत्र्यंबकला गेले व तिकडून परततांना जांबेस हि जाऊन आले व ज्या सिंहस्थांत प्रत्यक्ष श्रीरामानें त्यांना आज्ञा केली कीं, आतां हिंडणें फिरणें कमी करून, कोठें तरी एका जागीं राहून, तेथें क्षेत्र निर्माण करून उपासना वाढवावी, तो सिंहस्थ कोणता ?

( २ ) शक १५६८ आणि १५८० त सिंहस्थ होता व अनुकूल आणि प्रतिकूल बाबी विचारांत घेऊन, प्रस्तुतचा सिंहस्थ १५८० तील होय, असें मानण्याकडे माझ्या मनाची प्रवृत्ति होत आहे, असें मीं मागील एका उल्लासांत म्हटलें च आहे. अशी प्रवृत्ति होण्याला मुख्य कारण श्रीसमर्थप्रतापांतील ती ओवी होय. १५८० तील हा सिंहस्थ मानला म्हणजे ऐतिहासिक प्रसंगांची संगति बरोबर लागते व त्या ओवींतील ‘ मग ’ शब्द सकारण ठरून, त्याचें महत्त्व हि आपल्या प्रत्ययास येतें. मागील श्रीशिवसमर्थ या उल्लासांत सविस्तर केलेल्या विवेचनाप्रमाणें मंदिरांतील बाडांक ६३२ तील ती मूळ आणि शुद्ध ओवी अशी :

**समर्थें अफझलखानासि मारविलें । मग चांफळक्षेत्र उभें केलें ।**
**श्रीतुळजामाउलिस संस्थापिलें । जाउलिपर्वतिं प्रतापगडिं ॥**

— श्रीसमर्थप्रताप, १८, ३६

खानाचा वध १५८१ त झाला व प्रतापगडावर देवीची स्थापना १५८३ त झाली, हे दोन शक निश्चित आहेत. हिंदु देवालयांच्या बाबतींत खानाचा डंका सर्वत्र पिटलेला होता. तेव्हां त्याचा कांटा उपटल्यावर च नवीन क्षेत्र निर्माण करणें इष्ट होतें. या सर्व परिस्थितीचा विचार केला म्हणजे कालक्रमानुसार चार हि प्रसंगांची संगति बरोबर लागते :

१५८० च्या सिंहस्थांत नूतन पुण्यपावन क्षेत्र निर्माण करण्याची श्रीरामाची श्रीसमर्थांना नाशिकास आज्ञा होते.

१५८१ च्या मार्गशीर्षांत अफझलखानाचा कांटा उपटला जातो.

१५८२ त चाफळास श्रीराममंदिर होऊन क्षेत्र निर्माण होतें आणि

१५८३ त प्रतापगडीं तुळजामाउलीची स्थापना होते.

प्रतापाच्या ओवींतला ‘ मग ’ शब्द सहेतुक आणि सार्थ असला, तर १५६८ तील सिंहस्थ धरतां च येत नाहीं.

( ३ ) एक च अडचण आहे. चाफळास श्रीरामाची स्थापना अफझलखानाच्या वधानंतर १५८२ त झाली, असें मानलें तर बखर आणि वाकेनिसी टिपण यांना विरोध होतो, पण श्रीसमर्थांचें कांहीं काळ सान्निध्य लाभलेल्या गिरिधरांच्या श्रीसमर्थप्रतापाच्या आधारावर मी बखर आणि टिपण यांचा विरोध पतकरण्यास सिद्ध झालों आहें. प्रश्न केवळ विचाराचा आहे, कोणाच्या सुखदुःखाचा नाहीं. १५७१ काय आणि १५८२ काय, दोन्ही शक आज आपणांस सारखे च आहेत. आपला प्रयत्न, साधेल तितकें, श्रीसमर्थांच्या जवळ जाण्याचा आहे.

## ( १०९ ) उरमोडी नदीच्या तटीं पर्णकुटी

संत, साधु, भले लोक चातुर्मासांत, निदान त्यांपैकीं श्रावण महिन्यांत एका च जागीं वास करतात. अशा एका श्रावणांत श्रीसमर्थ अनेक शिष्यांसह उरमोडी नदीच्या तटाकीं पर्णकुटी बांधून राहिले होते. प्रत्येक शिष्यानें आपआपली निरनिराळी पर्णकुटी उभारली होती. कल्याणांनीं मात्र स्वतःकरितां स्वतंत्र पर्णकुटी बांधली नव्हती. केव्हां हांक मारतील आणि काय काम पडेल, याचा नियम नसल्यामुळें ते श्रीसमर्थांच्या च पर्णकुटीच्या आश्रयानें जवळपास च अहोरात्र सेवेसाठीं असत. बाकीची मंडळी

**श्रीगुरुराया आज्ञा पुसोनि । जप भजन पूजा करिती कोणी ।**
**वाचिती ग्रंथ पाठ करोनि । अर्थान्वय शोधिती ॥**

**कोणी निमग्न असती ध्यानीं । महावाक्याचे अनुसंधानीं ।**
**कोणी पुरवून देती पाणी । कोणी स्वयंपाक निर्मिती ॥**

**येकासी सद्गुरुसेवेविन्हा । आणीक साधन आवडेना ।**
**येका प्रसन्न श्रीरामराणा । कोणी कपिवर्या आराधिती ॥**

— दासविश्रामधाम, ३३, २९ – ३१

अशा त्या मुक्कामांत श्रीशिवाजीराजांचें हि आगमन झालें होतें. त्यांनीं विज्ञप्ति केली कीं, आज्ञा होईल तर, आपल्या हि मनांत दळभारसहित कांहीं दिवस पदसेवेसाठीं येथें रहावें, असें येतें. समर्थ आज्ञापितात :

**ऐक राजा रे विहित हें ऐसें । फिरतां वनस्थानीं आम्ही उदास ।**
**केवि साधेल बिकट सहवास । राज्यभार चालवीं हे चि आज्ञा ॥**

**उपासना धरी बळकट । किमपि न सांडी सत्यवाट ।**
**उपकार साधनामाजीं श्रेष्ठ । विहित विचारीं मानसीं ॥**

**गुरुवर्मातें लक्षूनि हृदईं । विहरतां प्रपंचीं भय काई ।**
**जाई बहुपरी सावध राहीं । कृपा करील रघुराज ॥**

— दासविश्रामधाम, ३३, ४७–४९

याप्रमाणें निर्जनस्थळीं नदीतटाकीं गुरुसान्निध्यांत गुरुबंधूंच्या संगतींत स्वतंत्रपणें आपआपला उपासनेचा कार्यक्रम सांभाळीत अहोरात्र राहण्यांत जो आनंद असेल, चित्ताची जी प्रसन्नता असेल, जें स्वर्गीय सुख अनुभवास येत असेल, त्याची आज आपणांस कोठून कल्पना होणार !

## ( ११० ) सारंगपुरचा मारुती

श्रीसमर्थ एकदा भद्राचलाकडे जात असतां मार्गांत इंदुर शहर लागलें. हें इंदुर म्हणजे होळकरांचें इंदुर नव्हे. तिकडे नांदेडच्या पलीकडे आणि भागानगरच्या अलीकडे हें शहर आहे. त्या मुलुखांत पाणी विपुल आहे. इंदुर व इंदुरच्या भोंवतालचा मुलुख अति रम्य आहे. त्या भागांत एक विलक्षण दृश्य नजरेस पडतें. एकावर एक जणूं रचलेले दोन दोन, तीन तीन मोठाले दगड सर्वत्र दृष्टीस पडतात. खालतीं वरतीं हत्तीएवढाले मोठाले दगड आणि मधला च लहानशा वासरा एवढा दगड. अशा ह्या उतरंडी पाहून नवल वाटतें कीं, त्या उतरंडी रचल्या तरी कोणीं ? इंदुर-पासून दीड कोसावर डोंगरांत सारंगपुर ठिकाण आहे. अवर्षण पडलें होतें म्हणून तेथें कांहीं ब्राह्मण अनुष्ठानास बसले होते. त्या सुमारास समर्थ तेथें जाऊन पोचले. ब्राह्मणांनीं काय चालविलें होतें तें पाहून एका मोठ्या दगडावर त्यांनीं कोळशानें मारुती रेखाटून देऊन त्यावर छाटी टाकून अभिषेक करण्यास समर्थांनीं ब्राह्मणांना सांगितलें. अभिषेक होत असतां त्या दगडावर रेखाटल्या जागीं मारुतीचें रूप प्रकट होत होतें. अभिषेक संपला, आणि प्रतापमारुतीचें संपूर्ण रूप प्रकट झालें, पाऊस हि पडला, सर्वत्र आनंद झाला. तेथें च आरंभीं समर्थांनीं मठ स्थापून अधिपति म्हणून उद्धवांची योजना केली. पुढें कांहीं वर्षांनीं इंदुरांत प्रचंड देवालय

बांधून त्याच्या सान्निध्यांत मठपति राहूं लागले. इंदुर मठांतील संग्रहांपैकीं बाडांक ४६६ त " शके सोळासे १६४० वीलंबी नाम संवछरी गांवांतील मठ बांधोनी प्रथम नवमी जाली " अशी नोंद आहे. यावरून उघड आहे कीं, १६४० च्या पूर्वीं सारंगपुर येथें मारुतीपाशीं च मठ होता. गांवांतलें आणि डोंगरांतलें, अशीं हीं दोन्ही ठिकाणें अति रम्य आहेत.

## ( १११ ) विट्ठल रामरूप झाले

एकदां श्रीसमर्थ कृष्णातटाकीं असतां त्यांच्या पुढून यात्रेकरूंचे पोव्यामागें पोवे चालले होते. " कुणीकडे चाललांत," म्हणून समर्थांनीं त्यांना विचारिलें. " आषाढी एकादशीसाठीं पंढरीस जात आहोंत, चला आपण हि आमच्याबरोबर, आम्हांस आनंद होईल, आपली संगति लाभेल," असें यात्रेकरू म्हणाले. " आम्ही येऊन काय करणार ? शरयुतीरनिवासी श्रीरामावांचून आम्हांस दुसरें कोणी दिसत च नाहीं. "

**करीं धनुष्यबाण अंतरीं बिंबलें ठाण ।**
**वेगळें करील कोण आतां रे ॥ ध्रु०**

**रामीं बोधली बुद्धि सांडूनिया उपाधि ।**
**आणीक देवाची शुद्धि नाहीं रे ॥**

**राम आठवे जनीं राम आठवे वनीं ।**
**राम ध्यानीं मनीं आठवतो रे ॥**

**रामदास म्हणे आतां सांडून रामाची कथा ।**
**आणीक सर्वथा चाड नाहीं रे ॥ ३**

यात्रेकरू आपल्या मार्गानें गेले. श्रीसमर्थांची ही निष्ठा श्रीपंढरीनाथाला ठाऊक होती, तथापि समर्थांना एकवार पंढरीस आणलें च पाहिजे, असा विचार करून विठोबा च वेष पालटून ब्राह्मणाचें रूप धारण करून श्रीसमर्थांना बोलावण्यास आले. समर्थांचें पानगे भाजण्याचें काम चाललें होतें. तेवढ्यांत हा ब्राह्मण पातला, समर्थांस आनंद झाला, ब्राह्मणास म्हणाले, " स्नान करा, रामाचा प्रसाद तयार आहे. " ब्राह्मणानें स्नान केलें, संध्या केली, सूर्यास नमस्कार केला आणि श्रीसमर्थांच्या समवेत पानगे भक्षण केले. " आपण कोठें असतां, आपलें नांव काय ? " म्हणून समर्थांनीं

ब्राह्मणास विचारलें. " पंढरीस सहकुटुंब असतों, मला विठ्ठलभट म्हणतात, एकादशी जवळ आली, यजमान धुंडीत इकडे आलों. देवाचे भक्त ते च माझे यजमान, आपण हि भक्त च आहांत, चलावें मजबरोबर पंढरीस, मी सांभाळून नेईन आपणाला, " असें विठ्ठलभट नांव धारण केलेले प्रत्यक्ष पंढरीनाथ बोलले. " शरयुतीरविहारी रामावांचून मला अन्य कोणाची अपेक्षा नाहीं, " असें समर्थांचें उत्तर ऐकतां च विठ्ठलभट म्हणाले, " तेथें प्रत्यक्ष हनुमंत आहेत व राम आणि रामाचे दास हनुमंत कांहीं भिन्न नव्हत, तेव्हां आपण हनुमंताच्या दर्शनास आलें पाहिजे. " समर्थांचें मन वळलें आणि विठ्ठलभटाच्या संगतीनें पंढरीस जाण्यास ते सिद्ध झाले. बरोबर दत्तु नापिक होता च. मार्गांत पाऊस लागला, चिखलांतून जावें लागलें, पायांत कांटे मोडले, विठ्ठलभटानें ते स्वतः काढावे. त्रिवर्ग पंढरीस महाद्वाराशीं येऊन पोचले, विठ्ठलभट " घरीं जाऊन येतों " म्हणाले आणि निसटले, जागच्या जागीं गुप्त झाले. दत्तु नापिक विचारतो, " विठ्ठलभट नाहींसे कसे झाले ? " " अरे, विठ्ठलभट कोठचे, ते स्वतः पंढरीनाथ होते, आम्हांवर त्यांचें हें केवढें ऋण ! " समर्थांनीं हनुमंताचें दर्शन घेतलें आणि राम च समजून श्रीविठ्ठलाकडे पाहून विचारतात,

**येथें उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ॥**
**चाप बाण काय केले । कर कटावरी ठेविले ॥**
**कां बा धरिला अबोला । दिसे वेष पालटला ॥**
**काये जाली अयोध्यापुरी । येथें वसविली पंढरी ॥**
**काय केली शरयुगंगा । येथें आणिली चंद्रभागा ॥**
**काय केलें वानरदळ । येथें वसविले गोपाळ ॥**
**दिसे हनुमंत येकला । हा कां सैन्यांतून फुटला ॥**
**काय केली सीताबाई । येथें राही रखुमाई ॥**
**रामदासीं जैसा भाव । तैसा जाला पंढरीराव ॥**

विठ्ठलानें रामरूप धारण केलें. जगाला आश्चर्य वाटलें. सर्वांनीं समर्थांना विनंति केली, स्थानमाहात्म्य टिकलें पाहिजे. तेव्हां समर्थांनीं पुनरपि प्रार्थना केली आणि राम पुन्हां विठ्ठल झाले. श्रीसमर्थांना तें हि रूप मानवलें.

**माझें मानस विटेवरी । विठ्ठलचरणीं निरंतरीं ॥ १**
**जो जो पंढरीस गेला । तेणें कळीकाळ जिंकिला ॥ २**
**रामदास म्हणे पंढरी । नाना साधनेंविणें तारी ॥ ३**

या गोष्टीचें तात्पर्य इतकें च कीं,

**जैसा भाव प्रतिबिंबला । तयाचा चि देव जाला ।**
**जो जैसें भजे त्याला । तैसा चि बोळे ॥ ३–१०–१९**

सर्व चरित्रकारांनीं ही कथा वर्णिली आहे. त्या वेषधारी ब्राह्मणानें आपलें नांव विठ्ठलभट म्हणून सांगितलें, असें दासविश्रामधामकर्ते आत्मारामहाराज म्हणतात, तर महीपति आणि उद्धवसुत म्हणतात कीं, त्यानें आपलें नांव केशवभट सांगितलें. त्या ब्राह्मणानें आपलें नांव विठ्ठलभट म्हणून सांगणें, मला जास्त सयुक्तिक वाटतें.

ज्या ज्या प्रसंगाविषयीं गिरिधरांची साक्ष लागते, त्या त्या प्रसंगीं ती साक्ष उद्धृत करण्याचें मी बहुधा टाळीत नाहीं.

**श्रीपांडुरंगयात्रेसी समर्थ आले ।**
**कटीं कर काढोनि कोदंडपाणी श्रीराम केले ।**
**आत्माराम सर्वी सर्वत्र देखिले ।**
**संतसज्जनीं संकीर्तनीं ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३, २१

## ( ११२ ) पंढरीस राम आणि चाफळास समर्थांच्या ध्यानांत विठ्ठल

आषाढी एकादशीचा दिवस होता. पंढरीस हरबा नांवाचा श्रीसमर्थांचा कोणी शिष्य वाळवंटीं मोठ्यानें भजन कीर्तन करीत आणि श्रीसमर्थांचा तो प्रख्यात अभंग, त्यांच्या पाठांत जसा होता तसा म्हणत होता –

**धनुष्यबाण काय केलें । कां कर कटावरी ठेविले ॥ १**
**कां बा धरिला अबोला । दिसे वेष पालटिला ॥ २**
**किल्किलाट वानरांचे । थोवे दिसत ना तयांचे ॥ ३**
**पंढरीस जालें येणें । येका पुंडलीकाकारणें ॥ ४**
**दिसे हनुमंत येकला । सैन्यामधून कां फुटला ॥ ५**
**रामीरामदासीं भाव । तैसा भेटे देवराव ॥ ६**

हरबाचें चाललेलें हें भजन ऐकून पंढरीस आलेल्या हरिदासादि मंडळीस कोप चढला. ते हरबास म्हणाले, " कां उगीच वटवट चालविली आहे ? " हरबानें उत्तर केलें, " रागावूं नका, मंदिरांत जाऊन पहा, तेथें विठ्ठल आहेत कां राम आहेत. " हरिदासादि जाऊन पाहतात, तों त्यांच्या नजरेस राममूर्ति पडली ! चकित झाले !

त्या च दिवशीं इकडे कृष्णातटाकीं समर्थ ध्यान करीत असतां असतां च राम जाऊन विठ्ठल प्रकट झाले. राम गेले पंढरीस आणि विठ्ठल प्रकटले चाफळखोऱ्यांत. एकादशीचा दिवस होता, समर्थांना आणि सर्वांना अनायासें विठ्ठलदर्शन घडलें. ( दासविश्रामधाम, ५६ )

## ( ११३ ) छिद्रान्वेषी कोंडोपंत ब्राह्मण

ही छिद्रांतून पाहिल्याची गोष्ट सर्व चरित्रकारांनीं सांगितलेली आहे. कोंडोपंताला स्त्रिया दिसाव्या आणि शिवाजीराजांना वानर दिसावे ! या मूर्खाच्या सांगण्यावरून संशय धरून आपण पाहण्यास आलों, याचा राजांना पश्चात्ताप वाटला.

**उदयो पावतां सहस्रकर । सद्गुरुपासीं पावला सत्वर ।**
**ठाकला घालोन नमस्कार । म्लान वक्त्र बहु जालेंसे ॥**

**निरखोन कळवळले मोक्षदानी । बोलिले राजा रे तूं रजोगुणी ।**
**पराव्याच्या बोला लुब्धुनी । अविश्वासा आश्रइसी ॥**

**कां आलासी चोरीनें पाहूं अंत । पाहिलासि तरि काय तें येथें ।**
**सांगातियावरी ठेऊनि निमित्य । काय सौख्य दाविलें तयासी ॥**

—दासविश्रामधाम, ६८, १११-११३

राजांचा कंठ दाटून आला, नेत्रांवाटे अश्रुधारा चालल्या.

## ( ११४ ) मुसलमान पादशाहांच्या भेटी

श्रीसमर्थांच्या केव्हां केव्हां प्रसंगोपात मुसलमान सरदार आणि पादशाहा यांच्याशीं भेटी होत. तेव्हां ठराविक चर्चा होत असे. यांनीं आपला अभिप्राय स्पष्ट सांगावा कीं, सर्वांचा देव एक च आहे, स्वातंत्र्याचा

उपभोग घेण्याचा सर्वांचा सारखा हक्क आहे, सर्व जण सुखी असावेत, हिंदु आणि मुसलमान आपसांत अकारण कलह माजवितात, मुसलमानांनीं अत्याचाराची वृत्ति सोडून न्यायानें आणि सलोख्यानें वागलें पाहिजे, इत्यादि. एकदां अशा च एका भेटीच्या प्रसंगीं पादशाहा म्हणाला, "सर्वांचा देव एक च आहे, तर आपण सर्व जण एक च आहोंत, तेव्हां आपलें एकत्र भोजन होण्यास हरकत नसावी," असें म्हणून

**मांसघृतानें चपचपीत अन्न । पोलाव साणक पुढें ठेऊन ।**
**स्वीकारा म्हणे कर जोडून । तंव हास्य आलें समर्था ॥**

—दासविश्रामधाम, २८, १०७

त्यांनीं

**अपसव्य अन्न हो जाणोनि परम । स्मरोनि मोठ्यानें श्रीरामनाम ।**
**झोळींत घालोनि दिव्य हस्तपद्म । द्वय पिलीं काढिलीं डुकराचीं ॥**

—दासविश्रामधाम, २८, १०८

आणि पादशाहास म्हणाले, "चालवा यांच्या वर सुरी आणि रक्तमांस एक करा, मग करूं भोजन !" पादशाहा तेवढ्यापुरता विरमला. समर्थ निरोप घेऊन निघाले.

**पादशाहा भावी कोण्या मार्गें । जाती तैसा चि करावा लाग ।**
**तंव अखंडैक्यरस दास निःसंग । जेथील तेथें सामावले ॥**

—दासविश्रामधाम, २८, ११३

आणि चाफळास प्रकट झाले. पादशाहा आश्चर्य च करीत राहिला. त्याच्या मनांत आलें, अशा महापुरुषाचें साहाय्य आहे, म्हणून च शिवाजी बलाढ्य होऊन आम्हांस आटोपेनासा झाला आहे.

## (११५) देहकष्ट निवारण्याचा उपाय

एका चातुर्मासांत श्रीसमर्थ शिष्यपरिवारासह तारळखोऱ्यांत असतां शिष्यमंडळी शैत्य होऊन आजारी पडूं लागली. कल्याणांनीं समर्थांना कळविलें आणि समर्थांनीं कष्टनिवारणार्थ

**वोपिला श्लोक येक। तो कल्याणजी घेऊनि हरिखें।**
**श्रवण करवितां पावले सुख। जाड्यत्व सर्वांचें निरसलें॥**

—दासविश्रामधाम, ५६, ५१

तो श्लोक:

**इंद्रनीळरंग राम शाम धाम योगियां।**
**नाम पूर्णकाम सार फार भवरोगियां॥**

या उपायाचा सर्वांनीं अनुभव घेऊन पाहावा, असें मी म्हणतों. श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिरांतील बाडांक ५१ हें प्रचंड बाड श्रीकल्याणस्वामींच्या हातचें असून त्यांत हा श्लोक, स्फुट ओव्या २६० आणि २६१ यांच्या मध्यभागीं आहे.

## ( ११६ ) श्रेष्ठांचें निर्याण

शक १५९९ च्या फाल्गुनांतील वद्य १४ चा दिवस होता. समुदायासह काननांत श्रीसमर्थ फिरत होते. प्रचंड तरुछाया आणि पाण्याचें सान्निध्य पाहून एका ठिकाणीं थांबले. श्रीसमर्थ एकटे च पाण्यापाशीं गेले, वस्त्रें भिजविलीं, स्नान केलें, स्वतःच वस्त्रें धुतलीं आणि छायेखालीं एकीकडे जाऊन ध्यान करीत बसले. कोणी जवळ येऊं लागले, तर "दूर व्हा," म्हणत. भोजनाचें हि त्याच जागीं मागविलें. "काय झालें?" म्हणून विचारतां म्हणाले,

**रामीरामदास ज्याचें अभिधान। तो बंधु आमुचा पुरातन।**
**देहास करूनि श्रीरामार्पण। स्वरूपीं जाले समरस॥**

—दासविश्रामधाम, ९०, ३७

"कोण आले? कोणीं येऊन बातमी कळविली?" "कोणीं येऊन कळवावयास कशास पाहिजे?"

**अहो साक्षी हें असे मनासी मन। असतां येकात्मीं कां न कळे खूण॥**
**फाल्गुन वद्य आज चतुर्दशी। रविवारीं इन येतां प्रथमप्रहरासी।**
**सावधपणानें पुण्यराशी। गुप्तले जाले तनुसार्थक॥**

—दासविश्रामधाम, ९०, ३९–४०

सर्वांना साहजिक आश्चर्य वाटलें आणि दुःख हि झालें. समर्थ च उलट सर्वांचें समाधान करितात

**छाया माजी छाया लोपे । तरी काये पुरुष हरपे ॥ १**
**तैसा देह लोपतां जाण । कदा न घडे मरण ॥ २**
**खेळा अंतीं डाव हरपता । तरी कां नटासी आला मृत्य ॥ ३**
**रामदासी रामीराम । जन्ममरण कैंचा भ्रम ॥ ४**

चैत्र शु. ९ ला अकरावा दिवस आला. सर्वांच्या मनांत आलें, आज समर्थांचें दर्शन घडावें,

**तों शुद्ध सोवळ्यानें देवासन्निधी । जप करीत असती दयाब्धी ।**
**देखतां जयघोष केला समुदीं । रामदासमहाराजकी जय ॥**

— दासविश्रामधाम, ४६

अशौच्याचा प्रश्न निघाला असतां समर्थांनीं निर्णय दिला :

**सुतक सुतवधूचें बंधुमातापित्याचें ।**
**उपजत मरतां ही गोत्रजा गोत्रजाचें ।**
**परि हरिहरदासा त्यागितां देह कांहीं ।**
**इतर जड जिवाला सूतकीं चाड नाहीं ॥**

आणि हा निर्णय श्रुतिस्मृतीला धरून असल्याची साक्ष जमलेल्या वैदिक, पंडित, शास्त्री मंडळींनीं दिली.

## (११७) श्रीवेणाबाईंचें निर्याण

श्रीवेणाबाईंनीं शक १६०० च्या चैत्र वद्य १४ सह अमावास्येस देह ठेवला, त्याची हकिकत कौतुकास्पद आहे. त्यांनीं त्या दिवशीं कीर्तन केलें, कथासमाप्तीनंतर आरती झाली, गजर झाला, वेणाबाईंनीं मंजुळ स्वरानें भजन केलें, श्रीसमर्थांपाशीं आल्या आणि

**वोपूनि विणा तो सद्गुरुकरीं । वाहूनि मस्तकु पदाब्जावरी ।**
**प्राणज्योतीते काढूनि झडकरी । सद्गुरुहृदईं मिळविली ॥**

— दासविश्रामधाम, १११, ९८

गडावरील राममंदिराच्या वायव्य दिशेला वेणाबाईंच्या देहाला अग्निसंस्कार झाला, त्या स्थानीं त्या काळीं चंपकवृक्ष निघाला होता. आज त्या जागीं श्रीवेणाबाईंचें समाधीवृंदावन आहे.

## ( ११८ ) श्रीसमर्थ जाण्याच्या गोष्टी बोलूं लागले

शक १६०१ चें वर्ष सुरू झालें आणि श्रीसमर्थ जाण्याच्या गोष्टी बोलूं लागले. एकदां श्रीशिवाजीराजे यांच्याजवळ समर्थांनीं गोष्ट काढली, तर राजांना ती ऐकवेना. राजे म्हणाले, " मला ही वार्ता ऐकावयास नको. मी आधीं पुढें जाऊन मोक्षद्वार उघडून आपली वाट पहात बसेन. " त्यावर समर्थांनीं श्रीशिवरायाला उपदेश केला, त्याचा सारांश असा :

**उदासीनता धरून हृदईं । वासना गुंतों न देईं कहीं ।**
**आयुष्य उरलें जें स्वल्प तें हि । सार्थककारणीं घाली पां ॥ ८७**

**प्राणवासनाच्या अंतःपाती । होऊन येते ज्ञानात्मज्योती ।**
**स्वरूप चि आहे निज आदिअंतीं । जाणें ना येणें आत्मस्थिता ॥ ८८**

**प्रपंचादिहीं स्थूळ समंध । बंधान याचें हि किजे सावध ।**
**अंतकाळींचा न धरिजे खेद । व्यवहार संपतां वेळ ते ॥ ८९**

**कीर्ति उरवावी अगाध माग । धर्मआदरणा कीजे ससांग ।**
**पूर्वी जे जाले राजे अनेग । मर्यादा त्यांची ऐकतोसी ॥ ९०**

**धर्म अंतींचा जो असे पुराणीं । तो सांग संपादी पुण्यखाणी ।**
**आम्हाजवळी राहणें येथुनी । केवळ मनानें करावें ॥ ९१**

**सगुणापेक्षें धाऊन येसी । तरी आमुची स्थिति होईल उदासी ।**
**विचित्र लीला देखोन दचकसी । हुरहुर वाटेल ऐकतां ॥ ९२**

**यास्तव संभाजीपुत्राकारण । नीट सर्व हि आया करून ।**
**राजभार अवघा त्याला सोपून । मुक्तदशातें अपंगी ॥ ९३**

**शंभुदेव तुझा कुळदैवत । राजमार्गानें जाऊन तेथ ।**
**दानधर्मादि आचरून समस्त । देवब्राह्मणा मानवी ॥ ९४**

**वर्षासन अग्रारनेम क्षेत्र । पुष्टी करी पूर्वींचे चालूं थोर ।**
**नूतनादि विधीत करून साजिर । स्वरूपसमरसीं होईं पां ॥ ९५**

— दासविश्रामधाम, ११०

## (११९) श्रीशिवछत्रपति यांच्या निर्याणानंतर

आपला हि अवतार संपला, असें च श्रीसमर्थांना वाटलें. आतां जगाकडे पाहणें नको, असें वाटून त्यांनीं एकान्तवास पतकरला. कसे हे दोन आत्मे एकजीव होते !

**समर्थ स्वप्रकाशें अंधारीं तीन मास बैसताती ।**
**मुरूमपात्रें उदकें सेविताती ।**
**शकलपात्रें घेऊनि धांवताती । अरण्याकडे दुश्चिन्हें ॥**

— श्रीसमर्थप्रताप, २०, ६४

## (१२०) गाथाचरित्रें संपलीं नाहींत, तीं अनंत आहेत

पण माझी मति कुंठित झाली, म्हणून मी थांबत आहें. श्रीसमर्थांचीं गाथाचरित्रें संपलीं नाहींत, त्यांना अंत नाहीं. तीं आतांपर्यंत फार थोडीं प्रकाशांत आलीं आहेत. येथून पुढें जसजसें संशोधन होत जाईल तसतशीं नवीन साधनें उपलब्ध होत जातील व नवीन नवीन गोष्टी कळत जातील. तेव्हां मग सर्व जण मान्य करतील कीं,

**कृतत्रेतद्वापारीं । जाले अद्भुत अवतारी ।**
**परी या समर्थाची सरी । कोणी न पावे ॥**

—रामसोहळा, १, ६, १०५



उ ल्ला स स त रा वा

# श्रीसमर्थांचीं वैशिष्ट्यें



प्राप्तिपुरुषाचीं जितुकीं लक्षणें ।
उपनिषद् भागीं केलें वर्णन ।
समर्थांआंगीं तितुकीं चिन्हें ।
कां वेदांनीं स्तविलें म्हणों नये ॥ दासविश्रामधाम, २, ५१

अनंत गुण समर्थांचे ।
काय वद्‌वतील येकि वाचे ।
श्रीगुरु रामचंद्र हनुमान साचे ।
जगदानंद जगद्गुरु ॥ श्रीसमर्थप्रताप, ३, ५५

[ ( १ ) स्वाभाविक जिज्ञासा – ( २ ) श्रीसमर्थांच्या रूपाचीं अनंतकवि, गिरिधर, मेरुस्वामी यांनीं केलेलीं वर्णनें – ( ३ ) तुकाराममहाराजांनीं केलेलें वर्णन – ( ४ ) अवाळु आणि पुच्छ – ( ५ ) वेष – ( ६ ) मेखळा – ( ७ ) माळ – ( ८ ) त्यांचें बोलणें – ( ९ ) चालणें – ( १० ) पाहणें – ( ११ ) आसन – ( १२ ) कसे दिसत – ( १३ ) निजणें – ( १४ ) खाणें, पिणें – ( १५ ) फळांची आवड विशेष – ( १६ ) विडा, तंबाखु यांचें सेवन – ( १७ ) पोहणें, घोड्यावर बसणें – ( १८ ) मुलें आवडत – ( १९ ) गायनाची आवड – ( २० ) एकान्तप्रियता – ( २१ ) अशा ठिकाणीं यांचें रक्षण कोण करी? ( २२ ) वक्तृत्व – ( २३ ) निरूपण – ( २४ ) कीर्तन – ( २५ ) वाचन – ( २६ ) लेखन – ( २७ ) भिन्न भिन्न भाषा – ( २८ ) राहणें – ( २९ ) त्यागवृत्ति – ( ३० ) परोपकारवृत्ति – ( ३१ ) न्यायबुद्धि आणि दयालुत्व – ( ३२ ) इतरांशीं वर्तणूक – ( ३३ ) ज्ञानोत्तर कर्म – ( ३४ ) अनेकीं एक – ( ३५ ) इतरांचें संदेहहरण – ( ३६ ) त्यांचीं नांवें – ( ३७ ) कार्याची व्यापकता – ( ३८ ) वाङ्मयाची व्यापकता – ( ३९ ) त्या व्यापकतेचें कारण – ( ४० ) अनंतकोटिब्रह्मांडनायक – ( ४१ ) सर्वगुण संपन्नता – ( ४२ ) प्रार्थना ]

## ( १ ) स्वाभाविक जिज्ञासा

तो जगदानंद जगद्गुरु कसा दिसे, कसा चाले, कसा बोले, केव्हां निजे, केव्हां उठे, कोठें बसे, काय खाई, काय पाही, काय करी, इत्यादि त्यांच्या सर्व क्रिया जाणण्याची इच्छा, अनन्य भक्ताला होणें, अगदीं स्वाभाविक आहे. अनन्य भक्ताला होणारी ही इच्छा, ज्याची त्यानें च आपल्या उपासनेच्या बळावर तृप्त करून घेतली पाहिजे, दुसरा कोणी ती तृप्त करूं शकणार नाहीं. या कामीं मला आणि तुम्हांला किंचित् साहाय्य व्हावें, म्हणून कांहीं प्रश्न मनांत आणून, पूर्वचरित्रकारांचा आधार घेऊन, त्यांचीं उत्तरें देण्याचा मी या उल्लासांत प्रयत्न करणार आहें, तो कितपत साधेल, सांगतां येत नाहीं.

अगदीं पहिली इच्छा आपणास होणार ती, ते कसे दिसत, त्यांचें रूप कसें होतें, वेष कसा असे, हें जाणण्याची.

## ( २ ) श्रीसमर्थांच्या रूपाचीं वर्णनें

अनंतकवि आणि गिरिधर यांनीं निश्चित आणि मेरुस्वामींनीं बहुधा त्यांना प्रत्यक्ष पाहिलें होतें, त्यांचा त्यांना सहवास घडला होता.

पैकीं अनंतकविकृत श्रीसमर्थस्तवनपर जे ५+३=८ श्लोक प्रसिद्ध आहेत, त्यांत रूप आणि वेष यांचा निर्देश एका च श्लोकांत केलेला आहे, तो श्लोक :

**वस्त्रें हुर्मुजि भर्जरी पटकुळी माथा चिरा ही असे ।**
**काया सुंदर गौरवर्ण लघुसें भाळीं अवाळु असे ।**
**वाणी उद्भट दासबोध वरदें हें काव्य केलें असे ।**
**ऐसा सद्गुरु जो अनंतकविचा बद्धासि तारीतसे ॥**

प्रतापकार गिरिधर वर्णन करून सांगतात, तें पहा :

**सद्गुरुस्वामीचें निर्गुणध्यान । लीलाविग्रहें सगुणध्यान ।**
**जेणें केलें श्रीराममूर्तिसंस्थापन । तें चि ध्यान वर्णीन हो ॥ १६**

**माथां निर्मळ केशरी पाग लपेटिली आहे। सुमनावतंसें मुक्तलग तुरे पाहें।**
**केशर कस्तुरी भाळीं झगमगिताहे । रत्नाक्षता झळकती ॥ १७**

**आकर्ण नयन कृपावलोकन । कर्णीं मुक्तमुद्रा विराजमान ।**
**नास्तिकांसी देऊनि आस्तिक ज्ञान । सरळ नासिका विराजे ॥ १८**

**निजबोधमुखें बत्तिसी झळकली । अधरामृतें स्वर्गामृतें निवालीं ।**
**कंठीं मुक्तलग मेखळा आपाद शोभली । कांची मेखळा कटिसूत्रें ॥ १९**

**कौपिनावरुता पीतांबर । लीळा कासिला चिदंबर ।**
**आपाद मुक्तमाळा मनोहर । मुक्तपणा नातळती ॥ २०**

**आपाद सुमनमाळा विराजती । नाना पर्णमाळा हरित शोभती ।**
**नवरत्नमाळा नवविधा दिसती । करांगुळीं झळकती निजमुद्रिका ॥ २१**

**नाना त्रिविध त्रिपुटी तापशमन । केवळ निर्मळ बावन चंदन ।**
**समर्थासी सर्वांगीं जाला लीन । अभ्यंग अंगदर्शन दावितसे ॥ २२**

**उत्तर सिद्धांत उत्तरीय वस्त्र । निर्मळपणें सूक्ष्म स्वतंत्र ।**
**सर्वांगध्यान दावी विचित्र । दिव्यांगभूषणें विभूषणें ॥ २३**

**निजपदीं पादुका झळकती । निजकरीं मोक्ष कैवल्य विराजती ।**
**बद्धता मुक्तता नित्यमुक्त विसरती । मननशीळ गुरुपाईं ॥ २४**

**कोटिपूर्णचंद्र कळंकरहित । पूर्णीं पूर्णपणाविरहित ।**
**नाना ज्ञानप्रकाशें उदई येत । उपमे न येत श्रीगुरुपाईं ॥ २५**

**अचळ सिंहासनीं अचळ मूर्ति । निर्मळ निश्चळ स्वरूपस्थिति ।**
**सर्वेश्वर म्हणे जी सद्गुरु मूर्ति । माझी मायोपाधि स्फूर्ति चालेना ॥ २६**

**भोंवतीं अनंत बैसलीं सज्जनवृंदें । अनंत दाटलीं ब्रह्मवृंदें ।**
**सर्व हि अभेद देखती श्रीगुरुपदें । सच्चिदानंदें संतोषती ॥ २७**

**विशाळ मंडप गगनस्थानीं । गगनसदृशं गुरुमूर्ति ध्यानीं ।**
**नयनीं नयन गेले हारपोनि । सद्गुरुध्यान राहिलें ॥ २८**

**ऐसें सद्गुरुसमर्थध्यान । सगुण ध्यान निर्गुण ध्यान ।**
**सर्वत्रांचें समाधान । कृष्णातीरीं देखिलें ॥ २९**

—श्रीसमर्थप्रताप, ४

कोणीं देखिलें? गिरिधरांनीं देखिलें! तें त्यांचें वर्णन वाचून आपण आपल्या श्रीसमर्थांना मानसपूजेंत पहावयाचें आहे! या वर्णनाशीं मेरुस्वामींनीं केलेलें वर्णन हि किती तंतोतंत जुळत आहे. मेरुस्वामी वर्णन करितात:

**दिव्य केशरटिळा भाळीं । सुरेख प्रथम कळा झळाळी ।**
**त्यावरी कस्तुरी शोभे आगळी । शोभा अक्षतेची ॥ ३९**

**केशरमिश्रित दिव्य चंदन । उटी दिधली विराजमान ।**
**चंपकमाला विभूषण । दिव्य मुक्तमाळा ॥ ४०**

**माथां वेष्टित दिव्य चिरा । नक्षत्रापरी मुक्तांचा तुरा ।**
**कनकरुचिर मनोहरा । मेखळा साजे ॥ ४१**

**सर्वांगसुंदर मनोहर । निजलावण्यअभ्यंतर ।**
**विश्रांतीचें माहेरघर । बैसलें हृदयीं ॥ ४२**

**स्वरूपसाक्षात्कारी रूपडें । विज्ञानसभेचें तेज चोखडें ।**
**पाहतां पाहतां निजनिवाडें । उपरमल्या वृत्ती ॥ ४३**

**ध्यानदृष्टीस समर्थमूर्ति । होय सहज चि भवनिवृत्ति ।**
**तटस्थवेध ब्रह्मप्रतीति । समर्थदर्शनें ॥ ४४**

—रामसोहळा, १, ११

याप्रमाणें या दोघांनीं केलेल्या वर्णनांच्या ओव्या वाचून व त्यांची तुलना करून मला माझ्या शब्दांत उभय वर्णनांतील साम्य सांगतां आलें असतें,

पण त्यांच्या ओव्या वाचतांना जसें जगूं प्रत्यक्ष श्रीसमर्थदर्शन घडतें तसें, माझ्या शब्दांनीं घडलें नसतें, म्हणून या मूळ ओव्या च उद्धृत करणें मला इष्ट वाटलें.

## ( ३ ) तुकाराममहाराजांनीं केलेलें वर्णन

श्रीसमर्थांना प्रत्यक्ष पाहिलेल्या आणखी एका थोर पुरुषानें त्यांच्या स्वरूपाचें वर्णन केलेलें आहे, पण तें कोणी खरें मानतात, तर कोणाची प्रवृत्ति तें क्षेपक मानण्याकडे कलुषित भावनेनें होते. तुकाराममहाराजांचा एक अभंग आहे. रामदासगुणार्णवकारादि अनेक पूर्वचरित्रकारांनीं तो उद्धृत केलेला आहे. कृष्णातटाकीं आपणांस समर्थांचें दर्शन घडलें, असें म्हणून कोण पापी मनुष्य श्रीतुकाराममहाराजांच्या नांवावर असला अभंग रचील ? तो अभंग असत्य मानण्यास मला कांहीं कारण दिसत नाहीं. तुकाराममहाराज म्हणतात :

**हुर्मुजी वस्त्राचा उंच मोतीदाणा । रामदासी बाणा या रंगाचा ॥ १**
**पीतवर्ण कांती तेज अघटित । अवाळु शोभत भ्रूकुटिमाजी ॥ २**
**कौपिनपरिधान मेखळा खांद्यावरी । तुंबा कुबडी करीं समर्थांच्या ॥ ३**
**रामनाममुद्रा द्वादश टिळे । पुच्छ ते वळवळे कटामाजी ॥ ४**
**काष्ठाच्या खडावा स्वामीचे पायांत । स्मरणी हातांत तुळशीची ॥ ५**
**कृष्णातटाकासी जालें हो दरुशन । वंदितो चरण तुका म्हणे ॥ ६**

## ( ४ ) अवाळु आणि पुच्छ

कपाळावर, किंचित् उजव्या बाजूला, अवाळु होतें, तें जन्मतः च होतें. तें प्रत्यक्ष च होतें. पण गिरिधरांसुद्धां सर्व चरित्रकार, पुच्छ हि होतें, असें म्हणतात, तें मला लाक्षणिक वाटतें. तुकाराममहाराज हि वरच्या अभंगांत पुच्छ असल्याचें म्हणत आहेत. श्रीसमर्थ हे मारुतीचा अवतार होत.

**कृते तु मारुताख्यश्च । त्रेतायां पवनात्मजः ।**
**द्वापारे भीमसंज्ञश्च । रामदासः कलौ युगे ॥**

या भविष्योत्तर पुराणांतील वचनाधारें श्रीसमर्थ हे मारुतीचा अवतार होत. असें सर्व सांप्रदायिक मानतात च, पण महीपतिसारखे इतर हि मानतात. संतविजयांत महीपति अगदीं आरंभीं च म्हणतात,

**ऐका आतां श्रोते चतुर । रामदास मारुतीअवतार ।**
**करावया विश्वोद्धार । प्रगटे साचार भूमंडळीं ॥ १-१३**

ते मारुतीचा अवतार होते, म्हणून च केवळ पुच्छ होतें, असें म्हणण्यांत येत असावें.

## ( ५ ) वेष

कौपीन, मेखळा, शिरोवेष्टन हीं सर्व हुर्मुजी रंगाचीं असत. वनवासांत श्रीरामरायांच्या जटाकलापीं हुर्मुजी वस्त्र असे. सिंहासनावर बसतेवेळीं तें त्यांनीं हनुमंताजवळ दिलें व हनुमंतांनीं तें श्रीसमर्थांना दिलें. तो च हुर्मुजी रंगाचा बाणा श्रीसमर्थांनीं पुढें चालविला. श्रीसमर्थांना

रामाचें हुर्मुजी वस्त्र मिळालें,
विष्णूनें शिरोवेष्टन दिलें,
महालक्ष्मीनें पीतांबर दिला,
कृष्णानें गोकुळ येथें श्रीसमर्थ गेले असतां
घोंगडी, काठी व कुबडी हीं दिलीं,
दत्तात्रेयानें करवीर येथें झोळी आणि पादुका दिल्या आणि
मारुतिरायांनीं तुंबा दिला.

असा श्रीसमर्थांचा एकंदर साज होता. तो च बाह्य थाट, त्यांचे म्हणविणाऱ्या आम्हीं चालविला आहे, फक्त त्यांच्यांतील सामर्थ्य, निर्भयता आणि निस्पृहता, हीं आमच्यांत अल्पांशानें हि उतरलीं नाहींत ! असें कां झालें आणि होत आहे, याचा विचार करून आम्ही अंतर्बाह्य श्रीरामदासी बनूं, तर च आमचा बाह्य वेष आम्हांस भूषणावह होईल.

## ( ६ ) मेखळा

एकदां हिमालयांत श्रीसमर्थ थंडीनें त्रस्त झाले असतां श्रीरामानें त्यांच्या अंगावर मेखळा घातली.

**समर्थ निर्वाण तनुलीला । दाशरथीनें देखोनियां डोळां ।**
**निजकृपांबर मेखळा । दासाचे गळां घातली ॥**

—रामसोहळा, ३, ११, ४०

ती मेखळा कोणीं धारण करावी याचा क्षणभर हि विचार मनांत न येऊं देतां आम्ही गळ्यांत अडकवून भिक्षा मागावयास निघत असतों ! वास्तविक ती मेखळा श्रीसमर्थांपाशीं च ठेवून तिला आम्हीं नित्य वंदन केलें पाहिजे. ती आमच्या हि गळ्यांत शोभेल, पण केव्हां ? ती कोणीं धारण करावी ?

**शून्यसंकल्प निर्विकल्प । नाहीं विक्षेपाचा विकल्प ।**
**तेणें रामप्रसादरूप । मेखळा घ्यावी ॥**

**भागवतधर्मीं चित्तप्रसन्न । ब्रह्मानंदें परिपूर्ण ।**
**तेणें सहजस्थिति हें विभूषण । मेखळा धरावी ॥**

**सर्वशास्त्रीं अभिज्ञमती । भगवद्भजनें सुलीनवृत्ती ।**
**भूतमात्रीं देवप्रतीती । मेखळा धरावी तेणें ॥**

—रामसोहळा, ३, ११, ४४-४९-५१

इतरांनीं नव्हे ! इतरांनीं धारण करणें हा तिचा अपमान आहे. ती शाप देईल. आपण तिची पूजा करावी, तिची कृपा भाकावी !

## ( ७ ) माळ

श्रीसमर्थांना स्मरणाभ्यास अखंड असे. त्यांना माळेची जरूरी नसे, पण ती त्यांच्या हातांत सारखी असे. मग हातांत कां असे ? लोकांसाठीं, ज्यांना आपोआप सतत स्मरण होत नाहीं, त्यांनीं निदान माळ हातांत वागवावी, म्हणजे तरी स्मरण होत जाईल.

**जो गुरुकृपें स्वात्मीं जाला समरस । त्या घडे अखंड स्मरणाभ्यास ।**
**त्यावरी हि हें भूषण विशेष । लोकसंग्रहाकारणें ॥**

—दासविश्रामधाम, ५६, ११२

श्रीसमर्थांचें आपण रूप पाहिलें, वेष पाहिला. आतां त्यांचें बोलणें, चालणें, पाहणें इत्यादि सामान्य क्रिया कशा असत, त्या पाहूं.

## (८) त्यांचें बोलणें

श्रीसमर्थ सामान्यतः फार थोडें बोलत. प्रतापाच्या तेराव्या समासांत श्रीराम आणि सीतामाई यांच्या मध्यें श्रीसमर्थांविषयीं जो संवाद झालेला दिला आहे, त्यांत राम सीतेला म्हणाले, "समर्थ प्रत्यक्ष च येथें आहेत, तेव्हां तुम्हांला जें कांहीं विचारावेंसें वाटेल, तें त्यांना च समक्ष विचारा." त्यावर जगन्माता म्हणाली—

**दिसताती देवा अनिर्वचनी ॥**

यावरून च दिसतें कीं, श्रीसमर्थांना फारसें बोलावयास नको होतें. आढ्यतेनें कोणी त्यांच्याकडे गेल्यास त्याच्याशीं तर ते मुळीं च बोलत नसत; पण नम्र भावानें कोणी कांहीं विचारल्यास ते मोकळेपणानें सांगत. कोणी हि प्रथम च त्यांच्या कडे गेल्यास ते भिडस्तपणानें थोडें बोलत, पण परिचय होऊन कांहीं काळ गेल्यावर ते सलगीनें बोलत.

## (९) चालणें

श्रीसमर्थ फार भरभर चालत. ते चालत तेव्हां बरोबर असणाराला पळावें च लागे कीं काय, इतकें त्यांचें जलद चालणें असे. गिरिधर सांगतात च

**समर्थ हनुमानस्वरूप वायोरूप निर्धारें ।**
**जातां तीर धरिती मागिल्या करें ।**
**समुद्रीं जहाज चाले जेवीं त्वरें ।**
**तेवीं सत्वरें श्रीसमर्थगमन ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १९, २२

## (१०) पाहणें

खालीं पाहून चालत. त्यांची नेहमीं अंतर्दृष्टि असल्यामुळें ते साहजिक अधोदृष्टि दिसत. "महाराज, आपण नेहमीं अधोदृष्टि कां असतां?" असें एकदां एकानें सलगीनें त्यांना विचारलें च होतें, त्याचें त्यांनीं उत्तर दिलें :

**समर्थासी कोण्ही येक लोक म्हणती ।**
**स्वामि अखंड अधोदृष्टि अंतर्दृष्टि कां असती ।**
**अरे अंतरीं पाहतसों श्रीराममूर्ति ।**
**तुम्हासी सगुणमूर्ति हे लक्षावया ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १९, ७०

## ( ११ ) आसन

श्रीसमर्थांचें नेहमींचें आणि आवडीचें आसन म्हणजे सिद्धासन. ते मानसपूजा, ध्यान, जप सिद्धासन घालून करीत.

**महापुरुषाचें कोण जी आसन ।**

असें सीतेनें विचारलें असतां

**जानकी यांचें सिद्धासन ॥**

— श्रीसमर्थप्रताप, १३, २७

असें श्रीरामांनीं च सांगितलें आहे. अर्थात् श्रीसांप्रदायिकांचें हें च आसन असणार.

## ( १२ ) कसे दिसत

त्यांच्याकडे जेव्हां पहावें तेव्हां ते बहुधा ध्यानस्थ दिसत. प्रतापकारांनीं सांगितलें आहे :

**समर्थ दिसताती बहुधा ध्यानस्थ मनें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १३, ४१

आणि स्वतः समर्थांनीं आत्मबोधांत म्हटलें आहे :

**जनास दिसे हा दुश्चित । परी तो आहे सावचित ।**
**अखंड जयाचें चित्त । परमेश्वरीं ॥** १४–७–१५

हा आणि तो म्हणजे स्वतः श्रीसमर्थ च.

## ( १३ ) निजणें

पुरश्चरणाच्या काळांत, तीर्थाटण करीत असतां, केव्हां हि रानावनांत, पर्वतावर हिंडतांना, श्रीसमर्थांनीं जमिनीवर निजावें, उशाला रामचरण घ्यावे,

पांघरावयाला दाही दिशा असत च आणि थंडीचें निवारण करण्यास धुणी पेटवीत. याच्या वर्णनाचा त्यांचा स्वतःचा श्लोक आहे च :

**सुषुप्तीअवस्थेसि भूमीं निजावें । उसें रामपाद स्मरोनी धरावे ।**
**दिशांचा महा पट्ट तो पांघरावा । सिताकारणें साह्य वन्ही करावा ॥**

— करुणाष्टकें, ७९, १४

असा हा अनंतकोटिब्रह्मांडनायक आपल्या पूर्व वयांत, आरंभींच्या काळांत वावरत असे.

पुढें मग, राजयोगाच्या काळांत पलंग आणि बिछाना हीं आलीं, तरी हि त्यावर क्वचित् च निजत.

निद्रेची हि त्यांना फारशी आवश्यकता नसे कीं काय, कोण जाणे! उगीच दुपारीं थोडेसे निजत, रात्रीं क्वचित् च निजत. रात्र बरी च झाली म्हणजे शिष्यांना म्हणत, " चला रे उठा, आतां निजा, आम्ही हि विश्रांति घेण्यास जातों ;" असें म्हणून सर्वांना निजावयास जाण्याची आज्ञा करीत आणि आपण एकाद्या डोंगराची वाट सुधारीत !

## ( १४ ) खाणें पिणें

आरंभींच्या काळांतील त्यांचें खाणें पिणें विचारूं च नका. भिक्षा मागून पीठ आणावयाचें, तें दगडावर मळावयाचें आणि त्याच्या पानग्या भाजून त्या, पाण्याच्या घोटाबरोबर, भक्षण करावयाच्या ! पुष्कळदां अनेक दिवस उपवास हि घडे ! अशा वेळीं झाडाचा पाला खाऊन व पाणी पिऊन ते रहात ! होते कांहीं त्यांनीं सोसलेल्या कष्टांची कल्पना ? कशासाठीं हे एवढे कष्ट त्या महापुरुषानें सहन केले ?

पुढें चाफळ आणि सज्जनगड येथें राहणें झाल्यावर, स्वतः पानग्या भाजण्याचें काम टळलें. वेणाबाई सुगरीण होत्या. त्या स्वयंपाक करीत आणि देवाला नैवेद्य होई, तेव्हांपासून मग श्रीसमर्थांना चारी ठाव अन्न मिळूं लागलें. दिवसाकांठीं ते एकदां च भोजन करीत, दुसऱ्यांदा रात्रीं पुन्हां जेवीत नसत. त्यांच्या बरोबर भोजनास मारुतिराय असत, म्हणून ते एकवाढ करून घेऊन, एकीकडे एकटे एकांतांत बहुधा जेवावयास

बसत. एक दोन प्रसंग असे झाले, चुकून केव्हां तरी, एकदां वेणुबाई व दुसऱ्यांदा दुसऱ्या कोणी बाई, अमुक पाहिजे कां म्हणून विचारावयास गेल्या, तों मारुती भोजन करीत होते, त्यांनीं भु:भुकार केला आणि त्या बाया बेशुद्ध होऊन पडल्या.

## ( १५ ) फळांची आवड विशेष

अन्नापेक्षां त्यांची फळांवर भक्ति विशेष असे. पुरश्चरणतीर्थाटणकाळांत त्यांनीं रानांतलीं फळें खावीं, पण पुढें ज्या ज्या ऋतूंत जीं जीं फळें जेथें जेथें होत, तेथून तेथून तीं त्यांना येत. फळांत हि त्यांना आंबे जास्त आवडत.

**षण्मास आंबे गोमंतपर्वतींचे । समर्थांसी येती अपाड पाडाचे ।**
**नाना ऋतुकाळीं नाना फळांचे । आहार सर्वदा समर्था ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ९, २१

खाद्यांत जशीं फळें आणि त्यांत हि जसे आंबे, त्यांना आवडत, तसे पेयांत दहीं आणि उसाचा रस, हीं त्यांना आवडत.

## ( १६ ) विडा, तंबाखु यांचें सेवन

पूर्ववय सारें थंडीवाऱ्यांत कंठावें लागल्यामुळें श्रीसमर्थांना कफाची व्यथा जडली होती. त्यासाठीं विडा खात जावा, असें त्यांना सुचविण्यांत आलें होतें. श्लेष्मपित्तशमनार्थ आणि एकाग्र चित्त होण्यास तंबाखूचा उपयोग होत असावा, असें वाटतें. श्रीदासविश्रामधामकार सांगतात :

**विडा मर्दन करीत वदनीं । चित्त निक्षेपिजे नेऊनि ध्यानीं ।**
**तरी शांतता ठसोनि अंतःकरणीं । समाधान होय चिंता हरे ॥**

—दासविश्रामधाम, २३, ३९

त्यामुळें त्यांच्यापाशीं बटवा नेहमीं असे.

## ( १७ ) पोहणें, घोड्यावर बसणें

पोहतां येणें आणि घोड्यावर बसतां येणें हे गुण अंगीं नसलेलीं माणसें त्या काळीं क्वचित्च असतील. तेव्हां समर्थांच्या ठिकाणीं हे

दोन्ही गुण होते, यांत कांहीं अपूर्वता नाहीं. घोड्यावर बसण्यांत ते अति पटाईत होते. कसा हि खट्याळ घोडा असला, तरी ते त्याला तत्काळ वठणीवर आणीत. एकदां त्यांच्यासाठीं म्हणून मोठा थोरला घोडा आणण्यांत आला होता, तो जागजागीं तंगानें बांधलेला होता. तो पाहून श्रीसमर्थ म्हणाले, "याला असा ठिकठिकाणीं कां बांधला आहे? त्याला मोकळा करा." तसें करण्यांत आलें आणि मग त्यावर मोकळे बसून त्यास कोस दोन कोस दामटून दमवून समर्थांनीं आणलें. तात्पर्य, घोड्यावर बसण्यांत ते पूर्ण वाकबगार होते.

## (१८) मुलें आवडत

समर्थांना मुलें फार आवडत. त्यांच्यांत ते खेळत आणि त्यांच्यासारखे वागत. कारण उघड च आहे. एक तर, लहान मुलें निर्मल मनाचीं, निष्कपट असतात व त्यांच्यावर त्या वयांत योग्य संस्कार झाले आणि त्यांना चांगलें वळण लागलें, तर तीं च पुढें देशाच्या आणि धर्माच्या उपयोगी पडावयाचीं असतात. त्यांचा एक श्लोक प्रसिद्ध च आहे.

**वयें थोर ते चोर भावार्थ नाहीं। विकल्पें बुडाले अहंभाव डोहीं।**
**अहंता नसे हो तया लेकुरांसी। म्हणोनी बहू आवडी रामदासीं॥**

## (१९) गायनाची आवड

(१) श्रीसमर्थांना गायन फार आवडत असे. कोणत्या हि कारणानें विषाद वाटून त्यांचें मन उद्विग्न झालें, तर प्रेमळ गायन कानीं पडतां च उद्विग्नता नाहींशी होऊन त्यांचें चित्त प्रसन्न होत असे. एकदां कांहीं कारणानें विषाद वाटून ते एकीकडे बागेंत जाऊन बसले. लोक दर्शनासाठीं खोळंबले, पण त्यांच्यापर्यंत जाण्यास कोणी धजेना. तेवढ्यांत एक भैरवजोगी आला. श्रीसमर्थांच्या पुढें जाऊन एका पायावर उभें राहून किन्नरीच्या साहाय्यानें एक सुंदर पद गोड आवाजांत त्यानें म्हटलें, तें श्रीसमर्थांनीं ऐकलें आणि त्यांचा विषाद पळाला! त्या भैरवजोग्याच्या अंगावर त्यांनीं शंभर होनांची कसबी सुवर्णचादर टाकली (श्रीसमर्थप्रताप, १८, ३२).

( २ ) त्यांना स्वतः हि गाण्याचें अंग अप्रतिम होतें, रागरागिणींचें पूर्ण ज्ञान होतें. आपल्या शिष्यांना हि ते गायन शिकवीत. कोणत्या वेळीं कोणता राग म्हणावा, हें जाणून तदनुरूप त्यांनीं पद्यरचना करावी व ती शिष्यांना सांगावी. असावरी, काफी, केदार इत्यादि रागांवरील त्यांचीं पदें पदपदांतरांत प्रसिद्ध झालेलीं आहेत.

( ३ ) गायन हें लोकवशीकरणाचें एक मोठें अमोघ साधन आहे. राष्ट्रपुरुषाच्या ठिकाणीं तें असल्यास त्याचा फार उपयोग होत असला पाहिजे. गायनकलेची त्यांनीं धन्यता गायिलेली आपणा सर्वांस ठाऊक च आहे.

**संगीत गायनी विद्या । सर्व सद्या मनोरथा ।**
**विदेश पाहतां नाहीं । धन्य ते गायनी कळा ॥ १**

**आवडी सकळै लोकां । प्रीतीनें भजती जनीं ।**
**इच्छिलें पुर्विती सर्वै । धन्य ते गायनी कळा ॥ २**

**वेधिलीं सर्व हि चित्तें । बोधिलीं लोक भाविकें ।**
**अद्भुत गुण देवाचे । धन्य ते गायनी कळा ॥ ३**

**येकाकी महंती येते । उदंड कीर्ति वाढते ।**
**विख्यात सकळै लोकीं । धन्य ते गायनी कळा ॥ ४**

**राहती लोक ते राजी । आवडे उपजे मनीं ।**
**वर्णितां कीर्ति देवाची । धन्य ते गायनी कळा ॥ ५**

इत्यादि, स्फुट प्रकरण ३९ वें.

## ( २० ) एकांतप्रियता

श्रीसमर्थांना एकांत फार प्रिय असे. कित्येकदां तर ते महिनेच्या महिने एकांतांत जाऊन रहात, कोणास भेटत नसत. या एकांतप्रियतेमुळें च बहुधा त्यांच्या ठिकाणीं वनाची विलक्षण आवड उत्पन्न झाली असावी. वनांत, पर्वतावर, अवघड जागीं जाऊन चिंतनांत मग्न होऊन बसण्याचा त्यांना छंद फार असे. त्यांचे आत्मचरित्रपर पुढील तीन श्लोक बाडांक १०३ त आढळतात :

**अघोरा वनामाजि येकांत जावें । उदासीन चित्तें तयाला पहावें ।**
**उभी धांव घ्यावी गिरी तो चढावा । देहे कष्टवावा बरा वीवरावा ॥१**

**भवें त्रासलों हाक मारूनि जावें । गिरीशृंग पाठार ते प्रार्थवावे ।**
**सुखें वस्ति विश्रांति तेथें करावी । मनोवासना रामरूपीं भरावी ॥ २**

**बहू झाडखंडें उदंडें अचाटें । गिरी सारिखीं थोरथोरें कपाटें ।**
**बहू सावजें व्याघ्रसिंहे कलाली । तेथें रामदासें असे गुंफ केली ॥ ३**

कोठल्या गुंफेला अनुलक्षून हा उल्लेख आहे, सांगतां येत नाहीं. चाफळ, शिवतर, हेळवाक, चंद्रगिरि वगैरे ठिकाणच्या आपल्या पाहण्यांत आलेल्या एकाद्या गुंफेला अनुलक्षून तो आहे, कां आपल्या पाहण्यांत अद्यापि न आलेल्या निराळ्या च एकाद्या गुंफेला अनुलक्षून आहे, कोणीं सांगावें ?

हिंवाळा असो कीं पावसाळा असो, बरोबर कोणी शिष्य असो वा नसो, ते निर्भयपणें, दिवसाचे आणि रात्रींचे, अरण्यांत जाऊन बसत. विजांचा चकचकाट आणि मेघांचा गडगडाट हीं त्यांना अरण्यवासापासून परावृत्त करूं शकलीं नाहींत. मारुतिराय आपणांस कोठें हि आणि केव्हां हि विसंबणार नाहींत, हा त्यांना पूर्ण भरंवसा होता.

सर्व ऋतूंत, रात्रीं अपरात्रीं, अरण्यवासापासून त्यांना त्रास झाला नसेल काय ? नसेल असें कसें होईल ! पण त्यांनीं मानला च नसणार, तेव्हां त्यांच्या दृष्टीनें त्रास कोठला ?

अरण्यांत अस्वलवृकव्याघ्रादिकांची गांठ पडत असली पाहिजे. पडत असे च. त्यांना अरण्यांत भेटावयास गेलेल्या अनेकांनीं त्यांना व्याघ्राच्या संगतींत पाहिल्याच्या गोष्टी प्रसिद्ध आहेत. ते सारे वन्य पशु त्यांच्या आज्ञेंत वागत, असें दिसतें. चंद्रगिरीवरच्या घळींत हे रहावयास गेले, तेव्हां त्या घळींत एक वाघ रहात होता, पण यांनीं त्यास दुसरीकडे जाण्यास सांगून आपण त्या घळींत राहूं लागले.

**कठीण स्थळीं अगत्य राहाणें । सिंहव्याघ्रेंसीं हरिहरेंसीं भांडणें ।**
**निरावलंब कड्यावरी धोत्रध्वजा लावणें । ब्राह्मण्य दावणें सृष्टीसी ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३, ३६

## ( २१ ) अशा ठिकाणीं यांचें रक्षण कोण करी ?

रात्रीं अपरात्रीं रानावनांत एकटे हिंडत, डोंगरांतील घळींत एकटे रहात, तेथें यांचें रक्षण कोण करीत असे ? याचें उत्तर गिरिधर, मेरु आणि आत्माराम या त्रिवर्गांनीं एकसारखें च दिलें आहे.

( १ ) गिरिधर सांगतात :

**समर्थांसी रक्षित दोनी धनुर्धारी । समागमें गुप्त असती विपिनविहारीं ।**
**कोठें न विसंबती येक क्षणभरी । आत्माराम समर्थस्वामी ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३, २६

आणखी पुढें ते म्हणतात :

**गिरिकंधरीं समर्थआसनें । दरीं दर्कुटीं मंचकशयनें ।**
**कडेकपाटीं धांवती जनें । वैभवार्चनें करावया ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३, ३४

पण समर्थ

**वैभवें सांडोनि दुर्गम वनीं । गिरिगुहांतरीं तरुतळ उष्णशयनीं ।**
**कोदंडपाणी स्वयें पीतांबरें छाया करूनि । नाना फळीं जीवनीं सान्निध्यें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ३, ३५

( २ ) आपल्या रामसोहळ्यांत मेरुस्वामी एका ठिकाणीं स्पष्ट च श्रीसमर्थांचा उल्लेख करून म्हणतात—

**विचरतां विरक्तीनें वनीं । स्वामीसंरक्षणालागुनी ।**
**मनोहर कार्मुकपाणी । पुढें मागें तिष्ठती ॥**

—रामसोहळा, ३, ११, ३४

आणि दुसऱ्या एका ठिकाणीं स्पष्ट उल्लेख नसला तरी, मला यत्किंचित् हि शंका नाहीं, श्रीसमर्थांना मनांत आणून च ते म्हणत आहेत :

**देहबुद्धीची शृंखळा । तोडूनि जाला तो मोकळा ।**
**मायावस्ती लोकां सकळां । त्यागूनि ब्रह्मारण्य घे ॥ २८**

**जनवस्ती टाकूनि । भरला निर्जनवनीं ।**
**अवरोधितां कामादिकांनीं । विभांडूनि गेला ॥ २९**

**देश विदेश महास्थानें । विचरे निजविरक्तीनें ।**
**देव दयार्णव त्याकारणें । रक्षितसे सबाह्य ॥ ३०**

**जैसें शिशु नेणत मायेसी । भरे क्रीडेच्या विलासीं ।**
**तयाची दृष्टि चुकऊनि सरसी । माता संरक्षी कृपेनें ॥ ३१**

**देव तैसा कृपेचा कोवळा । भाविकांसि रक्षित अवलीला ।**
**तया दयार्णवाची लीला । अकळ ब्रह्मादिकासी ॥ ३२**

**भक्ति रिघतां कठिणांतरीं । पुढें मार्ग सोपारा करी ।**
**त्रितापहर छाया धरी । परिधानांबरें ॥ ३३**

**वेंची मार्गींचे कंटक । निवारीं विघ्न भयानक ।**
**धरूनियां शरकार्मुक । पुढें मागें उभा चि असे ॥ ३४**

— रामसोहळा, ५, ४

इतके राम समर्थांचे ऋणी झालेले होते ! अशा समर्थांना काय उणें असणार ! त्यांना भय कसलें आणि चिंता कसली ! त्यांनीं म्हणावें तें व्हावें, हें सहज च होतें !

( ३ ) श्रीदासविश्रामधामकर्ते आत्मारामहाराज हि तो च अनुवाद करतात :

**अनंतगुणी श्रीरामचंद्र । न कळे कवणा हि जयाचा पार ।**
**तो दासासन्निधीं अहोरात्र । गुप्त प्रगट सांभाळिती ॥**

—दासविश्रामधाम, १०, ६०

## ( २२ ) वक्तृत्व

श्रीसमर्थांचें बोलणें फार आकर्षक असे. त्यांचा वाक्प्रवाह सुरू झाला, म्हणजे श्रोते देहभान विसरून जात. त्यांत हि, प्रतिपादनाचा विषय श्रीरामचरित्रांतला एकादा प्रसंग असला, म्हणजे स्वत: श्रीसमर्थ च कोठें देहभानावर असत, तर श्रोते असणार ! साधें तत्त्वज्ञान असलें, तरी तें त्यांच्या तोंडून ऐकावें, असें लोकांना वाटे. या त्यांच्या वक्तृत्वगुणाविषयीं श्रीदासविश्रामधामकर्ते म्हणतात :

**वर्णितां श्रीरामगुणानुवाद । अधिकाधिक्य वाढे आनंद ।**
**जैसा साधका बोधितां बोध । अपेक्षा उठे विशेष ॥**

**पाजितां पाजितां वरिवरी सुधा । पोट फुगेना ना म्हणे कदां ।**
**तैसे श्रोते ते विसरोनि धंदा । नेहार देती ऐकती ॥**

**धन्य दासाचें वक्तृत्व ऐसें । कपिलसिद्ध चि नेणों सादृश ।**
**संजय जयमिनी सूत कीं व्यास । वैशंपायनु अगस्ति ॥**

—दासविश्रामधाम, २३, ८४–८६

या त्यांच्या गुणाचा प्रभाव त्यांच्या निरूपणांत आणि कीर्तनांत सर्वांच्या प्रत्ययास येत असे.

## ( २३ ) निरूपण

श्रीसमर्थ प्रत्ययावांचून कांहीं बोलले नाहींत व कोणती हि गोष्ट स्वत: केल्यावांचून दुसऱ्याला करण्यास त्यांनीं सांगितली नाहीं. त्यामुळें त्यांचें बोलणें प्रभावी ठरत असे. ते सहज कांहीं बोलत, तरी तें शास्त्राला सोडून नसे, त्याला शास्त्रांचा आधार असावयाचा च.

**जया अंतरीं भगवंत । अचल राहिला निवांत ।**
**तो स्वभावें जें बोलत । तें ब्रह्मनिरूपण ॥**

ही त्यांची ओवी त्यांच्या च बोलण्याला पूर्णपणें लागते.

"अरे, तें चाफळास त्या दिवशीं शिवरायासाठीं पद केलें होतें, तें म्हण पाहूं" असा एकाद्या विशिष्ट प्रसंगाचा उल्लेख करून एकाद्या शिष्याला पद म्हणावयास सांगत व त्यानें तें म्हटल्यावर आपण त्याचें निरूपण करून समजावून सांगत. केव्हां केव्हां श्रीमत् ग्रन्थराज दासबोधांतील एकादा समास पुढें घेऊन त्यावर हि श्रीसमर्थ स्वत: निरूपण करीत. निरूपण चालत असतां शंका विचारण्याची श्रोत्यांना मोकळीक असे आणि श्रोते हि मोकळ्या मनानें शंका विचारीत आणि स्वत:चें समाधान करून घेत. करा त्या श्रोत्यांच्या भाग्याची आणि आपल्या अभाग्याची कल्पना !

## ( २४ ) कीर्तन

निरूपणाप्रमाणें च श्रीसमर्थ कीर्तन हि करीत. कीर्तनाला उभे ठाकले, म्हणजे अगदीं आरंभीं नमनाचें पद म्हणावयाचें, तें ठरलेलें असे.

अंतःकरण अगदीं खुलें करून दाखविणारें किती प्रेमळ तें पद आहे! सर्व श्रीसमर्थसांप्रदायिक कीर्तनकारांनीं श्रीसमर्थांचा हा दंडक चालविला पाहिजे. बडोद्याचे कै. दादामहाराज च तो चालवीत असत. ऐका तें पद, नसलें पाठ तर पाठ करा, श्रीरामचरण आठवून प्रेमानें म्हणत चला.

**येईं रामराया नेईं भवतम विलया।**
**तुझे चरण ध्यातों शरण तुज चि सखया॥ ध्रु०**

**हरिकथेच्या मिषें तुह्मीं पाउलें पहावीं।**
**पोटींचें आरत रामें झडकरि पुरवावें॥ १**

**तुजविण वैभव आम्हां काय रे करावें।**
**त्वां जरि न यावें तरी म्यां कवणा शरण जावें॥ २**

**चंचलमानस हरिकथेसी उभा मी राहे।**
**निडळावरि बाहे राम-दास वाट पाहे॥ ३**

मग निरूपणाला एकादें पद अथवा अभंग घ्यावयाचा व त्याला अनुरूप आख्यान लावावयाचें.

कीर्तन हें च त्यांच्या प्रचाराचें मुख्य साधन असल्यामुळें ते जेथें जेथें म्हणून जात, तेथें तेथें त्यांचें कीर्तन हें व्हावयाचें च. अशीं त्यांचीं शेंकडों ठिकाणीं हजारों कीर्तनें झालीं. टाळ, काहळा, वीणा, मृदंग इत्यादि कांहीं उपांगें असलीं तर ठीक, पण नसलीं तरी त्यांचें त्यांवांचून अडत नसे. त्यांचें कीर्तन म्हणजे पाठ केलेली नक्कल नव्हे. ते कीर्तनाला उभे राहिले म्हणजे प्रसंगानुसार स्फुरेल तें आख्यान, मनांत उद्भवतील ते विचार आणि तत्काळ होईल ती काव्यरचना. कीर्तनकाराला मुख्य जें पाहिजे असतें भगवत्प्रेम, त्याचा जिवंत झरा च त्यांच्या हृदयांत असल्यामुळें त्यांच्या कीर्तनांत स्वतः ते आणि त्यांचे श्रोते रंगून जाण्यास वेळ लागत नसे. तशांत भगवत्प्रेमाला गोड आवाजाची जोड मिळाल्यामुळें त्यांच्या कीर्तनांत तत्काळ रंग भरत असे. त्यांची भव्य मूर्ति, प्रेमळ दृष्टि, मधुर वाणी, खडा आवाज, निस्सीम भक्तिप्रेम, सप्रचीत बोलणें, लोककल्याणाची तीव्र तळमळ, हीं सर्व आठवावीं व दासविश्रामधामकारांनीं श्रीसमर्थांच्या कीर्तनांचे प्रसंग वर्णन करीत असतां जीं अनेक पदें उद्धृत केलीं आहेत, त्यांतलें किंवा

**बंद प्रबंदें बहुविध छंदें । कीर्तनघमडि करावी ।**
**निरूपण श्रवणमनननिजध्यासें । पावन वाट धरावी ॥ १**

**तरि च जन्म हा सफळ । नाहीं तरि सकळ निर्फळ ॥ ध्रु०**

**जड चंचळ निश्चळ वोळखावें । सार चि शोधुनि घ्यावें ।**
**मुळापासुनि सेवटवरी । माईक सकळ तजावें ॥ २**

**पुस्तकज्ञानें होत चि नाहीं । प्रत्यय नीट पहावा ।**
**दास म्हणे समजेल विचारें । तेणें तुटेल गोवा ॥ ३**

असलें एकादें उपदेशपर किंवा अन्य कोणतें हि भक्तिपर पद, आपण श्रीसमर्थांच्या मुखांतून ऐकत आहोंत, असें मानून मनाची कशी अवस्था होते, तिचा आज हि अनुभव घेऊन पहा. आज जो आनंद नुसत्या कल्पनेनें तुम्हांस होईल, त्याच्या शतपट आनंदाचा अनुभव त्या काळीं प्रत्यक्ष ऐकतांना श्रोत्यांना आला असला पाहिजे !

## ( २५ ) वाचन

श्रीसमर्थांचें वाचन फार दांडगें असलें पाहिजे. असलें पाहिजे कां म्हणा, होतें च. श्रीमत् दासबोधाच्या पहिल्या च समासांत आधारभूत ग्रन्थांचा जो उल्लेख केला आहे, तो हें च दर्शवितो. संस्कृत, प्राकृत, वेदान्तपर कोणता हि प्रख्यात ग्रन्थ त्यांच्या नजरेंतून निसटला असेल, असें वाटत नाहीं. प्राकृत ग्रन्थांविषयीं मी हें विधान निश्चयानें करूं शकतों. ते जात तेथें असलेल्या सत्पुरुषांच्या, योग्यांच्या, सिद्धांच्या भेटी घेत आणि होऊन गेलेल्यांच्या समाधीचें दर्शन घेत आणि त्यांचे ग्रन्थ तर अवलोकन करीत च, पण त्यांच्या प्रती हि संग्रहार्थ मिळवीत.

( श्री ) माझ्या या विधानाला आधार श्रीदासविश्रामधामांत आणि या श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील संग्रहांत मला सांपडतो. बरोबर उद्धवास घेऊन इंदुरबोधनहून निघून श्रीसमर्थ अंबाजोगाई येथें गेले असतां, जवळ च जी बुटेटेकडी दाखविण्यांत येते, त्या टेकडीवर ते जाऊन राहिले होते. तेथें मुकुंदराजांची समाधी आहे. तेथें मुकुंदराजांचा विवेकसिंधु ग्रंथ श्रीसमर्थांनीं पाहिला, वाचला, त्यांना तो फार आवडला, संग्रहार्थ त्याची त्यांनीं प्रत मिळविली. मुकुंदराजांच्या दर्शनाची श्रीसमर्थांना

तीव्र इच्छा झाली आणि मुकुंदराज प्रकट झाले. श्रीसमर्थांच्या हातांत विवेकसिंधूची प्रत होती च. तेव्हां मुकुंदमुनि

**तर्कोनि वदले जी रामदासा । आखुड ग्रंथ हा सिंधु सहसा ।**
**विस्तार सर्वत्रा कळेल तैसा । ग्रंथ स्वमतीनें रचावा ॥**

—दासविश्रामधाम, २६, १२३

श्रीसमर्थ तथास्तु म्हणाले.

(रा) श्रीमत् दासबोध ग्रन्थाचा जो कोणी वाचक विवेकसिंधु ओझरता हि वाचील, त्यास सिंधूंतील किती तरी विषय, विशिष्ट वाक्यें आणि विवक्षित शब्द श्रीसमर्थांनीं आत्मसात् केल्याचें आढळून येईल. दासबोधांतील अध्यात्म म्हणजे मुकुंदमुनींनीं दर्शविलेल्या इच्छेला अनुसरून सिंधूंतील आखुड विवेचनाचा केलेला विस्तार होय.

(म) मंदिरांतील विवेकसिंधूची, क्रमांक ४९३ ची प्रत शक १५७९ तील आहे. ही च प्रत श्रीसमर्थांनीं वाचलेली आणि मिळविलेली असेल काय? व ती त्यांनीं नंतर उद्धवांच्या हवालीं केली असेल काय? तसें असेल तर, ही प्रत आम्हांस उद्धवांच्या इंदुर येथील मठांत मिळाली, ती योग्य ठिकाणीं च मिळाली, असें म्हणतां येईल. किती महत्त्वाची ही प्रत म्हणावी! तिला श्रीसमर्थांचा हात लागला होता!

(दा) विवेकसिंधूप्रमाणें च, अंबा जोगाई येथील दिगंबरानुचर दासोपंतांचा ग्रन्थराज नांवाचा ग्रंथ हि श्रीसमर्थांनीं तेथें च अवलोकिला होता. हा ग्रंथ श्रीसमर्थांच्या अवलोकनांत आलेला होता. याला प्रमाण स्पष्ट च आहे, दासबोधाच्या तिसऱ्या दशकाच्या १ ते ५ समासांत जी एका प्रपंची माणसाची सविस्तर काहाणी श्रीसमर्थांनीं वर्णिली आहे, तिचें हि 'आखुड' मूळ दासोपंतांच्या ग्रन्थराज ग्रंथांत आढळतें. या ग्रन्थाच्या ज्या कांहीं प्रती या मंदिरांत आहेत, त्यांत क्रमांक ९५७ ची प्रत श्रीसमर्थकालीन आहे.

(स) क्रमांक ३९४ ही श्रीसमर्थपूर्वकालीन श्रीएकनाथी भागवताची प्रत आहे. ती श्रीसमर्थांच्या चाफळखोऱ्यांत च आमच्या हातीं आली. न जाणों, हीच प्रत श्रीसमर्थांनीं मिळविलेली असावी. नाथांच्या वाङ्मयाची

छटा श्रीसमर्थांच्या वाङ्मयावर उमटलेली सर्व विद्वानांनीं मान्य केली आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांची ज्ञानेश्वरी हि श्रीसमर्थांच्या अवलोकनांत होती. श्रीसमर्थस्थापित शिरगांवमठांतील क्रमांक ५७२ हा ज्ञानेश्वरीचा तेरावा अध्याय व स्वानुभवदिनकरकारांच्या मठांतील क्रमांक ८६८ हा नववा अध्याय, या दोन्ही अध्यायांच्या प्रती श्रीसमर्थकालीन आहेत. दिनकरांना समर्थांनीं सांगितलेली हटयोगाची प्रक्रिया ज्ञानेश्वरीच्या आधारानें च सांगितली होती, हें स्वानुभवदिनकरांतील हटयोगलक्षणाच्या नवव्या कलापावरून सिद्ध होत आहे.

तात्पर्य, सर्व नामांकित संस्कृतप्राकृत ग्रन्थ श्रीसमर्थांनीं अवलोकिले होते, यांत संदेह नाहीं. मागील तेराव्या उल्हासावरून हि ही गोष्ट सिद्ध होत आहे.

## (२६) लेखन

वाचनाप्रमाणें च त्यांचें लेखन हि सतत चालू च असे. स्फुरेल तेव्हां ते लिहीत आणि कशावर हि लिहीत. रघुनाथपंडितकृत श्रीसमर्थस्तवनाचे जे अकरा श्लोक प्रसिद्ध आहेत, त्यांत एक श्लोक

**जो लेखणीसहित कागद दौति वाहे ।**
**तो दंड सद्गुण उदंड जयांत आहे ।**
**हस्तीं तयासि मिरवी फिरवी विनोदें ।**
**श्रीरामदास गुरु तो नमिला प्रमोदें ॥**

असा आहे. त्यावरून असें दिसतें, रानावनांत एकटे संचार करीत असतां त्यांच्या हातांत एक जाड काठी असे व त्या काठींत च लेखणी, कागद आणि दऊत ठेवण्याची योजना केलेली असे. तेव्हां, केव्हां हि लिहावेंसें वाटल्यास सर्व साधनें त्यांच्याजवळ असत. पण ते स्वतः हातानें बहुधा लिहीत नसत, दुसऱ्यास आणि विशेषतः कल्याणांना लिहिण्यास सांगत. कल्याण जवळ नसले च तर दुसऱ्या एकाद्या शिष्यास सांगत. सांगतां सांगतां ते अनेकदां ध्यानस्थ होऊन हि बसत. एकदां सांगणें सुरू झालें म्हणजे सारखा प्रवाह चाले. मग त्यांना काळाचें हि भान रहात नसे. उद्धवसुत, महीपति, इत्यादि कांहीं चरित्रकार म्हणतात

कीं, दासबोध ग्रन्थ त्यांनीं एका रात्रींत सांगितला. याचा अर्थ मी इतका च करतों कीं, केव्हां केव्हां रात्रभर हि ते सांगत असावेत, रात्रीं आरंभ करीत, ते दुसरा दिवस उजाडेपर्यंत लिहिण्याचें सांगत च असावेत.

## ( २७ ) भिन्न भिन्न भाषा

त्यांना आपल्या देशांतील अनेक भाषा अवगत होत्या. संचार करीत असतां परप्रांत लागला, म्हणजे तेथील भाषा ते अवगत करून घेत आणि त्या भाषेंत कवन करीत आणि लोकांस उपदेश करीत. त्यांचीं कांहीं हिंदी भाषेंतील पदें पदपदांतरांत आलेलीं आहेत. मला समजत नाहीं, पण तेलगु आणि कानडी भाषेंतील एकाददुसरें पद दासविश्रामधामांत आहे. संशोधनाला जागा आहे, संशोधन केलें पाहिजे.

## ( २८ ) राहणें

आरंभींच्या काळांत त्यांचें राहणें एका जागीं म्हणून नसावयाचें. सारखा संचार चालू असे. सतत कष्ट. जन्मापासून समाधीपर्यंतचें श्रीसमर्थांचें चरित्र एका च व्यापक शब्दांत सांगा, असें मला कोणीं विचारल्यास मी 'कष्ट' हा एक च शब्द उच्चारीन. धर्मासाठीं त्यांनीं केलेले कष्ट आठवले म्हणजे आज हि एकाद्याचे डोळे प्रेमाश्रूंनीं भरून येतील. श्रीगुरुदेवदत्ताप्रमाणें त्यांचें जीवन होतें. एका गांवीं स्नानसंध्या करितील, तर भोजनास दुसऱ्या च गांवीं जातील आणि पाणी पिऊन विडा खातील तिसऱ्या च गांवीं आणि चौथ्या गांवीं विश्रांति घेतील ! असे कष्ट त्यांनीं केले, म्हणून आम्हीं कांहीं दिवस सुखाचे पाहिले !

## ( २९ ) त्यागवृत्ति

ज्यांनीं घरदार सोडलें, जिवलगांचा संग सोडला, आपला गांव सोडला, त्यांच्या त्यागाचें वर्णन काय करावें ! पुढें त्यांना राजवैभव प्राप्त झालें, तें हि त्यांनीं झुगारून दिलें. प्रांतोप्रांतींचे लोक दर्शनास येऊन त्यांच्या पुढें द्रव्य ओतीत, नाना पदार्थ अर्पण करीत, त्यांचे प्रकार सांगून पुरे पडणार नाहींत व त्यांची गणना हि करवणार नाहीं, पण ते सारे पदार्थ ते तत्काळ वांटून टाकीत.

**लोकीं वैभवभजनें उदंड केलीं। समर्थें देवब्राह्मणकार्यासी लाविलीं।**
**कितीयेक ब्रह्मसंतर्पणें करविलीं। धनधान्यवस्त्रें उडविलीं निस्पृहपणें॥**

—श्रीसमर्थप्रताप, ७, १२

त्यांनीं आपणांस कशाचा च विटाळ होऊं दिला नाहीं. ते निर्मल होते.

**जनीं दिसतो परी वेगळा। वर्ततां भासे निराळा।**
**दृश्य पदार्थ त्या निर्मळा। स्पर्शला च नाहीं॥**

**तो परमात्मा केवळ। तयास नाहीं मायामळ।**
**अखंड हेतूचा विटाळ। जाला च नाहीं॥**

या त्यांच्या ओव्या मी त्यांना च लावीत असतों.

## (३०) परोपकारवृत्ति

परोपकार करण्यास ते सदा तत्पर असत, हें काय सांगावयास पाहिजे? ते स्वतःसाठीं जन्मास आले च नव्हते मुळीं. स्वतःच्या शिष्यांच्या साहाय्यार्थ धांवून जात, पण त्या हि पेक्षां आधीं तिऱ्हाइताकडे पहात.

**पहा दासाची स्थितगति कैसी। स्ववर्गापेक्षां प्रीत परासी।**
**नानापरीनें भाविक जनासी। दाऊन सन्मार्ग तारिती॥ ३५**

**फेडिती सकृपें कष्ट क्लेश तळमळ। दाविती करुणेनें विश्रामस्थळ।**
**सेवटीं खर्चिती आपुलें तपफळ। परहितीं प्रीत जडलीसे॥ ३६**

**तपपुण्य स्वामीचें खर्चतां पुष्कळ। जडमूढ आम्हा सौख्यसुकाळ।**
**बहुतांस करायालागीं सांभाळ। तपव्रतश्रम केले बहुतापरीं॥ ३७**

**संकटांत स्मरतां निरसिती वेगीं। साह्य बहु होती उपास्यालागीं।**
**भक्त जे वसती चहुंकडे जगीं। पावोन सर्वांतें सांभाळिती॥ ३८**

—श्रीदासविश्रामधाम, ९८

सर्व स्थळीं आणि सर्व काळीं भक्ताचा सांभाळ करणें, हें त्यांचें ब्रीद च आहे. 'आधीं केलें मग सांगितलें' या त्यांच्या प्रतिज्ञेप्रमाणें १९ व्या दशकाच्या चौथ्या समासांत त्यांचें च आत्मचरित्र आहे, पण त्यांत हि म्हणतां येईल कीं,

**धगधगीत पुण्यरासी । माहापुरुष ॥**
**तो परोपकार करितां चि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला ।**
**मग काये उणें तयाला । भूमंडळीं ॥**

—श्रीदासबोध, १९, ४, ९–१०

असे श्रीसमर्थ होते.

## ( ३१ ) न्यायबुद्धि आणि दयालुत्व

हे दोन्ही गुण त्यांच्या ठिकाणीं एकत्र आढळून येतात. ज्यानें जोंधळ्याचीं ताटें पाठीवर ओढलीं, त्याला शेत इनाम करून देवविलें, अंत्यजाच्या पोराला काढण्यासाठीं पुरांत तत्काळ उडी टाकली, यांच्यापाशीं कर मागितला किंवा यांचा आश्रम गळाला म्हणून स्थानिक जबाबदार अधिकाऱ्यांना शिक्षा फर्मावण्यांत आली असतां त्यांना सोडविलें, इत्यादि गोष्टींवरून यांच्या अंतःकरणांत न्यायबुद्धि आणि भूतदया सतत कशी जागृत होती, हें आपल्या लक्षांत आलें च असेल.

## ( ३२ ) इतरांशीं वर्तणूक

( श्री ) श्रीसमर्थ आपल्या सर्व शिष्यांना लेकुरें समजत व लेकरांप्रमाणें त्यांना लडिवाळपणानें वागवीत. पण म्हणून त्यांची शिस्त आणि मर्यादा हीं कधीं सुटलीं नाहींत.

**थोरथोरां महंतांस धारकी धरिती ।**
**श्रीगुरु मर्यादा रक्षविती सिकविती ।**
**भाविक भोळया लोकांसी जवळी बैसविती ।**
**तांबुलसेवा घेती त्यांचेनि हस्तें ॥**

—श्रीसमर्थप्रताप, ९, १०

कण्हेरीमठाचे अधिपति वासुदेव महंत यांनीं मंत्रांत फरक केल्यामुळें त्यांना कसें धारेवर धरलें होतें व भोळारामाकडून कशी सेवा घेत, हें आपण मागच्या च उल्लासांत पाहिलें आहे.

( रा ) स्त्रिया दर्शनास येत, पण त्यांनीं चरणास स्पर्श करावयाचा नसे, त्यांनीं दुरून दर्शन घ्यावें.

**स्त्रियादिकांसी दुरूनि गुरुदेवदर्शन । नीतिमर्यादा स्वामीची ॥**

—श्रीसमर्थप्रताप, २०, ३९

( म ) मुसलमान साधु आणि गृहस्थ यांच्या दर्शनास येत. श्रीसमर्थ त्यांचें आदरातिथ्य करीत. ते हि श्रीसमर्थांचें तेज, वैभव, वृत्ति पाहून त्यांच्या चरणीं लीन होत. त्यांना हि श्रीसमर्थ बोध करीत:

**रे भाई याद करो अल्लाकी । हक चलणा सब दिल पाखी ॥ ध्रु०**
**कुबल बखतकु ज्यायेंगे । ज्यायागे मुसलमाना ।**
**बेग धणीकी तलब आई । तब तो अलबत ज्याणा ॥ १**
**हिंदु मुसलमान अल्ला निरंजन । दोउ नही रे। समज्यत समज्यत नही रे**
**बंदा कहे समजो रे भाई । सोई खुदाके प्यारे ॥ २**

अशीं त्यांचीं उपदेशपर हिंदी पदें अनेक आहेत.

## ( ३३ ) ज्ञानोत्तर कर्म

पुष्कळांना वाटत असतें कीं, ज्ञान झालें म्हणजे कर्म सुटलें तरी चालेल. श्रीसमर्थांना हें मान्य नव्हतें व त्यांचें आचरण हि तसें नव्हतें. स्वतः परब्रह्मरूप असून हि त्यांनीं स्नानसंध्यादि कर्म, भजनपूजन कधीं टाकलें नाहीं :

**धन्य दासाची अगाध करणी । वैराग्यभरें राहती काननीं ।**
**ज्ञानध्यानयोगें जयाचे नयनीं । न दिसे चि सृष्टिभूतक्रम ॥ २३**
**दृश्य द्रष्टा दर्शन तिही । सस्वरूप चि भासे सर्व हि ।**
**प्रपंचआस्था ते नसे कांहीं । निर्विकल्पदशा हि जिरलीसे ॥ २४**
**स्वयें होऊनि परब्रह्ममूर्ति । आत्मवत् सर्व हि पाहती जगतीं ।**
**सगुणनिर्गुण दोनी भक्ति-। माजी अंतर न पडे चि ॥ २५**
**अणुमात्र न त्यजिती साधनक्रम । कथाकीर्तनीं अचूक प्रेम ।**
**भजनपूजन नित्य नेम । करूनि सन्मार्ग दाविती ॥ २६**
**बहुता सावरिती करूनि सावध । येवों न देती लोकापवाद ।**
**भले भले जे तत्त्वब्रह्मविद । क्रिया देखोन संतोषती ॥ २७**
**स्वयें होऊनि विरक्त पूर्ण । जडमूढा करिती सावधान ।**
**श्रुतिसारभोक्ते स्वयें सर्वज्ञ । कर्माविरुद्ध न करिती ॥ २८**

— दासविश्रामधाम, ९०

## ( ३४ ) अनेकीं एक

**अनेकीं सदा येक देवासि पाहे ।**

असें श्रीसमर्थांचें पाहणें होतें. तथापि सर्व क्षेत्रांतील देवांना वाटे, श्रीसमर्थांनीं आपल्याकडे हि एकवार येऊन जावें. देवांनीं निरनिराळीं रूपें धारण करून, त्यांना भेटून व सांगून आपआपल्या क्षेत्राच्या ठिकाणीं घेऊन जावें. याप्रमाणें पंढरपुर, नरसिंहपुर, पाली इत्यादि ठिकाणीं त्यांचें जाणें झालें होतें. पालीस तर श्रीशिवाजीमहाराजांचें रूप धारण करून म्हाळसाकांत त्यांना घेऊन गेले. समर्थ म्हणत, " मला असें कां फसवावें ! मी सर्व देवांना मानतों, पण सर्वांच्या ठिकाणीं एका रामाला च पाहतों. " तेव्हां रामानें च शेवटीं वर देऊन सांगितलें कीं, यापुढें ( १ ) कोणी कपटानें तुमच्याकडे आल्यास तुम्ही त्याचें कपट तत्काळ ओळखूं शकाल, ( २ ) मनांत आणाल त्या ठिकाणीं मनांत येतां च जाऊं शकाल आणि ( ३ ) दुष्टास शिक्षा करूं शकाल. ( दासविश्रामधाम, ३६ )

## ( ३५ ) इतरांचें संदेहहरण

श्रीसमर्थांच्या कडे साशंक दृष्टीनें पाहणारे त्या काळीं कोणी नव्हते, असें नाहीं. पण श्रीसमर्थांचा सहवास लाभून अशा सर्वांचे संदेह फिटत. अशा कोणा हि संशयखोराचें नांव न घेतां गिरिधर म्हणतात :

**संकल्प नामा समर्थ शोधक । श्रीमंचकीं निद्रिस्थ देखे गुरुनायक ।**
**चहुं मांचवीं चारी धनुर्धारी मूर्ति सम्यक् । देखतां मूर्छना पावला ॥२३**
**विकल्प नामा म्हणे स्वामी कैंचे अवतारी । सगट संत असती देहधारी ।**
**हनुमानरूप देखतां चंद्रगिरी । मूर्छना येऊनि उलंडला ॥ २४**
**संदेह नामा म्हणे स्वामी जरी हनुमान । तरी कपाटें जातील भेदून ।**
**समर्थ वायोस्वरूप पावले अंतर्धान । संदेह सर्व मावळला ॥ २५**

— श्रीसमर्थप्रताप, १२

## ( ३६ ) त्यांचीं नांवें

दास, रामदास, रामीरामदास, भक्त, रसिकराय, कवि, रामसेवक, सज्जन, देवदास, निजदास, हरिदास, विप्र रामदास, महंत, राघवदास,

गाण, हरिजन, वैष्णव, जिंदा फकीर आणि बंद कमीन ह्या एकोणवीस नांवांनीं अंकित अशी श्रीसमर्थांची कविता च आढळते, तेव्हां हीं इतकीं त्यांचीं नांवें होतीं च, पण यांशिवाय व्यवहारांत ते अनेक नांवांनीं ओळखले जात. श्रीशिवाजी राजे त्यांना महाराज म्हणत, जयरामस्वामी राघोबा म्हणत, आई नारोबा म्हणे तर सर्वसामान्य जनता समर्थ म्हणत असे. नुसते दास म्हणून श्रीराम त्यांना संबोधीत, तर मारुतिराय रामदासा म्हणून हाक मारीत. सुरपति त्यांना पुरुषोत्तम म्हणत. शिवाय हि गुरुराज, ब्रह्मपिसा, भीम, सांईवंदनवाज, योगेश्वर, योगीराज, विरक्त, अतीत, मोक्षपाणी, संत, महापुरुष, उदासी, निस्पृही, तारक, पावन, स्वामी, सिद्ध, तपी, ज्ञानी, धन्य, मान्य, दयाळ, जय, इत्यादि त्यांचीं अनेक नांवें प्रचारांत होतीं च, त्यांत च मग मी हि त्यांना आणखी एका निराळ्या नांवानें हांका मारूं लागलों !

## ( ३७ ) कार्याची व्यापकता

आश्चर्य वाटतें. ज्यांनीं लहानपणापासून च अरण्यवास पतकरला, ज्यांच्या ठिकाणीं देहममता यत्किंचित् हि उरली नव्हती, पूर्ण वैराग्य बाणलें होतें, ते श्रीसमर्थ स्वयंपाकापासून राजकारणापर्यंत सर्व व्यवहार जाणत, हें आश्चर्य नव्हे? त्यांनीं स्वतः घरदार सोडलें, पण प्रपंच करावयाचा च तर तो कसा नेटका करावा, हें इतरांस शिकविलें. त्यांचें मानसपूजा हें लघु काव्य पहा, त्यांत स्वयंपाक कसा करावा, याची सुद्धां शिकवण आहे. बागा कशा असाव्या, इमारती कशा बांधाव्या, विटा कशा पाडाव्या, इत्यादि प्रपंचांत राबणाऱ्या माणसांना हि सामान्यतः ठाऊक नसणाऱ्या गोष्टी त्यांनीं सविस्तर सांगितल्या आहेत. व्यवहारांत स्वतः केव्हां हि पडले नसतां, त्यांनीं इतकें व्यवहारज्ञान कोठून मिळविलें होतें? आश्चर्य आहे !

## ( ३८ ) वाङ्मयाची व्यापकता

श्रीसमर्थवाग्देवतामंदिर म्हणजे श्रीसमर्थांच्या सर्वांगीण व्यापाचें कायमचें भादांत स्मारक च होय. श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्यांच्या पश्चात् धर्मरक्षणार्थ

सर्व भरतखंडभर एवढ्या मोठ्या प्रमाणावर व्याप केलेला श्रीसमर्थांच्या शिवाय दुसरा कोणी महापुरुष झाला नाहीं, असें वाटतें. त्यांनीं सर्व देशभर हजारों मठ स्थापन केले, त्यांच्या शिष्योपशिष्यांची गणती नाहीं व त्यांच्या संप्रदायांत लहान मोठे हजारों ग्रंथ निर्माण झाले. ते बहुतेक ग्रंथ आज या मंदिरांत येऊन राहिले आहेत. गेल्या चाळीस पन्नास वर्षांत झालेलें हें संशोधन त्याच्या पूर्वीच्या चाळीस पन्नास वर्षांत व्हावयास पाहिजे होतें. किंबहुना त्याच्या हि पूर्वी होतें, तर फार बरें झालें असतें. परसत्ता आली आणि तिच्या पाठोपाठ दारिद्र्य आलें आणि धर्मावरील श्रद्धा गेली, स्वाभिमान लोपला आणि पूर्वजांविषयीं प्रेम राहिलें नाहीं, मठपतींचें महंतपण लयाला जाऊन ते इतरांप्रमाणें च प्रपंची बनले आणि मठामठांतील हस्तलिखित ग्रन्थांची उपेक्षेनें सारखी दुर्दशा होत गेली. पण पूर्वी प्रत्येक मठांत लेखनक्रिया परंपरेनें अखंड चालत असे. प्रत्येक मठांत श्रीसमर्थांचें वाङ्मय पूर्ण असे च, पण मठपतींच्या आवडीप्रमाणें इतर संतकवींचें हि वाङ्मय थोडें फार असे. यांतून नष्ट होत होत जें कांहीं उरलें तें आज या मंदिरांत विराजमान झालें आहे. त्याकडे पाहून मी म्हणत असतों, मठामठांतला उरलेला केवळ गळांठा मीं गोळा करून आणला आहे, पण तो गळांठा च आज लक्षावधि रुपये मोलाचा आहे, मग ज्या वेळीं हे सारे मठ आपल्या ऐन वैभवांत होते आणि पहिल्या एक दोन पिढ्यांतील दक्ष मठपति होते, त्या काळीं असलेल्या संग्रहा चें स्वरूप कसें असेल, याची कल्पना करावी! आज हि या मंदिरांतील संग्रहाकडे पाहून मी म्हणूं शकतों कीं, त्यांत श्रीसमर्थांच्या वाङ्मयाचा पूर्णावतार झाला आहे आणि मुकुंदराजापासून तों राजारामप्रासादीपर्यंत महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या सर्व संतकवींचें कांहीं ना कांहीं तरी वाङ्मय या मंदिरांत आहे च आहे आणि त्यामुळें च या मंदिरांतील संग्रह न पाहतां, कोणत्या हि संतकवीच्या वाङ्मयाची शुद्ध आणि संपूर्ण आवृत्ति म्हणून कोणीं परभारें प्रकाशित केली, तर आपण येथें बसून म्हणूं शकूं कीं, त्याचें तें प्रकाशन अशुद्ध आणि अपूर्ण आहे.

अशा प्रकारें हा संग्रह परंपरेनें चालत आलेल्या श्रीसमर्थांच्या व्यापाची आपणांस ओळख पटवीत आहे.

## ( ३९ ) त्या व्यापकतेचें कारण

संतकवींमध्यें श्रीसमर्थांच्या वाङ्मयाइतकें व्यापक आणि विविध स्वरूपाचें वाङ्मय दुसऱ्या कोणाचें नसावें, याचें कारण इतकें च कीं, जगाकडे पाहण्याची श्रीसमर्थांची दृष्टि व्यापक होती. संकोचित नव्हती. मनुष्याच्या जीवनांत हरिकथानिरूपण ही मुख्य गोष्ट खरी, पण तेवढ्यावर च श्रीसमर्थ थांबले नाहींत. त्यांनीं दुसरें स्थान राजकारणाला दिलें आणि तिसऱ्या स्थानीं तर जीवनाच्या एकूणएक अंगांविषयीं सावधानतेला नेऊन बसविलें.

## ( ४० ) अनंतकोटिब्रह्मांडनायक

श्रीसमर्थ हे महंतांचे महंत होते. ते राष्ट्रगुरु होते. त्यांची दृष्टि चौफेर होती. ते बागा करतील, इमारती बांधतील, राष्ट्राच्या राजकारणाकडे लक्ष पुरवितील आणि इतकें करून स्वत: अलिप्त राहून खनाळामध्यें जाऊन आत्मानंदांत मग्न होऊन बसतील ! ते शरीरानें फक्त भरतखंडांत च फिरले, पण एकाद्या गुंफेंत एकांतांत बसून मनानें ते अखिल चराचर सृष्टींत, अवघ्या विश्वांत, ब्रह्मांडांत संचार करीत. ते अनंतकोटिब्रह्मांडनायक खरे च होते.

## ( ४१ ) सर्वगुणसंपन्नता

अशीं श्रीसमर्थांचीं वैशिष्ट्यें आपण किती आठवत बसणार ? त्यांच्या गुणांचा पार कोणास लागणार आहे ? त्यांनीं बाळपणीं अनेक लीला करून श्रीकृष्णाप्रमाणें आईला रंजविलें, षण्मुखाप्रमाणें ते लग्नांतून निसटले, ब्रह्मचर्यांत गंगासुताची त्यांनीं बरोबरी केली, जडभरताप्रमाणें ते विषयीं उदास होते, श्रीदत्ताप्रमाणें त्यांनीं सर्व बाबतींत प्रावीण्य मिळविलें, मच्छेंद्राप्रमाणें त्यांनीं तीर्थाटणें केलीं, अत्यंत साक्षेपांत त्यांनीं शौनकाला हि मागें टाकलें, जाणण्यांत ते जणूं दुसरे शामिक च होते, ते चंद्राप्रमाणें आल्हादकारक, वशिष्ठाप्रमाणें शांत, नारदाप्रमाणें हितोपदेशबोधक, वक्तृत्वांत दुसरे बृहस्पति च, श्रीरघुनाथसेवेमध्यें दुसरे, दुसरे कां, प्रत्यक्ष च, मारुती च होते ! अशी सर्वगुणसंपन्नता त्यांच्या ठायीं होती ! तेव्हां शेवटीं नुसतें मोघम इतकें च म्हणतों कीं,

श्रीसमर्थांचें गुणवर्णन करतांना अतिशयोक्ति करूं म्हटलें तरी करतां येणार नाहीं, अतिशयोक्ति अल्पोक्ति ठरेल. परब्रह्माचें वर्णन पूर्णपणें करण्याचें सामर्थ्य कोणांत असणार? ते परब्रह्म च होते !

**समर्थ अनंत गुणें परिपूर्ण । निजरूप पाहतां केवळ परब्रह्म निर्गुण ।**
**लीलाविग्रहें शिष्योपदेशें सगुण । संत सर्वज्ञ जाणती ॥**

—श्रीसमर्थप्रताप, २१, ७२

मी च कशास सांगावयास पाहिजे?

## ( ४२ ) प्रार्थना

येथें च थांबतों. कोठें तरी थांबलें च पाहिजे. त्यांच्या आंगच्या गुणांचा आपणांस शेवट गांठतां येईल, असें मला कधीं च वाटलें नाहीं. तेव्हां आपण प्रत्येकानें आपआपल्या परीनें त्यांचें यथार्थ स्वरूप जाणण्याचा स्वतंत्रपणें च प्रयत्न केला पाहिजे. मठांत, रानांत, वनांत, डोंगरांत, सर्वत्र सतत छायेप्रमाणें त्यांच्या सन्निध राहून आणि स्वतःला विसरून आपण त्यांना बसतांना, उठतांना, चालतांना, बोलतांना, गातांना, निरूपण करतांना, टाहो फोडतांना, ध्यानस्थ असतांना, विश्रांति घेतांना पहात रहावें, ही च माझी माझ्या मनाला आणि तुम्हांला प्रार्थना आहे.



उ ल्ला स अ ठ रा वा

# श्रीसमर्थांनीं वयाच्या ७३ व्या वर्षीं केलेलें

# आत्मचरित्राचें सिंहावलोकन



देवा तुझे चि इच्छेनुसार ।
वर्तताहे जगदाकार ।
अनंत ब्रह्मांडीचा कर्तार ।
तूं चि होसी ॥ १

तुझिया उपकाराच्या कोटी ।
नित्य दाटल्या माझिये पोटीं ।
त्या आठवितां चि कंठीं ।
बाष्प दाटे ॥ २

[ ( १ ) भक्तवत्सल श्रीराम – ( २ ) तेरा कोटी जपाची फलश्रुति – ( ३ ) श्रीरामाच्या उपकारांचें स्मरण, तिसरें करुणाष्टक – ( ४ ) त्याचा अर्थ – ( ५ ) सांप्रदायिकांचा सांभाळ करण्याविषयीं श्रीरामाची प्रार्थना – ( ६ ) सिंहावलोकनाची कल्पना एका पदावरून सुचली – ( ७ ) तें पद – ( ८ ) त्यांतील मोघम पण महत्त्वाचे शब्द – जालें येवढें – ( ९ ) झालें एवढें म्हणजे केवढें, त्याचें श्रीसमर्थांनीं मनांत केलेलें सिंहावलोकन – ( १० ) पदांतील तिसरें कडवें – ( ११ ) चौथें कडवें – ( १२ ) शेवटचें कडवें – ( १३ ) बखरींतला आधार – ( १४ ) शेवटचें दर्शन ]

( १ ) श्रीसमर्थ जाण्याच्या गोष्टी बोलूं लागले. शक १६०२ च्या श्रीरामनवमीस ते चाफळास नव्हते, पण १६०३ च्या होते. ती त्यांच्या आयुष्यांतील शेवटची श्रीरामनवमी होय. त्या वेळीं त्यांनीं एकवार शेवटचें सारें चाफळखोरें हिंडून पाहिलें. त्या खोऱ्यांत जवळ जवळ तीस वर्षे त्यांचें वास्तव्य झालें होतें. खोऱ्यांत हिंडत असतां जागजागेच्या आठवणी त्यांना होत होत्या. शिंगणवाडीच्या मारुतीपाशीं त्यांनीं बोलत बसावें, भैरवाचें दर्शन घेतलें, सर्व आठवणी काढीत रामघळींत जाऊन बसले, कुबडीतीर्थापाशीं कांहीं काळ कंठावा! सर्व आठवणी होऊन रामाचे आपणावर हे किती उपकार झाले, त्यांचें स्मरण होऊन त्यांचें हृदय वारंवार भरून यावें! त्यांनीं म्हणावें, "रामा, माझ्या पदरीं काय पुण्याई होती, कीं मीं म्हणावें आणि तुम्हीं ऐकावें, मीं मागावें आणि तुम्हीं द्यावें, जो जो हट्ट मीं धरावा, तो तो तुम्हीं पुरवावा, माझा शब्द तुम्हीं खालीं पडूं देऊं च नये! काय म्हणावें या तुमच्या वात्सल्याला!"

**जो देवा भक्ताचे मनोरथ । पुरवावया उपजतां हेत ।**
**करुणास्वरानें प्रार्थितां तुम्हातें । पुरविले आर्त नानापरी ॥ १८**

**कितेकां दिल्हें प्रत्यक्ष दर्शन । इच्छिलें इच्छा ते केले पूर्ण ।**
**कितेक दिल्हें सफळीत स्वप्न । कैवल्यनिधान दाविलें ॥ १९**

**कितेकां सांभाळ केलेती मार्गीं । सुखदुःख विचारिलें कितेकालागीं ।**
**गाइला जेविला कितेका संगीं । महिमा अपार न वानवे ॥ २०**

**सांभाळूनिया चौदेशीं भक्ता । आणोन शोभसी निजपरमार्था ।**
**मज लागों न दिल्हें कांहीं चिंता । न पडों दिल्हें वाक्य खालीं ॥ २१**

**सुकृत पाहिजे हें न केला आड । अथवा न पाहिला भक्तिभाव दृढ ।**
**सुलभ होठेलें काम जें अवघड । कीर्ति वानविलें जगदोन्मुखीं ॥ २२**

**मज दीनास्तव सर्वा केला लालन । पुढती हि कराल संरक्षण ।**
**परंपरावरी कीजे पाळण । उपास्यअभिमान तुमचा ॥ २३**

—दासविश्रामधाम, १०५

अशा सर्व कृतोपकाराच्या आठवणी काढीत व परंपरेच्या भावी रक्षणाविषयीं प्रार्थना करीत, श्रीसमर्थ स्वच्छंदानें खोऱ्यांत हिंडत राहिले.

(२) या संचारांत त्यांनीं आपला आणखी एक हट्ट रामापाशीं चालविला. "रामा, आणखी एक मागणें आहे. आपल्या सगुणदर्शनाची कोणी इच्छा केल्यास, त्यानें काय केलें म्हणजे आपण प्रसन्न होऊन त्यास दर्शन द्याल, तें सांगा." हें त्यांचें मागणें आणि रामाचें देणें एका च अभंगांत गोवलेलें आहे :

**आज्ञाप्रमाण परमार्थ । केला जाण म्यां यथार्थ ॥ १**
**आतां देहाचा कंटाळा । आला असे जी दयाळा ॥ २**
**आहे येक चि मागणें । कृपा करोनिया देणें ॥ ३**
**ज्यासी दर्शनाची इच्छा । त्याची पुरवावी आस्था ॥ ४**
**ऐक सखया वचन । त्यासी देईन दर्शन ॥ ५**
**तेरा अक्षरिया मंत्राचा । जप करील जो साचा ॥ ६**
**त्याची संख्या तेरा कोटी । होतां भेटेन मी जगजेठी ॥ ७**
**भय न धरावें मनीं । बहु बोलिलों म्हणोनी ॥ ८**
**नलगे आसनीं बैसावें । नलगे अन्न हि वर्जावें ॥ ९**
**येतां जातां धंदा करितां । जपसंख्या मात्र धरितां ॥ १०**
**येका तेरा कोटींत चि । पापनाशन जन्मांतरींची ॥ ११**
**मग तयासी दर्शन । देऊनि मुक्त त्या करीन ॥ १२**
**ऐसा वर होतां पूर्ण । दास जाला सुखसंपन्न ॥ १३**

(३) हे त्यांच्या आयुष्यांतील शेवटचे शेवटचे दिवस होते. त्यांना देहविसर्जनाची कल्पना येऊन चुकली होती. त्यांनीं मनांतल्या मनांत आत्मचरित्राचें सिंहावलोकन चालविलें होतें. त्यांतलें च कांहीं थोडें,

उद्गाररूपानें बाहेर पडलेलें आहे. अशा उद्गारांपैकीं च करुणाष्टकांतील तिसरें करुणाष्टक होय :

**हिणाहून मी हीण जैसे भिकारी । दिनाहून मी दीन नाना विकारी ।**
**पतितांसि रे आणि हातीं धरावें । समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ १**
**जनीं भक्ति नाहीं मनीं भाव नाहीं । मला युक्ति ना बुद्धि कांहीं च नाहीं ।**
**कृपाळूपणें राज्य रंकासि द्यावें । समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ २**
**बहूसाल अन्याय कोट्यानकोटी । रघूनायकें घातले सर्व पोटीं ।**
**किती काय गूणासि म्यां आठवावें । समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ।**
**समर्थे दिल्हें सौख्य नानापरीचें । सदा सर्वदा जाणसी अंतरींचें ।**
**लळे पाळिले तूं कृपाळू स्वभावें । समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ ४**
**दिनानाथ हें ब्रीद त्वां साच केलें । म्हणे दास भक्तासि रे उद्धरीलें ।**
**सुखें सांडणें या देहाचें करावें । समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ ५**

( ४ ) या अष्टकाच्या पहिल्या श्लोकांतील ‘ धरावें ’ आणि दुसऱ्या श्लोकांतील ‘ द्यावें ’, या शब्दांचा अर्थ भूतकालवाचक च समजावयाचा आहे. ज्या चरणांत हे दोन शब्द आले आहेत, त्यांचा अर्थ, मी पतित असून हि मला हातीं धरलें, मी मूळचा रंक असून मला राज्य दिलें, असा च आहे. पुढच्या तिन्ही श्लोकांतील क्रियापदांचीं रूपें भूतकाळाचीं च आहेत. वयाच्या शेवटीं शेवटीं आपलें चरित्र आठवून श्रीसमर्थ श्रीरामाच्या उपकारांचें या अष्टकांत स्मरण करीत आहेत, हें उघड आहे. त्यांत मागील काळाचा उल्लेख आहे, एवढें च नव्हे, आपण कृतकृत्य झालों, असा भाव व्यक्त करून, आतां मोठ्या आनंदानें देहाचें विसर्जन करण्याची त्यांनीं तयारी दर्शविली आहे.

( ५ ) आतां आपण लवकर च जाणार, तेव्हां आजपर्यंत जसा आपला सांभाळ केला, तसा च आपल्या पश्चात् जे या उपासनेच्या आश्रयाला येतील, त्यांचा हि सांभाळ करण्याविषयीं त्यांनीं या च वेळीं श्रीरामाची प्रार्थना केली.

**पाळिलें पोसिलें मज । काय रे म्यां द्यावें तुज ।**
**चालविलें हितगुज । कृपाळुपणें सहज ॥ ध्रु०**
**आठवितां कंठ दाटे । हृदय उतरे फुटे ।**
**नयनीं पाझर सुटे । बोलतां वचन खुंटे ॥ १**

**धन्य तूं गा रघोत्तमा । कोण ते द्यावी उपमा ।**
**सुखाचिया सुखधामा । मी काय जाणे महिमा ॥ २**
**सोडविले ब्रह्मादिक । तूं रे त्रैलोक्यनायक ।**
**दास म्हणे तुझे रंक । सांभाळी आपुले लोक ॥ ३**

( ६ ) मी तर त्यांच्या च दुसऱ्या एका पदावरून अशी कल्पना करीत आहें कीं, त्या श्रीरामनवमीच्या रात्रीं सर्व शिष्यमंडळींची निजानीज झाल्यावर, एकान्तांत श्रीरामापुढें उभे राहून, जन्मापासूनचें आपलें सारें चरित्र आठवून श्रीसमर्थांनीं आत्मचरित्राचें सिंहावलोकन केलें. त्या वेळीं तेथें श्रीरामावांचून आणखी दुसरे कोणी नव्हते. मन मोकळें करून श्रीसमर्थ बोलत होते आणि श्रीराम ऐकत होते. एकाचें जणूं हृदय दुसऱ्याच्या हृदयाशीं बोलत होतें. दोघे हि एकमेकांचा अंतर्भाव जाणत होते.

( ७ ) बाळपणापासूनचें सारें चरित्र आठवून श्रीसमर्थांचें हृदय कृतज्ञतेनें भरून आलें. श्रीरामाची आपणावर ही केवढी कृपा, असें वाटून ध्रुवपदाच्या रूपानें पुढील उद्गार त्यांच्या मुखांतून बाहेर पडले.

**शरण तुज रघुवीरा । गुणगंभीरा ।**
**धन्य रे दातारा । कृपाळु खरा ॥**

" रामा ! जन्मापासूनचें दुःख किती आठवूं व कसें सांगूं, पण त्या सर्व दुःखाचा निरास करून तूं माझें भलें केलेंस. " तें सबंध च पद आधीं ऐका आणि मग, त्या पदांतून मी जो अर्थ काढीत आहें, तसा निघतो किंवा नाहीं, हें ठरवा.

**जन्मदुःख सांगतां न ये । सांगों मी काये ।**
**दुरी करूनि अपाये । केला उपाये ॥ १**
**शरण तुज रघुवीरा । गुणगंभीरा ।**
**धन्य रे दातारा । कृपाळु खरा ॥ ध्रु०**
**बाळपणापासुनी वेडें । तुज सांकडें ।**
**सांगावें कवणापुढें । जालें येवढें ॥ २**
**जिवींचें मनींचें पुर्विलें । गोमटें केलें ।**
**सर्व साहोनियां नेलें । नाहीं पाहिलें ॥ ३**

**देवा तूं त्रैलोक्यनाथ । तूं रे, अनाथ – ।**
**मज करूनि सनाथ । केलें समर्थ ॥ ४**
**दास म्हणे तुझ्या अन्नाचा । वाढलों साचा ।**
**मज हा संसार कैंचा । सर्व देवाचा ॥ ५**

## ( ८ ) या पदांतले महत्त्वाचे शब्द दोन : जालें येवढें

येवढें म्हणजे केवढें, तें त्यांनीं अध्याहृत च ठेवलें आहे. बरोबर च आहे. जें झालें तें त्यांच्या नजरेपुढें च होतें आणि ज्यांच्याशीं ते बोलत होते, त्या श्रीरामाला हि तें ठाऊक होतें. म्हणून जें झालें त्याचा त्यांनीं प्रत्यक्ष उच्चार केला नाहीं. अशा स्थितींत जालें एवढें, तें केवढें, हें आपणांस कसें कळावें ? ‘ जालें येवढें ’ म्हणतांना त्यांच्या मनांत काय काय येऊन गेलें असेल, तें सर्व आपणांस कळण्यास मार्ग नाहीं, तथापि आतांपर्यंत त्याचें जें चरित्र आपणांस अवगत झालें आहे, त्यावरून च तें आपण अनुमानिलें पाहिजे. तसा प्रयत्न आपण किंचित् करूं.

( ९ ) श्रीसमर्थ मनांत म्हणाले असतील, “ रामा, आतांपर्यंतच्या माझ्या आयुष्यांत मजवर दुःखाचे प्रसंग थोडे कां आले, पण ते सारे, बाप्पा, तूं निभावून नेलेस. मी लहानपणीं किती तरी वेडे वेडे चार करावे, सारखें खेळावें, रानांत जावें, झाडावर आणि माळवदावर चढावें, उड्या माराव्या, पाण्यांत डुंबत रहावें, असे नाना प्रकार करावे आणि या मुलाचें कसें होणार, हा कसा निवटणार, अशी चिंता तुम्हांस वाटावी ! पण त्या तुमच्या चिंतेमुळें च माझ्या हातून एवढालीं कामें झालीं. तेव्हां, रामा, हें एवढें झालें, त्याचा पाढा तुमच्या शिवाय दुसऱ्या कोणापुढें गाऊं ! त्या दिवशीं मला डोहांतून बाहेर सुरक्षित कोणीं काढलें, विश्वांत सर्वत्र भरलेल्या नारायणाची ओळख कोणीं करून दिली, आपल्या पुरतें च न पाहतां विश्वाच्या कल्याणाची चिंता वाहण्यास कोणीं शिकविलें, पूर्वजांचें कांहीं भाग्य होतें, म्हणून माझ्या वयाच्या अकराव्या वर्षी च दूताला पाठवून मला हटानें गांवाबाहेर नेऊन गुरुगोप्यवचन कर्णीं उपदेशून माझें अत्यंत समाधान कोणीं केलें, वयाच्या बाराव्या वर्षी च संसाराचें असारत्व पटवून

देऊन सावधान शब्द कानीं पडतां च निसटून जाण्याची प्रेरणा कोणीं केली, गोदावरीच्या पुरांत उडी टाकावयास लावून दक्षिणेच्या तीराला कोणीं सुरक्षित नेऊन सोडलें, बरोबर येऊन पंचवटीस कोणीं पोचविलें, याचा व याच्या परंपरेचा सांभाळ कर, अशी हनुमंतास आज्ञा करून मला त्यांच्या पदरांत कोणीं निरविलें, पुरश्चरणाच्या बारा वर्षांच्या काळांत माझें संगोपन कोणीं केलें, त्यापेक्षां हि तीर्थाटणाच्या काळांत अहोरात्र सन्निध राहून माझें संरक्षण कोणीं केलें ! त्या काळांत नाना तऱ्हेचीं संकटें काय थोडीं आलीं ? अंदाधुंदीचा तो काळ ! पण त्या सर्व संकटांचें निवारण कोणीं केलें ? किती आठवूं रे रामा ? हें एवढें सारें माझ्या हातून झालें तरी कसें ? माझें मला मोठें नवल वाटतें, तें बारा वर्षांचें पुरश्चरणाचें तप आणि तीर्थाटणाच्या निमित्तानें घडलेलें तें बारा वर्षांचें देशपर्यटण, हीं दोन्ही कार्यें माझ्या हातून कशीं पार पडलीं ? तीर्थाटणाच्या काळांत, धर्मावर आलेल्या संकटाची कल्पना होऊन धर्मरक्षणार्थ देशाच्या चारी दिशांना मठ स्थापण्याची प्रेरणा कोणीं केली ? हजारों मठ आणि लक्षावधि शिष्य कसे झाले ? पुढें पुढें तर शिष्यांची आणि प्रशिष्यांची संख्या सारखी वाढत च जाऊन

**नभामाजीं तारांगणें । तैसे लोक ॥**

येऊन मिळाले आणि भूमंडळीं जणूं आपली सत्ता चालू झाली, हें सारें, रामा, तुमच्याशिवाय कोणीं घडवून आणलें, तुमच्या च कृपेमुळें प्रभावी तत्त्वज्ञानाचा सर्वत्र प्रसार झाला, यत्न हा च देव, असा जनतेला देवाचा साक्षात्कार होऊन तिच्यांत धैर्याचा संचार झाला, धर्माचें रक्षण झालें ! रामा, क्षत्रियकुलावतंस शिवरायाची भेट करवून त्यांच्या हस्तें हिंदवी स्वराज्याची निर्मिति करून देशाला आणि धर्माला निर्भयता कोणीं प्राप्त करून दिली, शिवछत्रपतीला निमित्त करून पुनरपि जणूं, रामा, तुमच्या च राज्याची — रामराज्याची — स्थापना कोणीं केली, ठिकठिकाणीं मारुतीची स्थापना होऊन चाफळास तुमचें च संस्थान निर्माण झालें. हें सारें एवढें, तुमच्या कृपेवांचून च झालें काय ?

( १० ) " मीं जी जी इच्छा करावी, ती ती, रामा, तुम्हीं पुरवावी, जें जें मीं नुसतें मनांत आणावें, तें तें तुम्हीं जाणून घडवून आणावें,

माझें एकादें करणें तुम्हांस आवडलें नाहीं, तरी तें सहन करून, माझ्या गुणदोषांकडे न पाहतां तुम्हीं माझे कोड पुरवावे, ही आपली केवढी कृपा! माझी काय योग्यता, पण तुम्हीं माझा शब्द खालीं पडूं दिला नाहीं, या तुमच्या भक्तवत्सलतेला काय म्हणावें?

( ११ ) "रामा, आपण त्रैलोक्याचे नाथ आहांत आणि मी केवळ अनाथ आहें! घरदार, शेतीवाडी, आई आणि अग्रज बंधु वगैरे जिवलगांचा संग, हीं सर्व सोडून एकटा जीव घराबाहेर पडला, अशा मजसारख्या अनाथावर कृपा करून त्यास आपण सनाथ केलें, इतकें च नव्हे, तर

त्रैलोक्यास पडिलें ठावें। सामर्थ्य ज्याचें ॥

इतकें समर्थ करून सोडलें, हे आपले उपकार आठवून हृदय भरून येत आहे.

( १२ ) "देवा, मीं असें कधीं च मानलें नाहीं, कीं हा सारा माझा पराक्रम, हें सारें मीं केलें! मी कोण आणि माझा पाड तो किती! रामा! मी आपलें च खात आलों, आपल्या च अन्नावर लहानाचा मोठा झालों, आपल्या च कृपेमुळें माझ्या हातून हें सारें घडलें, आपण च या साऱ्या गोष्टी केल्या, मला फक्त आपण निमित्त केलें आणि मी निमित्ताला कारण झालों, पण हें जें 'येवढें जालें' तें माझें कर्तृत्व नव्हे, तें आपलें कर्तृत्व होय! हा दिसतो आहे तो सारा पसारा माझा नसून आपला आहे, तो आतां आपला आपण सांभाळा आणि मला मुक्त करा!"

( १३ ) याप्रमाणें, त्या रामनवमीच्या रात्रीं सर्वत्र सामसूम झाल्यावर, रामापुढें एकान्तांत उभे राहून श्रीसमर्थांनीं आत्मचरित्राचें मनांतल्या मनांत सिंहावलोकन करून श्रीरामाची करुणा भाकली आहे. ही त्यांची शेवटची रामनवमी होती. १६०४ ची रामनवमी त्यांना घडावयाची नव्हती: म्हणून या रामनवमीला प्रेम उचंबळून येऊन त्यांनीं रामाला आत्मनिवेदन केले. वरील पदावरून मला ही सिंहावलोकनाची कल्पना सुचली, पण तिला बखरींत हि आधार सांपडतो, याचा मला आनंद होतो. बखरींत म्हटलें आहे:

"समर्थांनीं श्रीची आज्ञा घेतांना प्रार्थना केली कीं, महाराज, हा देह उत्पन्न करून सेवा घेतली ती केली, पुढें जे आपली सेवा करतील त्यांचें कल्याण करावें. या संप्रदायाचा अभिमान श्रीस आहे च. मीं विनंति करावी, असें सामर्थ्य माझें नाहीं. याप्रमाणें बोलून सर्वत्रांस देवालयांतून बाहेर काढून आपण एकटे च आंत बसले. चार घटका स्वामी आंत होते. तेव्हां देवालय अति तेजेंकरून सुंदर दिसूं लागलें, हें मंडपांत होते त्यांनीं पाहिलें. नंतर समर्थ बाहेर आले आणि आनंदयुक्त मंडपांत येऊन श्रीस साष्टांग नमस्कार घातला."

(१४) मला हि लिहितांना जड वाटतें. चाफळच्या रामाचें समर्थांनीं घेतलेलें हें दर्शन शेवटचें होय. श्रीरामनवमीनंतर पंधरा वीस दिवसांत च, चाफळखोरें, मंदिर, मंदिराचें शिखर, यांकडे पहात पहात, श्रीसमर्थ शिबिकारूढ होऊन, अवतार संपविण्याचें मनांत आणून सज्जनगडावर जाण्यास निघाले.

# शेवटचे

दहा महिने पंधरा दिवस

( चैत्र शुध्द ९ ते माघ वद्य ९ )

# शक १६०३



उ ल्ला स ए को ण वि सा वा

# निर्याण आणि पश्चात्



असो ऐसे सकळ हि गेले ।
परंतु येक चि राहिले ।
जे स्वरूपाकार जाले ।
आत्मज्ञानी ॥ १

आत्माराम दासबोध ।
माझें स्वरूप स्वतःसिद्ध ।
असतां न करावा हो खेद ।
भक्त जनीं ॥ २

[ ( १ ) शिवाजी राजे गेले आणि समर्थ कष्टी होऊन बसले – ( २ ) शक्ति गेल्यावर नुसती युक्ति मागें राहून काय करणार ? – ( ३ ) आपण माघ वद्य ९ स जाणार असें समर्थांनीं विदित केलें – ( ४ ) मार्गशीर्षांत दासबोध पुरा केला आणि शेवटीं एक ओवी समाविष्ट केली – ( ५ ) पौष व. ९ स संभाजी-महाराजांना सांगितलेलीं अकरा वचनें – ( ६ ) माघ व. ५ तंजावरच्या मूर्ति – ( ७ ) आम्ही गडावर च राहणार – ( ८ ) माघ व. ८ स एकादशाक्षरी दोन वचनें – ( ९ ) माघ वद्य ९ – ( १० ) भीमस्वामींनीं केलेलें वर्णन, समर्थांनीं ध्यान धरिलें – ( ११ ) तेव्हां आक्कांच्या डोळ्यांना पाणी आलें, तें पाहून समर्थांनीं उच्चारलेल्या आश्वासनपर शेवटच्या दोन ओव्या – ( १२ ) त्यांचा सरळ अर्थ – ( १३ ) हयातींत हि त्यांनीं तें च आश्वासन दिलें होतें – ( १४ ) शेवटचा क्षण – अवतारसमाप्ति – ( १५ ) वार्ता ऐकून झालेली अवस्था – ( १६ ) उत्तरकार्य उद्धवांनीं केलें – ( १७ ) अस्थींची हकिकत – ( १८ ) श्रीसमर्थांच्या पश्चात् उद्धव-दिवाकरांत केवळ गैरसमजुतीमुळें उद्भवलेला कलह – ( १९ ) त्या वादांत कल्याणांची उच्च भूमिका – ( २० ) पश्चात् कारभार आक्का पहात व महंतामहंतांचें पटेना म्हणून जांबेहून श्रेष्ठांच्या वंशजास बोलावून घेण्यांत आलें – ( २१ ) श्रेष्ठांचे नातु गंगाधर गडावर १६३२ त आले व तेव्हांपासून श्रीसमर्थसंस्थानांचा कारभार पुत्रपरंपरेनें पाहण्यांत आला आहे – ( २२ ) आक्कांचे उपकार – ( २३ ) स्थलमहिमा – साक्षात्कार – ( २४ ) साक्षात्काराचें एक उदाहरण – ( २५ ) रिता ठाव या सद्गुरूवीण नाहीं – ( २६ ) महाराजे, पंत प्रधान, प्रतिनिधि, सचीव, अमात्य सर्वांनीं श्रीशिवरायाचें व्रत पुढें चालविलें – ( २७ ) यापुढें लोकशाहीच्या काळांत सर्वांनीं च पूर्वजांचें व्रत पुढें चालविलें पाहिजे – ( २८ ) श्रीशिवसमर्थ या दोघा ईश्वरी पुरुषांचे थोर उपकार ]

( १ ) श्रीछत्रपति शिवाजीमहाराज गेले आणि श्रीसमर्थ अत्यंत कष्टी होऊन बसले. हें माझें बोलणें बरोबर आहे काय ? बरोबर नसतें तर, मला सांगा, राजांच्या निधनाची वार्ता ऐकून श्रीसमर्थ सारखे एकान्तांत जाऊन कां बसते, कोणास भेटावयास नको, कोणाशीं बोलावयास नको, असें त्यांना कां वाटूं लागलें असतें ? हा केवढा चमत्कार म्हणावा ! श्रीसमर्थ म्हणजे प्रत्यक्ष परब्रह्म ! पण श्रीशिवरायांनीं अवतार संपविला आणि परब्रह्म कष्टी झालें ! श्रीसमर्थांना वंदन करून श्रीशिवराय कैलास-वास करावयास रायगडास गेले, आणि

**समर्थ स्वप्रकाशें अंधारीं तीन मास बैसताती।**
**मुरूमपात्रें उदकें सेविताती।**
**शकलपात्रें घेऊनि धांवताती।**
**अरण्याकडे दुश्चिन्हें॥**

—श्रीसमर्थप्रताप, २०, ६४

तेव्हां, श्रीशिवाजीमहाराजांची योग्यता केवढी म्हणावी! आणि त्यांचा आणि समर्थांचा जिव्हाळा किती होता, म्हणून सांगावा !

( २ ) श्रीशिवराय गेले आणि श्रीसमर्थ आपल्या हि जाण्याच्या तयारीला लागले. त्यांनीं अन्न वर्ज केलें. कोणाकडे पाहणें नाहीं, कोणाशीं बोलणें नाहीं. शक्तियुक्तीचा इतका एकजीव झाला होता ! शक्ति गेल्यावर नुसत्या युक्तीला मागें राहून काय करावयाचें होतें ? शिवाजीराजांच्या शक्तीच्या जागीं संभाजीराजांच्या शक्तीची स्थापना झाली. त्या शक्तीशीं जुळवून घेण्याचा युक्तीनें प्रयत्न केला. समर्थांनीं संभाजीमहाराजांस हि पत्र पाठवून पाहिलें, पण त्याचा उपयोग व्हावा तसा झाला नाहीं.

( ३ ) तात्पर्य, शिवाजीमहाराजांबरोबर समर्थांचें हि अवतारकार्य संपलें. १६०३ च्या श्रीरामनवमीसाठीं चाफळास जाऊन श्रीराम आणि श्रीमारुती यांना भेटून, प्रार्थना करून, शिष्यपरंपरेला निरवून, चाफळखोऱ्यांतील वृक्षांचा, घळींचा, पर्वतांचा शेवटचा निरोप घेऊन श्रीसमर्थ सज्जनगडावर आले, हें आपण गेल्या उल्लासांत पाहिलें च आहे. १६०३ च्या चैत्र वद्यांत ते गडावर आले. गडावर आले आणि त्यांनीं सर्वांना विदित केलें कीं, आम्हांस आतां येथें दहा च महिने राहणें आहे :

**माघ वद्य नवमी। जाणें आहे परंधामीं।**
**केला निश्चय अंतर्यामीं। भावें ऐसा॥**

( ४ ) वैशाखापासून माघापर्यंत दहा महिने होतात. मध्यंतरीं मार्गशीर्ष मासीं त्यांनीं श्रीमत् दासबोधाचे वीस दशक पुरे करून दिले, ते असे : सातदशकी दासबोध तयार होता च, त्याच्या च पुढें तयार असलेला ज्ञानदशक, आठवा दशक म्हणून जोडला आणि तोंपर्यंत सांचलेल्या अनेक स्फुट समासांपैकीं जरूर ते घेऊन व त्यांची विल्हे लावून आणि

दशक पाडून श्रीसमर्थांनीं वीसदशकी दासबोध पुरा केला. तसें करतांना त्यांनीं शेवटची एक ओवी सांगून ती बाराव्या दशकाच्या दहाव्या समासांत समाविष्ट केली. ही शेवटची ओवी म्हणजे श्रीसमर्थांची आपणा सर्वांस शेवटची आज्ञा होय. ती ओवी अशी :

**आमची प्रतिज्ञा ऐसी । कांहीं न मागावें शिष्यासी ।**
**आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥**

( ५ ) पुढें पौष वद्य ९ स, म्हणजे बरोबर एक च महिना आधीं श्रीसंभाजीमहाराज दर्शनास आले असतां, आम्हांस आतां लवकर च जाणें आहे, असें बोलून श्रीसमर्थांनीं श्रीसंभाजीमहाराजांना कृपापूर्वक अकरा वचनें सांगितलीं, तीं अशीं § :

**"श्रीशिवराज कैळासवासी यांचे वंशपरंपरेसी राज्यभोग वहुत आहे ॥ ॥ १ ॥**

**वर्षें पांच पर्यंत अति कठीण आहे दैवि प्रार्थना सावधानतेनें रक्षिलें पाहिजे ॥ ॥ २ ॥**

**पूर्वि राजश्रीस राजधर्म व क्षत्रधर्म व अखंड सावधान ऐसीं पत्रें पाठविलीं होतीं तीं पत्रें प्रसंगानुसार वाचून मनासी आणून वर्तणुक होईल तरि त्या वचनाचा अभिमान श्री देवासि आहे ॥ ॥ ३ ॥**

**नळ संवत्सरीं[1] सिवथरीं १८ शस्त्रें समर्पिलीं ते समई श्री[2] चे इछेनें राजश्रीयांसि कित्येक आसिर्वाद वचनें प्राप्त जालीं तो अर्थ कांहीं घडला असेल आणीक हि द्वादश वर्षाउपरि उत्कट भाग्य आहे ते समईचा संकल्प वाक्य लेखीं लेख होता स्मरण मात्र द्यावें कोण्हे समई कोण्हासि काय घडणार तें सुखें घडेल ॥ ॥ ४ ॥**

**संनिध वस्त्रपात्रादिक जो पदार्थ होता तो सर्व श्री स समर्पिला चांफळीं प्रसंगानुसार श्री च्या देवाळयाचा कार्यभाग घडोनि येईल हा हि पदार्थ राजश्रीच्या विचारें त्या चि कार्यासी लावावा अथवा महाद्वारीं दीपमाळा कराव्या ॥ ॥ ५ ॥**

§ श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, खंड पहिला, ले. ४३. १ शक १५९८ त. २ श्रीशिवरायास.

प्रमादि संवत्सरीं सींगणवाडीचे मठीं राजश्रीनीं श्री च्या सर्व कार्याचा आईकार केला त्याप्रमाणें त्यांनि नित्य उत्सव व यात्रासमारंभ उत्तम चालविला पुढें इमारतीचें हि स्मरण द्यावें हें त्यानीं मान्य केल्यावरी आपण सज्जनगडी सुखें वास्तव्य केलें ॥ ॥ ६ ॥

श्री च्या भोगमूर्ती आणविल्या त्याची प्रतिष्ठा मल्हरी निंबदेव त्याच्या बंधूच्या हस्तें करावी ॥ ॥ ७ ॥

कर्नाटक रीतीचा रथ करून या भोगमूर्ती आणउन प्रतिवर्षी रथोत्साव केल्यानें राज्यासी कल्याण आहे वार्षिक चिन्ह दिसोनि येईल त्याउपरी श्री चे इमारतीसी आरंभ करावा येक शत येकवीस खंडी धान्य संकल्पाची गती सांगावी ॥ ॥ ८ ॥

श्री चे देवालय अशक्त जाले नदी संनीध आहे ॥ ॥ ९ ॥

पूर्वी येक प्रसंग जाला होता राजश्री श्री च्या दर्शनासी सज्जनगडासी येणार म्हणोनि स्थळसिद्धीकारणें मनुष्य आले होते ते समईचे वर्तमान। उत्तरेकडील राजपुत्राचें आगमन जाले म्हणोनि ऐकिले ते समई आतां काय आला म्हणोनि बोलिले परंतु याउपरी हि ते प्रांतीचे लोक अनकूळ करून घेतील तरी उभयता योगें कार्यसिद्धी च आहे परंतु त्वरा पाहिजे। प्रतिवर्षी श्री चे यात्रेसी राजगृहीहून येक भले मनुष्य संरक्षणासी पाठवीत जावे व समारंभादि रथोत्सावसमई हस्ती २ कर्णे २ वाद्ये जोड २ तींवाशे २ जमखाने २ शामिने २ येणे प्रमाणे पाठऊन श्री चा यात्रासमारंभ संपादून पदार्थ फिराऊन आणीत जावे हा हि निश्चय पूर्वीचा चि आहे लेख हि होता ॥ ॥ १० ॥

श्री चे पेठेचे पत्र दृश्य करावे कार्यकर्ते नीति वंदावी। श्री कार्यासी अति तत्पर ऐशा पुरुषाच्या योगें धर्मवृत्धी आहे धर्मवृत्धीने राज्यवृत्धी आहे॥ ॥ ११ ॥

याप्रमाणें बोलून राजास जावयास श्रीसमर्थांनीं आज्ञा दिली.

( ६ ) पूर्वी श्रीसमर्थ तंजावरास गेले असतां राम, लक्ष्मण, सीता आणि मारुती या चौघांच्या मूर्ति तयार करण्याची मल्हार निंबदेव यांस

---

१ शक १५९५ त.

आज्ञा केली होती. त्याप्रमाणें त्यानें त्या मूर्ति तयार करवून केशवनिस्पृही याबरोबर पाठविल्या, त्या गडावर माघ वद्य ५ स येऊन पोचल्या. श्रीसमर्थांच्या जवळ शेजघरांत त्या मूर्ति ठेवल्या होत्या. माघ वद्य ५ च्या

**मध्यरात्रीं साहवे तासी । समर्थ पाहती त्या मूर्तींसी ।**
**मेण होतें ते नयनासी । तें काढविलें ॥ ३५**

**श्रीचें मुखावलोकन केलें । परम समाधान जालें ।**
**या उपरी आपलें । राहणें न घडे ॥ ३६**

**अवकाश पांच दिवस । उरला आहे आम्हांस ।**
**कोण पूजील हो त्यास । यश घडो ॥ ३७**

**करणाराच्या करविल्याच्या । आणिल्याच्या श्रमाचा ।**
**प्रसाद जाला सर्वांचा । मनोरथ ॥ ३८**

असें भीमस्वामींनीं श्रीसमर्थांच्या अंतकाळच्या केलेल्या पन्नास ओव्यांच्या वर्णनांत म्हटलें § आहे. या च मूर्ति आज सज्जनगडावरील मंदिरांत आहेत.

(७) अन्न आणि पाणी दोन्ही सोडून समर्थ अखंड समाधिस्थ च राहूं लागले. पण शरीर थकत चाललें. माघ महिना तो. त्या महिन्यांत थंडी फार असते आणि गडावर विशेष च. तेव्हां शिष्यमंडळींनीं सुचविलें, चाफळास जावें हें बरें. समर्थांनीं नकार दिला. ते म्हणाले,

**जेथें होईल हो प्रांत । तेथ भजतील हो भक्त ।**
**उछाह चाफळीं अद्भुत । राहील तेव्हां ॥ २७**

चाफळास गेल्यानें श्रीरामाचा उत्सव मागें पडून भक्तजन आमचा च उत्सव करूं लागतील ! नको, ती कल्पना हि नको ! आम्ही गडावर च राहणार, जें काय देहाचें व्हावयाचें असेल तें येथें च होऊं द्या.

(८) माघ वद्य अष्टमी उजाडली. क्षीणता आली होती, पण प्रकृति बरी होती. त्या दिवशीं "दो प्रहरां निद्रा करून उठले, ते समई वचनें दोनि, प्रत्येकीं येकादशाक्षरें – देवद्रोही यांचा नाश चि आहे ॥ १ ॥ समुद्रतीरस्थांचा नाश आहे ॥ २ ॥" बोलिले.

§ श्रीसांप्रदायिक विविध विषय, खंड पहिला, विषयांक २५ वा.

( ९ ) शेवटचा दिवस प्राप्त झाला ! श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, खंड पहिला, लेखांक ४३, याचा शेवट " नवमी दो प्रहरां दर्शनासी बहुत लोक आले । त्यासी स्वमुखें आज्ञा दिल्ही । ते लोक द्वारापासी उभे चि आहेत । संनीध कोण्हास हि येऊं दिल्हे नाहीं । ते चि समई पलंगावरून उतरोन पादुकावरी उत्तराभिमुख बैसले । श्रीचें स्मरण मोठ्यानें केलें ।"

( १० ) भीमस्वामी आपल्या पन्नास ओव्यांत थोडा विस्तार करून कळवितात —

**माघ वद्य नवमी । दिवसा दोन प्रहर नेमी ।**
**शनिवारीं परंधामीं । योग केला ॥ ३९**

**पलंगाखालीं उतरले । पादुका पाईं लेइले ।**
**उत्तरदिशेकडे केलें । मुख बरवें ॥ ४०**

**भक्तजन विनविती । पलंगावरी बैसावें म्हणती ।**
**तेव्हां बोलिले हो प्रीतीं । बैसणें नाहीं ॥ ४१**

**तुम्ही बैसवाल तरी पहा । म्हणौन उचलती जण दहा ।**
**शक्तिवंत करिती अहा । नुचलती आमुते ॥ ४२**

**करितां बहुत चि यत्न । नुचले अनुमात्र आसन ।**
**तेव्हां आज्ञापिलें वचन । बाहेर बैसा ॥ ४३**

( ११ ) मंडळी बाहेर, पण दाराशीं च जाऊन बसली. आक्का आणि उद्धव आंत च राहिले. श्रीसमर्थांनीं रघुपतीकडे दृष्टि लावून ध्यान धरिलें. आक्कांच्या डोळ्यांना पाणी आलें. तें पाहून समर्थ म्हणाले, " आमच्या सहवासांत राहून हें च कां शेवटीं ? " त्यावर आक्का म्हणाल्या, " महाराज, आम्हांस सारें समजतें, पण यापुढें या सगुणरूपदर्शनाला आम्ही आंचवणार याचें दुःख होतें ! " बाकी, मला वाटतें, कोणी किती हि मोठा तत्त्वज्ञानी झाला, तरी अशा वेळीं, समजा, कोणा जिवलगाचा अंतकाळ आला, आई, वडील, बंधु, बहीण, अपत्य, कोणी समक्ष जाण्याचा क्षण आला, म्हणजे ज्याच्या मनाची यत्किंचित् हि चलबिचल होणार नाहीं, असा मनुष्य विरळा ! असो, आक्कांचें म्हणणें ऐकून श्रीसमर्थांनीं, या निमित्तानें, आपणा सर्वांस कायमचा संदेश देऊन ठेवला आहे.

**माझी काया आणि वाणी । गेली म्हणाल अंतःकरणीं ।**
**परी मी आहे जगज्जीवनीं । निरंतर ॥ ४५**

**आत्माराम दासबोध । माझें स्वरूप स्वतःसिद्ध ।**
**असतां न करावा हो खेद । भक्तजनीं ॥ ४६**

त्या महापुरुषानें उच्चारलेले हे शेवटचे शब्द होत. तुम्हां आम्हांस हा त्यांचा शेवटचा आदेश आहे, ही त्यांची शेवटची आज्ञा आहे. तुमच्या आमच्या कल्याणासाठीं हें त्यांनीं केलेलें शेवटचें मार्गदर्शन होय.

( १२ ) याचा अर्थ सरळ आहे. समर्थ म्हणत आहेत, " मी जातों, पण जात नाहीं, राहतों. " आत्माराम म्हणून त्यांचें च १७८ ओव्यांचें, पांच समासांचें एक लघु काव्य आहे, तें आणि ग्रन्थराज दासबोध हें, " असे हे दोन ग्रन्थ म्हणजे माझें च स्वरूप होय. तेव्हां मी च या दोन काव्यांच्या रूपानें मागें रहात आहें. यापुढें ज्या कोणास माझ्या स्वरूपाचा साक्षात्कार व्हावा, असें वाटेल, त्यानें मला या दोन ग्रन्थांत पहावें. त्यानें हे दोन ग्रन्थ मस्तकीं धारण करावे, हृदयाशीं धरावे, त्यांत दाखविलेल्या मार्गानें जावें, सांगितलेलीं साधनें करावीं, प्रतिपादलेल्या तत्त्वज्ञानाचें मनन करावें, त्याचा निदिध्यास घ्यावा ! जो जो कोणी असें करील, त्याला त्याला माझ्या स्वरूपाचा साक्षात्कार झाल्यावांचून राहणार नाहीं. "

( १३ ) असें श्रीसमर्थांचें आपणांस शेवटचें आश्वासन आहे. तें च त्यांनीं एकदां आपल्या हयातींत, चांगल्या स्थितींत असतां, वेणाबाईच्या प्रश्नाला उत्तर देतांना, स्पष्ट शब्दांत दिलेलें होतें :

**श्रीरामदेवार्चन सिद्ध चि आहे ।**
**ग्रन्थराज दासबोध सामर्थ्य सिद्ध चि पाहें ।**
**जो जो महंत येथें निश्चयें राहे ।**
**तो तो लाहे साक्षात्कारु ॥**

असें श्रीसमर्थांनीं स्वतः वेणाबाईना सांगितलें, तें वेणाबाईनीं गिरिधरांना सांगितलें व तें गिरिधरांच्या श्रीसमर्थप्रताप ग्रन्थाच्या द्वारें तुम्हांआम्हांपर्यंत येऊन पोंचलें आहे ; असो.

( १४ ) इतकें सर्व बोलणें झालें आणि शेवटचा क्षण येऊन ठेपला. तेव्हां श्रीसमर्थांनीं तीन वेळां रामनामाचा एवढ्या मोठ्यानें गजर केला कीं, तो आवाज आकाशांत सबंध गडावर मुहूर्तभर दुमदुमून राहिला ! तो गजर ऐकून सर्व जण चकित झाले, सर्वांचीं हृदयें प्रेमानें भरून आलीं. क्षणभरानें ध्वनि थांबला आणि श्रीसमर्थांचा अवतार पूर्ण झाला !!!

**तीन वेळां स्मरण केलें । अंबर अवघें गर्जिनलें ।**
**रामनामें कोंदाटिलें । जिकडे तिकडे ॥ ४७**

**मुहूर्त एक हो गर्जना । गगनीं कोंदाटिले हो जाणा ।**
**विस्मय पावलो निजजना । प्रेम आलें ॥ ४८**

**ध्वनी जाली संपूर्ण । जाहला अवतार हो पूर्ण ।**
**देशोदेशीं भक्तजन । जाते जाले ॥ ४९**

( १५ ) गडावरच्या च मंडळींची काय, पण समर्थांनीं अवतार पूर्ण केल्याची वार्ता ऐकून महाराष्ट्रभर च केवळ नव्हे, तर सर्व देशभर सर्वांची आणि विशेषतः शिष्योपशिष्यांची काय अवस्था झाली असेल, याची कल्पना च केली पाहिजे. श्रीसमर्थचरित्र लिहितांना आपण अनेकांचे आधार घेत आलों, पण त्या सर्वांत आपणांस कल्पनेचा केवढा तरी आधार वाटतो ! तेव्हां कल्पना करीत थांबूं या थोडा वेळ.

( १६ ) पण आपण किती हि थांबलों, तरी कथानक शेवटपर्यंत पोंचविलें च पाहिजे. पुढच्या तयारीला मंडळी लागली. श्रीसमर्थसदनाच्या उत्तरेस, म्हणजे जेथें आज समाधिमंदिर आहे, त्या जागीं पूर्वीपासून खड्डा होता, त्यांत स्थलशुद्धि करून बिल्व आणि तुळशी यांच्या काष्ठानें श्रीदेहाचें दहन झालें. उत्तरकार्य उद्धवांनीं यथासांग केलें. तिसऱ्या दिवशीं रक्षा सावडतांना व अस्थि गोळा करतांना समाधीचा आयता चिरा निघाला. तो पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. काशीस नेऊन भागीरथींत सोडण्याकरितां अस्थि चाफळास मठासमोर वृंदावन करून त्यांत नेऊन ठेवण्यांत आल्या.

( १७ ) श्रीसमर्थांच्या अस्थींची गोष्ट निघाली म्हणजे श्रीकल्याणस्वामींचें स्मरण हटकून होतें. तें कां, हें येथें च सांगतों आणि मग

श्रीसमर्थांच्या पश्चात् गडावर आणि चाफळास काय व्यवस्था झाली, ती पाहूं.

अस्थि चाफळास श्रीराममंदिराच्या सभामंडपाच्या उजव्या बाजूच्या वृंदावनांत ठेवल्या होत्या. त्या काशीस घेऊन जाण्याची गोष्ट कल्याण-स्वामींचे शिष्य, उंब्रजमठपति केशवस्वामी यांनीं कल्याणस्वामींच्या जवळ वारंवार काढावी, पण दर खेपेस कल्याणस्वामींनीं, पुढें पाहूं, असें म्हणावें. शेवटीं एकदांचें १६३६ च्या अधिक आषाढ शुद्ध १२ स केशवांच्या मनांत आलें कीं, त्यांत काय वारंवार विचारावयाचें आहे, अस्थि भागीरथींत विसर्जनासाठीं काशीस न्यावयाच्या आहेत खऱ्या, तरी घेऊन जाऊं, मार्गांत डोमगांवीं कल्याणांना भेटूं, त्यांना विदित करूं आणि पुढें जाऊं. त्याप्रमाणें त्यांनीं त्या दिवशीं वृंदावनांतून अस्थि काढल्या आणि त्या घेऊन डोमगांववरून काशीस जाण्यास ते निघाले. डोमगांवीं पोचले तों त्यांना कळलें आणि दिसून आलें कीं, अधिक आषाढ शुद्ध १२ स ज्या क्षणीं आपण चाफळास वृंदावनांतून अस्थि बाहेर काढल्या, त्या च क्षणाला इकडे डोमगांवीं कल्याणमहाराजांनीं देह ठेवला! केशवांना कोण दुःख झालें! म्हणून च बरें ते, वारंवार विचारलें तरी पुढें पाहूं, पुढें पाहूं, म्हणत! आपला वेडेपणा झाला, त्यांच्या पूर्व संमतीवांचून आपण अस्थि काढल्या, ही आपली चूक झाली. केशवांना मनस्वी दुःख झालें, पश्चात्ताप वाटला, आपल्या हातून मोठा अपराध घडला, असें त्यांना वाटलें! पण आतां दुःख करून काय उपयोग! योगायोग पहा कसा विलक्षण, समर्थांच्या अस्थींत कल्याणांच्या अस्थि मिसळून, दोघांच्या अस्थि एकत्र होऊन च, त्या घेऊन केशव पुढें काशीकडे रवाना झाले. किती अपूर्व हें चरित्र! कोण ही गुरुनिष्ठा! हिला जोड त्रिभुवनांत कोठें आढळेल काय? समर्थ आणि कल्याण या गुरुशिष्यांच्या अस्थि हि एकत्र संगम पावून च भागीरथीस जाऊन मिळाल्या! उगीच नाहीं कोणाच्या हि एकनिष्ठ शिष्याला कल्याणस्वामींची उपमा देण्यांत येत!

**धन्य धन्य हें गुरुशिष्यपण। धन्य धन्य हें सेवाविधान।**
**धन्य धन्य हें अभेदलक्षण। धन्य धन्य लीला अगाध॥**

—दासविश्रामधाम, ११६–१५२

## श्रीसमर्थांच्या पश्चात्

( १८ ) केवळ गैरसमजुतीमुळें कांहीं शिष्यांत, विशेषत: उद्धव आणि दिवाकर यांच्यांत कलह उत्पन्न झाला होता, असें कागदपत्रांवरून दिसतें. कल्याण गोसावी, भास्कर गोसावी, विठ्ठल गोसावी, गणेश गोसावी व श्री चे इतर कांहीं समुदायी यांना दिवाकरांनीं विचारल्यावरून श्रीस्थलाच्या पारपत्याधिकारासंबंधानें श्रीसमर्थांची इच्छा काय होती, याची ज्याला जी माहिती होती, ती त्यानें लिहून दिलेली आहे. सर्वांच्या म्हणण्याचा आशय इतका च कीं, पारपत्याधिकार चालविण्यास दिवाकर योग्य होते व तो त्यांनीं चालवावा अशी इच्छा श्रीसमर्थांनीं अनेक वेळां प्रकट केलेली होती. यावर उद्धवांचें म्हणणें असें कीं, पारपत्य जर दिवाकरांनीं करावें, तर आपणांस मठांत असत जा, म्हणून श्रीसमर्थांनीं जी शेवटीं आज्ञा केली होती, ती काय निरर्थक होती? दोघांचें हि म्हणणें सर्वथैव खरें होतें. आपल्या म्हणण्यावर कोणी विश्वास ठेवीत नाहीं, याचें उद्धवांना इतकें वाईट वाटलें कीं, ते १६०७ त टांकळीस जाऊन राहिले व १६२१ पर्यंत तरी निदान त्यांनीं सारखा उपवास केला. § दिवाकरांनीं पारपत्य करावें, असें श्रीसमर्थांनीं अनेकदां सांगितलें होतें हें खरें व अवतार-समाप्तीचे वेळीं उद्धव गोसावी श्रीसमर्थसन्निध होते व त्यांनीं तेथें राहून मठींचा कारभार पहावा, असें श्रीसमर्थांनीं त्यांना आज्ञापिलें होतें हें हि खरें. पण श्रीसमर्थांची ही शेवटची आज्ञा इतरांना माहीत नव्हती आणि म्हणून उद्धव गोसावी विनाकारण कलह करीत आहेत, असा सर्वांचा समज झाला होता. परंतु दोघे हि खरे च होते. ह्या कलहाचें स्वरूप श्रीसमर्थप्रतापांत एका ओवींत आलें आहे :

**मोहरे मोहरे इरेसी पडती । मोहरे मोहरे बळावती ।**
**मोहरे मोहरे भक्ति करूनि दाविती । प्रीतिकळहो दिसती परमार्थें ॥**

—श्रीसमर्थप्रताप २१, ५१

( १९ ) या वादांत श्रीकल्याणस्वामींची भूमिका किती उच्च कोटीची होती, ती त्यांच्या एका पत्रावरून दिसून येत आहे. श्रीसमर्थचरणांच्या

§ श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, प्रथम खंड, लेखांक ६१ व १०६

निष्काम सेवेवांचून त्यांना दुसरें कांहीं ठाऊक च नव्हतें. त्यांनीं उद्धव आणि दिवाकर या दोघांना हि पत्रें लिहिलीं होतीं. उद्धवांना लिहिलेलें पत्र उपलब्ध नाहीं, पण दिवाकरांना लिहिलेलें उपलब्ध असून प्रसिद्ध झालेलें आहे.§ तें अस्सल असून त्यांच्या हातचें आहे. तें उद्धृत करण्यासारखें आहे. त्यांत त्यांच्या हृदयाचें पूर्ण आविष्करण झालेलें आहे :

लेखांक ४९ ] १६०४ अंदाजानें [ अस्सल बालबोध

श्रीरामवरद

**समर्थस्वामी**

**श्रीगुरुभक्तपरायेण मोक्षश्रीया वीराजीत वि**
**राजमान दिवाकरगोसावियां प्रति कल्याण**
**नाम्ने कृतानेक नमस्कार विनति उपेरि तु**
**म्ही पत्र पाठविलें तें पावोन लेखनार्थ अवग**
**त जाहलें सर्व प्रकारें विस्तारें ल्याहावें तरि**
**श्री याचीं अज्ञाप्रमाणें वर्तावें**
**हें उचीत ते हि सुज्ञ आसेत वडीलपणाची**
**निती जे परंपरागत उपासना स्छापना**
**जे केलि आहे तें भजन चालावें तेथें कल**
**हास कारण नाहि आपण श्रीच्या अज्ञे**
**प्रमाणें देवाचा कार्यभाग चालुं देणें श्री**
**शिवथरचे घळिस अस्तां तुम्हावर सं**
**तोष होऊन नळनाम संवत्छरिं अज्ञा स**
**र्वत्रांस केलि जे हा महाबळेश्वरकर आ**
**हे बुद्धि हि महाबळ आहे राजद्वारि की**
**त्येक प्रसंगीं पाठवायास योग्य आसे**
**प्रस्छानपारपत्या योग्य याच्या हस्तें श्री**
**चें संस्छान जोंपर्यंत तों कार्य कर्तव्य वंश**
**परंपरेनें घ्यावें ऐसें बोलोन तुम्हास श्री**
**नि तांबुल दिधला ते समयि रो उद्धव**
**गोसावि व विठ्ठल गोसावि व चीमणा**
**बाई व भानजी गोसावि व आम्ही आणी**

§ श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, प्रथम खंड, लेखांक ४९.

क कित्यक समुदायि होते ते अज्ञा स्मरो
न अभिमान अक्रोध होउन भजनास
प्रवर्तल्यानें श्री दया करितिल तुम्ही धै
र्य न टाकणें यांच्या कलहामुळें श्रीच्या
धर्मस्छापनेसि अंतर पडे ऐसें न करणें
त्यांचा संतोषरूप आशिर्वाद् आसे सर्व
हि यश देतिल राजेश्री उद्धव गोसावि यां
स हि पत्र लिहिले आसे त्यावरुन विदित हो
इल आम्ही हि लवकरि च येतों बहुत का
य लिहिणें धैर्य श्रीभजनाचें न टाकणें
हे विनति

( २० ) श्रीसमर्थांच्या पाठीमागें चाफळमठाचा कारभार आणि सज्जनगडावरील व्यवस्था हीं आक्कांनीं पाहिलीं. देशांत यवनांनीं धुमाकूळ मांडला होता. तेव्हां कांहीं काळ चाफळच्या मूर्ति वाघापुरच्या सड्यावर व गडावरील मूर्ति वासोट्यास नेऊन ठेवल्या होत्या. स्थिरस्थावर झाल्यावर दोन्ही ठिकाणांहून मूर्ति परत आणण्यांत आल्या. परंतु महंतामहंतांचें पटेना म्हणून प्रतापांत म्हटल्याप्रमाणें त्यांनीं च आपसांत ठरविलें, शिवाय गडावर आणि जांबेस साक्षात्कार हि झाले, म्हणून जांबेहून श्रेष्ठांच्या वंशजास बोलावून घेण्यांत आलें. श्रीसमर्थांनीं आपल्या हयातींत च तशी आज्ञा केली होती व जांबेस तसें पत्र पाठविण्यास सांगितलें होतें, असें बखरींत व इतर एक दोन चरित्रग्रन्थांत म्हटलेलें आहे, तें मात्र बरोबर नव्हे, असें एकंदर कागदपत्रांवरून व शक्याशक्यतेचा विचार करून माझें मत झालें आहे.

( २१ ) श्रेष्ठांना पुत्र दोन होते : रामजी आणि शामजी, पण ते दोघे हि या वेळीं कालवश झाले होते. रामजी यांचे पुत्र गंगाधर विद्यमान होते, ते १६३२ श्रावण शु. ५ स सज्जनगडावर येऊन दाखल झाले आणि चाफळचे श्रीराम व गडावरील श्रीसमर्थ, यांचीं संस्थानें त्यांच्यावर सोपविण्यांत आलीं. तेव्हांपासून आजतागाईत जांब, चाफळ व सज्जनगड या तिन्ही ठिकाणचा कारभार पुत्रपरंपरेनें पाहण्यांत आला आहे.

(२२) शक १६४३ कार्तिक शु. १ स आक्कांनीं देह ठेवला. वेणाबाईच्या प्रमाणें आक्कांची हि समाधि गडावर च आहे. आक्का फार दक्ष होत्या. विचार करा, १६०३ ते १६३२ पर्यंतच्या अस्वस्थतेच्या काळांत त्यांनीं उभय संस्थानें सांभाळिलीं, हे त्यांचे संप्रदायावर केवढे उपकार होत ! गंगाधरस्वामी आले तरी ते नवीन च होते. ते हि आक्कांच्या च सल्ल्याप्रमाणें वागत. तात्पर्य, आक्कामहाराजांनीं आपलें सबंध आयुष्य श्रीसंप्रदायसेवेंत खर्च केलें.

(२३) शक १६०३ माघ वद्य नवमीस श्रीसमर्थ जगाच्या दृष्टीआड झाले, पण निष्ठावंत भक्तांच्या हिशेबीं ते सर्व काळीं व सर्व स्थळीं आहेत च. गडावर तर आहेत च. असा च त्या स्थलाचा महिमा सर्वांनीं गायिला आहे. भीमस्वामींनीं आपल्या वर्णनाचा शेवट हें च सांगून केला आहे :

**स्थलमहिमा अपार । उदंड जाले साक्षात्कार ।**
**भीम ध्यातो निरंतर । चरणरज ॥ ५०**

या साक्षात्काराचीं अनेक उदाहरणें माझ्या वाचण्यांत आणि ऐकण्यांत आलेलीं आहेत. श्रीदासविश्रामधामकारांनीं एक उदाहरण दिलेलें सांगतों.

(२४) एकदां एक भाविक गुरव पुण्यतिथीचा सोहळा पाहण्यासाठीं गडावर आला होता. गर्दींत त्याची सोय न होऊन त्यास प्रसाद मिळाला नाहीं. तेव्हां त्याच्या मनांत आलें, समाधीच्या दर्शनास जाऊन नुसतें तीर्थ जरी मिळालें, तरी तें घेऊन निजूं. म्हणून तो दर्शन घेण्यास गेला. तेव्हां समाधीपाशीं एका ताम्हनामध्यें पक्वान्नाचा नैवेद्य ठेवलेला होता. तो नैवेद्य प्रसाद म्हणून तूं घे, असा आवाज गुरवाच्या कानांवर आला. गुरव दचकला आणि मागें सरला, तों त्रयदा जाली वाणी, स्वीकारी प्रसाद ! गुरवानें प्रसाद घेतला, भक्षिला आणि मग तो कीर्तनश्रवणास जाऊन बसला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ताम्हन परत करण्यास गेला, तर जो तो म्हणे ताम्हन आपलें नाहीं. गुरवानें तें ताम्हन आपल्या पूजेंत ठेवलें. तो प्रसाद त्याला श्रीसमर्थांनीं दिला होता ! (दासविश्रामधाम, ११४, ३२ ते ३६) अनंत कवींनीं केलेल्या अष्टकांत सज्जनगडाविषयीं म्हटलें आहे :

**तेथें जागृत रामदास विलसे जो या जना उद्धरी ॥**

तें यथार्थ होय.

( २५ ) तात्पर्य, गडावर ते प्रामुख्यानें आहेत, ही गोष्ट सर्वांच्या नजरेंत पटकन् भरावी, हें स्वाभाविक आहे. पण मला विचारावेंसें वाटतें, तें असें कीं, ते नाहींत कोठें असें एकादें ठिकाण आहे काय? श्रीसमर्थांनीं च आपल्या एका पदांत सांगितलें आहे कीं,

**जेथें राम तेथें दास। दृढ धरावा विश्वास ॥**

जेथें राम आहेत, तेथें समर्थ आहेत च. आणि राम नाहींत असें ठिकाण च नाहीं,

**रिता ठाव या राघवेंवीण नाहीं ॥**

तेव्हां मग ओघानें च म्हणतां येतें कीं, श्रीसमर्थ कोठें नाहींत असें ठिकाण च नाहीं,

**रिता ठाव या सद्गुरूवीण नाहीं ॥**

उणीव आहे निष्ठेची, म्हणून आम्हांस प्रत्यय येत नाहीं, बाकी ते सर्वत्र आहेत, आपण म्हणूं तेथें आहेत! असोत.

( २६ ) श्रीशिवाजीमहाराजांनीं श्रीसमर्थांच्या सर्व कार्याचा अंगीकार केल्याचें आपण पाहिलें च आहे. पण त्यांच्या पश्चात् हि संभाजीमहाराज, राजाराममहाराज, शाहूमहाराज वगैरे नंतरच्या सर्व महाराजांनीं तें च व्रत पुढें चालविलें होतें. तसें च कागदपत्रांवरून असें हि दिसतें कीं, बाजीराव बल्लाळ, बाळाजी बाजीराव, माधवराव बल्लाळ, माधवराव नारायण, पंत प्रतिनिधि, पंत सचीव वगैरे सर्वांनीं निष्ठापूर्वक श्रीशिवसमर्थांना स्मरून श्रीसमर्थकार्याकडे लक्ष पुरविलें होतें. अमात्यांच्या घराण्याचा प्रश्न च नाहीं. तें घराणें श्रीसांप्रदायिक च होतें. रामचंद्र नीळकंठ अमात्यांनीं केलेली सेवा अपूर्व होती.

( २७ ) हा झाला इतिहास. पण यापुढें हि लोकशाहीच्या काळांत सर्वांनीं च श्रीसमर्थांचें स्वरूप जाणून अभिमानपूर्वक पूर्वजांचें व्रत पुढें चालविलें पाहिजे, जांबेचें श्रीसमर्थमंदिर, चाफळचें श्रीराममंदिर, सज्जनगडावरील श्रीसमाधिमंदिर, तसे च श्रीसमर्थस्थापित ठिकठिकाणचे मठ या सर्व संस्थांची जोपासना केली पाहिजे. श्रीदेवाचें चढतें वाढतें चालविण्यांत आपलें चढतें वाढतें कल्याण आहे, असा श्रीसमर्थांचा महाराष्ट्रास आशीर्वाद आहे.

(२८) श्रीसमर्थ आणि श्रीशिवराय एकामागून एक अवतार घेऊन आले, त्या वेळीं देशाची काय स्थिति होती व धर्म कसा संकटांत होता, हें आपण दहाव्या उल्लासांत पाहिलें च आहे आणि आतां या दोघांच्या अवतारसमाप्तीच्या वेळीं धर्मावरील संकटाचे ढग नाहींसे होण्याच्या मार्गाला लागले होते व पुढील पन्नास पाऊणशें वर्षांत ते समूळ नाहींसे होऊन आकाश अगदीं निरभ्र झालें, हे या दोघा ईश्वरी पुरुषांचे भरतखंडावर थोर उपकार झालेले आहेत. त्यांची विस्मृति भरतखंडास कालत्रयीं हि न होवो ! अशी श्री चरणीं प्रार्थना आहे.



उल्लास विसावा

# ग्रन्थाचा शेवट



समर्थ कैवल्याची धरणी ।
समर्थलीला अकल करणी ।
साच समर्थचरित्रश्रवणीं ।
चाकाटलें चित्त ॥

समर्थांच्या पडलों पदरीं ।
अधिकार हि नसतां तिळभरी ।
नाम मात्र ते घेत वैखरी ।
अहोरात्रीं विनवितसे ॥

[ ( १ ) अवतारखंड मागाहून कां ? – ( २ ) श्रीसमर्थावतार ग्रंथ केव्हां हि लिहितां येईल, अवतार च झाला पाहिजे – ( ३ ) ग्रंथ लिहून वाचकांच्या ऋणांतून मी मुक्त होत आहें – ( ४ ) सारी उसनवारी – ( ५ ) वादांत न शिरतां निर्णय ग्रथित करतां – ( ६ ) ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें – ( ७ ) फलश्रुति – ( ८ ) जन्मसफलतेच्या तीन पायऱ्या – तप, व्याप, त्याग – ( ९ ) प्रत्येकानें आपल्या ऐपतीप्रमाणें या मार्गाला लागावें – ( १० ) रामाची कृपा संपादन करणें हें आपलें पहिलें कर्तव्य – ( ११ ) नुपेक्षी कदा राम दासाभिमानी – ( १२ ) याचों पौराणिक उदाहरणें आहेत च, पण प्रत्यक्ष उदाहरण श्रीसमर्थांचें च – ( १३ ) त्यांनीं आचरून दाखविलेला उघडा धडा – ( १४ ) पण राम आपला कैवार घेतील, यासाठीं आपण काय करावें ? – ( १५ ) त्याला उपाय – ( १६ ) पण ते श्रीसमर्थ तरी आपणांवर कृपा करतील याला उपाय कोणता ? – ( १७ ) श्रीसमर्थभक्ताची ध्यानधारणा – ( १८ ) तशी ध्यानधारणा होण्याला या ग्रन्थाचा उपयोग – ( १९ ) या ग्रन्थाचे वाचक – त्यांच्यापाशीं क्षमेची याचना – ( २० ) श्रीसमर्थवाङ्मयाचें महत्त्व व श्रीचरित्राच्या पुढच्या दोन खंडांचें स्वरूप – इति श्री ]

( १ ) श्रीसमर्थचरित्रमंदिराचें, सात वर्षांमागें, आधीं गाभाऱ्याचें काम झालें, मग तेथून पुढें तीन वर्षांनीं मंदिरावर कळस चढविला गेला आणि आतां मागाहून मंदिराचा पाया भरला जात आहे. आधीं कळस मग पाया रे, अशासारखें हें झालें. त्यांच्या च इच्छेनें हें घडलें, असें म्हणावें. त्यांची इच्छा आपणांस प्रमाण होय. आपणांस त्यांच्या हृदयांत आधीं शिरून त्यांच्या अंतरंगांतील तरंग पाहण्याची संधि मिळाली, त्यामुळें त्यांच्या चरणीं स्वाभाविक प्रेम जडलें. मग त्यांची शिकवण पाहण्यांत येऊन अशा ईश्वरी पुरुषाचें साद्यंत चरित्र कळावें, अशी जिज्ञासा उत्पन्न झाली आणि आतां त्यांच्या पायांपाशीं कायमचा ठाव मिळावा, म्हणून अखेरीस हा चरित्राच्या पायाचा पहिला खंड प्रकाशित होत आहे. या च क्रमांत हे तिन्ही खंड वाचकांच्या अवलोकनांत येणें इष्ट होय, असें मला वाटतें. आपल्या संकल्पावांचून जें हें असें घडलें, तें आपल्या कल्याणाचें च होय. आतां केव्हां हि श्रीसमर्थचरणांपासून दूर होणें नको !

( २ ) गाभाऱ्याचा दुसरा खंड – **श्रीसमर्थहृदय** – आणि शिखराचा तिसरा खंड – **श्रीसमर्थसंप्रदाय**, हे दोन्ही खंड ज्यांच्या अवलोकनांत

आले, त्यांच्यापैकीं कित्येकांनीं पत्रद्वारें विचारणा करावी कीं, पायाचा पहिला खंड—**श्रीसमर्थावतार**—केव्हां प्रकाशित होणार! जें उत्तर द्यावयाचें तें देत असें, पण मीं मनांत म्हणावें, श्रीसमर्थावतार ग्रन्थाचें काय एवढें मोठेंसें आहे, आपण म्हणूं तेव्हां तो लिहून होईल व म्हणूं तेव्हां तो प्रकाशित हि करूं, पण खरें म्हणजे, आतां पुन्हां प्रत्यक्ष श्रीसमर्थावतार च झाला पाहिजे!

**ॐ नमो सद्गुरु रामदास।**
**आदिनारायणरूप निर्दोष।**
**जगदुद्धरावया निःशेष।**
**अवतार तुमचा॥ १**

**देवा सकळ सृष्टिये आदि।**
**शुद्धस्वरूपी निजानंदी।**
**संकल्परूपें तूं अनादि।**
**नारायणस्वरूप॥ २**

**निजभक्तसाह्यतेकारणें।**
**युगानुयुगीं तुज लागे अवतरणें।**
**दुष्ट दैत्यां वधूनि संरक्षणें।**
**स्वधर्मकर्मसंस्था॥ ३**

**जे जे समईं जें जें संकट।**
**भक्तांलागीं पडे अचाट।**
**तेव्हां अवतरोनि नाना दुष्ट।**
**निर्दाळिसी स्वलीळा॥ ४**

**जे वेळेसी जैसें कार्य पडे।**
**ते समईं तुजलागीं तैसें होणें घडे।**
**परी भक्तांचें साह्य करणें आवडे।**
**कायावाचामनेंसीं॥ ५**

—स्वानुभवदिनकर, ९, १

ते तुम्ही आतां च आमची उपेक्षा कराल, अशी शंका हि मनाला शिवत नाहीं, पण महाराज, सांगा, सांगा हो केव्हां येणार, आम्ही अगदीं रडकुंडीस आलों आहोंत!

## प्रार्थना

**महाराज पुन्हां कधीं येणार राष्ट्रोद्धार करणार ॥ ध्रु०**
**शिवकल्याणा संगें घेउनि भूतलिं अवतरणार ॥ १**
**भक्तजनांच्या दैन्या पाहुनि हृदया द्रव फुटणार ॥ २**
**घटिका पळ हि युगसम भासत ' थांब ' किती वदणार ॥ ३**
**धर्मग्लानी पूर्ण जाहली अंत किती बघणार ॥ ४**

**धर्मस्थापनेचे नर ।**
**ते ईश्वराचे अवतार ।**
**जाले आहेत पुढें होणार ।**
**देणें ईश्वराचें ॥ १**

**हीं तव वचनें दासबोधिचीं सत्य कधीं होणार ॥ ५**
**कळवळोनि सद्गुरुराणा सत्वर गति येणार ॥ ६**
**त्या येण्याची वाट पाहत प्राण कंठिं उरणार ॥ ७**
**महाराज पुन्हां कधीं येणार विश्वोद्धार करणार ॥ ध्रु०**

( ३ ) श्रीसमर्थांचा प्रत्यक्ष अवतार व्हावयाचा असेल तेव्हां होईल, तूर्त माझ्यापुरतें इतकें खरें कीं, त्रिखंडात्मक श्रीसमर्थचरित्राचा श्रीसमर्थावतार हा प्रथम खंड प्रकाशित करून मी वाचकांच्या ऋणांतून मुक्त होत आहें.

( ४ ) या ग्रन्थाकडे पाहिलें तर त्यांत माझें असें काय आहे ? असलें च तर फार थोडें आहे. बहुतेक सारी उसनवारी आहे. कल्पनेचा भाग असेल, तेवढा माझा म्हणतां येईल, माहिती सारी इतरांकडून मिळविलेली आहे. श्रीसमर्थचरित्रांतील अत्यंत महत्त्वाचा काळ म्हणजे पुरश्चरणाचा आणि तीर्थाटणाचा. या काळांतील तपश्चर्येच्या पुण्याईवर पुढच्या चरित्राची उभारणी झालेली, पण या च काळांविषयीं माहिती फार थोडी मिळते, उसनवारी करण्याला हि फारशी जागा नाहीं. सुमारें दीडशें वर्षांमागें होऊन गेलेल्या श्रीदासविश्रामधामकारांना हि ही अडचण भासली होती.

**वाक्य असे पां दासबोधग्रंथीं । मंडळी करावी परि गुप्त जगतीं ।**
**बळाऊनि आपसया प्रगट होती । हें बोलिलें स्वयें चालोनि ॥ ९८**

**कोण्या प्रसंगीं काय लीळा । कोण शिष्य तो कोठें जाला ।**
**कोण देव भेटले भोगिले सोहळा । किती श्रम जाला कोणे स्थळीं ॥ ९९**

**राजयोगवरी हा वृत्तान्त । प्रांजळ कवणा हि नाहीं विदित ।**
**मग भारावोनि पुढें जगन्नाथ । बहुतां मुखीं बोलविलें ॥ १००**

— दासविश्रामधाम, १७

आश्चर्य असें, प्रतापकारांनीं एकाददुसऱ्या ओवीपलीकडे या काळांतील श्रीचरित्राचा मुळीं च उल्लेख केला § नाहीं. इतर चरित्रकारांनीं केला असला, तरी तो अगदीं त्रोटक च आहे. तेव्हां मी उसनवारी तरी कोणापासून करणार ? या काळांतील खरी माहिती त्यांची त्यांना च व ती त्यांनीं स्वमुखें क्वचित् च कोणास सांगितली असेल ! चरित्राच्या उत्तरार्धांतील माहिती मात्र बरी च मिळते, कारण त्या काळांत पुष्कळ शिष्योपशिष्यांना त्यांचा सहवास लाभला होता व त्यांच्या कडून श्रीसमर्थांच्या लीला कळण्याला मार्ग होता.

( ५ ) वाचकांच्या हें सहज लक्षांत आलें असेल कीं, श्रीसमर्थ-चरित्रांतील कांहीं प्रसंगांविषयीं कोणी कोणी वाद घालीत असतात, पण हें चरित्र लिहीत असतां मी कोणत्या च वादांत न शिरतां, पूर्ण विचारान्तीं जे निर्णय मला मान्य झाले, ते च मी या ग्रन्थांत ग्रथित केले आहेत. वाद घालीत बसणारांना मी असें विचारीन, त्या काळांत कोणीं केले नसतील, इतके पुरश्चरणाचे आणि तीर्थाटणाचे कष्ट श्रीसमर्थांनीं केले, त्यांनीं धर्मरक्षणार्थ सर्व देशभर हजारों मठ स्थापन केले, त्यांचे लक्षावधि शिष्योपशिष्य होते, कशासाठीं कोणास ठाऊक, पण कांहीं त्यांचे गुप्त हि शिष्य असत,

**समर्थें कित्येक गुप्त शिष्य केले ।**
**ते ते समर्थासी विदित भले ॥**

—श्रीसमर्थप्रताप, १०, १०

ते दुसऱ्या कोणास ठाऊक हि झाले नाहींत, सबंध भरतखंडभर वाटेल तेथें कारणपरत्वें ते शिष्यांना महंती करण्यास पाठवीत असत, त्यांची विशिष्ट नियमबद्ध संघटना होती, सुंदर अक्षर काढण्यापासून तों प्रभावी

---

§ पहा श्रीसमर्थप्रताप ३×८ व १०×६

राजकारणापर्यंत अधिकारपरत्वें सर्वांना त्यांची शिकवण असे, या इतक्या निर्विवाद गोष्टी त्यांच्या चरणीं मस्तक ठेवण्यास पुरेशा नाहींत काय? श्रीसमर्थचरित्र म्हणजे सर्वांना अमृतवृष्टीसारखें वाटलें पाहिजे, तेथें वाद कसला घालावा आणि अहंकारांत वृथा कां बुडावें! त्या दिव्य चरित्राचें चिंतन करतांना अंत:करणांत परमानंदाशिवाय दुसरी वृत्ति च उद्भवूं नये, असें वाटतें!

( ६ ) श्रीसमर्थांचें चरित्र इतकें अद्भुत आहे कीं, त्याला तोड त्रिभुवनांत सांपडावयाची नाहीं! त्यांच्या चरित्रांतील कोणता हि प्रसंग पाहिला तरी तो अपूर्व च वाटतो. एक एक प्रसंग वर्णावा आणि म्हणावें

**ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें ॥**

त्यांच्या चरित्रांतील प्रत्येक प्रसंगाचें माझें हें पालुपद समजा! एक एक प्रसंग आठवावा आणि पालुपद म्हणत जावें. ( १ ) आपल्या आराध्य दैवताच्या बरोबर जन्माच्या च वेळीं दुसरा कोण जन्मला, ( २ ) वयाच्या अकराव्या वर्षी, म्हणजे इतक्या अल्प वयांत विश्वाच्या कल्याणाची चिंता दुसऱ्या कोणीं वाहिली, ( ३ ) लग्नाची ऐन घटिका भरली असतां, सावधान शब्द कानीं पडतां च दुसरा कोण सावध झाला, ( ४ ) दुसऱ्या कोणीं एकसारखें बारा वर्षें गायत्रीचें पुरश्चरण केलें, ( ५ ) ऐन तारुण्यांतील बारा वर्षें दुसऱ्या कोणीं तीर्थाटणांत कंठलीं, ( ६ ) सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं। असा दुसरा कोण, ( ७ ) व्याघ्रादि वन्य पशूंच्या संगतींत दुसरा कोण निर्भयपणें राहिला, ( ८ ) दुसऱ्या कोणीं हजारों मठ स्थापिले, ( ९ ) रामराज्याची घडी बसविली, ( १० ) झोळींत पडलेलें राज्य परत केलें, ( ११ ) सांगा ना, दुसऱ्या कोणीं, आपल्या पश्चात् हि, तसा च संकटकाळ आला असतां, मार्ग दाखविणारा दासबोधासारखा ग्रन्थ निर्माण करून ठेवला? किती आठवीत बसूं? इतिहासांत काय आणि पुराणांत हि काय, असलें दुसरें उदाहरण आढळत नाहीं. म्हणून मला पुनरुक्तीचा दोष पदरीं घेऊन हि म्हणावेंसें वाटतें,

**कृतत्रेत द्वापारीं। जाले अद्भुत अवतारी।**
**परी या समर्थांची सरी। कोणी न पावे ॥**

त्या समर्थांचें संपूर्ण अवतारकार्य वर्णावयाला आणि त्या कार्याचें रहस्य जाणण्याला कोण समर्थ आहे? तद्रूप व्हावें आणि त्यांना ओळखावें! एवढें भाग्य कोणाचें आहे? माझ्या अल्प बुद्धीला जेवढें आकलन करतां आलें तेवढें – तेवढें हि सगळें नव्हे, त्यांतील थोडें – मी सांगूं शकलों!

(७) आतां या ग्रंथाची फलश्रुति काय, असा प्रश्न विचारणें योग्य होईल. ती फलश्रुति एका वाक्यांत मी अशी सांगेन कीं, आरंभींच्या उल्लासांत म्हटल्याप्रमाणें

**सामर्थ्य आहे चळवळेचें। जो जो करील तयाचें।**
**परंतु येथें भगवंताचें। अधिष्ठान पाहिजे॥**

—श्रीदासबोध २०, ४, २६

या ओवींत श्रीसमर्थांनीं स्वानुभवाचा जो सिद्धान्त सांगितला आहे, त्याची सत्यता, हें चरित्र वाचून आपणांस पटली पाहिजे. पटली पाहिजे इतकें च नव्हे, तर ती पटून, त्या सिद्धान्ताला अनुसरून आपल्या सर्वांच्या हातून तशी कृति घडली पाहिजे. श्रीसमर्थांनीं बारा वर्षें पुरश्चरण करून तें अधिष्ठान मिळविलें होतें. बारा वर्षें तीर्थाटण करून देशस्थितीचें ज्ञान करून घेतलें होतें. देशस्थिति धर्मरक्षकांना आणि राजकारणी पुरुषांना, संतसाधूंना आणि वीर पुरुषांना जन्माला घालीत असते. तत्कालीन देशस्थितीनें श्रीशिवसमर्थांना जन्म दिला होता. ती देशस्थिति पाहून च श्रीसमर्थांनीं आपल्या कार्याची दिशा ठरविली. त्यांनीं सर्व देशभर हजारों मठ स्थापिले, लक्षावधि जनाचीं मनें आपलीशीं करून घेतलीं, श्रीशिवरायाच्या यशासाठीं देवीला भार घातला, आपल्या चळवळीचें सामर्थ्य जगाच्या प्रत्ययास आणून दिलें, रामराज्याचा पाया घातला, तें राज्य सर्वत्र व्हावें, अशी इच्छा दर्शविली आणि कृतार्थ होऊन श्रीरामस्वरूपीं अखंड लीन होऊन राहिले.

(८) हें चरित्र आणि त्याची फलश्रुति पाहिली, म्हणजे जन्मसफलतेच्या **तप, व्याप** आणि **त्याग,** अशा तीन पायऱ्या दिसतात. त्यांनीं बारा वर्षें पुरश्चरण आणि बारा वर्षें तीर्थाटण करून परमेश्वरप्राप्तीसाठीं **घोर तप** केलें, नंतर सुमारें तीस वर्षें धर्मासाठीं आणि राष्ट्रासाठीं **प्रचंड व्याप** केला आणि शेवटचीं सहा सात वर्षें सर्वस्वाचा **संपूर्ण त्याग** करून चाफळ आणि सज्जनगड येथें निवास केला.

तप, व्याप आणि त्याग म्हणजे च आपले ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम आणि वानप्रस्थाश्रम, असें म्हणतां येईल, फक्त त्यांचा गृहस्थाश्रम म्हणजे राष्ट्राचा व्यापक प्रपंच होय. राष्ट्रासाठीं आणि धर्मासाठीं त्यांनीं आपली जन्मसिद्ध निःस्पृहता बाजूस सारून केवढा व्याप केला, पण अखेरीस सर्व कांहीं श्रीरामचरणीं अर्पण करून ते आपल्या मूळ स्वरूपीं लीन होऊन राहिले ! हा च त्यांचा अभिप्राय पुढील पदांत हि व्यक्त झालेला मला भासतो :

**माझी निस्पृहता गेली तुझ्या पाईं । ते माझी मज देंई देवराया ॥ १**
**नलगे संप्रदाव मज नलगे समुदाव । माझा अंतर्भाव उच्चाटला ॥ २**
**नलगे प्रतिष्ठा मज नलगे गौरव । नलगे हावभाव मान्यतेचा ॥ ३**
**रामदास म्हणे दंभें शब्दज्ञानें । वाया अभिमान कासयासी ॥ ४**

या त्यांच्या पदांतून च अर्थ निघतो कीं, श्रीसमर्थांची मूळची वृत्ति निःस्पृहतेची होती, पण देवकार्य म्हणून त्यांना व्याप करावा लागला होता आणि त्यामुळें च लोक त्यांच्या भोंवती गोळा झाले होते, त्यांचा समुदाय झाला होता आणि संप्रदाय बनला होता. साहजिक च जगांत त्यांची प्रतिष्ठा वाढून ते लोकमान्य झाले होते, जातील तेथें त्यांचा गौरव होऊं लागला होता. अवताराचा हेतु सफल झाला होता, धर्माच्या आड आलेलीं विघ्नें लयाला गेलीं होतीं. पण याचा त्यांना यत्किंचित् हि अभिमान वाटत नव्हता. ते रामाला म्हणत आहेत, " रामा ! केवळ तुमची आज्ञा म्हणून मला माझी निःस्पृहता बाजूस गुंडाळून ठेवून, हा सारा व्याप करावा लागला होता ! रामा, आतां आपलें उद्दिष्ट साध्य झालें आहे आणि माझी स्वतःची अशी कोणती च इच्छा उरली नाहीं, तेव्हां आपला आपण हा व्याप सांभाळा आणि माझी मूळची निःस्पृहता माझी मला परत द्या."

( ९ ) आधीं तप, मग व्याप आणि शेवटीं त्याग, असा बोध या चरित्रापासून होतो. तो मनांत ठसवून घेऊन प्रत्येकानें आपल्या ऐपती-प्रमाणें जगाच्या, राष्ट्राच्या, समाजाच्या किंवा निदान स्वतःच्या कल्याणा-साठीं रघुनायकाला आपुलेसें करून घेण्याच्या मार्गाला त्वरित लागलें पाहिजे. त्यावांचून जन्माची सफलता नाहीं.

( १० ) रामाची कृपा संपादन करणें, हें आपलें पहिलें कर्तव्य होय. हा बोध श्रीसमर्थांच्या चरित्रापासून आणि शिकवणीपासून होतो. त्यांची

शिकवण बहुविध आहे, व्यापक आहे, ब्रह्मांडाला गवसणी घालणारी आहे, पण तिचा पाया हा असा आहे. काय पाहिजे तें करा, जीवाचा आटापिटा करा, अनेक साधनें करा, पण राम आपलासा करून घेतल्या-वांचून राहूं नका. हें च श्रीसमर्थांच्या जीवींचें गुज होय. तें त्यांनीं शंभर ठिकाणीं, निरनिराळ्या शब्दांनीं दर्शविलें आहे. तें सारें वाचावयाचें आणि कोरडें रहावयाचें, हें योग्य नव्हे. पुनरुक्ति होत असेल तर होऊं द्या, पण ऐका :

**राघवाचें नाम राखशिल जरी । तुज राखे तरी देवराणा ॥ १**
**देवराणा माझे जीवींचें जीवन । आवडीनें खूण सांगतसे ॥ २**
**सांगतसे खूण माझे अंतरींची । सर्व हि सुखाची सुखमूर्ति ॥ ३**
**सुखमूर्ति राम सोडूं नको कदा । तुज तो आपदा लागों नेदी ॥ ४**
**लागों नेदी कष्ट आपुल्या दासासी । रामीरामदासीं साहाकारी ॥ ५**

याप्रमाणें ते आपल्या अंतरींची खूण प्रेमानें सांगत असतां ती मात्र मानावयाची नाहीं, तथापि त्यांच्यावर आपला पूर्ण विश्वास आहे, असें म्हणावयाचें, ही विसंगति नव्हे काय ?

**आपंगिलें मज श्रीरामसमर्थें । ब्रह्मांड पालथें घालूं शके ॥ १**
**वक्रदृष्टीं पाहातां भरील त्याचा घोंट । काळाचें हि पोट फाडूं शके ॥२**

हा त्यांचा अनुभव खोटा म्हणावयाचा काय ? नाहीं, पण आपण आपल्या वर्तनानें काय दर्शवीत असतों ? तसेंच मनाच्या श्लोकांत

**समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥**

असा प्रश्न मोठ्या धिटाईनें साऱ्या जगाला आव्हानपूर्वक विचारावयाचा, पण त्या समर्थाचें एकनिष्ठ सेवक मात्र व्हावयाचें नाहीं, हें आपलें वर्तन सुसंबद्ध म्हणतां येईल काय ?

( ११ ) मनाच्या श्लोकांत श्रीसमर्थ एरव्हीं मनाला उद्देशून बोलले आहेत, पण एका श्लोकांत मात्र ते तुम्हाआम्हांला उद्देशून बोलत आहेत आणि आश्वासन देत आहेत. त्या श्लोकांत ' मना ' च्या ऐवजीं ' जना ' या शब्दाचा त्यांनीं उपयोग केला आहे. ते सर्वांना बजावून सांगतात कीं, आपण उगीच कांहीं तरी बोलत आहोंत, असें समजूं नका, आपलें हें

बोलणें निरपवाद सत्य आहे, तें कधीं खोटें पडणार नाहीं. ते हडसून खडसून म्हणतात,

**जना वाक्य नेमस्त हें सत्य मानी ।**

कोणतें वाक्य? तर

**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ।**

रामाला आपल्या दासाचा फार अभिमान वाटत असतो. त्यांनीं त्याची कधीं हि उपेक्षा केली नाहीं, ते करीत नाहींत, करणार नाहींत. उदाहरणें सांगून हें आश्वासन श्रीसमर्थांनीं दहा आणि दहा, वीस वेळां दिलें आहे. पहा श्रीश्लोक मनाचे, २८ ते ३७ आणि ११६–१२५. २८ ते ३७ यांत सर्व उदाहरणें श्रीरामचरित्रांतील च दिलेलीं आहेत आणि ११६ ते १२५ त पौराणिक आणि दशावताराचीं उदाहरणें घेतलीं आहेत. त्यांत

**नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ।**

असें म्हटलें आहे. पण त्यांत हि १२३ व्या श्लोकांत रामावताराचें उदाहरण सांगतांना

**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ।**

असा च प्रयोग केला आहे. श्रीसमर्थ कधीं तरी चुकतील काय? कौतुक वाटतें !

( १२ ) कोणी म्हणेल, हीं प्राचीन, पौराणिक उदाहरणें काय कामाचीं? श्रीसमर्थ तसें म्हणत नाहींत, म्हणणार हि नाहींत, पण मी म्हणतों, सोडून द्या तीं प्राचीन आणि पौराणिक उदाहरणें, या त्यांच्या आश्वासनपर सिद्धान्ताला धादान्त उदाहरण म्हणजे स्वत: श्रीसमर्थांचें च आहे, तें पहा. हें चरित्र हा च सिद्धान्त सिद्ध करीत आहे. कशास पुनरुक्ति करूं? वाचून पहा, पुरश्चरणाच्या काळांत, तीर्थाटणांत, रानांत वनांत डोंगरांत, हिमालयांत, सर्वत्र दुसऱ्या कोणी त्यांची काळजी वाहिली आणि सांभाळ केला! हा च एक मुख्य बोध तुम्ही, आम्ही या चरित्रापासून घ्यावयाचा आहे. ही च या ग्रन्थाची फलश्रुति होय, श्रीसमर्थांच्या सामर्थ्याची ही च किल्ली होय !

( १३ ) स्वतः आचरून, अनुभव घेऊन, इतरांना उपदेश करणाऱ्या श्रीसमर्थांचें ऐकावयाचें, तर त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें च गेलें पाहिजे. आधीं भगवंताचें अधिष्ठान प्राप्त करून घेऊन मग उद्योगास लागणें, हा त्यांचा मार्ग होय. त्या मार्गानें च ते स्वतः गेले. त्यांनीं श्रीरामाची कृपा संपादन करण्यांत आयुष्याचीं चोवीस वर्षें खर्च केलीं, राम आपलासा करून घेतला आणि मग राष्ट्रोद्धाराचा व्याप केला. त्यांनीं आचरून दाखविलेला हा उघडा धडा आहे. तो च महाराष्ट्रानें गिरविला पाहिजे.

( १४ ) तात्पर्य, कोणता हि व्याप करण्यापूर्वीं आधीं राम कैवारी करून घेतले पाहिजेत, हा बोध या चरित्रापासून होतो, पण प्रश्न असा येऊन पडतो, ते राम आपला कैवार घेतील, यासाठीं आपण काय करावें.

( १५ ) तें श्रीसमर्थांनीं च एकवीस समासीच्या पंधराव्या समासांत अगदीं उघड रीतीनें सांगितलें आहे.

**आतां हि जयासी वाटे भेटावें । रामें मज सांभाळीत जावें ।**
**ऐसें दृढ घेतलें जीवें । तरी ऐका मी सांगेन ॥ ३७**

**श्री राम जय राम जय जय राम । ऐसा कांहीं येक धरूनि नेम ।**
**जप कीजे तेणें आत्माराम । जोडेल नेमें ॥ ३८**

—एकवीससमासी, १५

पण श्रीसमर्थ स्वतः सांगणार नाहींत, असा एक सुलभ उपाय मला सुचतो, तो मी सांगतों. श्रीसमर्थरामदासांना च आपण आधीं आपलेसे करून घ्यावे, म्हणजे ते आपणांस रामाच्या पायांवर नेऊन घालतील. श्रीरामदासाशीं आणि श्रीरामाशीं आपलें नातें च तसें आहे. त्या च पंधराव्या समासांत त्यांनीं तें नातें सांगितलें आहे. श्रीसमर्थ आपणांस सांगतात :

**शिष्या सांगतों तुज नेम । तो चि रे तुझा स्वधर्म ।**
**ज्ञातेपणें हि माझा राम । विसंभों नको ॥ ५२**

**राम स्वामी जाण माझा । तरी तो तुज होय आजा ।**
**तुझें लडिवाळपण वोजा । चालवील आत्मारामु ॥ ५३**

किती नि:संदिग्ध हें आश्वासन आहे ! मला आपली, आपली म्हणजे तुमची, धन्यता वाटते ! समर्थ हे आपले वडील, तेव्हां राम हे आपले सहज च आजोबा झाले. आणि मजसारखीं प्रपंची माणसें तेव्हां च सांगूं शकतील कीं, आजोबांना, नातवंडांना अंगाखांद्यावर लडिवाळपणानें खेळविण्याची फार आवड असते. हें जर खरें, तर आपण आधीं बापाची च कृपा संपादन करावी, म्हणजे ते आपण होऊन आपणांस आजोबांच्या मांडीवर नेऊन बसवितील !

( १६ ) पण वडिलांची तरी कृपा होण्यासाठीं काय करावें ? त्याला हि मी एक उपाय सुचवितों. ध्यान, धारणा इत्यादि क्रिया आणखी काय असतील, त्या मला ठाऊक नाहींत, पण जन्मापासून समाधीपर्यंतच्या श्रीसमर्थचरित्राचें चिंतन करणें, १५३० त जांबेस अवतार घेतल्यापासून तों १६०३ त सज्जनगडीं तो समाप्त करीपर्यंत श्रीसमर्थांनीं ज्या ज्या लीला, ज्या ज्या काळीं आणि स्थळीं केल्या, त्या त्या लीला, त्या त्या काळीं आणि स्थळीं अंतर्दृष्टीनें पाहणें, ही च श्रीसमर्थभक्ताची ध्यानधारणा होय. अशा ध्यानधारणेंतून श्रीसमर्थचरित्रांतील कोणता प्रसंग निसटूं शकेल ? त्यांच्यावरील आपण आपली अंतर्दृष्टि केव्हां हि ढळूं च दिली नाहीं, तर ते आपणाला केव्हां हि टाळूं शकणार नाहींत !

( १७ ) तिकडे राममंदिरांत गुलाल उधळला जातो तों इकडे हें बालक ट्याहां करतें, तें त्याचें ट्याहां आपण ऐकावें, त्यांच्या नंतरच्या साऱ्या बाललीला पाहाव्या, त्यांच्या जवळ कोणीं लग्नाची गोष्ट काढतां च त्यांनीं जें अकांडतांडव करावें, त्याचे आपण साक्षी व्हावें, आईच्या शब्दाला मान देऊन अंत:पट धरीपर्यंत उभी राहिलेली ती बालमूर्ति आपण हि पहावी, सावधान शब्द कानीं पडतां च ते निसटले व कोणास च सांपडले नाहींत, पण आपण त्यांचा पिच्छा सोडूं च नये, त्यांच्या पाठोपाठ जावें, गंगेंत त्यांनीं उडी टाकली, तशी आपण हि टाकावी व त्यांच्या बरोबर च पोहत परतीराला लागावें, तेथून त्यांच्या मागोमाग गंगेच्या कांठाकांठानें जावें, पंचवटीस पोचल्यावर श्रीरामापुढें उभें राहून त्या बालस्वामीनें मनांतल्या मनांत जरी रामाची प्रार्थना केली असली, तरी आपण त्यांच्या हृदयांत शिरून ती प्रार्थना ऐकावी, टांकळीस नजीकच्या संगमावर

पात्रांत उभे राहून ते जप जपत असतां आपण त्यांच्या सन्निध च असावें, तात्पर्य, आपण त्यांची सावली होऊन रहावें, त्यांच्या बरोबर तीर्थाटणास निघावें, हिमालयकुंडीं देह झोकून देण्याच्या बेतांत ते असतां त्यांना रामानें वरच्या वर धरलें, तेथें उपस्थित होण्याला आपण मुळीं च चुकूं नये, म्हणजे तेथें एका च वेळीं आपणांस दोघांचें हि दर्शन घडेल, वीस वर्षांनीं आईला भेटले असतां आईला जो आनंद झाला, त्या आनंदाचे आपण हि वाटेकरी व्हावें, आईला दिव्य दृष्टि देऊन आणि कृतार्थ करून, या खेपेस तिची परवानगी घेऊन निघाले, तसें आपणहि निघावें, ते जातील तेथें आपण हि जावें, मग ते घळींत जावोत, भुयारांत शिरोत, कीं एखाद्या डोहांत बुडी मारून जाऊन बसोत, त्यांची जणूं कांस धरल्याप्रमाणें आपण जेथें तेथें असावें च, त्यांच्या कडे कोण कोण येतात आणि काय काय बोलतात, तें सारें पहावें व ऐकावें, शिवाजीराजाबरोबर एकान्तांत कांहीं नाजुक कारभाराविषयीं ते खलबत करीत बसले असले आणि त्या वेळीं तेथें येण्यास कोणास हि परवानगी नसली, तरी त्या ठिकाणीं हि देहेवीण जाण्यास आपणांस कोणी प्रतिबंध करूं शकणार नाहीं, आपण तेथें हि जावें आणि त्यांचीं खलबतें ऐकावीं, ऐकावीं पण आज हि तीं सारीं च बाहेर फोडूं नयेत, त्यांचें अखंड चिंतन करीत आपल्या मनांत च ठेवावीं, १६०३ च्या माघ वद्य अष्टमीपर्यंत तर आपण जवळ असावें च, पण नवमीच्या दिवशीं सुद्धां, त्यांनीं इतरांना बाहेर जाण्याची आज्ञा केल्यावर हि आपण त्यांचे पाय घट्ट धरून आंत च रहावें आणि शेवटच्या रामनामाचा प्रचंड गजर करतांना त्यांचें जें दिव्य ध्यान होतें, तें आपण आपल्या हृदयांत आमरण अखंड सांठवून ठेवावें ! त्यांचा सहवास लाभण्याची इतकी अनुकूलता असतांना आपण कष्टी होण्याचें कांहीं च कारण नाहीं. श्रीसमर्थ म्हणजे मारुतीचा अवतार, ते चिरंजीव आहेत. ते कोठें गेले नाहींत आणि आपण त्यांना सोडून कोठें जाऊं नये. त्यांची कृपा संपादन करण्याचा मला आज हा च मार्ग दिसत आहे.

**रामदास रामदास । हा चि सदा निदिध्यास ।**
**लागावा तो रात्रंदीस । आपुल्या मना ॥**

इतका आपणांस ध्यास लागल्यावर त्यांना दूर राहवणार नाहीं, त्यांना धीर धरवणार नाहीं, कृपा केल्यावांचून ते राहणार नाहींत ! हें ब्रह्मलिखित समजा.

( १८ ) श्रीसमर्थांचें असें ध्यान करण्याला हा ग्रन्थ श्रीसमर्थ-भक्तांच्या उपयोगीं पडावा, अशी माझी इच्छा आहे. माझ्यापुरती या ग्रन्थाची तेवढी च फलश्रुति होय.

( १९ ) मी जाणूं शकतों कीं, या चरित्रग्रन्थाचे वाचक नुसते तिऱ्हाईत नसून श्रीसमर्थांचे अभिमानी उपासक असणार. नुसता वाचक तिऱ्हाइतासारखा असतो, त्याच्या ठिकाणीं आपलेपणा नसतो, त्याला कसलें च सुखदु:ख नसतें. उपासक ऋणानुबंधी असतो. केवळ चिकित्सक, चिकित्सा करीत च कोरडा राहूं शकेल, उपासक अवगाहन केल्यावांचून — भिजल्यावांचून — राहणार नाहीं. चिकित्सकाच्या मनावर तादृश परिणाम होणार नाहीं, पण भक्ताचे डोळे च, त्याच्या अंत:करणां-तील प्रेमळ खळबळीची साक्ष पदोपदीं पटवितील.

**श्रीसमर्थ हे उपासना । जनांत आणिती मना ।**
**रघोत्तमा उपासिती । सखे चि ते चि वाटती ॥**

असे प्रेमळ वाचक या ग्रन्थास लाभोत ! अशा सहृदय वाचकांस माझी विनंति कीं, मागचें पुढचें अनुसंधान न राहिल्यामुळें कांहीं पुनरुक्ति झाली असेल, कोठें न समजून अज्ञानानें माझ्या हातून चुक्या झाल्या असतील, कोठें कांहीं अप्रयोजकपणा हि घडला असेल, तरी अशा सर्व दोषांबद्दल मला क्षमा करून माझ्या केवळ भावनेकडे पाहून ग्रन्थाचा स्वीकार करा.

( २० ) संपलें माझें बोलणें, जसें त्यांनीं बोलविलें तसें बोललों. भक्ताच्या दृष्टीनें श्रीसमर्थ परब्रह्म च होत, पण ते राष्ट्रगुरु होते, ही त्यांची भूमिका सर्वांना मान्य व्हावी, अशी आहे. त्यांचें वाङ्मय म्हणजे राष्ट्रगुरु या नात्यानें त्यांनीं आपणा सर्वांस केलेला उपदेश होय. तें बोधवाङ्मय आहे. तें वाचलें, अभ्यासिलें, त्याचें मनन केलें, म्हणजे आपणांस वेदाध्ययन घडलें, औपनिषदिक ज्ञान झालें, श्रीमत् भगवद्गीता कळली, असें समजावें, कारण भगवद्वाक्याविरहित ते कांहीं बोलले च

नाहींत. अशा त्यांच्या वाङ्मयाच्या अध्ययनानें प्रपंच आणि परमार्थ, हीं दोन्ही साधतील. तें वाङ्मय शाब्दिक ज्ञानासाठीं किंवा केवळ विद्वत्तेसाठीं वाचावयाचें नसून आत्मोद्धारासाठीं वाचावयाचें असतें. तें वाचीत असतां दृष्टि सारखी अंतर्मुख होऊन स्वतःकडे वळलेली असावी. पुढील खंडांत आपण तसा प्रयत्न करून पाहूं. त्या खंडांत आपण त्यांच्या हृदयांत शिरून, त्यांच्या अंतरंगांतील तरंग अवलोकन करण्याचा हेतु मनांत बाळगून, त्यांच्या संपूर्ण वाङ्मयाचें निरीक्षण करूं आणि त्याच्या पुढच्या म्हणजे शेवटच्या तिसऱ्या खंडांत, त्यांच्या संप्रदायाचें स्वरूप तेव्हां कसें स्पृहणीय होतें, आमच्या अज्ञानामुळें आणि त्या अज्ञानांत निष्काळजी-पणाची आणखी भर पडल्यामुळें सांप्रत तें कसें निकृष्ट झालें आहे व पुढें पूर्ववत् कसें उज्ज्वल व्हावें, याचा विचार करूं. समर्था !

**इति श्रीसमर्थावतार । कालोचित प्रकटतो साचार ।**
**ठसावा मनीं हा निर्धार । भक्तजनांच्या ॥**

शंकर श्रीकृष्ण देव

श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळें
सोमवार, माघ वद्य ९, १८७०

# परिशिष्टें

(१) वाकेनिसी टिपण

(२) बखरीवरून शकावली

(३) श्रीरामजानकीसंवाद

(४) मेरुस्वामींच्या शब्दांत

- (श्री) अभिवंदन
- (रा) कृपावलोकन
- (म) वरदान
- (दा) उपदेशरहस्य
- (स) आपलें भाग्य

# ( १ ) वाकेनिसी टिपण

## श्रीरामसमर्थ

" स्मरणार्थ श्रेष्ठ व समर्थ यांचा जन्म होऊन लीला श्रीगंगातीरीं व श्रीकृष्णातीरीं राहोन अनंत लीला केल्या तीं चरित्रें भक्तमंडळींनीं लिहून ठेविलीलीं आहेत ते वाकेनिसीस लिहिणें म्हणोन दिवाकर गोसावी याणि सांगितल्या वरून अंताजी गोपाळ देशकुळकर्णी परगणे कुडाळ तेहि लिहिले शके १६०३ दुर्मती नाम संवत्सरे माघ वद्य १३ सौम्यवासरे तद्दिने लिख्यते सूर्याजीपंत याचा जन्म जाला त्या दिवसा पासोन चरित्र जालेलें....

१ सूर्याजीपंत याचा जन्म मौजे जांब पाा अंबड येथें शालिवाहन शके १४९० या शकांत जन्म जाला पिता लहानपणीं वारले उपासना श्रीरघुपतीची चालउन श्रीसूर्यआराधना करित आसतां शके १५२५ माघ शुद्ध ७ सप्तमीस श्रीसूर्यवर दोन पुत्र होतील मदंशें करून येक व मारुतीअंशें करून येक पुढीले संवत्सरी श्रीनवमीच्या समारंभांत श्रीरघु-पतीचें दर्शन होईल म्हणोन वर दिल्हा नंतर शके १५२६ क्रोधीनाम-संवत्सर चैत्र शुद्ध आष्टमीस मध्यरात्रीं दूत येऊन मारुतीच्या देवालयांत सूर्याजीपंत यास नेलें तेथें श्रीरामलक्ष्मण उभयताचे दर्शन होऊन अनुग्रह करून तांब्र मूर्ती च्यार देऊन दोघे पुत्र होऊन मदउपासना ज्येष्ठ पुत्र श्रीगंगातीरीं राहोन जगदोत्धार करील कृष्णातीरीं कनीष्ट राहोन जगदोत्धार करील म्हणोन वर देऊन अदृश्य जाले

२ श्रेष्ठाचा जन्म १५२७ विश्वावसुनामसंवत्सर मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीस जन्म जाला मातोश्रीनी नांव गंगाधर ठेविलें श्रीयेकनाथस्वामीच्या दर्शनास मुलास घेऊन गेले नाथमहाराजानी मुलाचें वर्णन करून नाव श्रेष्ठ ठेविलें बहुत आदरेंकरून निरोप दिल्हा

३ श्री जन्म शके १५३० कीलकनामसंवत्सरीं चैत्र शुद्ध नवमी रामजन्मसमई जन्म जाला त्यास हि नाथमहाराजाच्या दर्शनास भानजी गोसावी बोदलापुरीकर या सुध्या पैठणास गेले नाथानी मुलाचें वर्णन बहुत करून हा मारुतीअंश आवतारी हा परम समर्थ होईल कोण्ही

शककर्ता कृष्णातीरीं होईल याच्या योगें त्याची कीर्ति होऊन धर्मस्थापक होईल उपासनेचे उत्तीर्ण होऊन जगदोत्धार करील आम्ही आवतार समाप्त करितो म्हणोन अत्यादरें निरोप दिल्हा

४ श्रेष्ठाचा व्रतबंध पाचवे वर्षीं व समर्थांचा हि पांचवे वर्षीं व्रतबंध जाला सातवे वर्षीं श्रेष्ठाचें लग्न अंबडकर देशमुख याची कन्येसी जालें नाव पार्वतीबाई दाहावे वर्षीं मारुतीच्या देवालईं कवच्याचें पठण करित आसता श्री नी आनुग्रह देऊन रामीरामदास हे नामाभिधान ठेऊन श्रीगंगातीरीं जगदोत्धार करा म्हणोन आदन्य जाहाले १५३६ आनंदनाम-संवत्सरे फाल्गुन शुद्ध ११ मध्यरात्रीं अनुग्रह जाला

५ समर्थास वय वर्षे ७ शके १५३७ राक्षसनामसंवत्सर मार्गशीर्ष शुद्ध ९ सूर्याजीपंत परंधामा प्रती गेले श्रेष्ठाचें वय दाहा वर्षाचें

६ श्रेष्ठ कोणकोणास आनुग्रह देऊं लागले त्या समईं समर्थांनी मला अनुग्रह द्यावा म्हणोन विनंती केली श्रेष्ठानी उत्तर केलें कीं येव्हा गडबड करूं नये त्या वरून रुसोन मारुतीच्या देवालईं जाऊन निद्रा केली तेथें रघुपतीनी येऊन आनुग्रह करून रामदास हें नाम ठेविलें कृष्णातीरास जाऊन जगदोत्धार करावा सिसोदेयाचे वंशीं सांबवरें करून व देवीच्या वरें करून शिवनामा होणार आहे त्यास उपासना सांगावी धर्मस्थापना करवावी म्हणोन आज्ञा जाहली वरदहास्त मस्तकीं ठेऊन आदन्य जाले शके १५३८ नळनाम संवत्सरे माध्यान्ही दोन प्रहरी श्रावण शुद्ध नवमीस मारुतीच्या देवालईं अनुग्रह जाला

७ कोणे येके समईं वडावरून पाण्याच्या डोहांत उडी घेतली तेथें खडक होता तो कपाळास लागोन टणु आले त्यास आवाळु ऐसें म्हणत होते उजवेकडेस आमरणांत होतें

८ समर्थांनी बाळलीला अनेक प्रकारची केली झाडावरून झाडावर उडावें घरावरून घरावर उडावें लोकाची मुलें झाडावर नेऊन ठेवावी लग्नाची गोष्ट ऐकतां च दगड मारीत पळोन जावें श्रेष्ठास समजावें किंवा मातुश्रीची गाठ पडल्यास समजोन आणावें मातुश्रीच्या मनांत नारोबाचें लग्न करावें ऐसें श्रेष्ठानी ऐकोन बोलिले कीं नारोबाचे लग्न केल्यास हातीचा

जाईल वेड्या मला वंश आधीक असा अर्थ नाहीं नारायणाचे लग्न अवस्यमेव कर्तव्य मर्जी आपली त्यावर नारोबास मातुश्रीनी बोलाऊन बोलिली कीं बापा माझी गोष्ट अैकतोस आज्ञा श्री नी म्हटले लग्नाची गोष्ट काढली आसता रागे भरता व दगड मारता तरि अंत्रपाट धरी तोपर्यंत नाही म्हटलेस तर माझ्या गळ्याची शफत असे यावर बंधु बोदलापुरीकर याची कन्या आसनगावी होते तेथें लग्नाचा निश्चय करून लग्नास गेले लग्नविधी होत आसता श्रेष्ठाची समर्थाची च्यार नदरा होता च उभयतानी परस्परें हासावें सावधान म्हणोन ब्राह्मणानी अंत्रपाट धरिता च सावध च आहे मातुश्रीचे हि शफतीपासून मुक्त जालो म्हणोन पळाले ते पंचवटीस गेले शके १५४२

९ समर्थ गेल्यानंतर मातुश्रीस बहुत दु:ख जालें श्रेष्ठानी त्याचे समाधान करून आपण श्री ची सेवा करीत भक्तिरहस्यादि ग्रंथ करून उपासना वाढऊन आपण श्रीगंगातीरी जांबेस राहिले

१० समर्थ लग्नातून निघाले ते जांबेत अश्वथावर तीन दिवस होते तेथून निघोन पंचवटीस येऊन श्री दर्शन करून टाकळी येथें राहोन बारा वर्षें पुरश्चरण परम तीव्रतेनें केलें त्या समईं श्री ची आज्ञा कृष्णातीरास जावें पुरश्चरण समाप्त करून आज्ञे प्रमाणें जातो असें म्हणत असावे बारा वर्षांच्या आत दशकपंचक येथील कुळकर्णी मृत पावला त्याची स्त्री सहगमनास आली त्या समईं स्वामी ब्रह्मयज्ञ करीत आसतां बाईनी नमस्कार केला अष्टपुत्रा सौभाग्यवती म्हणौन स्वामीनी आशीर्वाद दिल्हा बाई बोलिली की या जन्मीं की पुढिले जन्मीं स्वामीनी भ्रूसंकेतें विचारिलें जवळच्यानी विनंती केली त्या काळीं स्वामी बोलिले कीं दासानी रघुपतीस बोल लाविला म्हणोन शव जवळ आणवोन ब्रह्मयज्ञ करीत आसता गंगोदके करून सिंचन केलें शव उठलें त्या काळीं श्री बोलिले कीं बाई पूर्वीं आठ पुत्र हल्ली दोन पुत्र येकुन दाहा पुत्र होतील त्यांचें नाव दशपुत्रे पडिलें हे चरित्र शके १५४५ रुधिरोद्गारिनाम संवत्सर वैशाख शुद्ध दशमीस समाप्त जाले बाईस प्रथम पुत्र जाला तो स्वामीस अर्पण केला त्याचे नाव उध्दव गोसावी

११ शके १५५४ पुष्पाचे गोष्टीचे चरित्र जालें

१२ शके मजकुरी १५५४ आंगीरानामसंवत्सर शिवनामा उत्पन्न जाला कृष्णातीरास जावें पृथ्वीप्रदक्षणा करून जातो म्हणोन गेले फाल्गुनमासी शुद्धपक्षीं

१३ बारा वर्षें पर्यंत काशीहिमालयादि करून श्वेतबंदी जाऊन बिभीषणाची भेटी घेऊन प्रदक्षणेचे समईं अनेक स्थळीं अनेक प्रकारची लीला केली त्याचा विस्तार उत्धव गोसावी लिहिजेलें पंचवटीस श्री चें दर्शन करून श्रीकृष्णातीरीं पंधराशें सासष्टींत आले.

१४ शके १५६६ तारणनाम संवत्सरीं महाबळेश्वरीं श्री मारुतीची स्थापना करून वाईस मारुतीची स्थापना करून माहुलीसंगमीं व जरंड्या-वर राहाणें तेथें जयरामस्वामी तुकाराम रंगनाथस्वामी रघुनाथस्वामी आनंद-मूर्ती धरणीधर देव केशवस्वामी वामनस्वामी इत्यादिकाचीं दर्शनें जाली त्या लीलेचा विस्तार आलाहिदा बाजीपंतीं लिहिले आहे

१५ श्रीकृष्णातीरीं शिष्यसांप्रदाय शाहापुरकर इत्यादि मंडळी आका वेणुबाई आंबाजी चाफळीं नरसो मलनाथ भानजी गोसावी आदिकरून सांप्रदायी जाले शिरगांवीं आंबाजीचे मातुश्रीस व बंधूस तेथें ठेऊन टाकळीहून उत्धवास आणविलें शके १५६७ पार्थीवसंवत्सरीं श्री च्या नवमीच्या उत्साहास प्रारंभ केला त्या उत्साहात आंबाजीचे नाव कल्याण म्हणोन फांदी तोडल्यामुळें पडिलें त्या च सालीं विहीरींत भिमाजीबावास आनुग्रह जाला हें चरित्र मसुरमुक्कामीं जालें तपशील आलाहिदा लिहिले आहे

१६ शके १५६९ यकोणहातरींत आंगापुरचे डोहातून मूर्त आणली शके १५७० सर्वधारीनाम संवत्सरीं उत्साहास प्रारंभ चाफळीं जाहला

१७ आकरा मारुतीची स्थापना शके १५६७ पासून १५७२ पर्यंत आकरा मूर्तीची स्थापना कारणपरत्वें जाहाल्या त्या वेणुबाईनी चरित्र वर्णिलें आहे डोळेगावचे मारुती सुध्धा

१८ शिवाजीमहाराज यास आनुग्रह शके १५७१ शिंगणवाडीचे बागेंत वैशाख शुध्ध नवमी गुरुवारीं जाला वरकड शिवछत्रपतीप्रकरण आलाहिदा लिहिलें आहे

१९ शके १५७१ ज्येष्ठ मास कड्यांत भोजनास घातले व तुकाराम याजकडे पाठऊन तेथें भोजनास घालविलें हें चरित्र जाहालें

२० पंढरीस गेल्याचें चरित्र शके १५७१ आषाढमासीं जाहालें

२१ परळीस नेहमीं राहाणें शके १५७२ विकृतीनामसंवत्सर कार्तिकमास

२२ शके पंधराशे त्र्याहात्तरींत विड्याची गोष्ट जाहाली खरसंवत्सर वैशाखमास

२३ शके १५७३ त्र्याहात्तरींत रंगनाथस्वामी याचें चरित्र रेड्याची गोष्ट जाली

२४ शके १५७४ तुपाचे घागरीचे चरित्र नंदननाम संवत्सर चैत्र शुध्द १० दशमीस जांबेत जाहालें मातापुरास जाऊन पंचाहतरींत सारंगपुरचे मारुतीचे चरित्र होऊन शाहातरींत कृष्णातीरीं आले

२५ वेणुबाईस श्रीरघुपतींनी गळ्यांत माळ घातली शके १५७६ चरित्र

२६ शके १५७७ येकनाथपंत याचे चरित्र जाहालें या च शकांत वैशाख शुध्द द्वितीयेस शिवाजीमहाराज याणी झोळींत चिठी टाकली मन्मथनाम संवत्सर या च सालीं रामेश्वरास स्वारी गेली चंदावरीं येकोजी-राजेयास कार्तिकमासीं आनुग्रह जाहाला वेणुबाईस मिरजेस या च शकांत ठेविलें

२७ शके १५७८ या शकांत कोहिनेत स्वामी बुडाल्याचें चरित्र श्रावण मासीं या च शकांत माघ वद्य प्रतिपदेस वडगांवीं रंगनाथस्वामी याचा घोडा उठविला याचें चरित्र जाहाजाचें चरित्र या च सालीं

२८ शके १५७७ ज्येष्ठ शुध्द तृतीया प्रातःकाळीं परळीहून जांबेस मातुश्रींचे अंतकाळीं गेल्याचें चरित्र या च शकांत कल्याण गोसावी यास तोडतो म्हणोन धाविले तें चरित्र

२९ शके १५७९ चैत्र वद्यांत निरंजनस्वामीची गोष्ट व त्यास आनुग्रह माघ शुध्द चतुर्थीस हें चरित्र जाहालें

३० शके १५८० हुरड्याची गोष्ट मौजे देहगावीं जाहाली विलंबी संवत्सर या च शकांत शीतज्वराची गोष्ट व सदाशिवशास्त्री याची गोष्ट या शकांत चरित्रें जालीं

३१ शके १५८१ विकारीसंवत्सरीं श्रेष्ठाचे दर्शनास शिवछत्रपती जांबेस गेले होते

३२ उत्धव गोसावी याणी कीर्तन केलें चाफळी श्री पुढें मागें मारुतीनी टाळ वाजविला हें चरित्र शके १५८२ शार्वरी संवत्सरीं चैत्र वद्य ५ ला जाले

३३ ब्रह्मनाळीं समर्थ गेले होते तेथें रघुनाथस्वामीचें वृंदावन डोललें शके १५८८ पराभव संवत्सर आश्विन शुध्य दशमीस चाा जालें

३४ शके १५९५ प्रमादि संवत्सरीं शिवछत्रपती कर्नाटकांत स्वारीस गेले तेथें तपश्चर्येस राहावें म्हणोन बोलिले याचें चरित्र आलाहिदा आहे

३५ सिंहासनाधीश्वर शिवछत्रपती यास राज्याभिषेक १५९६ आनंद-नाम संवत्सर ज्येष्ठ शुध्य त्रयोदशी समारंभ जाला नंतर सज्जनगडीं माहाराज येऊन दीडमास श्री पासी समारंभ बहुत ब्राह्मणभोजन इत्यादि जाले याचा तपशील बाजीपंत याणी लिहिला आहे

३६ श्रेष्ठ परंधामा प्रति गेले हें चरित्र १५९९ पिंगळनाम संवत्सर फाल्गुण वद्य त्रयोदशी मौजे दहिफळ बुाा परगणे शेवली माध्यान्हीं परंधामा प्रती गेले आमावास्येस पार्वतीबाई परंधामा प्रति गेली हें चरित्र व श्रेष्ठाचे आजन्मपर्यंत जालेलें त्रिंबक गोसावी मठ भालगांव याणी लीला वर्णिलेलें आहे

३७ शके १६०० काळ्युक्ताक्षिसंवत्सर रामचंद्रबावा शामजीबावा यास वैशाखमासीं जांबेहून दर्शनास आणिले संवत्सरपर्यंत होते श्रीदेवीच्या दर्शनास प्रतापगडास स्वामी गेले ज्येष्ठमास वेणुबाई आषाढ वद्य नवमीस परंधामा प्रति गेली ( रुजु चैत्र वद्य चतुर्दशीस वेणुबाई परंधामास गेली ) येकोजीराजे याणि समर्थास चंदावरास घेऊन गेले त्या काळीं मल्हार निंबदेव येलुरकर यास मूर्ती चवदा मणाच्या तयार करावयास सांगोन आले भाद्रपदमासीं पनाळ्यास जावयास छत्रपती आले आश्विन शुाा दशमीचे दिवशीं पत्र करून स्वामीपासी ठेविले कल्याणगोसावी यास डोमगावास रवाना मार्गशीर्षमासीं केलें हीं चरित्रें सोवळाशांत जालीं भक्तमंडळीनी चरित्रें आलाहिदा लेहून ठेविलीली आहेत

३८ शके १६०१ सित्धार्थीसंवत्सरीं पौष शुध्य नवमीस आले तें माघ शुध्य पौर्णिमे पर्यंत होते नित्यनित्य समारंभ हि त्या काळीं बहुत केला समर्थ

निरोप देते समई अनेक प्रकारच्या राजधानी संमंधें सांगोन अध्यात्मपर विषय हि श्री नी सांगितला तीन दिवस समाधी लागोन राजश्री बसले होते नंतर समाधिउत्थापन करून पुन्हा अनेक प्रकारच्या गोष्टी होऊन त्यात परंधामास जाणार हे समर्थांनी सुचविलें माघ शुध्य पौर्णिमेस राजश्री आज्ञा घेऊन रायगडास गेले राजश्री गेल्या नंतर उत्धव गोसावी याणी समर्थास प्रश्न केला प्रश्नाचें उत्तर जाल्यावर उत्धव गोसावी याणी विनंति केली राजश्रीस आवकाश थोडा राहिला आपल्या त्याच्या भाषणात उमजलो किती आवकाश राहिला तो स्वामीनी स्वमुखें आज्ञा करावी बापा आज पासुन साष्ट दिवसाचा आवकाश आहे म्हणोन आज्ञा जाली हें सविस्तर चरित्र उत्धवगोसावी याणी लेहून ठेविले आहे राजश्री परंधामा प्रति गेले शके १६०२ रौद्रनाम संवत्सर चैत्र शुध्य पौर्णिमा रविवारीं.

३९ राजश्री परंधामास गेल्या नंतर श्री पर्याटण करावयाचे टाकिलें वैशाखमासीं राजश्रीनी नूतन गृह केलें त्यांत वैशाखमासीं प्रवेश केला राजश्री शंभुछत्रपती दर्शनास रामचंद्रपंत सुध्या ज्येष्ठमासीं दर्शनास येऊन आठ दिवस राहोन आज्ञा घेऊन गेले नंतर आणखी कांहीं चरित्रें जालीं तीं भक्तमंडळीनी लेहून ठेविली आहेत माघ शुध्य आष्टमीस मल्हारि निंबदेव व केशव गोसावी याणी मूर्ती चंदावराहून घेऊन आले नंतर माघ वद्य पंचमीस मूर्तीची पूजा समर्थांनी करून पाच दिवसाचा आवकाश म्हणोन भक्तमंडळीस आज्ञा केली त्या काळचे भाषणे जी जी जाहाली ती भक्तमंडळीनी व दिवाकर गोसावी याणी आलाहिदा लेहून ठेविली आहेत श्री परंधामा प्रति शके १६०३ दुर्मतीनाम संवत्सरीं माघ वद्य नवमीस शनवारीं गेले अनेक प्रकारचीं चरित्रें श्री नी केलीं त्याचा अंत नाहीं तथापि भक्तमंडळीनी कांहीं कांहीं लेहून ठेविली आहेत दिवाकर गोसावी याणी अंताजी गोपाळ वाकेनीस कुडाळकर यास लेहून ठेवावयास सांगितलें त्या प्रती वरून गोपाळ अंबाजी शाहापुरकरी लिहिले मिती फाल्गुन शुध्य पंचमीस लिहिले आसे ”

असें हें वाकेनिसी टिपण आहे. तें महत्त्वाचें आहे. श्रीसमर्थांच्या निर्याणा-नंतर चार च दिवसांनीं म्हणजे माघ वद्य १३ स दिवाकर गोसावी यांच्या आज्ञेवरून अंताजी गोपाळ कुडाळकर यांनीं तें केलेलें आहे. तेथून पुढें सात

च दिवसांनीं फाल्गुन शुद्ध ५ स त्याची प्रत शहापुरकर गोपाळ अंबाजी यांनीं केली. त्या प्रतीवरून तें 'श्रीसांप्रदायिक विविध विषय' या ग्रंथांत विषयांक २१ म्हणून प्रकाशित करण्यांत आलेलें आहे. या टिपणांत चुकी नसेल च, असें म्हणतां येणार नाहीं, पण चुकी होण्याचा संभव फार थोडा. मी हें टिपण अत्यंत विश्वसनीय मानतों. फक्त एका ठिकाणीं, श्रीसमर्थप्रतापांतील ओवीची संगति लागावी म्हणून मी १५८० तील सिंहस्थाला श्रीसमर्थ नाशकास गेले होते, असें मानलें आहे आणि त्यामुळें चाफळास श्रीरामाची स्थापना १५८२ त झाली, असें म्हटलें आहे. नाशकास गेल्याचा सिंहस्थ १५६८ तील मानतां येईल तर उत्तम च, पण मग प्रतापांतील ओवीची संगति लागत नाहीं. या टिपणांत तेरा ठिकाणीं तरी, इतरांनीं आलाहिदा लिहून ठेवलेल्या प्रसंगांचा उल्लेख आहे. पुढिलांनीं संशोधन करण्याला हा केवढा प्रांत मोकळा आहे!

## (२) बखरीवरून शकावली

[ शके १८१० मध्यें यदुवंशीय ठक्कर गोवर्धनदास लक्ष्मीदास यांनीं मुंबई येथें जगदीश्वर छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलेल्या बखरीच्या दुसऱ्या आवृत्तीवरून ही शकावली तयार केली आहे. बखरीची पहिली आवृत्ति १७९२ त निघाली होती. ]

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| १ | शिष्यांनीं विचारल्यावरून हनुमंतस्वामींनीं बखर सांगितली | १७१५ माघ व. १२ | १ |
| २ | पैगंबरउत्पत्ति | ५१२ | १२ |
| ३ | गंगाधरस्वामींनीं चरित्र पूर्वी च सांगितलें होतें | १६४० ज्येष्ठ शु. ५ | १३ |
| ४ | पूर्वज बेदर प्रांतांतून प्रथम गंगेच्या दक्षिण तीरीं हिवरें येथें आले | ८८४ | १५ |
| ५ | पूर्वजांनीं जांब गांव बसविलें | ९१० | १७ |
| ६ | सहा प्रबळ यवनांनीं रामराजाचें राज्य हरण केलें | १२०० | १८ |
| ७ | सूर्याजीपंतास सूर्यनारायणाचा वर | १५२५ माघ शु. ७ | २० |
| ८ | सूर्याजीपंतास कीर्तनांतून पारावर हकिमाच्या रूपांत श्रीरामरायाचें बोलावणें | १५२६ चैत्र शु. ८ | २२ |
| ९ | श्रेष्ठांचा जन्म | १५२७ मार्गशीर्ष १३ | २७ |
| १० | समर्थांचा जन्म | १५३० चैत्र शु. ९ | २७ |
| ११ | येकनाथांचें निर्याण | १५३१ फाल्गुन व. ६ | २९ |
| १२ | श्रेष्ठांना श्रीरामाचा अनुग्रह | १५३६ फाल्गुन शु. ११ | ३० |
| १३ | सूर्याजीपंतांचें निर्याण | १५३७ मार्गशीर्ष शु. ९ | ३० |
| १४ | समर्थांना श्रीरामाचा अनुग्रह | १५३८ श्रावण शु. ८ | ३२ |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| १५ | पुरश्चरणास आरंभ | १५४२ माघ शु. ७ | ३६ |
| १६ | दशकपंचक गांवच्या कुळकर्ण्यांची स्त्री सती जाण्यास आली असतां तिला दिलेला आशीर्वाद | १५४५ वैशाख शु. १० | ४० |
| १७ | कृष्णाप्पांनीं वडगांवीं जितसमाधि घेतली | १५४५ माघ शु. १५ | ४३ |
| १८ | श्रीशिवराज जन्मले | १५४९ वैशाख शु. ३ | ४३ |
| १९ | पुष्पाची गोष्ट | १५५४ रामनवमी | ४४ |
| २० | श्रीसमर्थ तीर्थाटणास निघाले | १५५४ फाल्गुन शुद्धांत | ४९ |
| २१ | कृष्णातीरीं आले, ते प्रथम महाबळेश्वरीं | १५६६ वैशाख | ७० |
| २२ | मसुरास मारुतीची स्थापना करून रामनवमीच्या उत्सवास प्रारंभ केला | १५६७ | ९१ |
| २३ | अंगापुर डोहांतून मूर्ति काढल्या | १५६९ | ९७ |
| २४ | चाफळास उत्सवाची सुरुवात | १५७० | १०० |
| २५ | चिंचवड येथें मोरया देव, तुकाराम आणि समर्थ यांनीं आपआपल्या उपास्य दैवतासह भोजन केलें | १५७० | १११ |
| २६ | श्रीशिवरायास प्रतापगडीं स्वप्नांत दर्शन देऊन प्रत्यक्ष नारळ दिला | १५७१ वैशाख शु. ४ मंदवार | ११७ |
| २७ | श्रीशिवरायांना मंत्रानुग्रह | १५७१ वै. शु. ९ गुरुवार | १२६ |
| २८ | श्रीशिवराय प्रतापगडीं परत जाऊन मातुःश्रीस वगैरे भेटून नारळ, माती व खडे या प्रसादाचा भावार्थ सांगतात | १५७१ ज्येष्ठ शु. ९ | १५० |
| २९ | कुबडीतीर्थाची निर्मिती, अरण्यांत भोजनें, राजांना तुकारामांकडे पाठविणें, सिद्धी | १५७१ आषाढ | १५८ |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ३० | छाटी उडाली ती आणण्यास कल्याणांनीं तटाखालीं उडी टाकली | १५७१ | १६२ |
| ३१ | ब्राह्मणानें अनुग्रह परत केला तेव्हां वाचा गेली, अक्षरें चाटून वाचा आली | १५७१ ज्येष्ठ वद्य | १६४ |
| ३२ | श्रीशिवाजी राजे तुकाराममहाराजांकडे जातात, तुकारामांचें सहा अभंगांचें पत्र, पुण्यास शितोळे देशमुखांकडे भेट | १५७१ | १६९ |
| ३३ | अबदुलखानाचा वध | १५७१ मार्गशीर्ष शु. ५ शुक्रवार | १७३ |
| ३४ | अकरा मारुती व डोलगांवचा मारुती यांना अकरा अकरा बिघे जमीन | १५७१ मार्गशीर्ष | १७८ |
| ३५ | समर्थ पंढरपुरास जातात—येथें उभा कां श्रीरामा ! • • | १५७१ | १८८ |
| ३६ | श्रीसमर्थ रायगडावर प्रकट होतात, आंब्याच्या फोडी | १५७२ | १८९ |
| ३७ | बागप्रकरण-समर्थ परळीस रहावयास जातात | १५७२ | १९४ |
| ३८ | इमारतीप्रकरणें — सामनगड किल्ल्यावर बेडकीची गोष्ट | १५७२ | २०४ |
| ३९ | श्रेष्ठांचें समर्थांना पत्र व त्याचें उत्तर | १५७३ | २०६ |
| ४० | श्रीच्या तीन आज्ञा ( १ ) श्रावण मासीं कोटी पार्थिव लिंगें, ( २ ) ब्राह्मणांना दक्षिणा, ( ३ ) राम राम म्हणत जावें | १५७३ | २०९ |
| ४१ | भोळारामाची पिकदाणी आणि खलबत्ता | १५७३ वैशाख | २१६ |
| ४२ | रंगनाथांची रेड्याची गोष्ट | १५७३ मार्गशीर्ष शु. ५ | २२७ |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ४३ | पाडळी गांवास आग | १५७३ फाल्गुन वद्य १३ | २३२ |
| ४४ | शहाजीमहाराज समर्थांच्या भेटीस येतात | १५७३ | २३६ |
| ४५ | समर्थांचें जांबेस जाणें, तेथून मातापुरास, दत्तदर्शन, ब्राह्मण पळाले | १५७३ | २४३ |
| ४६ | तेथून इंदुरजवळ श्रीरंगपुरास – पाउसाची गोष्ट | १५७३ | २४७ |
| ४७ | परत जांबेस, तुपाची घागर | १५७४ रामनवमी | २४७ |
| ४८ | कृष्णातीरीं परत आले, राजांची भेट, परस्पर वृत्तान्त | १५७६ | २५० |
| ४९ | एकसष्ट होनांची गोष्ट | १५७६ | २५०-२५७ |
| ५० | कल्याणास सर्पदंश | १५७६ | २६० |
| ५१ | उडपीच्या मध्वाचार्यांकडील मनुष्य, अन्नास कुत्रें शिवलें | १५७६ | २६५ |
| ५२ | रामेश्वरास जाण्यास परळीहून निघाले | १५७७ वैशाख शु. २ | २६५ |
| ५३ | व्यंकोजीराजास अनुग्रह | १५७७ ज्येष्ठ व. ३ | २६८ |
| ५४ | मातुःश्रींचें निर्याण | १५७७ ज्येष्ठ शु. ३ | २७२ |
| ५५ | ( १ ) मिरजेस जयरामकथा<br>( २ ) छिद्रांतून निघणें<br>( ३ ) वेणाबाईचा मठ | १५७७ श्रावण | २७९ |
| ५६ | ( १ ) झोळींत राज्यदानचिठ्ठी<br>( २ ) सावधताप्रकरण | १५७७ चैत्र वद्य | २८९ |
| ५७ | समर्थ एकान्तांत भोजन करीत असतां वेणुबाई विचारावयास गेल्या व मूर्छित होऊन पडल्या | १५७७ | २९० |
| ५८ | उद्धव इंदुराहून भेटीस आले | १५७८ | ३०७ |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ५९ | (१) कोयना नदींत भोवऱ्यांत सांपडले.<br>(२) बुडाली तनूची जया शुद्धि नाहीं। | १५७८ | ३११ |
| ६० | समर्थ वडगांवीं जातात, तेथें रंगनाथ हैद्राबादेहून एका दिवसांत घोड्यावर येतात, घोड्याचा प्राण जातो, तिघांचे श्रीसमर्थस्तुतिपर तीन श्लोक आणि समर्थांचा त्या तिघांवर एक. चौघांचा मिळून एक श्लोक | १५७९ माघ शु. १५ व वद्य १ | ३२० |
| ६१ | राजांनीं समर्थांना घोडा नजर दिला. त्याचें नांव रामबाण | १५७९ | ३२१ |
| ६२ | निगडीहून परळीस येत असतां वाटेंत घडलेली देहेगांवची हुरड्याची गोष्ट | १५८० पौष | ३२५ |
| ६३ | छाटींत हिंव, उपदेश | १५८० फाल्गुन व. ११ | ३२७ |
| ६४ | सदाशिवशास्त्री देव येवलेकर ऊर्फ वासुदेव पंडित यांचा दिग्विजय, गंधर्वाची गोष्ट | १५८० माघ | ३४१ |
| ६५ | श्रीसमर्थ चौखांबींत बसले असतां राजापुरकर मुंजे यांच्या जहाजाची गोष्ट | १५८१ पौष व. ५ | ३४२ |
| ६६ | १ उपदेश—वासना<br>१ भवानी तलवार<br>१ कुंकुमाचा मळवट<br>१ पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी | १५८१ माघ वद्य ५ ते ९ | ३४८ |
| ६७ | उद्धवाची कथा, मागें हनुमंत उभे, उद्धवाच्या झग्यास शेंदुर, श्रीसमर्थ उपस्थित होते. | १५८१ | ३५० |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ६८ | राजांचा मुक्काम राक्षसभुवनावर पडला असतां तेथून जांबेस राजे जातात, श्रेष्ठांना भेटतात, परतल्यावर श्रीसमर्थांचा तत्त्वज्ञानपर मौल्यवान् उपदेश | १५८१ चैत्र | ३५५ |
| ६९ | वासुदेव पंडितांनीं मंत्रांत केलेला फरक | १५८३ | ३५६ |
| ७० | समर्थांचें कल्याणीस जाणें, शिवराम पूर्णानंदाची भेट, शिवरामांनीं पंचीकरण केलेलें दाखविलें, त्याच्याच शेवटीं समर्थांनीं पांच ओव्या घालून जणूं मोर्तब केला | १५८३ | ३५८ |
| ७१ | शिकार — चिमण्यांचा ढीग — पैठणास व साताऱ्यास | १५८३ | ३६३ |
| ७२ | माया सत्य कां मिथ्या? दोरीचा सर्प खरा कां खोटा? | १५८४ | ३७३ |
| ७३ | जेजुरीच्या खंडोबाचें दर्शन | १५८५ | ३७६ |
| ७४ | चंद्रगिरीच्या डोंगरांत समर्थ व रंगनाथ यांची भेट | १५८६ पौष | ३७८ |
| ७५ | पाटगांवच्या मौनीबावांचा शिष्य येतो, माहुलीस कृष्णेंत थालीपीठ, मेलेल्या गाईचें दूध | १५८७ | ३८४ |
| ७६ | जयराम आणि समर्थ, विहिरीवर स्नान, जयराम बुडाले | १५८८ | ३८७ |
| ७७ | वाघिणीचें दूध, महाबळेश्वराच्या जंगलांत | १५८८ | ३९४ |
| ७८ | ब्रह्मनाळ, रघुनाथ स्वामींच्या वृंदावनांचा डोल, त्यावर समर्थांचे दोन श्लोक | १५८९ | ३९६ |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ७९ | केशवखेरीज चौघे बाहे येथें, ज्योतिषी यांची विधवा, रेडकु मेलें, म्हैस निरंतर दुप्पट दूध देऊं लागली | १५९० | ४०० |
| ८० | उंबरजेस मारुतीनें समर्थांना हात देऊन कृष्णेंतून काढलें | १५९० | ४०० |
| ८१ | रंगनाथ भागानगरास एका म्हाताऱ्या विधवेकडे नैवेद्यास. एक पत्रावळ आणि दोन भाकरी, त्यांनीं इतर चौघांना बोलाविलें, बाईचें नांव आनंदीबाई ठेविलें | १५९१ | ४०८ |
| ८२ | पालीस शाहिरांच्या दोन तडांतील भांडण समर्थांनीं सवाल टाकून मिटविलें | १५९२ पौष शु. १० | ४०९ |
| ८३ | पवाराच्या निगडीचे रंगोबा, कमरेखालीं तोडावा, पालीस मठ | १५९४ चैत्र शु. ६ | ४१० |
| ८४ | शिवाजी राजे कर्नाटकची स्वारी करून आले | १५९४ चैत्र | ४११ |
| ८५ | कऱ्हाडचे निरंजन, गणेशभक्त, समर्थांचें मार्गदर्शन | १५९४ माघ शु. ४ | ४१५ |
| ८६ | शिवाजीराजे पुन्हां कर्नाटकच्या स्वारीवर जातात, अनेक क्षेत्रें पाहण्यांत येऊन कर्दळीवनांत वैराग्य प्राप्त, देवीचा संचार विचारणारे दत्तो मंगाजी व गंगो मंगाजी व लिहिणार बाळाजी आवजी | १५९५ चैत्र व. १३ | ४२० |
| ८७ | चाफळास चोरटे | १५९५ | ४२३ |
| ८८ | बोक्याच्या डोळ्यांत तिखट | १५९५ | ४२८ |
| ८९ | प्रथम समर्थांना राज्याचीं चिन्हें समर्पण करून मग राज्याभिषेक | १५९६ ज्येष्ठ शु. १३ | ४३१ |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ९० | कपिलाषष्ठीची पर्वणी माहुलीस-दगडाचें सोनें झालें | १५९७ | ४३४ |
| ९१ | दहिफळ येथें श्रेष्ठांचें निर्याण | १५९९ फाल्गुन व. १३ सह १४ | ४३६ |
| ९२ | श्रेष्ठांचे पुत्र रामजी व शामजी यांस आणण्यासाठीं पत्र देऊन उद्धवांना रवाना | १६०० चैत्र शु. १३ | ४३८ |
| ९३ | उभयता पुत्रांना परत जांबेकडे रवाना | १६०० माघ व. १ | ४४० |
| ९४ | गुदस्ता किंचित दुष्काळ म्हणून मनाचे श्लोक करून शिष्यांना कोंकणांत पाठविलें होतें, हें ऐकून राजे यांनीं हरजिनसी १२१ खंड्या धान्याची नेमणूक करून दिली | १६०० आधिक (?) शु. १० | ४७१ |
| ९५ | पोटरीस बांधलेल्या आंब्याची गोष्ट | १५९३ | ४७६ |
| ९६ | श्रीवेणाबाई निजधामास गेल्या. | १६०० चैत्र व.१४व३० | ४८१ |
| ९७ | तत्पूर्वी त्यांना एकदां हिंवताप आला होता त्या प्रसंगाची गोष्ट | १५७५ फाल्गुन शु.११ | ४८० |
| ९८ | तेहतीस गांवांची सनद | १६०० आश्विन शु.१० | ४८२ |
| ९९ | त्या तेहतीस गांवांत डोमगांव होतें, तेथें जाऊन मठ करून रहावें, अशी कल्याणांना आज्ञा | नंतर | ४८२ |
| १०० | सज्जनगडावर श्रीसमर्थांपाशीं महिनाभर राहून अनेक प्रकारचा उपदेश श्रवण करून राजे रायगडास जातात. | १६०१ माघ शु. १५ | ४८७ |
| १०१ | श्रीशिवरायांचें परंधामा प्रत जाणें व श्रीसमर्थांची खिन्नता | १६०२ चैत्र शु.१५ | ४९० |
| १०२ | नाइट्याची गोष्ट, देवीचा नवस, येक चि मागणें आतां | तत्पूर्वी एकदां | ४९२ |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| १०३ | तसें च राजे यांच्या आग्रहावरून श्रीसमर्थ रामजी व शामजी यांना घेऊन प्रतापगडीं गेले होते | पूर्वी १६०० त | ४९९ |
| १०४ | १६०२ त श्रीसमर्थ चाफळास उत्सवाला गेले नव्हते, शहापुरकर व शिराळकर यांचा वाद, निकालाची कलमवार यादी, १६०३ च्या उत्सवाला गेले होते | १६०२<br>१६०३ | ४९९<br>५०० |
| १०५ | श्रीसमर्थ एकटे च श्रीरामाची शेवटची प्रार्थना करून आज्ञा मागत असतां देवालयांत भरलेलें तेज | १६०३ चैत्र व. १३ | ५०३ |
| १०६ | दासबोधाचा विसावा दशक समाप्त केला | १६०३ मार्गशीर्ष | ५०३ |
| १०७ | संभाजी राजे यांना पत्र<br>अखंड सावधान असावें । | १६०३ पौष | ५०९ |
| १०८ | रविकुळटिळकाचा वेध संनीध आला। तदुपरि भजनाशीं पाहिजे सांग केला । अनुदिनिं नवमी हे मानसीं आठवावी बहुत लगबगीनें कार्यसिद्धी करावी ॥ | १६०३ माघ शु. ६ | ५१२ |
| १०९ | चंदावराहून मूर्ति आल्या | १६०३ माघ व. ५ | ५१२ |
| ११० | श्रीसमर्थांनीं देह ठेवून निजरूपीं प्रवेश केला | १६०३ माघ वद्य ९ मंदवार | ५१९ |
| १११ | माघ वद्य प्रतिपदा १६०४ पासून उत्सवास प्रारंभ | १६०४ | ५२१ |
| ११२ | संभाजीमहाराज यांस यवनांनीं संगमेश्वराकडून धरून नेलें, त्यांचा काळ झाला | १६१० | ५२२ |

| क्रमांक | प्रसंग | शक, मास, मिति | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ११३ | रामजी यांचे ज्येष्ठ चिरंजीव जांबेहून येऊन सज्जनगडीं दाखल झाले | १६३२ श्रावण शु. ५ | ५२४ |
| ११४ | उद्धवांचा काळ टांकळीस झाला | १६३२ फाल्गुन व. १ | ५२८ |
| ११५ | इकडे चाफळास श्रीसमर्थांच्या अस्थि वृंदावनांतून काढल्या तों तिकडे डोमगांवीं कल्याणांनीं देह ठेवला | १६३६ अधिक आषाढ शु. १३ | ५२९ |
| ११६ | आक्कांनीं देह ठेवला | १६४३ कार्तिक शु. १ | ५३० |
| ११७ | गंगाधरस्वामींचा काळ झाला | १६५६ मार्गशीर्ष व. १२ | ५३१ |
| ११८ | जांबेच्या मूर्ति अदृश्य झाल्या | १६८२ मार्गशीर्ष शु. ८ | ५३३ |
| ११९ | नवीन मूर्ति चंदावराहून आणविल्या | १६८४ श्रावण शु. ६ | ५३३ |
| १२० | त्या मूर्तींची स्थापना | १६९१ | ५३४ |

## ( ३ ) श्रीसमर्थ कोण, कोठील, काय, कैसे एतद्विषयीं

### श्रीरामजानकीसंवाद

[ प्रथम उल्लासांतील दहावा परिच्छेद पाहणें ]

कोण्ही येक समई ब्रह्मारण्यीं ।
श्रीरामजानकी वधुवरें दोन्हीं ।
समर्थासी नैवेद्य करावया लागुनि ।
त्रिभुवनगृहस्थें बैसलीं ॥ १

सद्गुरुसमर्थें दोघें प्रकृतिपुरुषें देखिलीं ।
रघुवीर रघुवीर म्हणोनि बोलाविलीं ।
भिक्षा आहे रे म्हणोनि आक्षेपिलीं ।
म्हणती भिक्षा अस्ति अस्ति रे समर्था ॥ २

सध्यां वाढा वेगीं परमान्नें ।
उसीर न लावा घाला भोजनें ।
तुम्हांसी घडावीं ब्रह्मसंतर्पणें ।
म्हणोनी अनिर्वचनें विसर्जिलीं ॥ ३

तीर्थ कोणासी मी देत नाहीं ।
तपश्चर्येमध्यें राही ।
समर्था तुझ्या दर्शनें सर्व तीर्थें सेविलीं पाहीं ।
सुमनगंधमाळा धूप दीप जाले ॥ ४

सध्या वाढिलीं शुद्ध दिव्यान्नें ।
निर्मळ पाक पक्वान्नें ।
विशुद्ध शर्करा क्षीर परमान्नें ।
भात भक्ष वरान्नें कथिकेसहित ॥ ५

सर्व शाक सर्व पाक ।
पंचामृत वाढिलें ठेविलें शुद्धोदक ।
येको विष्णुरूपें संकल्प सोडूनि सम्यक ।
जानकीनायक अभिश्रवणी ॥ ६

आपोशन केलें समर्थें ।
जानकी देवी म्हणे कांतातें ।
समर्थ कोण कोठील काय कैसे हो तुम्हातें ।
कळले आहेती काय जी ॥ ७

सुखें पुसेसिना कां तूं वचनीं ।
दिसताती देवा अनिर्वचनी ।
भोजन संपतां चि बहुधा निरंजन वनीं ।
जातील नेणों समर्थ ॥ ८

समर्थासी कैसी पुसों मी तुम्हाविणें ।
तुम्हा आधिन माझें सर्व जिणें ।
माहापुरुष कोण कैसे कोण जाणे ।
भोजनसमई हे बोलऊं नयेती ॥ ९

दिसताती मायात्यागी वैरागी ।
कोण जाणे कैसें वर्तती जगीं ।
तुमच्या आश्रयें मी करूनि सलगी ।
समर्थातें पुसतसें ॥ १०

बापा समर्था तूं कोण आहेसी ।
कांते अबोलण्यासी कां तूं बोलविसी ।
उत्तरप्रत्योत्तरेंविण या माहापुरुषासी ।
चाड नाहीं निर्धारें ॥ ११

ऐसीं बोलती जव रामजानकी वधुवरें ।
तव खुणा दाविलें श्रीगुरुसर्वेश्वरें ।
सांगा आपुल्या कांतेसी सत्योत्तरें ।
उत्तरप्रत्योत्तरें आम्ही श्रवण करूं ॥ १२

जानकी म्हणे माहापुरुषाची कोण वो स्थिति ।
कांते यांची दिसते आत्मस्थिति ।
देवा जी सांगा यांची कोणसी परोगती ।
प्रिये आत्मगती यांची दिसताहे ॥ १३

कोण हो यांची दिसते वृत्ति ।
यांची केवळ उदास वृत्ति ।
कैसी हो यांची व्यक्त मूर्ति ।
अमूर्त मूर्ति समर्थाची ॥ १४

कोण हो यांची देह अवस्था ।
कांते कैवल्यदेह उन्मनी अवस्था ।
कोठें हो यांची दिसते आस्था ।
शुद्ध परमार्थी आस्था दिसताहे ॥ १५

स्वामि कोण हो यांचें गांव ।
कांते यांसी नाहीं गांव शिव ।
कोण हो यांचें नांव ।
नाम रूप नाडळे सर्वथा ॥ १६

दिसताती देवा देहधारी ।
कांते केवळ लीळावतारी ।
बाह्य दिसती वो कर्मशरीरी ।
अंतर कांहीं अनारिसें ॥ १७

कोण वो यांचें धाम ।
यांचें केवळ परंधाम ।
कोठें वो यांचा विश्राम ।
आत्मारामनिरंजनीं ॥ १८

कोठें हो समर्थ असती ।
सर्वीं सर्वत्र घटीं दिसती ।
कोणे स्थळीं हो यांची वस्ति ।
निर्मळ निश्चळीं सर्वदा ॥ १९

काय हो सर्वदां भक्षिती ।
कांते सदैव परमान्न भक्षिती ।
कोण हो स्वरूप मनीं लक्षिती ।
अलक्ष लक्षिती परब्रह्म ॥ २०

माहापुरुषाचा कोण हो पंथ ।
यांचा आकाशमार्गीं गुप्त पंथ ।
कोण हो यांचा प्रांत ।
कांते अंतप्रांतासी अलिप्त हे ॥ २१

माहांपुरुषाचें कोण हो वन ।
यांचें केवळ आनंदवन ।
समर्थाचें कोण हो भुवन ।
सच्चिदानंद भुवन त्रिभुवन हें ॥ २२

समर्था यांचें कोण हो स्थान ।
यांचें सर्वीं सर्वत्र संस्थान ।
कोणेकडे हो यांचें प्रस्थान ।
गगनगर्भनिरंजनीं ॥ २३

कोण हो यांचा आनंद ।
कांते यांचा परमानंद ।
यांचा कोण कैसा हो ब्रह्मानंद ।
सच्चिदानंद त्रिपुटीमंद ब्रह्मानंदीं ॥ २४

सर्वेश्वरा माहांपुरुषासी आहे किं निद्रा ।
यांसी केवळ निश्चळ योगनिद्रा ।
यांची कोण जी सांगा मुद्रा ।
अगोचरी मुद्रा यांची जानकि ॥ २५

माहापुरुषाचें कोण जी आसन ।
जानकि यांचें सिद्धासन ।
समर्थाचें कोण जी उपासन
श्रीहरिसंकल्प उपासना ॥ २६

समर्थाचें कोण हें ध्यान ।
यासी केवळ श्रीगुरुध्यान ।
समर्थाचें कोण हो ज्ञान ।
शुद्ध विज्ञान परब्रह्म ॥ २७

समर्थाचा कोण मंत्र कोण यंत्र ।
तारक ब्रह्म मंत्र आत्मज्योति यंत्र ।
समर्थाचें कोण विधान तंत्र ।
नवविधा भजन विधान हें ॥ २८

समर्थें आवाहन विसर्जन कैसें केलें ।
दृश्य आवाहन करूनि विसर्जिलें ।
समर्थें आवर्ण काय जी मांडिलें ।
पिंड ब्रह्मांड आवर्णें ॥ २९

समर्थें कोण स्थापिली भक्ति मुक्ति ।
ऐक्य भक्ति सायोज्य मुक्ति ।
समर्थ समाधि कोण वो स्थापिती ।
सहज समाधि समाधानी ॥ ३०

समर्थें मानिली कोण हो माया ।
येथें बोलेल ते चि माया ।
काय जी बोलता श्रीरामराया ।
यथार्थ बोलतों आम्ही मायाब्रह्में ॥ ३१

समर्थ बोलती कीं न बोलती ।
सर्वेश्वररूपें अनुवादती ।
आपुलें समाधान कांहीं देवा सांगती ।
अधिकारें कथिती शिष्यवर्गा ॥ ३२

समर्थाचा कोण हो मठ ।
अवघा ब्रह्मांड यांचा मठ ।
तऱ्हि तऱ्हि यांचा सांगा मूळ मठ ।
विश्रांतिमठ परब्रह्मीं ॥ ३३

जगदीश्वरा यांचा कोण जी आश्रम ।
समर्थें केला चि नाहीं गृहस्थाश्रम ।
तऱ्हि तऱ्हि यांचा कोण वो आश्रम ।
ब्रह्मचर्याश्रम धगधगीतु ॥ ३४

देवा कैसें हो यांचें स्वरूपदर्शन ।
कांते सर्वी सर्वत्र संदर्शन ।
यांचें कोठें हो घ्यावें नित्य नेमें दर्शन ।
सज्जनगिरीमाझारी ॥ ३५

समर्थासी पुसतें मी कांहीं ।
समर्थें आश्रम कां अंगिकारिला नाहीं ।
समर्थ हनुमान अवतार सत्य पाहीं ।
ब्रह्मचर्याश्रम समर्थाचा ॥ ३६

देवा तुम्ही गृहस्थाश्रम अंगिकारिले ।
कांते तरि हे समर्थासी नैवेद्य जाहाले ।
स्वामि ऐसे चि अखंड नैवेद्य पाहिजेती घडले ।
कांते सर्वी सर्वत्र घडतील ब्रह्मांडोदरीं ॥ ३७

ऐसें जानकीदेवीनें जें जें पुसिलें ।
तें तें श्रीरामें सांगितलें ।
तव समर्थाचें भोजन जालें ।
अभिश्रवण केलें जगदीश्वरें ॥ ३८

समर्थें केलें शुद्धोदक प्राशन ।
समर्थें केलें उत्तर शुद्ध आचमन ।
निर्मळ निर्मळाचें करोद्वर्तन ।
मुखीं मुखशुद्धि गुळाळा मुखशुद्धि ॥ ३९

**मग समर्थांचीं शतपदी गमनें ।**
**अनिर्वचनीय आशीर्वचनें ।**
**समर्थ दिसताती बहुधा ध्यानस्थ मनें ।**
**आनंदवनप्रस्थानी ॥ ४०**

**त्रयोदशवर्णी त्रयोदशगुणी ।**
**जानकीकांतें तांबुल दिधला तत्क्षणीं ।**
**उदकपात्रें जेथील तेथें विसर्जन करूनि ।**
**समर्थ तारकपाणी वेगीं निघाले ॥ ४१**

कल्पना किती रम्य आहे! संवाद किती आल्हादकारक आहे! तो वाचीत किंवा ऐकत असतां एकाद्यास समाधि लागावी, इतकी त्याची योग्यता आहे! समाधि न च लागली, तर हृदय प्रेमानें आणि नेत्र आनंदाश्रूंनीं भरून तरी येतील! हा च संवाद जन्मभर वाचीन, त्याचें चिंतन करीन, त्यांत श्रीसमर्थांना पाहीन आणि स्वतःचा उद्धार करून घेईन, असा एकाद्याचा निर्धार व्हावा, इतकें आकर्षण या संवादांत खचित आहे! हें सारें करून हि मी मात्र कोरडा च राहणार काय? इच्छा प्रमाण!

## ( ४ ) मेरुस्वामींच्या शब्दांत

( श्रीरामसोहळा १ × ११ )

## ( श्री ) श्रीसमर्थांना अभिवंदन

श्रीरामसमर्थ आत्मरूप । षड्गुणऐश्वर्यें चित्स्वरूप ।
षड्गुणेश्वर सत्स्वरूप । मूळपुरुषा ॥ १

अमनउन्मनकलितांबरा । विदितावबोधधराधरा ।
सुवेद्यतत्त्वसुखकरा । प्रगटबोधा ॥ २

परम उपरमस्थान । परमगुरुत्वें सुप्रसन्न ।
निजयोगऐश्वर्यसंपन्न । स्वभावप्रभवा ॥ ३

प्रचुरतरप्रज्ञातरा । प्रमेयअद्वितीयपरावरा ।
प्रबोधपाथेय भवसागरा । भवभयशमना ॥ ४

संसर्गकल्मषहरणा । सुखैकघनसुधाकिरणा ।
सदयाब्धि संसरणा । निवारिसी सुखें ॥ ५

चिद्रांगनिस्तरंगभरणा । सशांतपरेशआभरणा ।
विज्ञानप्रतिष्ठितकरणा । करुणामूर्ति ॥ ६

स्वानंदज्योतिर्लिंग सोज्वळा । हृदयद्योतक उजाळा ।
प्रकाशविभवचित्कळा । झळाळ निजतेजें ॥ ७

विज्ञानजलजविकसिता । आत्मदिनमानप्रकाशता ।
स्वरूपपाथिक सुपथा । प्रकाश करिसी ॥ ८

भवभयभाजनभंजना । भेदनिर्जितप्रभंजना ।
सुवेद्यहिरण्यअंजना । निधान प्रकटिसी ॥ ९

अखिलजगत्कारणहरा । निखिलतत्त्वांगजिव्हारा ।
सकळागमनिगमधरा । समर्थस्वामी ॥ १०

स्वरूपक्षमासुप्रतिष्ठिता । स्वहितावबोधअवचिता ।
अवधानावतंसउन्नता । वरी विलाससी ॥ ११

ज्ञप्तिसुखउत्तुंगवेद्या । प्रतीती आस्तिक्य सुवेद्या ।
सत्य सनातन आद्या । आदिपुरुषा ॥ १२

जगदानंदभरणभरणी । अभिनवदशाची कारण करणी ।
भवजलतारकउत्धरणी । तव कृपा ॥ १३

अघटितघटनाघटीयंत्री । विमुक्तबोधकरें मोक्षसूत्री ।
स्वप्रकाश घन सर्वत्री । समान दया ॥ १४
स्वपददायक सदया । परमकृपाळु विदितहृदया ।
त्रिविधतापहरदया । अमृतघना ॥ १५
परमसंपन्नपरमार्था । अनाथनाथ श्रीसमर्था ।
कृतार्थपरंपरा निगमार्था । प्रबोधविसी ॥ १६
हृदयविबोधकसाक्षरें । रहस्यबीज अनाक्षरें ।
अक्षरब्रह्मगतिनिर्धारें । कृतार्थ करिसी ॥ १७
महावाक्य प्रणवपर । सच्चित्सुख अभ्यंतर ।
अबोधस्वयंभसाक्षात्कार । तुझेनि समर्था ॥ १८
अभिरामजगदभ्यंतर । शिवहृदयांबुजरससार ।
प्रबोधामृतधाराधर । वर्षसी सुखें ॥ १९
पुरार्जितसुकृतसिध्धी । विज्ञानवैरागरउपलब्धी ।
निरतिशय निरवधी । दयासंपन्नमूर्ती ॥ २०
मुमुक्षुचातकतृषा वारी । सद्भावचकोरामृतसुधाकरी ।
निववीलें हृदय परोपरीं ।
अभिवंदन तूंतें ॥ २१

## ( रा ) त्यांचें कृपावलोकन

अभिवंदनीं बोळला समर्थ । कृपेनें केलें चि कृतार्थ ।
पुढती प्रशंसूनि परमार्थ । उजळणी करी ॥ २३
बोधाचें शिखर निवृत्ति । स्वरूपीं नसे चि कांहीं प्रवृत्ति ।
वस्तु प्रत्यक्ष सर्वार्थी । व्यापकपणें ॥ २४
बोधबोधकग्राहिक । कारण नसे चि निश्चयात्मक ।
हा निज अंतरींचा विवेक । चळों नेदी ॥ २५
मिथ्याप्रारब्ध सत्संगती । उपासनाक्रम विशारदमूर्ति ।
सर्वहृदयस्थ दाशरथी । आपुला कीजे ॥ २६
जपोनि तारकब्रह्म जीवें । स्वरूपीं च राहे स्वानुभवें ।
सगुणउपासना सद्भावें । आर्जविली च आर्जवी ॥ २७
नित्यनेमें सन्मार्गभजन । प्रेमातिशय रघोद्भवपूजन ।
सर्वदां आर्जवी सज्जन । पूर्ण स्वसुखें ॥ २८

मनोहर मूर्ति सांवळी । आर्जवी प्रतीतीनें आगळी ।
न विसंबे ध्यान सर्वकाळीं । हें चि रहस्य ॥ २९
परमार्थसाभिमानी भीम । स्तवनें तोषवित जाय परम ।
त्याच्या चि निजध्यासें अंतर्याम । प्रगट करी ॥ ३०
असें कृपाळुपणें पूर्ण । समथ बोलिले सुप्रसन्न ।
सत्य उपासना चि कारण । ब्रह्मप्राप्तीसी ॥ ३१

## ( म ) त्यांचें वरदान

पुढती करूनियां नमन । मागितलें आश्वासन ।
जें आठवितां चि दर्शन । द्यावें अंतरस्थितीनें ॥ ५३
परमकृपाळ सदयहृदय । माथां कर ठेऊनि कृपान्वयें ।
दिल्हें वरदान अभय । मनोरथसिध्दीनें ॥ ५४

## ( दा ) त्यांच्या उपदेशाचें रहस्य

मागुतेन कृपेनें श्रवणीं । रहस्य सांगितलें समर्थांनीं ।
जे सर्वस्वें आर्जवी भजनीं । कोदंडपाणिविग्रह ॥ ५५
जें कां ध्येय सदाशिवाचें । परम जाप्य जापकाचें ।
सिध्दसाधुऋषीचें । आराध्य दैवत ॥ ५६
जें निज जीवन जीवांचें । जें हृदय सर्व निगमाचें ।
जें कुलदैवत विरक्तांचें । आर्जवी तया ॥ ५७
परम पवित्र अवतारचरित्र । परमगतीचे सत्क्षेत्र ।
स्वयंभ साक्षात्कारी स्वतंत्र । न विसंबे तयासी ॥ ५८
रामा ऐसें दैवत कैचें । अवतरलें सभाग्य सृष्टीचें ।
नाम चरित्र विख्यातचिं । पावन अधिदैवत ॥ ५९
नलगे तत्त्वशोधन । न करणें अध्यात्मविवरण ।
सर्वदा करीं रामध्यान । सगद्गदीत मानसें ॥ ६०
राम घननीळ सांवळा । सकळप्राप्तीचा जिव्हाळा ।
राहे जयाच्या ध्यान डोळां । तो चि कृतार्थ ॥ ६१
सद्भावें श्रीरामस्मरण । करील तो चि ज्ञानी पावन ।
काय करावें तें ब्रह्मज्ञान । रामीं प्रेम नसतां ॥ ६२

ऐसें समर्थें संबोधनीं । दृढाविलें रामभजनीं ।
जैसें अर्भकासी जननी । क्षणक्षणां शिकवी ॥ ६३
सकळ भक्तांचा कळवळा । सद्‌यसमर्थाची लीळा ।
येकात्मतेचा जिव्हाळा । जीवापासूनि सांगणें ॥ ६४
ऐसा समर्थ माझा उदार । जीवीं जडला निरंतर ।
लागला समर्थवेध निर्धार । येणें चि सभाग्य आम्ही ॥ ६५

## ( स ) आपलें भाग्य

समर्थ माझी गतीची निजगती । समर्थ माझी प्रतीतीची प्रतीति ।
समर्थ विश्रांतीची विश्रांति । जोडली मज ॥ ६७
समर्थ माझी तारक जननी । समर्थ ज्ञानसंजीवनी ।
समर्थ निजकृपेची खाणी । अवचट लाधलों ॥ ६८
समर्थ माझी अमृतवाहिनी । समर्थ माझी स्वानंदभरणी ।
समर्थ उन्मनीची निजउन्मनी । मज प्रत्यक्ष जाली ॥ ६९
समर्थ कैवल्याची धरणी । समर्थलीला अकल करणी ।
साच समर्थचरित्र श्रवणीं । चाकाटलें चित्त ॥ ७०
समर्थवचनें चित्त चमत्कारे । समर्थविरक्तीनें विरक्ति भरे ।
समर्थविख्यातीनें अवतरे । निजांगीं उद्बोध ॥ ७१
समर्थासी प्रशंसितां कोणी । मज्जे मन सुखाब्धिजीवनीं ।
समर्थमूळपुरुषस्तवनीं । आदरें चि प्रवर्ते ॥ ७२
समर्थ मज संकटीं सोडविता । समर्थ पावे मज आठवितां ।
समर्थावांचूनि सर्वथा । इतर गति असेना ॥ ७३
निजध्यास निश्चयेंसीं । वसोनि नित्य समर्थापासीं ।
असतां समर्थ सहवासी । भाग्यासी काय उणें ॥ ७४

या पांच उतार्‍यांत मन्नारगुडीच्या मेरुस्वामींची श्रीसमर्थचरणीं किती अनुपम निष्ठा होती, ती तर दिसून येत च आहे, पण एकंदर च श्रीसमर्थचरित्राचें रहस्य फलश्रुतीसह दर्शविलें जात आहे. मेरुस्वामींची ही निष्ठा आम्हांत उतरो व त्यांचा च प्रत्यय आपणा सर्वांस येवो, अशी श्रीचरणीं प्रार्थना आहे.

तोडूनि टाकी भवदुःखबेडी । त्या सद्गुरूची मज नित्य गोडी ।
दृढ लागली मी करूं काय आतां । नाचे सदा घेउनि पाय माथां ॥

---